# शुद्धिपत्र

| पान | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| १ | १० | धार्गा | वाई |
| २ | २० | िद | शिंदे |
| १० | १० | १०१२ | १०१६ |
| ११ | ३३ | बेळगाव | जळगाव |
| १४ | ३४ | डोंगराच्या | डागरच्या |
| १९ | २ | जावळ्याम | जवळ्याम |
| ३२ | १८ | खाम माळ | माळ |
| ३२ | २४ | गौनावर | गौंडावर |
| ३६ | २ | देई | देई, देह |
| ३६ | - | १९०४–०६ | १८८०–८७ |
| ३७ | ३ | स्वाराो | स्वाराचे |
| ३७ | २० | पैयला | पायला तादूळ |
| ३८ | ७ | अन्नाया घरी मुल | मुले |
| ४० | २० | पाग्णराच्या | नागपूरकराच्या |
| ४१ | ६ | रकुर्ना | कुस्ना |
| ४१ | १७ | चड्डा व | चाम |
| ५० | २४ | बापाच्या | आईबापाच्या |
| ५८ | २६ | रावनी | रामनी |
| ५९ | १ | ठेंगण | ठेंगणे |
| ५९ | ३३ | ताडावाव | तारीवाला |
| ६३ | ३ | जन्माचे | अन्माने |
| ६३ | १८ | टा० पा० | टा० जा० |
| ७० | १५ | नेवण | जेवण |
| १०५ | २० | पन्नि | पईक |
| १९० | ३४ | धयात | व्यापारधयात |
| १६० | ३४ | असल्याने व्यापार | असल्याने |
| २०९ | १ | गुदानी | गुदाना |
| २०४ | २२ | मूल | मूम गोल्ड |
| २११ | २ | पायान अधा इराप | पायान इराप |
| २१३ | १६ | धाग्गा | भामले |
| २२१ | १० | १९१० | १९२० |
| २९० | ३३ | दत | मोफत दत |
| ३६३ | १० | एकाणसाम | एकोणचाळीस |
| ३६७ | १७ | झोप | झाप |

ॐ

# साष्टांग प्रणिपातपूर्वक

ॐ

डॉ० पांडुरंग चिमणाजी पाटील, डी० एस्‌सी० (सेवानिवृत्तीनंतर शेताच्या अर्थशास्त्रावर प्रबंध लिहून मुंबई विद्यापीठाचे पहिले डी० एस्‌सी० हा बहुमान मिळविणारे) हे मराठा समाजातील एक थोर पुरुष आहेत त्यांच्या आठवणी वाचकांच्या पुढे रुजू करण्याचें काम मजकडे आलें आहे हा मी माझा बहुमान समजतों वास्तविक पाटीलसाहेबांना आशीर्वाद देऊन त्यांच्या या वयांतील साहित्यिक पराक्रमाचें कोडकौतुक करण्यास एखादें वडिलधारें माणूस हवें होतें परंतु या अठ्ठयाऐंशीं वर्षांच्या नवजात साहित्यिकास आशीर्वाद देण्यास वडिलधारें माणूस मिळणें कठीण होतें शिवाय हें काम मींच करावें असा पाटीलसाहेबांचा आग्रह होता पुस्तक त्यांनीं लिहिलें असलें तरी मीं सारखा तगादा लावून त्यांच्याकडून हें काम करवून घेतलें आहे म्हणजे एका अर्थानें हें पुस्तक माझेंच आहे शहाजहानानें ताजमहाल बांधला असें आपण म्हणतोंच की नाहीं? तो रेखाचा त्या इमारतीसाठीं खपायला गेला होता केव्हा? मलाहि शहाजहानाप्रमाणे श्रेय मिळणें योग्य आहे आणि म्हणूनच आपखुषीनें मीं हें परिचयाचें काम अंगावर घेतलें आहे

माझ्या शिरस्त्याप्रमाणें पाटीलसाहेब भेटले म्हणजे मी नेहमी त्यांची थट्टामस्करी करीत असतों त्यांचा उत्साह, उमेद आणि चाळिशीतली उतावेळ पाहून त्यांच्या तारुण्याचें कौतुक करतों आणि माझ्याकडे वृद्धाची भूमिका घेतों पाटीलसाहेब तसे गंभीर प्रकृतीचे आहेत आजवर इतक्या सलगीनें माझ्याइतका त्यांच्याशीं कोणी विनोद केला असेल असें वाटत नाहीं पण पाटीलसाहेबांना तो मानवतो, आवडतोसुद्धा माझ्या घरीं आले म्हणजे गांभीर्याचें कवच खुंटीवर टांगून ते खुशाल होतात आमचे परस्परसंबंध असे मोकळे व सलगीचे असले तरी पाटीलसाहेब मला पितृतुल्य आहेत त्यांच्याबद्दल माझ्या मनांत नितांत पूज्यभाव आणि आदर आहे आणि म्हणूनच हें परिचयाचें काम विनीतभावनें साष्टांग प्रणिपातपूर्वक मी करीत आहें

मी नुसतें पाटीलसाहेब असें म्हटलें. गेलीं पन्नाससाठ वर्षे सर्व मराठा समाज एवढ्याच नावानें त्याना ओळखतो तर्से पाहिलें तर महाराष्ट्रांत गावगन्ना पाटील आहेत. परंतु पाटीलसाहेब असें म्हटलें म्हणजे अज्ञाणी, निरक्षर, इंग्रजी न जाणणारा सेनकगैसुद्धा ताडकन् 'पी० सी० पाटील नव्हे का?' असें म्हणेल. पाटीलसाहेबाचें आडनाव थोरात. त्याचे तिघे चिरंजीव हेंच आडनाव लावतात. पाटीलसाहेब मात्र महादजी शिंद्याप्रमाणे आपल्या पाटिलकीवरच तृप्त आहेत. मराठा समाजानें त्यांच्या या मराठमोळ्या वृत्तीचें आजवर यथायोग्य कौतुक केलें आहे.

दीर्घायुष्य हा कधी वर असतो, कधी शापहि असतो पाटीलसाहेबांच्या बाबतींत तें बहुशः वरदानच आहे ते सर्वतोपरी सुखी आहेत. आनंदी आहेत असें मी म्हणत नाहीं. कारण आनंद व्यक्त करण्याची त्याना सवय नाहीं तो आपण तर्कानें जाणून घ्यावा लागतो. पाटीलसाहेबांचीं सर्व मुलें उत्तम शिक्षण संपादन करून उच्चपदस्थ झालीं आहेत. सर्वांनी आपल्या पराक्रमानें आणि कर्तबगारीनें आपापल्या क्षेत्रात नांव कमावलें आहे. आरंभीं पाटीलसाहेबांनी किंचित् हातभार लावला असेल, नाहीं असें नाहीं, परंतु अल्पकाळातच तिघेहि आपल्या पायावर उभे राहिले आणि आपल्या पायानें चालूं लागले. एक चिरंजीव तर सैन्यात अखिलभारतीय कीर्ति संपादन करून सेवानिवृत्त झाले. पाटीलसाहेब हे या पेन्शनर चिरंजिवाचे पेन्शनर बाप आहेत. नातवंडेहि हुशार आणि तरतरीत आहेत. पुढे येण्याची त्यानाहि ईर्षा आहे एक नातू सैन्यात अधिकारपदावर आहे. या लहान वयात नुसत्या आपल्या डोळ्यानें आपल्यापेक्षा दुप्पट वयाच्या शिपायावर हुकमत चालवतो आणि परेड संपली म्हणजे त्याच्यात मिसळून त्यांच्याबरोबर आपल्या शिक्षेरीचा समाचार घेतो मोठमोठे दाढीमिशावाले शिपाई व दुय्यम अधिकारी या कुमार थोरातावर बेहद खूप असतात सारांश, पाटीलसाहेबांना कौटुंबिक स्वास्थ्य आणि सौख्य भरपूर मिळत आहे परवापर्यंत उतारवयातसुद्धा मातोश्रींचें छत्र होतें आणि तें घरोघरींचें छत्र होतें वडील चिरंजीव परप्रांतीय तरुणीशीं लग्न करण्यास निघाले तेव्हा पाटीलसाहेब थोडे घुरगुटले होते पण मातोश्री फार जाणत्या, फार समजूतदार, फार दूरवर पाहणाऱ्या त्यानी दूर पंजाबपर्यंत पाहिलें आणि चिरंजिवांना हुकूम केला, "हें असें व्हायचेंच हे पत्करलें पाहिजे मुकाट्यानें गाडींत बस आणि लग्नाला जा " पाटीलसाहेब सुद्धा तसे जाणते, विचारी आणि संयमी. अल्प काळातच त्यांनी स्वतःला सावरलें आणि सर्व काही यथासांग झालें कुटुंबानेहि पाटीलसाहेबाना परवापर्यंत साथ दिली

पाटीलसाहेबांच्या मनात काही सलत असेल तर त्यांच्या लाडक्या, गुणी दद्दूचा मृत्यु पाटीलसाहेब पूर्वजन्मीं स्कॉट होते, असें मला कळलें आहे. स्कॉटिश माणसाप्रमाणेच ते कमी आणि मोजकें बोलणारे, भावनांना दाबलणारे, ऊनोंसीवर भागविणारे असे आहेत सहसा आवाजान कप यायचा नाही ते बोलायचे तें सोंधे आणि सरळ बोलतील आणि त्या बोलण्याच्या मागच्या भावना लपवून ठवतील. असें असलें तरी दद्दूचा आजार आणि मृत्यु हा एक अपवाद आहे. दद्दूविषयी बोलताना चटकन् डोळ्यांत पाणी

येते इद्विषयी या पुस्तकात जें लिहिले आहे ते वाचून दादाविनाना अर्धवटच वाचले पुढे वाचवेना. एक मिनिट मान वळविली (मींहि मान वळविली न पाहिलेसें केलें) थोडे खाकरले आणि परत आपल्या स्कॉटिश वाण्याने पुढे वाचू लागले माणसाच्या जीवनात सुखाबरोबर दुःख हे यायचेच दुःख आले नाही तर सुखाचे सुरपण जाणवत नाही पाटीलसाहेब नशिबवान आहेत, सुखी आणि स्वस्थ आहेत

दीर्घायुष्य हा शापदि असू शकतो कुणाला त्या शापाचे ओझे जाणवते, कुणी खेळाडू-वृत्तीने त्याला खांद्यावर वाहून नेतात पाटीलसाहेब असेच खेळाडू आहेत अलीकडे पंचवीस वर्षांत पुढे आलेला, चालू लागलेला मराठा समाज त्याना ओळखत नाही पाटीलसाहेबाना त्याची खन नाही ते त्या समाजाच्या उत्कर्षांत आनंद मानीत असतात पाटीलसाहेबानी मराठा समाजाच्या उन्नतीसाठी पन्नाससाठ वर्षे खस्ता खाल्ल्या तो अवाढव्य समाज कुंभकर्णी झोपेत होता त्याला त्यानी, शाहूमहाराजानी, खासेराव जाधवानी, भास्कर राव जाधवानी, खासेसाहेब पवारानी, आणखी कुणीकुणी, सर्व बाजूनी डवचून हलवून उठविण्याचे प्रयत्न केले आस्ते आस्ते गेल्या पन्नास वर्षांत त्या समाजाने डोळे उघडले जांभई दिली उभा राहिला, चालू लागला डोळ्यावर झोपेची गुंगी अजून आहे. पुढचं नीट आणि स्पष्ट दिसत नाही डोळ्यासमोर अनेक वाटा दिसत आहेत कोणती पत्करावी याविषयी मनात संभ्रम आहे पण मराठा समाज थांबला नाही चालू लागला आहे. पाटीलसाहेबांच्या डोळ्स बुद्धीला ही वाटचाल दिसते परंतु आपल्याला गदगदा हलवून जागे करणाऱ्या महाभागाची त्या समाजाला विस्मृति पडत चालली आहे इतर सारे गेले. आरंभीचे रथी, महारथी, अतिरथी वीर कालवश झाले फक्त पाटीलसाहेबच उभे आहेत त्याना या विस्मृतीचा विषाद वाटत नाही मला वाटतो आणि मी बोलून दाखवितो. मग्गूस बाहेर पडून चालू लागला म्हणजे त्याला आपल्या वाडवडिलांच्या वडिस्त खोलीची आठवण राहत नाही उघड्यावर त्याला प्रकाशात पुष्कळ दिसते आणि तो गोंधळतो अशा संभ्रान्त मन स्थितींत मागचे विसरले जाते इतकेच नव्हे तर कधीकधी ज्याच्या कानाडकट्यामुळे पायाना चालण्याचे बळ आलेले असते त्याच्या कामगिरीचा अनादर करण्याचाहि मोह होत असतो

पाटीलसाहेब विवेकी आणि समाधानी आहेत अनेक वाटांनी वाटचाल करणाऱ्या, चढणाऱ्या, पडणाऱ्या, ठेचा खाणाऱ्या आणि परत चढणाऱ्या मराठा समाजाने आपली दखल घ्यावी, निदान प्रसंगविशेषीं साधीसुधी आठवण ठेवावी, एवढी अपेक्षासुद्धा त्यानी बाळगली नाही मराठा समाजाच्या उन्नतीमध्ये त्याचे मन रंगून होत असते ते आपली भूमिका आणि तिची मर्यादा जाणून आहेत ते पायाचे दगड होते आपल्याला कुणी पहात नाही, आपल्या डोक्यावर उभारलेल्या आणि स्थिरता पावलेल्या मराठामंदिराकडे मात्र पाहतात, अशी तक्रार त्या मंदिराच्या पायाच्या दगडाला करण्याचा अधिकार नाही एखाद्या मोठ्या सभेत पाटीलसाहेब हजर असतात, थोडे एकीकडे बसतात तरुण, उत्साही पुढारी मध्यवर्ती असतात, बोलतात, टाळ्या मिळवतात पाटीलसाहेबहि

वत्सलभावाने त्या गौरवात सामील होतात. श्रेष्ठांची नजर मध्यवर्ती स्थानाकडेच असते. साहजिक आहे. ती जगरहाटीच आहे. इमारत बांधली गेली म्हणजे इमारतीकडेच पाहायचे असते. परंतु पायाचे दगड पाहण्यासाठी उगाच धडाला टाकावे ? समाजाची वृत्ति अशीच असते. नाही तरी आज रानडे-गोखल्यांची कितीजणांना आठवण येते ? टिळकांच्या आठवणीही इकडेतिकडे बुजत चालल्या आहेत. सर्पिण अशी घालीत पुढे पुढे जाते आणि परत येताना ती जशी खात येते, असे म्हणतात. समाज असाच अर्थी गान चालत असतो. काही वाचतात, पण थोडेच वाचनात तेवढ्यांची इतिहास नोंद घेतो.

कोल्हापूर संस्थानच्या मलकापूर जहागिरीतील एका लहानशा आडवळणी खेड्यात पाटील घराण्यात पाटीलसाहेबांचा जन्म झाला. घरी श्रीमंती नव्हती. परंतु कुटुंब खाऊन-पिऊन सुखी होते. प्राथमिक शिक्षणासाठीसुद्धा शेजारच्या गावी जावे लागले, इतके हे गाव लहान होते. जेमतेम मराठी तिसऱ्या-चौथ्या इयत्तेपर्यंत शिकायचे, मोडी अक्षर चांगले घटवायचे (पाटीलसाहेबांचे मोडी अक्षर सुंदर आहे. या पुस्तकाचा पहिला खर्डा त्यांनी मोडीतच लिहिला ), घरचे हिशेबठिशेब पाहायचे, शेतात राबायचे, आखाड्यात जोरजोडी करायची, फडात कुस्त्या जिंकायच्या आणि शेलापागोटे, क्वचित प्रसंगी तोडा मिळवायचा, घरच्या दुधदुभत्याचा सुबलक समाचार घ्यायचा, जवळच्या जंगलात शिकारीला जायचे, गावच्या नदीत माशांची शिकार करायची, जत्रांना जायचे, कुळधर्म कुळाचार दक्षतेने पाळायचे आणि चावडीत बसून वाडवडिलांची पाटिलकी पुढे चालवायची—एवढेच इतर असंख्य पाटीलपुत्रांप्रमाणे पाटीलसाहेबांच्या वाट्यास आले होते. परंतु वडिलांना त्या जुन्या काळीसुद्धा वाटणारे शिक्षणाचे महत्त्व, एकुलत्या एका मुलाच्या हुषारीबद्दल वाटणारा विश्वास आणि बराचसा योगायोग एकत्र आले आणि पाटीलसाहेबांना पुढे घेऊन गेले.

वडिलांची अशी महत्त्वाकांक्षा कितीशी असणार ? आपल्या मुलाने चार बुके इंग्रजी शिकावे, वेळीप्रसंगी मामलेदार प्रांताशी इंग्रजीत फाड फाड बोलावे आणि आपण ते ऐकावे, हीच त्यांची महत्त्वाकांक्षा. पाटीलसाहेबांची मलकापुरास शिक्षणासाठी रवानगी झाली. तेथे तीन बुके शिकल्यावर वडिलांनी यांना मोठ्या हिमतीने कोल्हापुरी पाठविले. तेथे योग्य वेळी ते मॅट्रिक झाले. त्या तालुक्यातच नव्हे तर कोल्हापूर संस्थानात (कदाचित् सबंध महाराष्ट्रात) खेड्यातल्या पाटलाचा मॅट्रिक झालेला हा पहिलाच मुलगा असावा. वडिलांना कृतार्थ वाटले. पाटलाच्या मुलाने मॅट्रिक व्हायचे म्हणजे त्या काळी एव्हरेस्ट गाठण्यासारखे होते. एव्हरेस्टच्यावर आणखी चढण्यासारखे काय असणार ? चढण्याची तिथेच इतिश्री झाली असती. परंतु कोल्हापुरास शाहूमहाराज होते. त्यांच्या डोळ्यांना दूरदूरचे दिसत होते. आडवळणी खेड्यापर्यंत नजर पोचत होती. नजरेच्या मागोमाग घोडे पोहोचले. पाटीलसाहेबांना महाराजांचे आवतन मिळाले. पाटीलसाहेब मुंडासे बांधून, अंगावर धोतर घेऊन गेले. महाराज हौदात डुंबत होते. कृपाळूपणाने पाटीलपुत्राकडे पाहिले, "अरे,

तुमें अगादरचे घोतर अग पुसायला दे जरा" म्हणाले महाराजापाशी अग पुसायच्या वस्त्राची कमतरता नव्हती पण त्यांना पाटलाच्या पोराचे धोतर हवे होते महाराज भारी खेळकर, खोडकर आणि चतुर कृपा दाखविण्याचे त्यांचे प्रकारहि अनेक धोतराचा हा त्यातला एक प्रकार.

पाटीलसाहेब कोल्हापुरास राजाराम कॉलेजात दाखल झाले वसरत आणि अभ्यास चालू झाला. इग्रजी व्यायामाची सुरवात झाली व्यायाम आणि शिकार यांची भारी हौस आज या वयात ताठ चालतात ते याच पुण्याईवर महाराजाना वाटले, कॉलेजची फी भरण्याची या पोराची ऐपत नाही महाराजाच्या चिटणिसाने कॉलेजच्या प्रिन्सिपॉलला नादारी देण्याची भलामण केली प्रिन्सिपॉलने नादारीचे अर्ज कॉमनरूम मीटिंगपुढे ठेवले. पाटीलसाहेबाचा प्रश्न निघाला प्रोफेसर विजापूरकरानी विरोध केला 'नादाऱ्या केवळ मार्कप्रमाणे द्या, इतर बाबींचा विचार करू नका,' असें त्यांचे म्हणणे पडले पाटीलसाहेबाना नादारी मिळाली नाही विजापूरकराचे म्हणणें अगदी रास्त होते हीं रास्त माणसेच आजवर महाराष्ट्राच्या उन्नतीच्या आणि ऐक्याच्या आड आलीं आहेत विजापूरकर सप्रदाय अद्याप चालू आहे

विजापूरकरांची गुणवत्ता आड आली, तरी पाटीलसाहेबाचें शिक्षण चालू राहिले. गुणवत्तेने चारचौघासमक्ष माळ घातली विजापूरकर हजर असतील त्यानाहि पाटील साहेबांच्या यशाने समाधान झाले असेल. ते भले, सज्जन होते. मनांत द्वेष नव्हता. पण डोळ्याना दूरवरचें दिसत नव्हते एवढेच

याच सुमारास पुण्यास शेतकीखातें आणि शेतकीकॉलेज निघाले तोंपर्यंत शेतीला शिक्षणात स्थान नव्हतें (आज तरी शेतीला शिक्षणात कितीसें स्थान आहे ? मूलोद्योग शाळांत आज शेतकऱ्यांचीं पुढेमागे शेती करणारीं मुलं माडी घालून ओठ मिटून सूतकताई करीत आहेत.) शाळा कॉलेजात अगत्यपूर्वक शिकण्याचें तें एक महत्त्वाचे—राष्ट्रीय महत्त्वाचे—ज्ञानक्षेत्र आहे, ही जाणीव त्या वेळीं झाली नव्हती (आजहि झाली नाही). शेतकीखातें नव्हतें मुलकी खात्याच्या रामरगाड्यात अनेकांवरोबर शेतीला कोपऱ्यात स्थान मिळाले होते परतु कर्झनसाहेबाच्या कृपेमुळे शेतीला कारभारात आणि शिक्षणात स्वतत्र स्थान मिळालें. विलायतेहून तज्ज्ञाची आयात झाली कारभारात मात्र तज्ज्ञ नेमले गेले नाहीत आय० सी० एस्० अधिकारी सर्वज्ञ तेच शेतीखातें चालवू लागले.

आरभा शेतीच्या शिक्षणाची सायन्स (हल्लींचे एजिनिअरिंग) कॉलेजात सोय केली आणि शेतीकॉलेजच्या इमारतीची बांधणी सुरू झाली पाटीलसाहेब पुण्यास शेतकी कॉलेजात दाखल झाले. इच्छा असती तर त्याना बी० ए०, एम्० ए०, एलएल० बी० कडे जाता आलें असतें. त्या वेळीं तोच राजमार्ग होता त्याच मार्गाने इतर सारे मराठा तरुण गेले, पदवीधर झाले आणि बडोदे कोल्हापूरकडे नोकऱ्या पटकावून स्वस्थ झाले पाटील साहेबांचा विशेष असा की त्यांनी हा राजमार्ग पत्करला नाही. नवीन जन्मास आलेल्या शेतकीकॉलेजात गेले तेथील शिक्षणाच्या व पदवीच्या बाजारभावाची त्यांनी चौकशी

केली नाही, इतकेच नव्हे तर शिक्षण संपल्यावर शेतकीखात्यातच नोकरी धरली. माझ्या मते हे एक धाडस होते, ही त्या वेळच्या आधाराने घेतलेली उडी होती. परंतु हा मार्गच अखेरीस फळदायी ठरला. बी० ए०, एम्० ए० झाले असते तर अनेकांपैकी एक झाले असते आणि गर्दीत नाहीसे झाले असते.

आरंभीच कॉलेजातील प्राध्यापक व अधिकारी विद्वान् आणि अनुभवी होते, धोरणी होते. शेती आणि शेतकरी यांच्या सुधारणेची त्यांना तळमळ होती. हिंदुस्थानातील शेतीच्या गरजांची त्यांनी माहिती करून घेतली व अडचणी दूर करण्याचे प्रयत्न केले. डॉ० मॅन तर एक विलक्षण व्यक्ती होती. शरीरात आयरिश रक्त सळसळत होते. इतर अधिकारी त्यांचा तिरस्कार करीत. तो त्यांचा तिरस्कार करून परतफेड करी. इतर गोऱ्यांप्रमाणे तो अलिप्त राहिला नाही. इकडच्या सार्वजनिक जीवनात समरस झाला. नोकरशाहीची तमा न बाळगता लोकमान्य टिळकांबरोबर मॅनसाहेबाने दारूगुत्त्यावर पिकेटिंग केले. तो मराठा स्टुडंट्स ब्रदरहूडचा अध्यक्ष झाला. त्या वेळी मोटारी नव्हत्या. मॅनसाहेब जातेगावच्या शेतकऱ्यांची आर्थिक पाहणी (survey) करण्यासाठी सायकलवर बसून या आडवळणी गावी जात असे.

पाटीलसाहेबांनी या कर्तबगार अधिकाऱ्यांना साथ दिली आणि शेतीखात्याची उभारणी केली. द्राक्षांच्या लागवडीसाठी उत्साही शेतकऱ्यांना प्रवृत्त केले, मदत केली. शेतकरीवर्गातील अनेक कर्तबगार तरुणांना शेतकीखात्यात घेतले व कामास लावले. नाना प्रकारच्या प्रयोगांची आखणी केली. शेतकऱ्यांच्या गरजा, त्यांच्या अडचणी लक्षात घेऊन वेळोवेळी शेतकीखात्याला नवीन योजना व सूचना दिल्या. सारांश, पाटीलसाहेब हे शेतकीखात्याचे, शेतकीशिक्षणक्षेत्राचे व प्रयोगांचे एक ठळक असे पायाचे दगड आहेत.

पाटीलसाहेब पूर्वजन्मी स्कॉट होते हे मी पूर्वीच सांगितले आहे—तोच ताठरपणा, स्वाभिमान आणि अभिजात सभ्यता. कुणास टाकून बोलायचे नाहीत. फाडफाड बोलायचे नाहीत. सांगतील त्यापेक्षा न सांगितलेले पुष्कळ असायचे. स्वतःविषयी कमी बोलतील. स्वतःच्या कर्तबगारीविषयी सुद्धा बेताने आणि तटस्थ वृत्तीने बोलतील. बहुतेक साऱ्या मराठा संस्थानिकांशी त्यांचे जवळचे संबंध होते. शाहूमहाराजांशी आणि रावसाहेबांशी तर जिव्हाळ्याचे संबंध होते. ग्वाल्हेरीच्या माधवमहाराजांचे व देवासच्या तुकोजीरावांचे ते मित्र होते. पाटीलसाहेब सर्वांचे मित्र राहिले, कुणाचेच कधीच नोकर झाले नाहीत. ग्वाल्हेर कोल्हापूरकडून कितीतरी आग्रह झाला, पण पाटीलसाहेब नमले नाहीत. राजपुरुषांशी बोलताना, वागताना कधी लाचारी पत्करली नाही, मिंधेपणा घेतला नाही. कुणाच्याच उपकारात सापडले आणि अडले नाहीत. खुशामत तर कुणाचीच केली नाही. शाहूमहाराजांचीसुद्धा. वडील चिरंजिवांना सँडर्स्टला पाठवायचे होते. बराच खर्च येणार होता. जवळ त्या वेळी हवा तितका पैसा नव्हता. कागलच्या बापूसाहेब महाराजांनी निरोप पाठवला, "संकोच बाळगू नका. काय हवे ते मागा. पाठवतो." पाटीलसाहेबांनी गोड शब्दांत आभार मानले, गरज लागली तर मागेनच, असे आश्वासन दिले आणि काही मागितले नाही. या निस्पृह

वाण्यामुळेच पाटीलसाहेबांचें मराठा राजावर विलक्षण वजन होतें. या वजनाचा उपयोग त्यांनी राजाच्या मगाजळीला अल्पस्वल्प प्रवाह मराठा शिक्षण परिषद्, शिवाजी सोसायटी आणि डेक्कन मराठा एज्युकेशन ॲसोसिएशन या शिक्षणक्षेत्रात काम करणाऱ्या मराठा संस्थांकडे वळविला. माधवमहाराजांनी मराठ्यांच्या उच्च शिक्षणासाठी व इतर सुधारणासाठी ॲडव्हायजरी बोर्ड नेमलें, त्यात पाटीलसाहेबांना महत्त्वाचं स्थान होतें. महाराज त्यांचा सल्ला अगत्याने घेत व सूचना कारवाईत आणीत. मराठ्यांच्या दुर्दैवाने ॲडव्हायजरी बोर्डाचा पैसा मुजुमदार ज्या पेटीत गुतवला होता तिचे दिवाळे वाटले. माधवमहाराजहि वारले. ॲडव्हायजरी बोर्डाचें काम तसेंच राहिलें. पाटीलसाहेबांनी दरचसें पडद्याआड राहून मराठा समाजासाठी (किंबहुना, बहुजनसमाजासाठी, कारण पाटीलसाहेबांच्या व माझ्या पिढीच्या वार्तीत मराठा व बहुजन हे शब्द समानार्थी होत) पुष्कळ काम केलें. आता त्याहि कामातून निवृत्त झाले असले तरी अद्याप लक्ष तिकडे आहे. नवीन कार्यकर्ते दिसले म्हणजे आनंद वाटतो. मुद्दाम त्यांना भेटून त्यांचे कोडकौतुक करतात.

ब्राह्मण ब्राह्मणेतर प्रश्नाविषयी पाटीलसाहेबांची भूमिका स्वच्छ आहे. त्यांचं मन निर्मळ आहे. त्यात कुणाविषयी कडवटपणा नाही. मागचीं भांडणे उकरून काढण्याची त्यांची वृत्ति नाही. मनाला बोचक असें पूर्वी पुष्कळ घडलं आहे, पण त्याकडे ते इतिहासाच्या निर्विकार दृष्टीने पाहतात. राजाराम कॉलेजच्या शास्त्रीबुवांनी संस्कृत घेऊ दिलं नाही (रत्नागिरीच्या एका शास्त्रीबुवांनी माझे मित्र बापूसाहेब शिंदे यांना शाळेच्या सर्व कपाटांच्या किल्ल्या दिल्या, संस्कृत कपाटाची मात्र दिली नाही, हे येथे आठवलं म्हणून सांगून टाकतों), पाटीलसाहेबांना व इतर मराठा विद्यार्थ्यांना फारशीच्या वर्गाकडे ढकलले, ही घटना पाटीलसाहेब गमत म्हणून सहज सांगून जातात. रेंगाळत नाहीत, दातओठ खात नाहीत. विजापूरकरांच्या विरोधामुळे राजाराम कॉलेजमध्ये नादारी मिळाली नाही, शाहूमहाराजांची रदबदली फुकट गेली, ही घटना विजापूरकरांचं नावसुद्धा न घेता ते एक मामुली गोष्ट म्हणून सांगतात. सत्यशोधक समाजाच्या पुण्याच्या एका सभेचा अहवाल विष्णुशास्त्री चिपळूणकर 'निबंधमाले'त "शूद्रांच्या सभेचा अहवाल" अशा अपमानास्पद मथळ्याखाली देतात. पाटीलसाहेब त्यावर कसलंच भाष्य करीत नाहीत. चिडत नाहीत. "हे शीर्षक लक्षात ठेवणे जरूर आहे" एवढीच सूचना वाचकांना देऊन पुढे जातात.

ही भूमिका विचार करण्यासारखी आहे. पूर्वी घडलं ते झालं गेलं, इतिहासजमा झालं, अशी हा समजूतदार दृष्टि आहे. जुना इतिहास सांगताना पाटीलसाहेब म्हणतील, इतिहास अवश्य वाचा, पण त्यापासून धडे घेण्यासाठी वाचा. बोध घेण्यासाठी वाचा. डाव फिरविण्यासाठी वाचू नका. डोकें फिरलं म्हणजे पुढचें नीट दिसत नाही.

अव्वल इंग्रजीमध्ये जुन्या जगाच्या परपरा खंडित झाल्या, जुनी घडी विसकटली, मुलुखगिरी संपली, दक्षिणेकडून आणि उत्तरेकडून दीडशे वर्षे अखंड वाहत येणारा द्रव्याचा प्रवाह आटला. जुने रोजगार बुडाले. या रोजगारावर पोट भरणारे समाज गांजले,

अगतिक झाले. पुढारलेले समाज पुढे गेले त्यांच्या कारकुनी जगताची नव्या राजवटीत सुद्धा गरज होतीच. पुढे गेलेल्या समाजात ब्राह्मण होते, सारस्वत होते, प्रभू होते, पारशी होते, आणखी कुणी कुणी होते. नुसते ब्राह्मणच नव्हते. एका खात्यात तर काही वर्षे कायस्थ प्रभूच ठळकपणे दिसत ती सर महादेव चौबळांची कृपा होती त्याच सुमारास अनेक खात्यात मुसलमान सरसावले, ती सर इब्राहिम रहिमतुल्लांची कृपा होती आणि सरसाहेबांच्या पाठीमागे उभ्या असलेल्या धूर्त गोऱ्या नोकरशाहीचा तो डाव होता. सर्व खात्यातील वरिष्ठ नोकऱ्या ही गोऱ्यांची मिरास होती. त्या सोवळ्या क्षेत्रांत ब्राह्मण ब्राह्मणेतरांना प्रवेश नव्हता परंतु इतरांनी वर पाहण्याचे धाडस नव्हतें हे खरें असलें तरी समोर ब्राह्मण दिसत होते जिकडे तिकडे. खेड्यातल्या कुलकर्ण्यांपासून, गावठी शाळामास्तरापासून थेट वरच्या (म्हणजे वर उल्लेखिलेल्या लक्ष्मणरेषेच्या खालच्या) सदर अमीनांपर्यंत ब्राह्मणच मुख्यत: दिसत होते काही काही उद्दामपणाने वागत होते शास्त्रीबुवांचा कित्ता गिरवून, मराठा-माळी-साळी असे न म्हणता शूद्र म्हणत होते साहजिकच जो सामाजिक संघर्ष उद्भवला त्याला व्यापक सामाजिक आशयाचे नाव न मिळतां ब्राह्मण ब्राह्मणेतर हे जातीय नाव मिळाले

मराठादि बहुजनसमाज शिकला नाही म्हणून तो मागे पडला असे पाटीलसाहेबांचे निदान आहे. त्यांचा पूर्वीपासूनच शिक्षणावर फार विश्वास आहे ती सारी जुनी पिढीच शिक्षणाच्या मागे लागली होती शिक्षणाबद्दल त्यांच्या फार अपेक्षा होत्या सत्यशोधक समाज काढण्यापूर्वी फुल्यांनी शाळा काढल्या स्त्रियांची आणि अस्पृश्यांची अवहेलना आणि अवनति पाहून फुले कळवळले आणि लागलीच त्यांच्यासाठी शाळा काढण्यास प्रवृत्त झाले शाहूमहाराज याच संप्रदायातले महाराजांनी राजकारणांत आणि धर्मक्षेत्रात कारवाया केल्या. परंतु त्यांचेंहि लक्ष मुख्यत शिक्षणाकडेच होतं महाराजांनी एकाच वेळीं वेदोक्त आणि वसतिगृहें सुरू केलीं महाराजानंतर भाऊराव पाटील आले. ब्राह्मणेतरांच्या राजकारणाच्या, किंबहुना राजकारणाच्या अभावाच्या, निष्फळतेचा अनुभव घेऊन भाऊराव शिक्षणाकडे वळले एवंच, 'नहि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते' हा या शंभर वर्षांतल्या महाभागाचा मंत्र होता

. ब्राह्मणब्राह्मणेतर वाद आता मिटला आहे, संपला आहे, असे मी समजतो. त्याच्या शिडातले वारे काँग्रेसने केव्हाच काढून घेतले, अजून कधीमधी एखादी मंदशी झुळुक येते शिडे फडफडतात पण तेवढ्यापुरतेंच जेधे-मोरे हे तरुण पुढारी बहुजन समाजासहवर्तमान काँग्रेसमध्ये शिरले तेव्हाच वाद संपला या नव्या आघाडीवर शिस्तींत वागायचे होते शिवाय या आघाडीवर मित्र वेगळे, अमित्र वेगळे होते. शिवाय या मामल्यात ब्राह्मण साथीदार होते शिवाय आता धर्मक्षेत्राला कुरुक्षेत्र न मानता आर्थिक समस्यांचा उकल करायचा होता या नव्या क्षेत्रात कामगिरी बजावून ब्राह्मणांना मागे टाकता येण्यासारखे होतें मुख्य मुद्दा म्हणजे सत्ता कमावणें आणि राबवणे येथे शक्य होते वेदोक्तासारख्या प्रश्नांना बदलत्या जगाच्या संदर्भात अर्थ उरला नव्हता

करते. डोळे झाकून काहीच पचवता येत नाही. जीवनात शेवटपर्यंत काहीच देता येत नाही. माझे मुकाबले डोळे उघडे ठेवूनच केले आहेत. मग हा मुकाबला-१ युद्धभेद-१ महाप्रस्थानपर्व-यांच्यासमोर डोळेझाक कशाला? का म्हणून?

सुषमा, पुणें
३० ८ ६४

—वि० द० घाटे

केलेली कामगिरी दिलीत तर ती आपल्या भावी पिढीस उद्बोधक होईल व आमच्या पिढीस कोणत्या काटेरी मार्गाने व कसे जावे लागले याची कल्पना तरी येईल."
अशा आमच्या शिळोप्याच्या गप्पा चालत.

याच सुमारास चिरंजीव शंकरराव ब्रह्मदेशातील युद्धात नाव कमावून आले होते व कोरियातील त्यांच्या कामगिरीचा बोलबाला झाला होता. म्हणून जनरल सडेकर म्हणत, "आज ना उद्या शंकररावाच्या घराण्याची जुनी माहिती त्याना शोधावी लागेल. तुम्हाला तुमच्या पूर्वजांची बरीच जुनी माहिती दिसते. ती एकत्र करा आणि लहानसे आत्मचरित्र लिहाच." "पाहू या" म्हणून मी उडवाउडवीच केली व त्याच्या सूचनेकडे फारसे लक्ष दिले नाही. पुढे थोडे दिवसानी श्री० विठ्ठलराव घाटे यांच्याकडे माझे जाणेयेणे वाढले. आम्ही दोघानीहि, आमच्या वेळच्या उपेक्षित व मागासलेल्या ब्राह्मणेतर जातीच्या सामाजिक अडचणी पाहिल्या व अनुभवल्याहि होत्या. त्या उपेक्षित समाजास कोणी व कसा हात दिला हे पाहिले असल्याने आमच्या गप्पागोष्टींत असल्या माहितीचा उल्लेख येई व त्यावर चर्चाहि होई. माझ्या बोलण्यात सहजासहजी सन १९०० ते १९२० या कालखंडातील आमच्या अडचणींचा व त्या काळात गंगारामभाऊ म्हस्के यांच्यासारख्या द्रष्ट्याने मराठ्यांच्या मुलासाठी विद्यावेतन देणारी संस्था कशी काढली, त्यास श्रीमंत सयाजीराव गायकवाड व छत्रपति शाहूमहाराज यानी कशी मदत केली, मी जेव्हा मॅट्रिक झालो, त्या वेळी मला शाहूमहाराजानी कसे बोलावून घेतले व लागलीच मराठा बोर्डिंग कसे काढले, कै० दाजीराव विचारे व कै० भास्करराव जाधव यांनी कोल्हापुरातील मराठा बोर्डिंग नावारूपास आणण्यास कशी मदत केली, बडोद्याचे खासेराव जाधव, ताराळ्याचे रुद्राजीराव राजे महाडीक यानी मराठाशिक्षण परिषद कशी स्थापली, पुढे पुढे पुण्यातील काही मंडळींनी व विशेषेकरून शाहूमहाराजांनी शिवाजी सोसायटी कशी स्थापिली; शिवाजीमहाराजाचा पुतळा उभारण्याच्या कामी आम्हास काय काय अडचणी आल्या, त्यावर देवासच्या खासेसाहेबमहाराजानी व मराठा राजेरजवाड्यानी कोणते उपाय योजिले, —या गोष्टींचा माझ्या बोलण्यात उल्लेख येई. विठ्ठलराव घाटे माझ्यापेक्षा जवळजवळ अठरा एकोणीस वर्षांनी लहान, म्हणून मी जे पाहिले व अनुभवले, ते त्यानी प्रत्यक्ष पाहिले व अनुभवले नव्हते. मी सांगितलेल्या गोष्टींपैकी त्याना बऱ्याच गोष्टी माहीत नव्हत्या. त्या ऐकून ते म्हणत, "पाटीलसाहेब, तुमच्याकडून मला बरीच नवी माहिती मिळते हे खरे, पण ती एकट्यासच ना? तुम्ही तुमच्या आठवणी लिहून काढा. तुम्ही सांगितलेली माहिती आजवर कोणी लिहून ठेवलेली दिसत नाही. ज्यानी मराठा चळवळींत प्रत्यक्ष भाग घेतला, त्यातले आता तुम्ही एकच एक मागे राहिला आहात, हे लक्षात ठेवा व स्वतःचे चरित्र लिहून काढा. तुमच्या पिढीस कोणत्या अडचणी आल्या, त्यांचे निवारण करण्यास कोणाची मदत झाली, हे भावी पिढीस जरूर कळले पाहिजे."

बरेच दिवस मी घाटेसाहेबांच्या म्हणण्याकडे लक्ष दिले नाही, टाळाटाळीच केली. मी म्हणे, "आत्मचरित्र लिहिण्याइतके उच्च स्थान मी मिळविलेले नाही. शिवाय मी

साहित्यिकहि नाहीं. आता माझ्या आठवणी पुसकट झाल्या आहेत हें लक्षात ठेवा; उगीच आग्रह करू नका." ते म्हणत, "तुम्ही माझ्याशीं जशा गप्पा मारता तसेंच लिहा, त्या लिहून झाल्यावर मी त्यांची मांडणी करीन." पुढे ज्या ज्या वेळीं त्यांची गाठ पडे त्या त्या वेळीं "तुमच्या आठवणी लिहिण्याचें काम कोठवर आलें?" असें ते हटकून विचारीत. अशा रीतीनें त्यांनी माझी मोट बांधली व मीं हें आठवणी लिहिण्याचें काम स्वीकारलें एकदा हातीं घेतलेलें काम पुरें केलेंच पाहिजे अशी माझी भावना असल्यानें तें पुरें करणें मला जरूर झालें.

या कामीं विठ्ठलराव घाटे यांनी वेळोवेळीं केलेल्या सूचनांचा, एखाद्या पीएच० डी० च्या थीसिस (निबंध) लिहिणाऱ्या विद्यार्थ्यास युनिव्हर्सिटी प्रोफेसरनें दिलेल्या सूचनांचा उपयोग व्हावा तसा उपयोग झाला. बरेंचसें लिहून झाल्यावर, त्यांनी तें लिखाण वाचलें व मला सांगितलें, "आता याचें शेवटचें चाळतपण मी करीन दुरुणीस पाहून सर्व काही करीन तुम्ही निर्धास्त असा."

विठ्ठलरावांनी जर माझ्यामागे आठवणी लिहिण्याचा लकडा लावला नसता, तर वयाच्या पंचाऐंशाव्या वर्षी, आठवणी पुसट झाल्यावेळीं, हें काम मीं हातीं घेतलें नसतें. पण झालें तें बरें झालें दिलेल्या शब्दाप्रमाणे मीं हें काम कसेंतरी रेटलें.

हे निवेदन करताना मला सांगावेंसें वाटतें की, या लिखाणानें वानप्रस्थाश्रमाच्या वयांत, विधुरावस्थेंत जीवन कंठणाऱ्या माझी करमणूक झाली आठवणी लिहीत असतांना मीं फार गडबड केली नाही. कटाळा येई त्या वेळीं कागद एका बाजूस ठेवीं. तरी लिहिण्यात माझा वेळ आनंदात गेला, हें खास.

हें पुस्तक लिहिण्यास हातीं घेण्यापूर्वी साधक अगर भक्त देवतांचें ध्यान वा मनन करतात, मनन म्हणजे काय, याचा अर्थ समजला नव्हता. आता त्याचा अर्थ उमगला, असें मला वाटतें. माझे आईवडील, निवर्तलेली मुलगी इंदुमती, बहीण लखुताई, तिचीं मुलें (भाचा व भाची) व इतर सुहृद यांच्या आठवणी लिहीत असताना, व त्यात भर घालीत असतांना, माझें अंतःकरण भरून येई आणि यामुळे काही वेळ लेखणी एका बाजूस ठेवून, त्यांच्या आठवणींत मग्न असें हें मनन नव्हे का? वरपरतें पुसकट झालेल्या स्मृतींस उजाळा देत असता, मला त्यांची जास्त ओळख पटली. काहींवर तरी मीं जास्त प्रेम करू लागलो आहें इतकेंच नव्हे, आता त्यांच्या आठवणी माझ्या स्मृति पटावर जास्त चांगल्या रीतीनें कोरल्या गेल्या आहेत.

जे मीं यत्र्य भाग्यासंबंधें वर लिहिले, तेंच ज्यांच्या सान्निध्यात मी आलें व ज्यांच्या विचारांचे माझ्यावर संस्कार झाले व मनावर पगडा बसला, अशा शाहूमहाराज, देवासचे गासेसाहेब महाराज व भास्करराव जाधव आदि महात्म्यांबद्दल वाटतें. मी त्यांचा ऋणी आहें.

माझ्या जीवनसरितेच्या उगमापासून आता जवळ आलेल्या अनंताच्या सागरा पर्यंतच्या वन्याच दीर्घ प्रवाहातील जुन्या स्मृति आठवून त्यावरील विस्मृतीचा धुरळा पुसून

काढण्यात बराच वेळ गेला सुरवातीस आठवणी फारच अंधुक होत्या; लिहिण्यास सुरवात केल्यावर त्या हळूहळू स्पष्ट होऊ लागल्या त्या जुळविताना अधिक स्पष्ट झाल्या व हळूहळू लिहिण्याचे कामात मन रमू लागले आठवणी लिहिण्याचे काम हातीं घेतले नसते, तर माझी दोनतीन वर्षे चागल्या रीतीने जातीं ना सन १९४८-४९ पूर्वी तशी अडचण भासत नसे पण त्या वेळीं थोड्याच अवधींत आई व पत्नी गुजरल्याने मी थोडाफार एकाकी झालो होतो अशा परिस्थितींत आठवणी लिहिण्याच्या कामी मन गुतले व वेळ बरा गेला

हें पुस्तक लिहीत असताना, त्यातील प्रकरणें मी मोडी लिपींत लिहीं मोडी लिहिणें मला आवडतें व बाळबोधीपेक्षा मोडींत मी जलद लिहू शकतों पण या दिवसात मोडी लिहिणारे वाचणारे फार दुर्मिळ अशा अडचणीच्या वेळीं माझे फार जुने मित्र राघवेंद्र गगाराम धोपाडे व गणपतराव बापूजी शिंदे यांची मला योग्य वेळीं मदत झाली या मित्रद्वयाचा, शिवाय ज्यानी मला काही माहिती पुरविली त्या सर्वांचा, मी आभारी आहें

पा. चि. पाटील



# कुळकथा



माझा जन्म, मराठा जातींत शेतकरी कुटुंबात तारीख १९ जून सन १८७७ सालीं झाला. माझा गाव मौजे वडगाव. हें लहानसें खेडें हल्लीच्या महाराष्ट्र राज्याच्या नैर्ऋत्य भागांतील कोल्हापूर जिल्ह्याच्या शाहूवाडी तालुक्यात वारणा नदीच्या दक्षिण तिरावर आहे. हा गाव सरूडच्या शिवेस लागून आहे. सन १७३१ ते १९४७ पर्यंत सदर गाव कोल्हापूर संस्थानच्या विशाळगड (मलकापूर) जहागिरींत होता.

कोल्हापूर राज्यसंस्थापिका छत्रपति महाराणी ताराबाई यांनी साताऱ्याचे त्या वेळचे छत्रपति शाहूमहाराज यांच्याशीं फुटून स्वतंत्र राज्याची स्थापना करण्यापूर्वी सरूड, वडगाव व जवळचीं खेडीं यांचा समावेश तर्फ सातवे, परगणे शिराळे यांत होई. पुढे या दोन्ही राज्यकर्त्यांमधील सन १७३१च्या तहान्वये वारणेच्या दक्षिणेकडील प्रदेश छत्रपति ताराबाई यांच्याकडे आला, वडगाव वारणा नदीच्या दक्षिण तिरावर असल्यामुळे तो गाव वर उल्लेखिलेल्या गावांसह कोल्हापूर राज्यात सामील झाला. पुढे कोल्हापूरच्या छत्रपतींनी आपल्या पंतप्रतिनिधींस जी ६४ खेड्यांची जहागिरी करून दिली, त्या जहागिरींत हा गाव गेला. सातारा राज्य सन १८४९ सालीं खालसा झालें, तथापि कोल्हापूर राज्य इंग्रजांच्या हुकुमतीखालीं सन १९४७ सालापर्यंत भिन्न राहिलें होतें.

माझा गाव (सध्याची पाढर) कधीं वसला याची माहिती मिळत नाहीं. पण असें सांगण्यांत येतें कीं, ही पाढर वसण्यापूर्वी आमचे पूर्वज कृष्णानदीकाठच्या कुंडल भागांत राहात असत. कृष्णेच्या काठीं वाळवें, बहें व कऱ्हाडजवळील कोटी वगैरे बऱ्याच गावांत थोरातांची वस्ती आहे. आमचें कुलदैवत, पेठ येथील माणकोबा, हें कृष्णेपासून दूर नाहीं. कुंडल भागांत पाऊस फार कमी पडतो. त्या वेळीं कृष्णेचा

चालनाहि माहरेला नव्हता. भाऊन्दरीस घटाळलेले आमचे पूर्वज एका अवर्षणांत कृष्णाकांठ सोडून पश्चिमेस मावळांत वारणेकाठीं आले. मावळ भागांत पावसाचा बराच जिव्हाळा असतो. खुन्द व फापरी या गावांच्या मध्यावर त्या वेळीं बरीच पडीत जमीन होती; त्या ठिकाणीं एका उचवट्यावर त्यांनी राहण्यास घरें बांधलीं. या ठिकाणास गवळटेक म्हणत, व आजहि गवळटेकच म्हणतात. ही उघड मुरमाड जागा उचवट्यावर असल्याने ती वस्तीस पसंत केली गेली. त्या ठिकाणीं सात आठ घरांचे उघडे पडलेले पाये वगैरे चिन्ह दिसत असत. अगदी अलीकडे सन १९४०च्या सुमारास ही जागा नांगरून बाधदिस्ती करून वहिवाटीखालीं आणली आहे. या टेकाजवळच्या जमिनीची मालकी महार लोकाकडे आहे. पण पुढे ही जागा गैरसोयीची वाटू लागली. कारण या जागेपासून वारणा नदी पाऊण मैल तरी असावी. जनावरांना पाण्यावर नेण्याची वाट, सध्या आमचा गाव आहे त्या जागेवरून असे. सध्याच्या वस्तीच्या जागीं (विशेषेकरून ग्रामदैवत ज्योतिबाचें देवालय आहे तेथे) बोराटीगोराटीचा झुडुप फार असत, व इतरहि लहानलहान टेंग्णी झुडुपें उगवून सर्वत्र पसरलेली असत. या झुडुपांत असलेल्या एका विवक्षित दगडावर एक गाय दूध सोडी, अशी आख्यायिका आहे. हा दगड स्वयंभू ज्योतिबा आहे असे समजून लोकांनी श्रद्धेने त्या दगडाभोंवती चांगलें देवालय बांधलें. नंतर त्यांनी देवालया-भोंवतीची जागा साफ करून, तेथे आपली राहण्याचीं घरें बांधली व गवळटेकावरच्या घरांचा उपयोग जनावरें बांधण्यास पद्धतीवारसा करूं लागले. या नवीन वस्तीस वडगाव हें नाव पडलें. या नव्या गावची पाटिलकी साहजिकच त्यांनी गाव वसविला त्या आमच्या पूर्वजांस मिळाली, अशी माहिती मिळते. गाव कधी वसला व पाटिलकी इनाम कोणत्या सरकारकडून मिळाले याची माहिती लागत नाही.

या थोरात कुळांत नाइकजी थोरात यांचा जन्म झाला. या नाइकजींस आम्ही आमचा मूळ पुरुष मानतो. नाइकजींचा मुलगा सिधूजी, सिधूजीचा मुलगा धयाजी, धयाजीचा मुलगा मोदजी आणि मोदजीचा मुलगा बाळूजी. बाळूजीचा मुलगा रावूजी हा माझा पणजा. राधूजीस तीन मुलगे होते. ज्येष्ठ चिरंजीव नारायणराव हे माझे आजोबा. मीं त्यांना चांगलें पाहिलें होतें. सन १८८७ सालीं ते वारले, त्या वेळीं मी नऊदहा वर्षांचा होतों.

पाटिलकीची सनद आजोबा नारायणराव यांच्या नांवें आहे. त्यांस लिहिता-वाचता येत नसल्याने काही वर्षें पाटिलकीचें काम त्यांचे धाकटे बंधु बापूजी हे करीत. पुढें माझे वडील चिमणाजी नारायण मोठे झाल्यावर ते काम पाहूं लागले. बापूजी व चिमणाजी यांना चांगलें लिहितांवाचतां येई. दोघांचींहि हस्ताक्षरें वळणदार होतीं, त्यांनी पाटिलकीचीं दप्तरें व घरचे जमाखर्च उत्तम रीतीने ठेवलेले दिसतात. यांच्या दप्तरांत पुष्कळ उपयुक्त माहितीहि मिळते. दाण्यादुण्याचे दरदाम, लत्याकपड्याच्या किंमती, सोन्याचांदीचे भाव, लग्नकार्य, महाल गोंधळ वगैरेंबद्दल-

सुद्धा तपशीलवार माहिती मिळते. माझे पणजोबा रापूजी पाटील यांच्याबद्दल फारशी माहिती आमच्या जुन्या दप्तरी मिळत नाही. त्यांना तीन मुलगे होते. तिघेहि उंच अगून रंगाने गोरे होते. ज्येष्ठ नारायणराव नेहमी शेतीकडे असत. कुशाजी उंच, धिप्पाड, बावेपूर होते. उतार वयातसुद्धा ते सकाळीं नदींत स्नान करून गावच्या देवळांत ज्योतिबाची व महादेवाची पूजा करीत. शिवाय पार्थिवपूजाहि करीत. नंतर दंड व जोरजोडीचा व्यायाम करून घरीं जात व निरसें दूध शेर अर्धाशेर पीत. बापूजी सर्वांत लहान, त्यांना चांगलें लिहितावाचता येत असे. त्यांची एक फार चलाख पाढऱ्या रंगाची घाडी असे ते घडूकहि चांगली चालवीत. रापूजी पाटील तारीख २ एप्रिल १८६१ साली वारले. तरी पण त्यांचे तीनहि चिरंजीव गुण्यागोविंदाने पुष्कळ दिवस एकत्र राहात. कुशाजीस पुत्रसंतान नव्हतें. नारायणराव व बापूजी यांची मुलें कर्तीसवरतीं झाल्यावर, तारीख २१ जून १८७४ रोजीं हे तिघे बंधु विभक्त झाले, त्या वेळच्या फारकती उपलब्ध आहेत. एकमेकांच्या संमतीने, गावच्या लोकांच्या व पाहुण्यांच्या विचाराने, वाटण्या झाल्या. त्यांत काही बाधा आली नाही.

या फारकतीवरून दिसून येतें की, त्यांची शेतीभाती व बैलम्हावरें बरींच होतीं. प्रत्येकाच्या वांट्यास दोन रेडे, पाचसहा बैल, दोनतीन गाई व एक म्हैस आली होती. दागदागिनेहि थोडेफार होतेच. दोन घरें होतीं, तीं दोघास गेलीं. तिसऱ्यास (बापूजीस) जागा व पैसा द्यावा, असें ठरलें.

कुशाजीच्या पहिल्या बायकोस मुलें झाली नाहीत. तिला कापाची आऊबाई म्हणत, कारण तिचें माहेरगाव कापे होते. दुसरी बायको पेरीडची आऊबाई. हिला दोन मुली झाल्या होत्या. तिसरी सरूडची. दुसरी व तिसरी कुशाजी पाटलांचे ह्यातीतच वारल्या. पहिली बायको मात्र नवऱ्याच्या मागे काही वर्षे होती. कुशाजी पाटील यांनी आपले मरणसमयीं तिला सांगितलें होतें की, "तुला पैसाअडका लागला तर पुतण्यांस्तून घ, पण वडिलार्जित जमीन विकू नकोस." त्याप्रमाणे ती वागली. तिच्या मरणानंतर तिची जमीन, घर व जंगम इस्टेट तिचे दीर नारायणराव व बापूजी यांच्या मुलांकडे आली.

माझे आजोबा नारायणराव हे श्रीमंत नसले तरी त्या काळाच्या मानानें खाऊनपिऊन सुखी होते. त्यांच्यावर कर्जबाम नव्हतें. वृद्धापकाळींसुद्धा ते सकाळीं शेताकडे जात, दुपारीं घरीं येऊन आंघोळ झाल्यावर गावच्या देवालयांतील ज्योतिबाच्या दर्शनास जात. देवालयांत कोणी वाटसरू असल्यास, त्याच्या जेवणाची चौकशी करून, तो जेवला नसल्यास त्यास आपल्याबरोबर जेवावयास घरीं नेत. वर्षा दोन वर्षांनी घरचीं चार माणसें घेऊन पंढरपुरास अगर देहू आळंदीस जात. श्राद्ध व महाळ श्रद्धेने घालीत. अशा प्रसंगीं पैपाहुणे व गावचे सर्व लोक जेवावयास येत. दसऱ्यात देवीचा गोंधळ घालीत. जरी आजोबा कोणावर फारसे रागावत नसत, तरी त्यांचा

दरारा सर्वांवर असे. माझे वडील व चुलते त्यांना वचकून असत.

बापूजी पाटील ही माझ्या लहानपणीं आमच्या भागांतील एक ठळक व्यक्ति होती. त्याच्या तरुणपणीं त्या वेळचे विशाळगडचे जहागिरदार त्यांना इतमामानें वागवीत. कधीकधी "आपली घोडी घेऊन या" असेंहि सांगत व दोघे घोड्यावरून दौड करीत. आमच्या भागांत त्यांचा बोज असे. ते वृद्ध असतांना त्यांच्याबद्दल मी पाहिलेली एक गोष्ट सांगतों.

आमच्या गावाजवळून वाहणाऱ्या वारणा नदीच्या पूर्वकिनाऱ्यावर सातारा हद्दींत कणदूर म्हणून एक गाव आहे. त्या काळीं मारामाऱ्या, जाळपोळ करण्यांत हा गाव प्रसिद्ध असे. तेथील दोन आडदांड गुंड भाऊ लक्‍ू व बाळा यांना आपल्या शक्तीचा ताठा असे आणि ते कणदूर व शेजारच्या गावांतील लोकांस भीति घालून खंडणी वसूल करीत. त्यांनी मागितलेली रक्कम न मिळाल्यास ते लोकांच्या गंज्या पेटवीत. त्यांच्याविरुद्ध कोणी साक्ष देण्यास धजत नसे व पोलीसहि त्यांना भिऊन वागत, म्हणून त्यांचा धुडावा चाले. माझे चुलत आजोबा बापूजी पाटील खाऊनपिऊन सुखी होते. लक्‍ू व बाळा यांच्या मनांत बापूजींकडून खंडणी मागण्याचें आलें, व ते बापूजींकडे आले. त्यांच्या हातांत फरशा होत्या. त्या वेळीं मी तेथें होतों. मी बारा तेरा वर्षांचा असेन.

वृद्ध बापूजींनी त्या तरुणांना "या, बसा" म्हणून सांगितलें व कशासाठी आलांत म्हणून विचारलें. ते म्हणाले, "आम्ही तुमच्याकडून खंडणी घेण्यासाठी आलों आहोंत. शेजारच्या गावच्या लोकांनी आम्हांस खंडणी दिल्याचें तुम्हीं ऐकलें असेल." बापूजी म्हणाले, "बस करा! जेवा पाहिजे तर व मुकाट्यानें कणदूरची वाट धरा. तुम्ही आगी लावतां, हें मला माहीत आहे; भिऱ्याच्या मागे लागून खंडणीहि घेत असाल. पण हा बापूजी थोरात जुन्या काळचा माणूस आहे. तो भिणार नाहीं. शिवाय मी आतां म्हातारा झालों. विधुर आहें. मला दोन कर्ती-सवरतीं मुलें आहेत. मला बंदूक चालविता येते." असें म्हणून वृद्ध बापूजी उठले व खुंटीवरची बंदूक हातांत घेऊन म्हणाले, "लौकर बाहेर निघा. दुनाल बंदूक भरलेली आहे. येथल्या येथें ठार करीन, समजलांत? अरे, आगी लावून भित्र्यांस भीति दाखवून गुंडपणा करतां. या बापूला तुम्हीं शिवधडें असेल ओळखलें नाहीं? चला, दाराबाहेर निघा. नाहीं तर गोळी सुटेल." हे म्हाताऱ्याचे कठोर निश्चयाचे शब्द ऐकून बाळा व लक्‍ू मुकाट्यानें चालते झाले व ते आमच्या गावाच्या वाटेस गेले नाहींत.

बापूजींस दोन मुलगे होते. त्यांना पणतवंडें आहेत. पैकी शंकरराव सरूडच्या इंग्रजी शाळेच्या बोर्डाचे अध्यक्ष आहेत. दुसरे रंगराव कायदेकौन्सिलमध्ये कांहीं दिवस होते. एका नातवंडाचा मुलगा बी० ए० झाला आहे. बापूजींच्या मुलीची (बायजाबाई) मुलगी यशोदा ही माझी पत्नी.

आजोबा व आजीबद्दलच्या मला फारशा आठवणी नाहीत. आजोबा नेहमी शेतावर असत; फक्त जेवावयास व झोपावयास काठी टेकीत टेकीत घरीं येत. आम्ही मुलें शेताकडे गेलो तर ते आम्हास हरभरा किंवा वाटाणा उपटू देत नसत. ते स्वत हि ढाळे उपटीत नसत. ढाळे उपटल्यास पोच्या शेंगा व घाटे वाया जातात, म्हणून शेतातच नसून शेंगा व घाटे तोडून आणून आम्हास देत. दुसरी आठवण सन १८८५ साली माझे वडील माझ्या आजाआजींना घेऊन बैलगाडीने पदरपुरास गेले, त्या वेळीं माझी आई, मी व माझी बहीण लक्ष्मुबाई त्यांच्याबरोबर गेलों तेव्हाची. जेवणाची वेळ झाली म्हणजे गाडीवानाने गाडीचे बैल सोडावे, बैलास पाणी पाजून पाण्याची घागर भरून आणावी, तोपर्यंत वडिलांनी झाडाच्या सावलीत कांबळा आथरून गाडींतील सामान काढावें व आम्हास कांबळ्यावर बसवावें; आजीने व आईने भातपिठलें तयार करावें, असा रोजचा क्रम जाता येता सुमारें पधरा दिवस चाले. आमच्या गावाहून पदरपूर अजमासें १२५ मैल असावें. त्या वेळीं कोल्हापूर ते पदरपूर आगगाडी नव्हती. माझी बहीण लक्ष्मुबाई अगदी लहान असल्याने आईच्या अगावरच असे. आई स्वयंपाक करण्यात गुतली म्हणजे ती रडू लागे. एकदा एक दरवेशी अस्वल घेऊन जात असता त्याला वडिलांनी थोपाविलें व लक्ष्मुस त्याच्या जवळ नेऊन सागितलें की, "पाहा, रडलीस तर या अस्वलास देऊ." या मनाचा चागला उपयोग झाला. पुढेसुद्धा ती रडू लागली तर "अस्वलास आणू का?" असे मी म्हणत असल्याचें मला आठवतें. पदरीस देवदर्शन घेऊन, मठ सवाष्ण घालून परत फिरल्यावर कोठे तरी नदीच्या अगर ओढ्याच्या घसरणीवर आमची गाडी उलटली, त्यात आजोबाचा हात मोडला. वडिलाच्या कोपरास लागलें. गाडी पळत असताना उलटल्याने हिसका बसून मी व माझी बहीण गाडींतून दूर फेकलीं गेलों. कर्मधर्मसयोगाने आम्ही दोघहि वाळूच्या ढिगावर पडलों, त्यामुळे आम्हास काहीहि दुखापत झाली नाही. आजोबाच्या दुखावलेल्या हातास ओल्या नारळाचा कीस उन करून त्याचा लेप दिला व त्यावर लहान पातळ फाटक्या बाधल्या. पुन्हा परत प्रवास सुरू केला. यात्रेहून परत घरीं आल्यावर आजोबांचा हात बरा झाला व ते रानामाळात नेहमीप्रमाणे काठी टेकीत जाऊ लागले. मात्र पदरीच्या यात्रेहून परत आल्यापासून ते थकत चालले. तरी पण अशा त्याच्या विकलाग परिस्थितींतहि, त्यांचें व आजी दत्याबाई यांचें लहानथोरावर वजन व दरारा असे. आजोबा माघ वद्य एकादशी शके १८०८ (तारीख १८ फेब्रुवारी १८८७) रोजीं सुमारें ऐशी वर्षांचे होऊन निवर्तले. त्यांच्या निधनापूर्वी, त्यांच्या मुलानी दानधर्म केला व यथासांग और्ध्वदेहिक क्रिया केल्या. त्यांना ईश्वरराव, बळवंतराव, चिमाजी व दौलतराव असे चार मुलगे आणि भाऊबाई व चागुणाबाई (चिगुबाई) अशा दोन मुली होत्या. भाऊबाईचें लग्न सरूड येथील नारायण पाटील रोडे यांच्याशीं झालें होतें. चिगुबाईचें लग्न महादेव यशवतराव माने नाईक, राहणार शिपे, यांच्याशीं झालें होतें.

आजोबा वारल्यानंतर लौकरच माझे वडील व चुलते विभक्त झाले. त्यांच्या वाटण्याहि निरतकार झाल्या. जमिनीच्या, जनावराच्या व दागदागिन्याच्या वाटण्या वस्तु तेवढ्या बरोबर करून, त्यांचे दिवस फागदावर करून, त्यास १, २, ३ व ४ असे नंबर दिले. नंतर कागदाच्या लहानलहान तुकड्यांवर ते आकडे लिहून त्यांच्या घड्या करून त्या घड्या एकत्र हलवून देव्हाऱ्यापुढे टाकल्या व एका लहान मुलाने त्या चार चिठ्या प्रत्येकीं एकेक अशा त्या चौघा भावांस दिल्या. चिठ्ठींत जें आलें तें प्रत्येकाने निरतकार मान्य करुं व त्याप्रमाणे ठराव लिहिला. त्या चिठ्या वडिलांच्या दप्तरात मला मिळाल्या आहेत. माझ्या वडिलांच्या वाटणीस आलेल्या जमिनी व घर आजहि कायम आहेत. या त्यांच्या वाटणींतील एक रेडा, चार बैल, तीन गाई, व माझ्या आईस तिच्या वडिलांनी मुलाला (मला) दुधासाठी दिलेली 'जनी' गायहि माझ्या दृष्टीसमोर आजदेखील येत आहे.

आजोबा निधन पावल्यानंतर आमिच्या कुटुंबाची घडी विसकटली. जो तो आपल्यापुरतं पाहूं लागला. पूर्वीप्रमाणे आजींचा जोर राहिला नाहीं व तिची थोडी आबाळ झाली असे मला त्या वेळींहि वाटत असे. तरी पण नदरला बाळ ओळखून आजीने आल्या दिवसाला निरतकार ताड दिले. आजोबाच्या मागं आजी सहा वर्षे जगली. ती सुमारें ८२ वर्षांची होऊन आश्विन वद्य ८ शके १८१५ रोजीं निवर्तली. जुन्या रिवाजाप्रमाणे तिच्या मुलांनी बापाच्या वेळीं जसा दानधर्म केला, गोप्रदान केलें, तसेच तिच्या निधनाच्या वेळींहि केलें.

माझे धाकटे चुलते दौलतराव हे तारीख ३१-१२ १८९६ रोजीं मरण पावले. त्यांना एक मुलगी व दोन मुलगे होते. मुलीचें लग्न मौजे शिंपे येथील बापू नाईक याचा मुलगा रामचंद्र याच्याशीं तिच्या लहानपणीं झालें होतें. माझ्या वडिलांनी दोन्ही पोरके मुलगे आपल्या घरीं नेले. त्या वेळच्या पद्धतीप्रमाणे त्या मुलांचीं लग्नं लहान पणींच झालीं. थोड्याच दिवसात धाकटा मुलगा व दुसऱ्याची (श्रीपतीची) बायको (सरूडचे कृष्णा नारायण सोमवंशी यांची मुलगी) वारली. नंतर माझ्या वडिलांनी श्रीपतीचें दुसरें लग्न वाडीचरणच्या लाडाची मुलगी आकुबाई हिच्याशीं करून दिलें. पण श्रीपति लवकरच सन १९१५मध्ये प्लेगने वारला. म्हणजे माझे वडिलांचे आधी सुमारें वर्षभर त्याचें निधन झालें. पुढे माझे वडील सन १९१६ साली पुण्यास वारले व माझ्यावर मोठी जबाबदारी पडली. मीं श्रीपतीच्या जमिनीची घरच्या घरींच माझ्या चुलतभावास लागण केली व येणाऱ्या उत्पन्नातून त्याच्या जमिनीचा सारा व त्याच्या बायकोच्या (आकुबाईच्या) अन्नवस्त्राची तजवीज केली. आकुबाई आपल्या बापाकडेच राही. मी रजेवर गावीं गेलों म्हणजे ती आमच्याकडे चारआठ दिवस राहण्यास येई. प्रथम प्रथम तिला आपण दत्तक घ्यावासा वाटे व त्याप्रमाणे तिने मला विचारलेंहि. मीं तिला सांगितलें, "तू अजून लहान आहेस. आणखी चार वर्षांनी तुला चांगलें समजूं लागल्यावर तुला वाटलें तर दत्तक घेता येईल." चार वर्षांनंतर

मीं तिला परत विचारलें, "तुला आता चागलें समजत. पाहिजे तर दत्तक घे." ती म्हणाली, "जर तुमचा मुलगा देत असाल तरच मी दत्तक घेईन. नाहीं तर मला दत्तक नको. दत्तक मुलगा तर वागतीलच कशावरुन? तुम्हीं माझी अन्नवस्त्राची सोय चागली केली आहे, तीच मला बरा वाटते." आकुबाई सुशील होती. बापाच्या घरीं राहून तिने आपल्या माधाच्या ससारास मदत केली. माझ्या आईच्या वृद्धापकाळीं, शेवटच्या चार महिन्याच्या आजारात (सन १९४८ साली) तिची चागली सेवाशुश्रुषा केली. तसेच सन १९४९ सालात माझ्या पत्नीच्या शेवटच्या दुखण्यात तिचीहि आकुबाईने मनोभावें शुश्रूषा केली या दोघीच्या आजारात तिच्याबरोबर माझ्या चुलतभावाची बायको (गगुबाई हैबतराव) हिनेहि दोघींची मनापासून सेवा केली. या दोन्ही चुलतभावजयाचे माझ्यावर फार मोठे उपकार आहेत. कारण माझ्या आईच्या व बायकोच्या आजारपणात आमच्या घरीं दुसरें कोणी घरचे माणूस नव्हत. मुलगी व सुना आपापल्या घरीं होत्या, त्या फक्त कधीकधी येऊन भेटून जात. आकुबाई तीनचार वर्षामागे, सन १९५८ साली, वारली, वृद्ध गगुबाइ सुदैवाने हयात आहेत.

माझे थोरले चुलते ईश्वरराव हे सन १९०८च्या सुमारास वारले असावेत. त्याना दोन मुलगे, रामचद्रराव व हैबतराव, आणि एक मुलगी बाळाबाई, अशीं तीन अपत्यें होतीं. मुलगी बाळाबाई तिच्या लग्नानतर थोड्याच दिवसानी वारली. रामचद्ररावहि सन १९१८ सालीं निवतले व लवकरच त्याची बायकोहि निधन पावली. त्या वेळी रामचद्ररावाचा मुलगा महिपतराव हा अवघा चार पाच वर्षाचा होता. या ठिकाणीं सागण्यासारखी गोष्ट म्हणजे या लहान मलास, महिपतरावास, त्याच्या आजीने आपल्याकडे आजोळीं नेलें. त्याच्या कपड्यालत्त्याचा, जेवणाचा व शाळेचा खर्च मी त्याच्या शेतीच्या उत्पन्नातून मागवीं. महिपतीच्या रेंवामातीची व त्याच्या शिक्षणाची व्यवस्था माझ्या आईच्या साहाय्याने मलाच पाहावी लागे.

माझे मधले चुलते बळवतराव यास पाच मुलगे व दोन मुली होत्या. आता त्याच्या मुलांपैकी फक्त एकच मुलगी हयात आहे. बळवतराव सन १९१३ सालीं परलोकवासी झाले. याच्या दोन मुलाचीं (गोविंदराव व सखाराम) मुलेंबाळें आहेत. तीं शेतीभाती करतात. बळवतरावाची मुलगी विठाबाई हिचें लग्न सरुडास यशवतराव सोमोशी याच्याशीं झाले होते. विठाबाई हयात असून तिला तीन मुलगे आहेत. हे तिघेहि सुशिक्षित असून एकत्र राहतात. त्यापैकी पहिला बापूसाहेब व तिसरा शकरराव हे शेती करतात व मधला मुलगा पाडुरग एल्एल्० बी० असून मलकापुरास वकिली करीत असे. नुकतीच त्याची नेमणूक 'असिस्टट कमिशनर ऑफ सेल्सटक्स, महाराष्ट्र' या जागवर झाली आहे.

ॐ

# माझे आईवडील

ॐ

मी सात वर्षांचा झाल्यावर जवळच असलेल्या माझ्या आजोळीं मला माझ्या वडिलांनी गावठी शाळेंत घातलें. त्या गावीं शाळेंत शिकत असतांना मी वेळ्हा वेळ्हा आमच्या गावीं (वडगावीं) माझ्या आईवडिलांकडे जात असें. माझे वडील व मातोश्री मात्र वरचेवर शाळशीस येऊन मला पाहून जात. पुढें मला शाळशींच्या गावठी शाळेंतून काढून आमच्या गावालाच लागून असलेल्या सरदातील सरकारी शाळेंत मोडी दुसऱ्या इयत्तेंत घातलें. या सरुडच्या शाळेंत मी तीन वर्षे होतों. म्हणजे माझें वय बारातेरा वर्षांचें होईपर्यंत मी आईबापाच्या सानिध्यांत होतों. पुढे चार वर्षे मी मलकापूरच्या शाळेंत गेलों. मलकापूर आमच्या गावापासून सातआठ मैल असल्याने, मी महिन्या पंधरा दिवसांनी गावास जाऊन येई. पावसाळ्यात बहुतकरून वडगावींच राहत असें. वडिलांच्या मतें, मी शेतकामास उपयोगी पडण्याच्या वयाचा होईपर्यंत थोडें ज्ञान मिळवावें एवढेंच. सरकारी कामानिमित्त वडिलांस वेळोवेळीं मलकापुरास जावें लागे. मलकापूरचा आठवड्याचा बाजार शुक्रवारीं असल्याने, ते शुक्रवारीं सकाळीं मलकापुरास येत. एखादे वेळीं मी त्यांच्याबरोबर संध्याकाळीं घरीं येऊन सोमवारीं सकाळीं परत मलकापुरास जाई. म्हणून या चार वर्षांतसुद्धा माझा घरचा संबंध तुटला नाही. या मुदतींत माझी बहीण लक्ुबाई आईजवळ असे. ती माझ्यापेक्षा चारपाच वर्षांनी लहान होती. तरी पण तिचें लग्न तिच्या अगदी लहानपणीं, ती तीनच वर्षांची असतांना, सरुडास गोविंदराव सोमोशी यांचा मुलगा नारायणराव यांच्याशीं झालें होतें. लक्ुबाईची सासू व सासरा हीं समजूतदार माणसें होतीं. मी बाहेरगावीं शिक्षणासाठी असावयाचा व लक्ुबाईशिवाय मला भावंडें न होतीं, त्यामुळे ती वयांत आल्यावरसुद्धा तिच्या सासूसासऱ्यांच्या संमतीने ती फार करून माझ्या आईकडे असे. थोडे दिवस सासरीं पण जास्त दिवस आमच्या घरींच असे.

तिला दोन मुली (हौसाबाई व हिराबाई) व दोन मुलगे (यशवंतराव व सदाशिव) अशीं चार अपत्यें होतीं. हीं मुलें माझ्या आईकडेच असत. हौसाबाईचें लग्न आमच्या गावापासून तीनचार मैलावर असलेल्या सागावातील एका सधन पाटलाच्या शंकरराव नावाच्या मुलाशीं माझ्या वडिलांनी स्वखर्चानें करून दिलें होतें. या शंकररावाचें मराठी चौथ्या इयत्तेपर्यंतच शिक्षण सागावातच झालें होतें. पुढें मीं त्यास आमच्याकडे पुण्यास पुढच्या शिक्षणासाठी नेलें. पण त्याचें शिक्षणाकडे लक्ष लागलें नाही व दोनतीन वर्षांतच ते परत आपल्या गावीं गेले.

आमच्या काही अडीनडीच्या वेळीं आई आमच्याकडे, आम्ही असू तेथे, थोडे दिवस येऊन जाई. वडिलानाहि माझीं मुलें पाहावींशीं वाटत. ते आइस परत नेण्यासाठी म्हणून येत व चार दिवस राहून दोघेहि परत जात. कधीकधी आमचें एखादें मूल त्यांच्याबरोबर काही दिवस गावीं जाई. या दृष्टीने मला व माझ्या मुलाना माझ्या आईवडिलांचा सहवास लाभत असे.

माझी आई वर्णाने निमगोरी, सडपातळ व जरा उचेली होती. सरळ लांबट नाक व पाणीदार तेजस्वी डोळे असून ती मारदस्त दिसे. आईचें वय सुमारें पन्नास वर्षांचें असताना, तिला प्रदराच्या विकारामुळे चारपाच वर्षे त्रास होई. मी त्या काळीं कोल्हापुरास राजाराम हायस्कूलमध्यें होतों. वेळोवेळीं मी डॉ० सकपाळकडून औषध घेऊन तें गावीं आईकडे पोहोचतें करीं. एकदा तिचा आजार विकोपास गेला व तिला अथरुणास खिळून राहावें लागलें. वडिलांनी मला कोल्हापुराहून बोलावून घेतलें. घरच्या माणसानी आईची आशा सोडली होती. जवळपासच्या गावचे सगसोयरे तिच्या शेवटच्या भेटीसाठी आले होते, त्यानींहि तिला पाहून आपल्या गावीं परत जाण्याचें रहित केलं. थोड्याच अवधींत या बाइ मरणार, तर तिला अग्नि देऊनच जावें, असें वाटून ते थांबले होते. माझे वडील अश्रुपूर्ण नेत्रानी आईकडे पाहात उभे होते. तिचे डोळे झाकलेलेच होते. इतक्यात साधे व स्वच्छ कपडे घातलेला एक कोकणी मराठा आमच्या दारावरून जात असता दरवाजात बरींच माणसें जमलेलीं पाहून तो आत आला. विचारपूस करता त्याला समजलें की एक बाई अत्यवस्थ स्थितींत आहे. त्या गृहस्थाने तिच्या दुखण्याबद्दलची बारीक चौकशी केली व तिला पाहण्याची इच्छा प्रदर्शित केली. त्याने तिला पाहिलें, तिचें पोट चाचपलें आणि म्हणाला, "बाईच्या गर्भाशयात लाडवासारखा गोळा झाला आहे. आपण लोकानी तर बाईची आशा सोडलेली दिसते. मी एक आसुरी उपाय करून पाहू का?" "आता कसचा उपाय!" म्हणत म्हणत माझ्या चुलत्याने सांगितलें, "करून पाहा तुमचा अखेरचा उपाय." त्या गृहस्थानें पाणी मागून घेतलें, आपले हातपाय धुतले. घरातून एक स्वच्छ खादीचें धोतर मागवून घेऊन त्याची चौपदरा घडी केली व ती घडी आईच्या ओटीपोटावर घातली. देवाचं नाव घेऊन हाताने पोटातील गाठ चाचपली. नंतर दातानी गाठ असलेला भाग कराकरा बराच वेळ चावला. आईला त्या वेळीं शुद्ध

नव्हती. त्याने आपलें तोंड उचललें त्या वेळीं आईने आराम वाटल्यासारखा श्वास सोडला व डोळे उघडले. तिचा श्वासोच्छ्वास हळूहळू व्यवस्थित चालू लागला व ती थोडा वेळ स्तब्ध पडली. "आता आईला तशीच थोडा वेळ पडू द्या. कोणी तिच्याशीं बोलण्याचा प्रयत्न करूं नका." असे सांगून ते गृहस्थ खोलीबाहेर आले. इतर माणसांबरोबर गुडगुडी ओढली व घराबाहेर पडले. आमच्या चाळींत कोणाचें लक्ष त्या गृहस्थाकडे गेलें नाहीं. थोड्या वेळाने आईस बरें वाटतें, असे सांगण्यास मी बाहेर आलों, पण ते गृहस्थ आधींच निघून गेल्याचें समजलें. हळूहळू आईची प्रकृति सुधारली, तिचा आजार नाहीसा झाला. ती पुढे जवळजवळ पन्नास वर्षें जगली. या अवधींत तिची प्रकृति अगदी निकोप होती.

सन १९१४ सालीं मी वडिलांस व आईस घेऊन सेतुबंध रामेश्वरास गेलों होतों. रामेश्वरच्या यात्रेहून परत जाताना, आई व वडील यांना वडगावीं पोहोचवून मी रत्नागिरीस कामावर रुजू होण्यास गेलों. दुसऱ्या वर्षीं सप्टेंबरात माझी डेप्युटी डायरेक्टर ऑफ ॲग्रिकल्चर, उत्तर भाग (दक्षिणेंतील मराठी जिल्हे, खानदेश व गुजराथ) म्हणून नेमणूक झाली. माझें सदरस्टेशन पुण्यासच होतें. वडील गावीं शेवाभाताकडे फिरून येत. त्यापूर्वी थोडे दिवस माझ्या धाकट्या चुलत्याचा मुलगा श्रीपति प्लेगने सन १९१५ सालीं ऑगस्ट महिन्यांत वारला होता. श्रीपतीचे आईबाप आधींच वारल्याने त्याचें संगोपन माझ्या आईवडिलांनी केलें होतें व त्याचें लग्नहि करून दिलें होतें. श्रीपति व त्याची बायको आमच्याच घरीं राहात. श्रीपति सन १९१५ सालीं प्लेगने वारला. त्याच्या मरणापासून माझ्या आईवरची संकटपरंपरा सुरू झाली. प्लेगांत माझे चुलतभाऊ ईश्वरराव यांचे मुलगे रामचंद्र व हैबती हे एकामागून एक वारले व माझ्या आईवर आपल्या पुतण्याच्या संसाराची जबाबदारी पडली. तिच्या पुतण्याचा एक मुलगा (आनंदराव हैबतराव) तीन वर्षांचा व दुसरा (महिपत रामजी) एक वर्षाचा होता. माझ्या वडिलांची प्रकृति बरी नव्हती तरी ते पडून नव्हते. आई त्यांची व्यवस्था चांगली ठेवी. घरीं नोकरहि होते. नेहमीप्रमाणे त्यांचीं पत्रें आठवड्याच्या आठवड्यास येत; पण तारीख २० माहे फेब्रुवारी सन १९१६ रोजीं त्यांचे शेवटचें व अपुरें पत्र आलें. पत्राचा पहिला भाग त्यांच्या स्वतःच्या हस्ताक्षरांत होता. बाकीचें पत्र दुसऱ्याकडून पुरें करून घेतलें होतें. दुसऱ्याकडून पुरें करून घेतलेल्या भागांत लिहिलें होतें कीं, "मी हें पत्र लिहीत असताना मला एकाएकी दिसेनासें झालें आहे व त्यामुळे हें पत्र दुसऱ्याकडून पुरें करून घेतलें आहे. तुम्ही येऊन गेल्यास बरें." पत्र मिळताच रजेचा अर्ज टाकून मी वडिलांकडे गावीं गेलों. त्यांच्या मेंदूंतील एका बारक्या रक्तवाहिनींत रक्त साकळून ती गोठली होती. त्यांची एक बाजू बधिर झाली होती. त्यांना चांगलें बोलता येत नव्हतें व दिसत तर नव्हतेंच. मात्र कानांनी ऐकूं येत होतें. मी लगेच त्यांना घेऊन पुण्यास जाण्याची तयारी करूं लागलों, हें त्यांना समजलें. आपण निश्चित

मरणार हें त्यांनी जाणलें. ते पुण्यास येण्यास नाराजच होते. गाव सोडताना त्यांना फार दुःख झालें. डोळ्यांतून अश्रु वाहू लागले. "मला माझें गाव सोडून दुसरीकडे नेऊ नका. माझे गावींच मला देह ठेवू द्या." असें ते हळूहळू म्हणाले. पण आशा आहे ना! मी त्यांना व आईला घेऊन उठाउठी पुण्यास गेलों. डॉ० व्ही० सी० गोखले यांचे देखरेखीखाली उपचार सुरू केले. वडिलांची हातापायांची शुद्ध गेली होती, म्हणून डॉक्टरांच्या सांगण्यावरून मीं ऊन पाण्याच्या बाटल्यांनी शेकावयास सुरुवात केली व त्यांच्या पायाच्या तळव्याजवळ एक ऊन पाण्याची बाटली ठेविली माझ्या हयगयीमुळे त्यांच्या एका पायास फोड आला. मला फार वाईट वाटलें. सर्व उपाय थकले व फाल्गुन शुद्ध प्रतिपदा शके १८३७ (तारीख ५ मार्च सन १९१६) रोजीं वयाच्या सत्तराव्या वर्षी त्यांचें देहावसान झालें.

त्या काळीं मी अधिकारी असल्याने व मराठा समाजात वयानेहि मोठा असल्याने, पुण्यास माझा मित्रपरिवार मोठा होता. केे० एम० पवार, बाबुराव येथे, गणपतराव शिंदे, नानासाहेब कदम, दादासाहेब सोंडे, रावबहादूर गंगाजीराव काळमोर, रावबहादूर डुबे, लक्ष्मणराव टोपर, बाबुराव जगताप व दौलतराव निकम आदिकरून पोलिस खात्यांतील मराठा मंडळी जमा झाली. शुभरदीडशे टाळकरी जमले व मोठ्या समारमाने दिंडीमागून प्रेतयात्रा निघाली. एकडीपुलाजवळ मुठा नदीच्या काठीं अंत्यविधि झाला व शवास मडाग्नि दिला. दहाव्या दिवशीं उत्तरक्रिया झाली. आळंदीस इंद्रायणी नदींत अस्थि विसर्जन केल्या. बाराव्या दिवशीं मोठ्या प्रमाणात दिवस घातले व वडिलांचा कारभार संपला. मरण हें प्रत्येकासच आहे, पण दुःखाची गोष्ट म्हणजे त्यांच्या निधनाच्या वेळीं त्यांना बोलता आलें नाही व मुलानातवंडांस डोळे भरून पाहता आलें नाहीं. माझ्या आईप्रमाणे जर वडिलांस दीर्घायुष्य लाभलें असतें, तर देवदयेने झालेला माझा उत्कर्ष व माझ्या मुलांची कर्तबगारी, कीर्ति व वैभव हीं पाहून त्यांना फार समाधान वाटलें असतें.

माझ्या वडिलांबद्दल मला त्यांच्या हयातींत आदर वाटे व आजहि त्यांच्या पश्चात् त्यांच्याबद्दल मला अभिमान वाटतो. लहानपणीं त्यांनी माझे लाड पुरविले; *माझ्या शिक्षणावरयेंत माझ्या उद्धारासाठी व माझ्या कल्याणासाठी मला, एकुलत्या* एका मुलास, गावापासून दूर मलकापूर, कोल्हापूर येथे शिक्षणासाठी ठेविलें व तरुणपणीं कालेजमध्ये जाऊ दिलें. हें सब त्या काळात व आमच्या सांपत्तिक स्थितींत अलौकिकच होत. आमच्या भागातील मराठ्यांत त्यांनीच हा धडा प्रथम घातला, असें म्हटल्यास चुकीचें होणार नाही. मी शिकत असताना व पुणें, जळगाव, रत्नागिरी वगैरे ठिकाणीं नोकरीवर कामाला असताना, त्याचप्रमाणे सन १९१२ सालीं युरोपात प्रवास करीत असताना त्यांचीं पत्रे नियमितपणें दर आठवड्यास येत. पुणें, रत्नागिरी व जळगाव येथे आम्हाकडे येऊन ते मुलास भेटून जात. वडील अकालीं वारल्यामुळे मला त्यांची सेवा करण्याची फारशी संधि मिळाली नाही नाही म्हणावयास, मी

त्याना व मातोश्रीस पढरी, आळंदी व देहू या यात्रा करविल्या होत्या. वडिलांच्या निधनाच्या आदल्या वर्षी दोघाना घेऊन रामेश्वरची यात्रा केली; त्या वेळीं दक्षिणेतील बहुतेक क्षेत्रास आम्ही गेलो होतो. पण ते एकाएकी वारल्याने त्यांची सेवा माझ्या हातून घडली नाही, याबद्दल वाईट वाटतें.

मी चाळीस वर्षांचा झालो तरी वडील घरी असल्याने, मला आमच्या शेता-भाताची बिलकूल काळजी वाटत नव्हती. माझ्याकडे थोडेफार पैसे शिल्लक राहिले तर ते मी त्यांच्याकडे पाठवीं. नवीन घर बांधण्यात व काही जमिनी खरेदी करण्यात या पैशाचा विनियोग होई. वडिलांच्या योजना विचारपूर्वक केल्या जात असल्याने, मी त्यात मन घालीत नसें. माझ्या बहिणीच्या मुलाबाळांवर त्याना बराच खर्च करावा लागे; पण त्याबद्दल मीं कधी नापसती दाखविली नाही; उलट त्यांचे पश्चात् व बहिणीच्याहि पश्चात् तिच्या मुलाबाळांच्या शिक्षणाचा व तिच्या ल्हान अविवाहित मुलींच्या लग्नाचा भार मीं उचलला. आपल्या स्वत.च्या ससाराची (घर, जमीन, बैलजनावरें वगैरे) व वडिलानी अगावर घेतलेल्या आपल्या पुतण्याच्या (श्रीपतीच्या) ससाराची व्यवस्था कशी लावावी हा प्रश्न माझ्यापुढे येऊन पडला. आगोटीचे दिवस जवळ येत चालले होते व जमीनजुमल्याची आणि बैलजनावराची काही तरी व्यवस्था तातडीने करणें जरूर होतें. म्हणून मी किरकोळ रजा घेऊन गावीं गेलों. आईला भेटून विचारलें, "आई, तू आता आमच्याकडे पुण्यास येणें बरें." ती म्हणाली, "हा संसाराचा पसारा टाकून मी कशी येऊ? शिवाय मी आपल्या वतनाच्या गावीं मालकीच्या मठींतच राहणें बरें. तुमचे वडील गेले. हा सर्व ससार आता तुमचा आहे. तुम्हीच आता आपल्या जमीनजुमल्याचें काय करावयाचें तें ठरवा." हें तिचें बोलणें ऐकून मी फार कष्टी झालों व बुचकळ्यातहि पडलों. मला काही सुचेना. हें पाहून आई म्हणाली, "का बोलत नाही?" यावर थोडा विचार करून मी म्हणालें, "आजवर आम्हीं घरींच शेती केली. आता जर आम्हीं जमीन खडमागाने दिली तर आपली जुनी प्रथा मोडणार व तें बरें नाही; पण जमीन घरीं करावें म्हटलें तर शेती पाहण्यास घरचा कोणी माणूस नाही. तुला काय सागावें हेंच मला उमजत नाही." आई म्हणाली, "एक तर मला तुमच्याकडे पुण्यास येऊन राहिलें पाहिजे किंवा येथेच राहिलें पाहिजे. जर येथे राहायचें असेल तर खाव्याकोड्यागारखे बाजारातून दारूगोळा व हरेक जिनस आणणें मला पसत पडणार नाही. आताप्रमाणे मला गाईम्हशी पाहिजेत. शेताकडे जाऊन भाजीपाला घेऊन येणें मला बरें वाटेल." पुढे आई आणखी म्हणाली, "शेतीभातीची सर्व व्यवस्था मी पाहू शकेन. मात्र माझ्या मनात तुम्हीं हे दगदग करता उपयोगी नाही. आमच्या शेतीत फारसा तोटा होण्यासारखा नाही, पण जर यदाकदाचित् तोटा आलाच तर तुम्हीं सोसू शकाल. मी नरसिमाच्याकडून शेती चालू करेन किंवा तुमच्या मेहुण्यास येथे आणू. त्यांची मुले तर मरकडेच आहेत. या घरच्या माणसाची मला मदत होईल." त्या वेळीं

माझी बहीण तेथेच असल्यामुळे मी तिला म्हणालों, "काय ल्लुबाई, तुम्ही येऊ शकाल काय?" त्यावर ती म्हणाली, "आम्हाला यायला काहीच अडचण पडणार नाही. आईलाहि आमची सोबत होईल." त्यावर मी म्हणालों, "तर मग हें मी सर्व तुमच्यावर सोपवून निधास्तपणें परत जातो. तुम्ही सर्व चालवा. तुमच्या कामात मी ढवळाढवळ करणार नाही." नंतर मी पुण्यास आलों.

ठरल्याप्रमाणे ल्लुबाई, तिचा नवरा व मुलं आईकडे वडगावास जाऊन राहिलीं. परंतु दुर्दैवानें माझ्या वडिलांच्या निधनानंतर पांच महिन्यांनी तारीख १९ माहे ऑगस्ट सन १९१६ रोजीं ल्लुबाई प्लेगनें वारली. त्यामुळे उलट तिच्याच संसाराचा व मुलाबाळांचा सर्व बोजा माझ्या आईवर पडला. ल्लुबाई वारली त्या वेळीं तिच्या मोठ्या मुलीचें, हौसाबाईचें, लग्न झालें होतें. मोठा मुलगा यशवंत आठ वर्षांचा होता. दुसरी मुलगी हिराबाई तीन वर्षांची व दुसरा मुलगा सदाशिव फक्त चार महिन्यांचा. असा सगळा पोराडा होता.

असल्या अडचणीच्या व संकटाच्या वेळीहि माझ्या आईनें धीर सोडला नाही. आल्या आपत्तीस तोंड दिले. चार महिन्यांच्या, बिनाआईच्या आपल्या नातवडाकडे पाहून तिला वयाच्या सत्तुसष्टाव्या वर्षी पान्हा फुटला. हें मूल आपल्या वृद्ध आजीच्या म्हणजे माझ्या आईच्या अंगावरचें दूध पिऊन जगलें व त्याला तिनें ल्हानाचा मोठा केला.

माझ्या बहिणीच्या निधनानें आईच्या संकटाचा शेवट झाला नाही. तारीख २० जून १९१८ रोजीं तिचा नातू, ल्लुबाईचा पहिला मुलगा यशवंत, प्लेगनें वारला. थोड्याच दिवसांत तिची नात हौसाबाई बाळंतपणासाठी वडगावास आली तेथे तिला प्लेग झाला. मला हें समजतांच मी पुण्याहून गांवीं गेलों व तिच्या औषधपाण्याची सोय केली. पण आता आपण मरणार हें जाणून ती बाळंतिणीच्या खोलींतूनच म्हणाली, "मामा, जरा दोन मिनिटें तेथेच उजेडात उभे राहा. मला तुम्हास डोळे भरून पाहू द्या." तिच्या त्या प्रेमळ शब्दांनी माझें अंतःकरण कालवलें. मग आपल्या वारलेल्या मुलीच्या मुलीचे हे शब्द ऐकून माझ्या आईस काय वाटलें असेल याची कल्पनाच केलेली बरी. नंतर हौसूबाईनें बाळंतपणाच्या यातनांतच तारीख ५-९ १९१९ रोजीं प्राण सोडला. संकटाचा असा कडेलोट झाला, तरी आईचा धीर खचला नाही. आमची शेतीभाती गडीमाणसें ठेवून माझे मेहुणे नारायणराव हे पाहात. कांही दिवस बरें चाललें. बहिणीची (ल्लुबाईची) दुसरी मुलगी हिराबाई हिचें लग्न करून दिलें.

आम्ही त्या भागातील एक घरंदाज शेतकरी गणले जात असू. माझे तीन चुलते व त्यांची मुलेंबाळें असा अटाळा होता. पण सन १९१२ ते १९२० पर्यंत या भागात प्लेगनें कहर उडविल्यामुळे आईचे दीर, जावा व दिरांचीं बरींच मुलें प्लेगास बळी पडलीं व दिरांच्या मुलांचीं ल्हानसहान मुलें मागे राहिलीं. इतकेंच न हे तर

जवळपासच्या माऊरदाच्या वुद्रुगावचि अशीच दशा उडाली. गावात फक्त पाच सहा घरें जरीं राहिलीं होतीं. गावांत जाणते वडील माणूस म्हणजे माझी आई तिला जनावदाराने सर्वांचा परामर्श घ्यावा लागे. मलाहि सन १९१३-१४ मध्ये अडचणी आल्या होत्या. आम्ही जळगावास असल्या मुदतींत तेथील कडक उन्हाळ्यात आमचीहि लहानलहान तीन मुले दगावलीं होतीं. पण तारुण्यात आम्ही त्याचा वियोग सोसू शकलों. पुण्यास बदलून आल्यावर आमचा सवार ठीक चालला होता. आम्ही सुस्थितींत असल्याने गावाकडच्या आमच्या नातलगाची जबाबदारी आईवर व मजवर पडली होती, ती आम्ही उचलली म्हणण्यापेक्षा आइनेच उचलली म्हणणें योग्य होईल. माझा चुलतपुतण्या आनदराव व चुलतभाऊ गोविंदराव यास शेतीसाठी लागणारी पैशाची भाटवली मदत मी करू शकलों. त्याच्या अडचणीच्या वेळीं त्याना धीर देऊ शकलो. पण जागेवर फक्त आईच असल्याने, आपल्या मुलीच्या व माझ्या चुलतभावाच्या विद्यार्थिद्याचा सर्व भार आईने आपलेपणाने व मोठ्या धैर्याने उचलला. आनदाची गोष्ट ही की, चुलतभावाच्या बायका व मुलें यानी त्याची आठवण ठेवली आणि आई फार थकल्यावर तिच्या वाधक्यात तिला सोबत केली. तिला आदराने आणि प्रेमाने वागविले.

माझ्या आईवडिलासबधी एक गोष्ट सागण्याचें राहून गेलें. चिरजीव शकरराव हे माझ्या वडिलाचे लाडके नातू असून, वडिलाचें त्याच्यावर फार प्रेम असे. शकरराव सुमारे चार वर्षांचे असताना, दिवाळींत वडिलानी त्याच्यासाठी टिकल्याची पिस्तुलें घ्यावींत, मोठा फटाकडा उडविण्यासाठी काठीचा चिमटा करून द्यावा, लहानशा घोड्यावर बसवावें, असे चाले. शकररावानी सन १९२४ साली विलायतेस लष्करी शिक्षण घेण्यासाठी जाण्याचे ठरलें, त्या वेळीं ते पुण्यास कालेजात होते। विलायतेस निघण्यापूर्वी माझ्या आईस भेटून, तिचा आशीर्वाद घेण्यासाठी ते वडगावीं गले, तेव्हा आई म्हणाली, "आज तुझे आजोबा असावयास पाहिजे होते. तू लष्करी शिक्षण घेण्यास जाताना पाहून, त्याना फार आनद वाटला असता!" शकरराव तिच्या पायां पडले, त्या वेळीं आशीर्वाद देताना तिने डोंगरच्या ज्योतिबास नवस केला व म्हणाली की, "देवा, ज्योतिबा, माझ्या नातवास सभाळून परत आण. तो परत आला म्हणजे मी पायीपायी नवस फेडण्यास तुझ्याकडे डागरावर येऊन, नवस फेडीन." या तिच्या ज्योतिबाबरील विश्वासाचा शकररावाच्या मनावर खोल परिणाम झाला. ते वेळोवेळी ज्योतिबाच्या दर्शनास डोंगरावर जातात. त्याच्या घरीं देव्हाऱ्यावर ज्योतिबाची नित्य पूजा होते.

शकरराव सन १९२६ साली विलायतेंतील लष्करी शिक्षण घेऊन सेकड लेफ्टनट बनून परत आल्याचें कळताच, तिने आपला नवस फेडण्यासाठी ज्योतिबाच्या डोंगरास पायीं जाण्याचे ठरवलें. शरीर थोडे व माणूस होता, पण ती पायींच ज्योतिबाच्या डोंगरास गेली. डोंगराच्या ज्योतिबाचें स्थान आमच्या गावाहून सुमारे १८ मैल

आहे. तिने त्या दिवशी आमच्या गुरवाच्या घरीं मुक्काम केला. दुसऱ्या दिवशीं सकाळीं देवाची पूजाअर्चा करून नवस फेडला. या वेळीं आईचें वय ७४ वर्षांचें होतें.

माझे वडील वारल्यानंतर आईस हातशोऽदण म्हणून आम्हीं तिच्या मुलीस, जावयास व मुलास आमच्याकडे नेलें होतें. क्रमनशिबाने चार पाच महिन्यांचे आंतच लहुताई वारली व तिचीं मुलें आमच्याकडे राहणें क्रमप्राप्त झालें. लहुताई वारली, त्या वेळीं तिचें शेवटचें मूल सदाशिव अवघें चार महिन्यांचें होतें. माझे मेहुणे चाळिशीच्या आतच होते. शिवाय आमच्या घरीं स्वयंपाकपाण्यास घरचें कोणी नव्हतें. याचा आईने विचार करून आमच्या एका नातलगाच्या मुलीशी आपल्या जावयाचें दुसरें लग्न करून दिलें. हेतु हा की, जवळच्या नातलगाची ही मुलगी असल्याने ती सदाशिवाचें पालनपोषण करण्यांत आपलेपणाने स्वत ल मदत करील. आईचा अंदाज चुकला. कारण त्या नववधूला (तारुबाईला) सदाशिवाचा जिव्हाळा लागला नाही. आईशीं व आपल्या नवऱ्याशींहि तिचें चांगलेंसे पटेना, व ती सरुडास आपल्या नवऱ्याच्या गावीं सासऱ्याच्या घरींच असे. थोड्या दिवसानी लहुताईचा पहिला मुलगा यशवंत प्लेगने वारला. सदाशिव लहानपणीं आमच्याच घरून सरुडास शाळेंत जाई. पुढे आम्हीं त्याला पुण्यास नेलें. तेथे तो माझ्या धाकट्या मुलाच्या (नानासाहेबाच्या) वर्गांत असे.

मी सन १९३२ त पेन्शन घेऊन गावीं आलों, पण पत्नी, मुलं व सदाशिव पुढे दोन वर्षे पुण्यासच होतीं. सन १९३४ साली कोल्हापुरांत स्टेशनजवळ बंगला घेतला व तेथे ही मंडळी आली. नानासाहेब सन १९३४ त मॅट्रिक झाले. सदाशिव नानापेक्षा दोन वर्षांनी मोठा होता, पण त्यास मॅट्रिक होणें जमेना. तो देखणा व बांधेसूद असून सुस्वभावी व धाडशी होता. तो आम्हा सर्वांचें मन धरून असे व तो आम्हास आवडे. तो आमच्याकडे कोल्हापुरास असताना, त्याच्या शाळेच्या वाटेवरील एका विहिरीवर बरींच माणसे गलगा करीत असल्याचें त्याला दिसलें व तो तिकडे गेला. त्याने विहिरींत डोकावताच त्याला एक सातआठ वर्षांचा मुलगा गटांगळ्या खात असल्याचें दिसले. विहिरीस पायऱ्या नव्हत्या, हें पाहून त्याने चटदिशी पैरण व टोपी काढून टाकून विहिरींत उडी टाकली व एका हाताने त्या मुलास धरून दुसऱ्या हाताने विहिरीचा काठ धरला. दुसऱ्या माणसानी विहिरींत दोर सोडला. सदाशिवाने दोर धरल्यावर त्यास व त्या मुलास वर ओढून घेण्यात आले. त्याने या गोष्टीचा आमच्याकडे उच्चारसुद्धा केला नाही. आम्हास मागाहून ही हकीकत त्याच्या मित्राकडून कळली.

मीं सदाशिवाच्या शिक्षणांत कसूर केली नव्हती, हें माझी आई व सदाशिवाचे वडील याना चांगले माहीत होतं. सदाशिवास मॅट्रिक होता येईना, म्हणून त्याचे वडील त्याचा राग करीत, हें मला चांगलेंसे माहीत नव्हते, पण माझ्या आईला तें

माहीत असल्यामुळे सदाशिवावर त्याच्या वडिलांनी रागावणें आईस खपेना. तेणेंकरून सदाशिवालाहि जावळ्यास राहणें अडचणीचें वाटू लागलें. म्हणून मीं त्यास सन १९३४ साली त्याच्या बापापासून दूर साताऱ्यास आर्यांग्ल वैद्यक विद्यालयात घातलें. तेथे तो अडीच वर्षे होता. पण तेथेहि त्याचें मन अभ्यासाकडे लागेना. आपल्यापेक्षा वयानें लहान मामेभाऊ, नाना, कॉलेजमध्ये गेला, हें पाहून त्यानें आयुर्वेदिक स्कूल सोडून बेळगावात सैन्यात सन १९३६ अखेर नोकरी धरली. नोकरीत असतानासुद्धा, तो कधीकधी पैसे मागे, ते त्यास मी पाठवीत असे.

बेळगावास सदाशिवाचें बरें चाललें होतें. तेथे तो सन १९३९ पर्यंत होता. त्याची पत्रें मला व माझ्या आईला येत. सन १९४० च्या आरंभास त्याची पलटण एडनला गेली. त्या वेळेस सुदानांत युद्ध चालू होतें. तिकडे त्याची पलटण (सेवंड मराठा) सन १९३९त गेली. तेथे त्याचें काम प्रशंसनीय झालें म्हणून त्याच्या वरिष्ठानें त्यास कमिशन देण्याबद्दल शिफारस केली होती, पण विधिघटना निराळी होती. त्या वेळीं 'केरन' युद्धात रणधुमाळी चालू होती. सदाशिव त्या युद्धात हिरीरीनें लढत होता. आमच्या लोकांची सरशी झाली, शत्रूकडचे बहुतेक लोक पडले, पण त्यांच्याजवळ एक मशिनगन उरली होती आणि ते चालून जाणाऱ्या आमच्या जवानांवर मारा करीत होते. सदाशिव व त्याच्या पलटणींतील काही जवान विजयाचा झेंडा लावण्यासाठी पुढे सरकत होते. असें म्हणतात की, मशिनगनच्या माऱ्यातून पुढे जावयाचें तर मशिनगनची एक फेर संपून दुसरी सुरू होण्यापूर्वीच्या अवधीत थोडें पुढे सरकणें शक्य असतें. पण अधीर झालेल्या सदाशिवाला दम धरवेना व तो प्रथम झेंडा लावण्यासाठी मशिनगनच्या माऱ्यातून पुढे धावला आणि आमच्या दुर्दैवाने तारीख ४ ३ १९३९ रोजीं तो धारातीर्थी पडल्याची तार सरदारास आली.

त्या वेळीं माझें वास्तव्य कोल्हापुरास होतें. आई गावीं होती व सदाशिवचे वडील स्वतःचे गावीं सातारास होते. त्यांना दम्याचा आजार वाढला होता. त्यांचें वयहि बरेंच, ६२ वर्षांचें, झालें होतें. मुलग्याच्या मरणाची तार त्यांस पोचली. तारेतील मजकूर ऐकून त्यांना धक्का बसला. सदाशिवाने लष्करांत जाण्यास आपलें बेचक होणें कारणीभूत झालें होतें, ही जाणीव व तिची टोचणी त्यांच्या अंतःकरणास फार लागली व त्यांनी हाय खाल्ली आणि पंधरावीस दिवसांतच इहलोक सोडला. सदाशिवाचे वृद्ध पितामह त्या वेळीं ८२ वर्षांचे होते. ते हिंडतेफिरते असत पण आपला नातू दूरदेशी धारातीर्थी पडला व मुलगाहि निवर्तला हें पाहून त्या वृद्धाचाहि अंत झाला.

माझ्या आईला आपला नातू सदाशिव, त्याची आई तो चार महिन्यांचा असतांना अगदीं प्रेमानें पाळला व त्याला पाहून तिला मुलाच्या बालपणाचें सर्व आठवे, पुरुष, तो दूर देशांत लढाईत पडला हें ऐकून किती दुःख झालें असावें, याची

कल्पनाच करणें नको! या प्रसंगी माझ्या धीरोदात्त आईने आतलें आपलें दुःख बाहेर दाखविलें नाही. उलट तीच आम्हास धीर देई. "रडू नका. रडल्याने का सदाशिव आता परत येतो!" असे म्हणून त्याचा विषयच ती टाळीत असे.

माझी मुलगी इंदुमती मग्न सहा महिने झाले होते इतक्यात आमच्यावर ही आकाशाची दुसरी कुऱ्हाड कोसळली व घरात दुःखाचें वातावरण पसरलें. दुःखाचा विसर पडावा म्हणून मी आईस व पत्नीस घेऊन आमचे दुसरे चिरंजीव दिनकरराव यांचेकडे ग्वाल्हेरीस गेलों. तेथे दोन आठवडे राहून नंतर आम्ही ज्येष्ठ चिरंजीव शंकरराव सिकंदराबादेस टेक्स्टाइल्सच्या हुद्द्यावर होते त्यांच्याकडे गेलों. तेथे आठवडाभर राहून नंतर सोलापूरमार्गे माळव्यास आमची मुलगी चि० सौ० आनंदीबाई होती तिकडे गेलों. त्या वेळीं माझे जावई श्रीयुत काशिनाथराव देशमुख हे तेथे मुनसफ होते. माळव्यास आठवडाभर राहून परत कोल्हापुरास गेलों.

पुढे दर वर्षी मी आईला व पत्नीला घेऊन बाबासाहेबांकडे ग्वाल्हेरीस किंवा भेलशास व भाऊसाहेबांकडे उत्तरहिंदुस्थानात दिल्लीस वा फेरोजपुरास जाई. या प्रवासाच्या वेळीं मी त्यांना हरिद्वार, काशी, प्रयाग, अयोध्या, मथुरा, अमृतसर, इत्यादि क्षेत्रें दाखविलीं आणि लाहोर, दिल्ली, आग्रा, फत्तेपूरशिक्री, कुतुबमिनार वगैरे प्रेक्षणीय स्थळेंहि त्यांनी पाहिलीं. या आमच्या यात्रांनी व प्रवासांनी आईला व पत्नीला दुःखाचा थोडाफार विसर पडला होता.

सन १९३२ सालीं मी पेन्शन घेऊन वडगावास गेल्यानंतर तेथे एक ल्हानसा बंगला बांधण्यात गुंतलों होतों. तेथे देवीचा आजार उद्भवला व आमच्या घरीं नेहमी कामावर असणारा गडी गणपती शिंदे यास देवी येऊन फोडयांनी त्याच्या अंगाची चाळण झाली. गणपतीचे आईबाप आधीच वारले होते व त्याचें लग्नहि झालेलें नव्हतें. जरा तो स्वतःच्या घरीं राहून आपली थोडीशी जमीन करीत असे तरी तो आमच्यावरच अवलंबून असे. त्याचें तोंड, नाक, कान, डोळे व गुह्येंद्रियें या सर्वांत आळ्या पडल्या. मग आईने व मीं देवीवरची इंजेक्शनें स्वतः घेऊन गणपतीच्या शुश्रूषेची जबाबदारी अंगावर घेतली. त्याच्या सर्व अंगावरील आळ्या काढाव्या, त्यास धुरानें, औषध लावावें, असा क्रम पंधरा दिवस चालला. त्याची चुलत चुलती विठाबाई शिंदे आम्हांस मदत करूं लागे. त्यास तेलगाणी आम्हींच घालून देत असू. त्याच्या अंगावरील कपडे ती बाई धुवून आणीत असे. गणपतीची शुश्रूषा रोज सकाळीं दोनतीन तास झाल्यावर आम्ही आंघोळ करून आपल्या कामास लागत असू. त्यास लागणाऱ्या वस्तु व जेवण आमच्या घरातून त्याची चुलती विठाबाई घेऊन जाई. या आजारात गणपतीचा एक डोळा गेला पण तो स्वतः वाचला. याबद्दल आईला व मला समाधान वाटलें. आम्हीं जगविल्याची जाणीव गणपतीला चांगली आहे. आईला आम्हीं सन १९४७ सालात कोल्हापुरास नेईपर्यंत त्याने तिची मनोभावें सेवा केली व तिच्या मागेहि तो आमच्या बंगल्याची झाडलोट व दिवाबत्ती करतो. मी अगर माझी

मुलें व नातरडें गावीं गेगें तर तो आमचें धुर्णेंगाणी करतो. मी त्याला कायमचा दरमहा काही तनखा देतों हें खरें, पण तो आमचें काम पैशाकरिता करतो असें नव्हे. त्याला आम्हीं जगविल्याची जाणीव आहे म्हणून तो हे काम करतो मींहि त्याला चांगलें वागविले व वागविनें. त्याचे एक चांगलें शेत तीसच्चाळीस वर्षे आमच्याकडे गहाण होतें तें मीं त्यास परत केलें.

आईकडे वडगावीं दोन म्हशी व दोन गायी असत. त्यावर तर गरीब लोकांचा एक असे. निमेल तेवढे दूर आमच्याकडे कोल्हापुरास रवाना होई. पण सकाळीं तिच्याकडे कोणी ना कोणी येऊन "आई, चिमुटभर चहा द्या," म्हणे. कोणी म्हणे, "चहासाठी चमचाभर साखर द्या." काही मुले येऊन सांगत, "माझ्या आईने सांगितलें की अरे तू वडगावच्या आईकडे जा. ती तुला रानीची भाजी किंवा लोणचें वगैरे काही तरी भाकरीबरोबर तोंडी लावण्यास देईल. जा." मग तीं मुलें माझ्या आईने दिलेली भाजी अगर लोणची घेऊन आनंदाने पळत घरीं जात.

माझे वडील सन १९१६ साली वारल्यानंतर, आमच्या संसाराचा बोजा व चालत आलेली घराण्याची जबाबदारी एकट्या आईवर पडली, कारण तीच आता आमच्या घराण्यातील वडील माणूस होती. त्या काळीं धान्य जरी स्वस्त होतें तरी गरीब लोकांना व महारापोरांना ज्येष्ठ व आषाढ महिन्यात धान्याचा तुटवडा येई. माझ्या वडिलांच्या वेळीं अशीं गरजू माणसे धान्य उसनें अगर सवाईने मागण्यास येत. माझ्या वडिलांसारख्या जबाबदार माणसाला त्याना नाही म्हणून परतवून लावणें शक्य नव्हतें. कारण या गरीब माणसांची आम्हाला मजूर म्हणून गरज असे. शिवाय गावांत माणसांची उपासमार होणें ही गोष्टहि त्यांना कमीपणाची वाटे. सवाईने जरी धान्य घालावयाचें झाले तरी फायद्याचे नव्हतें. शहरांतील लोकांना असें वाटण्याचा संभव आहे की, सवाईने धान्य देणें म्हणजे पंचवीस टक्के व्याज घेण्यासारखें आहे. परंतु हें लक्षात ठेवलें पाहिजे की एक तर पावसाळ्यात ज्या वेळीं लोक धान्य सवाईने नेतात त्या वेळीं तें महाग असतं व मळणीच्या दिवसात तें परत देतात त्या वेळीं तें स्वस्त असतें. दुसरें असे की धान्य परत करताना तें ओलसर असतें व पुढे वाळून कमीच भरतें. म्हणजे एकंदरीत काही फायदा वा तोटा न होता नेलें धान्य परत मिळतें एवढेंच. वडिलांच्या पश्चात् हीं माणसें माझ्या आईकडे धान्याची मागणी करीत व ती कोणास चार पायल्या, कोणास आठ पायल्या, कोणास मण असें धान्य उसनें अगर सवाईने घालीत असे. आईने असली यातायात करू नये असें मला वाटे. म्हणून मीं आईस म्हटले की "धान्य देण्याघेण्याची यातायात तू न करणें बरें." ती म्हणाली, "या माणसांची आम्हास गरज असते व दुसरें असे की या माणसांनी धान्य कोठून आणावें? शिवाय ते काय तुमचें देणें बुडवितात? नेवर त्याना मदत करणें ही तुमची जबाबदारी आहे."

आईकडे सेनेगावातील घरात लागणारे जिन्नस असावयाचे. तिच्या कपाटांत बिब्बा, हिरडा, बेहेडा व जायफळ, पिंपळी, सारीक वगैरे गुटीचे सामान असावयाचे. शिवाय माझ्याकडून ती कोयनेल्च्या गोळ्या, अमृतांजन, आयोडीन घेऊन ठेवी. त्याचा उपयोग गावातील माणसं करून घेत. गावातील सर्व लोक तिला 'आई' म्हणत. माझी मुलं व नातवंडे मात्र तिला 'वडगावची आई' म्हणत.

घर सांगितल्याप्रमाणे गावातील गरीब लोकांवर आईचे उपकार होते. घरच्या आतिथ्याबद्दल व दुसऱ्या गावी राहणाऱ्या सग्यासोयऱ्या बद्दल तिला प्रेम व जिव्हाळा वाटे. माझी मुलं व मुली वर्षातून एक वेळ तरी येऊन दिवस येऊन वडगावी आईकडे राहात. तिला आपल्या नातवंडेपणतवंडे आपल्या वतनगावी आल्याबद्दल अभिमान व आनंद वाटे. आईचे जुने दागिने व मी नवेले दागिने तिच्या मालकीचे होते. एवढच तिच्या मनाप्रमाणे ती नातसुनांस व पणतवंडास त्यातील दागिने देत असे. एकदा असे झालं की, नानासाहेबांच्या बायकोस काही दागिने देत असताना ती बानास म्हणाली, "बाना, तुला काय देऊ? ही शाल तू घे. मला माहीत आहे की तुझ्याजवळ या शालीपेक्षा भारी किंमतीच्या शाली आहेत. पण ही माझी म्हातारीची एक आठवण तुझ्याजवळ असू दे." बानालाहि आनंद वाटला व त्याने आपल्या आजीचे पायास हात लावून प्रेमाने त्या शालीचा स्वीकार केला.

पेन्शन घेईपर्यंतचे आयुष्य आईबापापासून व आपल्या गावापासून दूर गेल्याने, जेव्हा सरकारातून पेन्शनची तारीख मला कळविली गेली त्या वेळीं आपण आता आपल्या वतनगावी आईकडे जाणार असें वाटून मला आनन्द झाला व आईला तसें कळविलें. तिनेहि लौकर येण्याचा सल्ला दिला पेन्शन घेण्यापूर्वी मी स्वत आमच्या शेतीकडे फारसें लक्ष दिले नव्हते. आमच्या वडिलार्जित जमिनी वडगावीं होत्या. त्यातच मीं भर घातली होती. याशिवाय शेजारी सरडास व साळशीस थोड्या जमिनी संपादन केल्या होत्या. वडगावात वडिलानी सन १९१० च्या सुमारास एक चांगले घर बांधलें होते. पण आता माझीं मुलं वगैरे होतीं व ती सर्व कधी तरी गावीं आलीं म्हणजे जुन्या घरात थोडी अडचण होई. म्हणून आईच्या विचाराने जुन्या घराजवळच एक ल्हानशी नवी वाडाची अस ठरविलें. आईला ही कल्पना फार आवडली. घर फार मोठं नसलं तरी चालेल, पण सोयीस्कर व बळकट असावें असं ठरविलें. मी मोकळा होतो, अंगात शक्ति होती, म्हणून घराचें काम कंत्राटाने न देता स्वत च्या देखरेखीखाली करावयाचें ठरविलें. घराची जागा साफ करून घेतली. घर जुन्या चालीप्रमाणे दगड चिखल मातींत न बांधता चांगल्या मळलेल्या चुन्यात बांधावयाचें ठरविले घरास लागणारें सामानी लाकूड कोल्हापुराहून नेलें. आयता चांगला चुना मिळणें अवघड म्हणून सोनावडे व बानवड्याच्या रानातून चुनखडी वचली व ती आणून घरीच भाजली. उत्तम वाळू आणून ती स्वच्छ धुतली, स्वत च घाणी बांधून त्यात चुना मळण्याची सोय केली. चांगले गवंडी मिळविले. कोल्हापुराहून कच्ची

सुतार नेले. रत्नागिरीहून मगलोरी कौलें आणविलीं. सिमेंट मिळविलें. घरात लागणारे खुर्च्या, टेबलें, पलग, कपाटें इत्यादि फर्निचर रत्नागिरींतील टेक्निकल स्कूलमधून करून आणल.

प्रथम एक अडचण आली ती म्हणजे घर बाधण्यास लागणाऱ्या पाण्याची. सुमारें तीन फर्लांगावर असलल्या नदींतून पाणी आणावें लागल हें दिसून आलें. गावाजवळच मलकापूरच्या काटे नावाच्या ब्राह्मणाचा आड होता. तो चागला बळकट होता. पण कित्येक वर्षे त्याचा उपसा न झाल्याने त्यात गाळ साठला होता व शेजारी आडेंझुडुपें असल्यामुळे पान पाण्यात पडून पाण्यास घाण वास येत होता म्हणून या आडाच्या पाण्याचा लोक उपयोग करीत नसत. लाबून नदीचेंच पाणी आणीत. पावसाळ्यात पायवाटेंतील निसरड्यावरून पाणी आणणें बायकापोरास फार कष्टाच होई. पण सवयीमुळे तो प्रघात चालूच होता. बाधकामास लागणाऱ्या पाण्यासाठी आडाचा उपसा केला. पाणी स्वच्छ झाल्यानतर तच आम्ही पिऊ लागलों त्या वेळेपासून सव लोक आडाचें पाणी पितात. त्या काळात सागवान, लोखडी सामान, सुतार, गवडी व मजूरहि स्वस्त होते. मी स्वत देखरेख करीं. हाताखाली अनुभवी मिस्त्री होता. यामुळे बगला ल्हानसाच पण चागला व खबीर झाला. शाहूमहाराजाची आठवण म्हणून मीं त्या बगल्याचें नाव 'शाहूस्मरण' असें ठेविलें.

'शाहूस्मरण' बगला सन १९३५ तच पुरा झाला होता व घराची वास्तुशातीहि झाली होती. पण मुलाच्या शिक्षणाच्या दृष्टीने मी कोल्हापुरास भाड्याने बगला घेऊन पत्नी व मुलांसह राहात होतों. जरी आमचे कायमचें बिऱ्हाड कोल्हापुरास होतें तरी आम्ही सर्वजण दर पधरवड्यास वडगावास आईकडे जात असू. वडगाव कोल्हापुराहून अवघें तेवीस मैल असल्याने मोगरीने जाणें येणें मुलाना गमतीचें वाटे आणि आम्ही वडगावी येऊन नव्या बगल्यात ठाकठीक असल्याचें पाहून आईसहि समाधान वाटे.

सन १९३६ डिसेंबर अखेर चिरजीव भाऊसाहेबाचें लग्न पजाबात अमृतसरास झालें. त्यानी लागलीच आपल्या पत्नीस घेऊन वडगावास, ग्रामदेवतेच्या दर्शनास व माझ्या आईस व आपल्याहि आईस भेटावयास येण्याचें ठरविलें. या नव्या 'शाहूस्मरण' बगल्याचें उद्घाटन विशाळगडाचे जहागिरदार श्रीमत आनासाहेब पतप्रतिनिधि याच्या हस्तें करण्याच आणि मुल्गा व सून या उभयताना नव्या घरात नेऊन घरभरणा करण्याचें मीं ठरविलें. या समारभास जहागिरदाराचे ज्येष्ठ चिरजीव मनानराव बाबासाहेबहि आले होते. कोल्हापुराहून माझे स्नेही भास्करराव जाधव, आप्पासाहेब रत्नमुल्क आदिकरून बरीच मंडळी आली होती. नवविवाहित दांपत्य, शकरराव व लीलावती, 'शाहूस्मरण' बगल्यात आठ दिवस राहून कोल्हापुरास आले. माझ्या आईला आपला नातू व नातसून आपल्या घरीं येऊन राहिल्याने फार समाधान वाटलें. सन १९३२ मध्ये पेन्शन घेतल्यावर मी आईजवळ वडगावीं दोन

वर्षे होतों. त्याच मुदतींत गावीं 'शाहूस्मरण' बंगला बांधला होता. कोल्हापुरातहि स्टेशनजवळ चिंचलीकराचा बंगला यणगुद्रे कासाराकडून भाड्याने घेऊन त्यात पत्नी व मुले घेऊन मी राहात असे. गावीं 'शाहूस्मरण' बंगल्याचे काम चालू असताना मला सामानसुमान आणण्यास वरचेवर कोल्हापुरास जावें लागे. त्यामुळे मलाहि हें सोयीचें झालें होतें. पुढे आम्हीं हा बंगला कासाराकडून खरेदी घेतला त्याची दुरुस्ती केली. घराला लागून एक स्वतंत्र न्हाणीघर व स्वयंपाकघर बांधले.

याच सुमारास त्या वेळचे कोल्हापुरचे दिवाण रावबहादूर सुर्वे यांना वाटलें की, शहराबाहेर जी मोकळी जागा पडली आहे, त्यावर आपण सुखवस्तु मराठ्यांसाठी एक वसाहत स्थापावी. त्याप्रमाणे त्यांनी राजाराममहाराजांच्या परवानगीने सातआठ मराठा अधिकाऱ्यांना बंगले बांधण्यासाठी मोफत जागा दिल्या. त्यांनी मलाहि सांगितलें की, "तुम्ही वसाहतींत बंगला बांधीत असाल तर तुम्हांसहि मोफत जागा देण्याबद्दल आपण महाराजांस सांगू." मीं त्यांना सांगितलें की, "नुकताच स्टेशनजवळ एक बंगला मीं विकत घेतला आहे. तथापि आपण म्हणत असाल तर मीहि दुसरा बंगला बांधीन, पण मला मोफत जागा घेणं पसंत नाही. ज्या ज्या लोकांना तुम्ही जागा दिल्या ते संस्थानचे नोकर आहेत. त्यांचा काही हक्क आहे. मीं संस्थानाची नोकरी केलेली नाही व मला मोफत जागा घेण्याचा नैतिक हक्कहि नाही तथापि आपण काही किंमत घेऊन जागा द्याल तर मी आपल्या वसाहतींत बंगला बांधीन " लागलीच रावबहादूर सुर्वे यांनी राजाराममहाराजांना विचारून मला एक प्लॉट खरेदी करून दिला. मीं केलें तें बरें केलें असें मला वाटलें. कारण रीजन्सी कौन्सिलच्या वेळीं ज्यांना मोफत जागा दिल्या होत्या त्यांच्यावर काही बंधनें घालण्यात आलीं मी स्वत एक मिनिस्टर असल्याने मला अडचण वाटली असती, पण मी किंमत देऊन जागा घेतल्याने मला काही अडचण वाटण्याचें कारण नव्हतें.

गावाकडच्या घराचें व जमीनजुमल्याचें सर्व काम सवरून मी आता स्टेशनजवळ घेतलेल्या बंगल्यात राहात होतों मलाहि ताराबाई पार्कमध्ये दुसरा बंगला बांधण्यास मुबलक अनुकूलता होती गावीं घर बांधण्याचा अनुभव आला होता. मुंबईच्या नार्वेकर आर्किटेक्चरल इंजिनिअरकडून प्लन एस्टिमेट करून घेतलें. या वेळींहि लाकूड, दगड, सिमेंट, महाग नव्हतें. मजुरीचे दरहि वाढलेले नव्हते. माझे एक स्नेही हिंदुराव घाटगे यांना घरबांधणीचा अनुभव होता. त्यांनी कामावर देखरेख करण्याची हमी घेतली. हा बंगल्याचें कामसुद्धा स्वत च्या जबाबदारीवरच करावयाचें मीं ठरविलें. घरास लागणारा दगड (फाडं, पाथर, देदर, इतर) घेण्यास सुरुवात केली. चुनगड बामणव्याहून आणण्याची तजवीज केली. धारवाडास जाऊन दांडेलीच सुरलेले सागवानी अनगड लाकूड खरेदी केले. कोळसा घेऊन चुनगड नवीन घेतलेल्या प्लॉटवरच भाजली. उत्तम वाळू आणून स्वत च्या देखरेखीखाली धुतली. शहरांतील जाधव पागेळे कारागिराकडून खिडक्यांसाठी लोखंडी जाळ्या

तयार करून घेतल्या. चांगल्या कमची सुतारांकडून दरवाजे, खिडक्या, जागोजाग लागणाऱ्या तुळया तयार केल्या. फर्निचर तयार करून घेतलें व थोड्याच दिवसात नवा बंगला 'इदुनिकेतन' तयार झाला. बंगल्याचे काम सन १९३६ सालीं सुरू केले व सन १९३९ अखेर संपविलें. नंतर सन १९४० सालीं वास्तुशांति करून तेथे राहावयास गेलो.

जरी वडगावास नवें घर बांधण्याचें काम सन १९३५त संपवून मी कोल्हापुरांत स्टेशनावर घेतलेल्या बंगल्यात सन १९३९ पर्यंत राहिलों व नंतर ताराबाई पार्कमधील 'इदुनिकेतन'मध्ये राहू लागलों, तरी आई वडगावीं असेपर्यंत (म्हणजे सन १९४७ पर्यंत) आम्ही सर्व जण भक्तिभावाने नियमितपणें दर पंधरवड्यास गावीं जाऊन आईजवळ राहात असू. बहुधा वर्षांतून एक वेळ तरी मुलें असतील तिकडे आईस व पत्नीस घेऊन महिना पंधरा-दिवस जात असू.

आई म्हातारपणामुळे हळूहळू थकत चालली. आता तिला काठीचा आधार घ्यावा लागत असलेला पाहून मीं म्हटलें, "आई, तू आता आमच्याकडे कोल्हापुरास येऊन राहणें बरें." ती म्हणाली, "मला येथे स्वत च्या घरीं, दिराच्या मुलाबाळांत व नातवंडात राहणें बरें वाटतं. मी येथे असल्याने वडिलार्जित देव्हाऱ्यातील देवतांची पूजाअर्चा होते, घरात दिवाबत्ती लागते. शिवाय तुम्ही आगत्याने दर पंधरवड्यास मुलाबाळांस घेऊन मला भेटावयास येतां, व मीहि कधीकधी तुमच्याकडे चारआठ दिवस राहावयास येतें. मग मला सध्या येथून कायम हलण्याचें कारण काय! शेवटीं तुमच्याकडे यावयाचेंच आहे."

काही दिवसानंतर, माझ्या चुलतभावाचा मुलगा एके दिवशीं कोल्हापुरास आला व सांगू लागला की, "काल संध्याकाळीं वडगावची आई पाय घसरून पडली व तिच्या पायास लागलें आहे. मीं तुम्हांस कळविण्यास जावें अशी तिची इच्छा नव्हती, पण मीच होऊन तुम्हांस कळविण्यास आलो. पाय मोडलेला नाही, तथापि तुम्ही तिला बघून आलेलें बरें." मीं लागलीच पत्नीस बरोबर घेऊन वडगावास गेलों, व आईला पाहिलें. तिला फारसें लागलें नव्हतें. सरकटलेल्या ठिकाणी मलमपट्टी बांधली व म्हणालों, "आई, थोडक्यात वाचलीस. पडून जर तुझें डोकें फुटलें असतें तर लोक म्हणाले असते, की हे साहेब होऊन कोल्हापुरास बंगल्यात राहतात व इकडे गावीं आई घरीं मरून पडली तरी त्यांना दाद नाहीं. नाहीं का!" हें ऐकून आई थोडा वेळ स्तब्ध राहिली, आणि म्हणाली, "तुम्ही म्हणता तें खरें आहे. मी आता तुमच्याबरोबरच येते." त्यानंतर आम्ही आईस घेऊन कोल्हापुरास परत आलो. तिला फारसा मार न लागल्याने तिचा पाय लवकरच बरा झाला. पुढे बारा-तेरा महिने तिची प्रकृति बरी होती.

आमच्या एकत्र कुटुंबाचा रहाटगाडा व एक मोठा परिवार असल्यामुळे मी, पत्नी व मुलें एकत्रच वेगवेगळ्या कामांत दंग असू. आई आल्यापासूनहि घोर मन चांगले होता. तीहि

यथेच्छ झालें. रेडयात एक म्हण आहे, "हागू मोडी रूप व भूक मोडी रूप." याचा परिचय माझ्या पडित मित्रास या वेळीं पुरेपूर आला.

पुढे कऱ्हाड स्टेशनावर गाडींत बसून आम्ही दुसऱ्या दिवशीं मुंबईस पोचलों. मुंबईत मी मलकापूरच्या गावी आकाचे बंधु बाळकृष्ण कोलते होते त्यांच्याकडे उतरलो. ते मलकापुरास कधी कधी आपल्या बहिणीकडे येत असत. त्यामुळे त्यांच्याशीं माझी दाट ओळख झाली होती.

मुंबईस गेल्यानतर दोन-तीन दिवसात आमची परीक्षा सुरू झाली. परीक्षेच्या वेळचा एक प्रसग आजन्म माझ्या लक्षात राहील असा आहे. माझी दुसरी भाषा पर्शियन होती. पर्शियन व संस्कृतच्या प्रश्नपत्रिका एकाच वेळीं वाटल्या गेल्या. संस्कृतचे परीक्षक प्रसिद्ध समाजसुधारक राजारामशास्त्री भागवत मधूनमधून फिरत "कोणास काही समजले नाही काय?" म्हणून विचारीत होते. माझ्या डोकीस गुलाबी रगाचा कोल्हापुरी फेटा होता. मुंबईत फेटा बाधलेला विद्यार्थी व तोहि परीक्षेच्या मडपात पाहून शास्त्रीबुवाना थोडें आश्चर्य वाटले. ते माझ्याजवळ येऊन विचारपूस करू लागले. मीं काही उत्तर दिल्यानतर त्याना आदबीने सागितले कीं, "माझा पेपर लिहावयाचा आहे." त्यानी विचारले, "परीक्षा सपल्यावर तुम्ही माझ्या घरीं याल काय?" मी म्हटले, "होय, मोठ्या आनदाने येईन." त्याप्रमाणे मी त्यांच्याकडे गेलों. ते नुकतेच बाहेर जावयास निघाले होते, तरी पण थाबले. आपण टेबलाजवळ जाऊन बसले व मलाहि खुर्ची दिली. राजारामशास्त्री जाडे विद्वान व खरेखुरे सुधारक होते. गृहस्थ उच, लाबट तोंडाचे, नाकेले, व लाब करड्या मिशानी ओठ झाकलेले असे दिसले. त्यांच्या डोकीला लहानसा पाढरा रुमाल चापून बाधलेला होता. इग्रजी शिकत असलेला मराठा तरुण पाहून त्याना आनद झालेला दिसला. त्यानी हिंदु धर्मावर व त्या धर्मांत शिरलेल्या अनावश्यक रूढींवर बरेच मोठें व्याख्यान ऐकविलें.

पुढे मी कोल्हापुरास आल्यावर शाहूमहाराजांच्या भेटींत त्याना ही हकीकत सागितली. महाराजानी शास्त्रीबुवाना बोलावून घेतले व मराठा वसतिगृहात हिंदुधर्मावर त्याचीं व्याख्यानें करविलीं व त्यांच्याकडून विद्यार्थ्यांना गायत्रीमत्रहि देवविला.

मी मॅट्रिकच्या परीक्षेस गेलों त्या वेळच्या व आजच्या मुंबईत जमीनअस्मानाचा फरक पडला आहे. सन १८९९ सालीं मुंबईची लोकसख्या सुमारे आठ लक्ष असावी. मला वाटतें आज ती चाळीस लाखावर गेली आहे. पहिली मोटार सन १८९९ सालीं मुंबईस आली, त्याच वेळीं मी मॅट्रिकच्या परीक्षेस गेलों होतों. तत्पूर्वी मुंबईच्या सपन्न नागरिक लोकाकडे उत्तम उत्तम घोड्याच्या गाड्या असत. रोज सध्याकाळीं चौकेवर एकापेक्षा एक दिखाऊ घोड्याच्या गाड्या धावत असताना किंवा उभ्या असताना दिसत. भारी किंमती गाड्यांच्या रागाच्या रागा दिसत. तो देखावा फारच सुदर व मनोहर वाटे. आज मुंबईत स्वारीचे व गाडीचे घोडे बिल्कूल दिसत नाहीत. या मुंबईत सन १८९९ सालीं एक वाकडी तिकडी मोटार आली तेथे आज बसेस

व मोटारींची नावें जवळजवळ पन्नास हजार झाल्याचें ऐकतों. त्याशिवाय बाहेरून येणाऱ्या मोटारी व बसेस निराळ्या.

त्या वेळीं मुंबई शहरात सार्वजनिक वाहनें म्हणजे घोड्याच्या गाड्या व ट्रॅमकार. ट्रॅमकार रस्त्यावर जमिनीसपाट बसविलेल्या लोखंडी रुळावरून चाले. शहरातील बहुतेक मोठ्या रस्त्यावर ट्रॅमगाड्याचे रुळ असत. प्रत्येक ट्रॅमकारला दोन मोठे ऑस्ट्रेलियन घोडे जोडीत. पाठच्याने हात दाखविला म्हणजे ड्रायव्हर ट्रॅम उभी करी व उतारूनी घंटी वाजविली म्हणजे ट्रॅम थांबवी. एकदम ट्रॅम थांबविणें व सुरू करणें यामुळे घोड्यास फार कष्ट होत व त्याची छाती फुटे, आणि त्यामुळे दरसाल शेकडो घोडे मरत अथवा बाद होत. पुढे काही दिवसांनी विद्युत्शक्तीवर पण रुळावरूनच जाणाऱ्या ट्रॅमगाड्या आल्या. अलीकडे रुळ काढून विजेची शक्ति न वापरता मोठ्या मोटारीप्रमाणे डीझेल तेलावर चालणाऱ्या लालबुंद बसेस चालू आहेत. त्या ठराविक ठिकाणींच उभ्या राहतात. असल्या बसेस मुंबई अगर इतर शहरातच आहेत असें नाही, तर एका शहरापासून दुसऱ्या शहरास व शहराच्या आसपासच्या गावासहि नियमित जातात येतात.

जेथे त्या वेळीं तीनचार कॉलेजें होतीं, त्या मुंबईत आज पन्नास कॉलेजें आहेत व दरसाल त्यात नव्या चारदोन कॉलेजांची भर पडत आहे. आमच्या वेळीं मुंबई प्रांतात फक्त पुण्यास कॉलेज ऑफ सायन्समध्येच बी० एस्‌सी० चा क्लास असे. पण इंटर सायन्सच्या इंग्रजीच्या तासासाठी विद्यार्थ्यांना डेक्कन कॉलेजला जावें लागे.

सन १८९९ सालीं सध्याच्या पद्धतीचें एकहि हिंदी हॉटेल नव्हतें. कोठे कोठे ब्राह्मणाच्या खानावळी असत; पण त्यात मराठ्यासमुद्धा अडचण पडे; मग महारा मांगाची गोष्ट कशाला? मी व माझे दोन स्नेही सन १९०० सालीं पी० ई०च्या परीक्षेसाठी मुंबईस गेल्यावेळीं आम्ही एक ठिकाणीं उतरलो होतों व तेथून गिरगावातल्या सखूबाईच्या खानावळींत जेवावयास जात असू. खानावळींत दोन तऱ्हेच्या पंक्ति असत; एक सोवळ्याची व दुसरी ओवळ्याची. सखूबाईच्या खानावळींत आम्हास जेवण चांगलं मिळे. आमच्याबरोबर आमचा शेख युसुफ नावाचा मुसलमान स्नेही होता. तो कोल्हापुरात आमच्याबरोबर म्हणजे बोर्डिंगात राहात असे. त्याला मराठी उत्तम बोलता येई. तो दाढी ठेवीत नसे. आमच्यासारखेंच धोतर नेसे व पटका बांधी. तरी पण आम्हाला त्या खानावळींत असेपर्यंत त्याचें नाव व आडनाव घेता येत नसे. आम्हीं त्याला तात्पुरतें एक हिंदु नाव दिलें होतं. तो मनु आता पालटला आहे. हा इंग्रजी शिक्षणाच्या वाघिणीच्या दुधाचा प्रभाव!

सन १९०० व १९०१ मध्ये मी कॉलेजमध्ये असताना कोल्हापुरास नवीन निघालेल्या व्हिक्टोरिया मराठा बोर्डिंगमध्ये होतों. तेथे मला लहानशी स्वतंत्र खोली मिळाली होती. जेवणात रोज मांसरोटी, भात, तूप, वरण, वगैरे सकस अन्न असे.

बोर्डिंगांतील वास्तव्यांत, शाहूमहाराजांचे हाताखाली इतर विद्यार्थ्यांबरोबर समाजसेवेचे उपयुक्त धडे मिळाले व मला त्यांचा आयुष्यभर फार उपयोग झाला.

सन १९०१ अखेर पी० ई० ची परीक्षा पास झाल्यावर मी पुण्यास सायन्स कॉलेजच्या शेतकी शाखेत नांव घातलें. मी तेथे चार वर्षे होतों. सायन्स कॉलेजपासून आमचे क्वार्टर्स एक मैलावर, खडकी हद्दींत होते. तेथे छत्रांत जेवण होई व राहण्याच जागाहि चांगली होती. इथे माझे अभ्यासांत मन रमलें व १९०५ अखेर मी शेतकीची शेवटची (एल० ए० जी०) परीक्षा पहिल्या वर्गांत पास झालों.

# कौटुंबिक जीवन

माझें लग्न माझ्या वयाच्या दहाव्या वर्षी झालें. माझ्या वैवाहिक जीवनासबंधी लिहिण्यापूर्वी त्या काळीं (सन १८८७ च्या सुमारास) विवाह कोणत्या वयात होत असत याबद्दलची थोडी हकीकत देणें सोयीचें होईल.

आपल्या देशात चोहोकडे अगदी अलीकडेपर्यंत बालविवाहाची पद्धत रूढ होती. इतक्या कमी वयात माझे लग्न झालें हा अपवाद नव्हता. गुजराथेंत तर बालविवाह सर्रास चालू होते. कधीकधी वधूवरास कडेवर घेऊनसुद्धा त्याचीं लग्नें लावीत. त्या काळीं आमच्याकडच्या ब्राह्मण समाजातहि बालविवाह रूढ होता. मी सरूड येथे मराठी तिसऱ्या इयत्तेत शिकत असताना माझ्या वर्गात त्याच गावचा गोविंद कृष्ण कुळकर्णी म्हणून माझ्याच वयाचा एक ब्राह्मणाचा मुलगा होता. त्याचेंहि त्या वेळीं लग्न झालेलें होतें. गोविंदाची चवथी इयत्ता पास होण्यापूर्वीच तो पटकीने वारला. त्याची बालविधवा पत्नी जानकीबाई ही सुमारें पाऊणशे ऐंशी वर्षांची होऊन सातआठ वर्षांमागे वारली.

खेड्यातील अटालदार अविभक्त शेतकरी कुटुंबात पुष्कळ लहान मुलें असावयाचीं. अटालदार शेतकरी म्हणजे त्याच्या घरीं गायी, म्हशी, बैल असावयाचे. त्याची बरीच मोठी शेती असावयाची. त्याच्याकडे एकदोन सालदार गडी असावयाचे. म्हणजे त्याचा मोठा अटाला असावयाचा. लग्नातील जेवणें, वाजेवाले, बाजरी व शोभेचें दारूकाम याच्या खर्चात बचत करण्यासाठी असल्या मोठ्या कुटुंबात बऱ्याच मुलांचीं लग्नें एकाच मांडवात, एकाच दिवशीं उरकून टाकणें सोयीचं पडे. माझे वडील व त्यांचे तीन बंधु एकत्र असताना, सन १८८४ च्या एप्रिल महिन्यात, एकाच दिवशीं आमच्या घरीं चार मुलांचीं लग्नें एकाच मांडवात झालीं असल्याचें वडिलांच्या जमाखर्चाच्या वहीवरून दिसतें. तीं अशीं : मोठ्या चुलत्याचा मुलगा रामचंद्र

(वय वर्षे नऊ), मधल्या चुलत्याचा मुलगा गोविंदा (वय आठ), माझी धाकटी वहीण ललुबाई (वय तीन) व धाकट्या चुलत्याची मुलगी चद्राबाई (वय फक्त एक वर्ष). ही झाला घरची उदाहरण. आमच्या शेजाऱ्यापाजाऱ्याच्या घरींहि तसेच होई. असल्या बालविवाहापैकी काहींची दुर्दशा माझ्या डोळ्यासमोर आहे. वर उल्लेखलेलीं लग्न झाल्यानतर थोड्याच दिवसांनी माझे वडील व चुलते विभक्त झाले. धाकटे चुलते विधुर होते ते वारले. त्यांचा मुलगा श्रीपती लहानच होता. त्याचे लग्न माझ्या वडिलानी करून दिले, व त्यास आमच्या घरा आणलें. वर्षभराने (सन १९१५ त) श्रीपती प्लेगच्या साथात वारला. त्याच्या बालविधवा बायकोला (आकुताईला) वस्त्रप्रावर्ण व पोटगी आम्ही देत असू. आकुताई अगदी अलीकडे, चार वर्षांमागं वारली. आकुताईने माझ्या आईची व पत्नीची, त्याच्या शेवटच्या आजारात, चागली शुश्रूषा केली.

तसच माझ्या लग्नापूर्वी सुमारे एक वष, माझ्या पत्नीच्या दोन भावाचीं लग्न झाला होतीं. त्यापैकी मोठा भाऊ, एक मुलगी झाल्यावर वारला. पुढे त्या मुलीचेंहि बालपणीं लग्न झाले व ती मोठी होण्यापूर्वीच तिचाहि नवरा वारला. ती बालविधवा मुलगी आपल्या दिराच्या आधारावर जीवन कठीत आहे. माझ्या पत्नीचा दुसरा भाऊ बाळा माझ्या वयाचा होता. त्याचे लग्न झाल्यानतर तो सुमारे तीन वर्षांतच पटकीने वारला. त्याची बालविधवा बायको चद्राबाई त्या वेळीं नऊदहा वर्षांची असावी मी माझ्या मेहुण्याच्या दहनविधीस हजर होतों. बाळाच शव सरणावर ठेवीत असताना त्याच्या मूलवजा अल्पवयी बायकोने, चद्राबाईने, जो आक्रोश केला तो फार हृदयद्रावक होता. ती सारखी नवऱ्याचे सरणाकडे जाण्याची धडपड करताना तिला धरून ठेवावी लाग. त्या वेळच दृश्य मी आजन्म विसरणार नाहीं. चद्राबाई पुष्कळ दिवस जगली. तिने आपल्या दिराच्या घरीं राहून त्याचा व त्याच्या मुलाचा ससार चालविण्यास मदत केली. अगदी अलीकडे सुमारे ८३ वर्षांची होऊन ती वारली. माझ्या बायकोच्या तिसऱ्या भावाच लग्न चद्राबाईच्या ल्हान बहिणीबरोबर बालपणींच झाले होत. तोहि मूलबाळ होण्यापूर्वी असाच साथीने वारला. त्याची बालविधवा बायको माहेरी आपल्या भावाकडेच राही. कधीकधी ती आपल्या सासरीं, बहिणीकडे तिथे गावीहि चारआठ दिवस राहात असे. ही बाई वृद्ध होऊन तीन वर्षांमाग वारली.

बालविवाहासबधी लिहीत असताना, कैलासवासी श्रीशाहूछत्रपतानी केलेल्या समाजसुधारणाची आठवण होते. शाहूमहाराजाच समाजस्थितिनिरीक्षण फार सखोल असे. ते आपल्या हुजऱ्यांशीं, घोडेस्वारांशीं व आपल्याकडे मुजऱ्यास आलेल्या गोर गरिबांशीहि मोकळेपणाने वागत व बोलत. शिकारीच्या निमित्ताने, दऱ्याखोऱ्यांतून आढळेल्या हारेवाल्यांशीं आणि देशभागातील हरणाच्या व नदीकाठीं माशाच्या शिकारीस गेले असताना तेथील लोकांशीं ते एकजीव होत व त्याच्याशीं आपलेपणाने

बोलत व त्याच्याबद्दल चौकशी करीत. सन १९१२ ते १९१५चे दरम्यान प्लेग व पटकीच्या साथींनी माणसे फार मरत. त्या वेळीं महाराज मयताच्या वयाबद्दल, त्याच्या मुलाबद्दल व त्याच्या राहणीबद्दल चौकशी करीत व लगलीच थोडीफार मदतहि करीत. महाराजांना बालविवाह व त्यापासून होणारे तोटे स्पष्ट दिसून आले व बालविवाहप्रतिबंधक कायदा व विधवाविवाहाचा कायदा याची त्याना जरुरी भासली. याच सुमारास महाराजांचे द्वितीय चिरंजीव राजकुमार शिवाजीराव घोड्यावर बसून माल्याने डुकराची शिकार करीत असताना खाली पडून, १९१५ चे जून महिन्यामध्ये, मरण पावले. [राजकुमार शिवाजीचे लग्न आदल्याच वर्षी सासवडच्या जगताप घराण्यातील इंदुमतीदेवींशीं झालें होतें.] हळव्या मनाच्या शाहूमहाराजास मुलाच्या मरणाबद्दल व सुनेच्या वैधव्याबद्दल फार दु:ख झाले व त्यानी काही दिवस राज्यकारभार आपल्या वधूच्या हवाली करून एकांतवास स्वीकारला होता. त्यानी लोककल्याणाच्या दृष्टीने उपयुक्त असे वर उल्लेखिलेले दोन कायदे आपल्या राज्यात जारी केले व समाजाचा दुवा घेतला. पुढे थोड्याच दिवसानी इंग्रज सरकारने तसले कायदे ब्रिटिश हिंदुस्थानात लागू केले.

सध्याच्या सुधारलेल्या दिवसात मुलामुलींची लग्नें ल्हानपणी होत नाहीत. दोघेंहि वयात आल्यावर मोठेपणीं लग्न होत असल्याने नवविवाहिताचे वैवाहिक जीवन, विवाह झाल्यावर थोड्याच अवधींत सुरू होतें. पण माझं लग्न त्या वेळच्या रूढीप्रमाणे वयाच्या नवव्या वर्षी झालें. त्या वेळीं माझ्या पत्नीचें वय सात वर्षांचें होतें. तिचे माहेर मौजे शिंपे गावचें. हा गाव माझ्या गावास लागूनच आहे. ती माझ्या चुलत आत्याची मुलगी. तिच्या वडिलाचे नाव लक्ष्मणराव ज्योतिराव माने नाईक. माने घराणें फार जुनें असून लक्ष्मणरावाच्या आजापणजानी माळव्यात, इंदूर संस्थानात, वस्तगाव व वाफगाव वगैरे पाचसहा गावचें इनाम संपादन केलं होतें. पुढे होळकर महाराजाचें व माने इनामदाराचें पटेना, म्हणून ते लष्करातील असामी व पाच गावाची इनामदारी सोडून परत आपल्या गावीं स्थायिक झाले. इकडून परत येताना त्यानी सोनेंनाणें वगैरे बरीच संपत्ति आणली होती असे म्हणतात. त्यांचा शिंपे गावातील जुना वाडा व वाड्याचा तट आजहि कसा तरी उभा आहे. वाड्यात शिरण्यापूर्वी दोन मोठाले दरवाजे एकमेकास काटकोनात असून प्रत्येक दरवाजाच्या आंत देवडीची जागा दिसते.

माझं लग्न म्हणजे माझ्या आईबापाची हौस व त्याचप्रमाणे पत्नीच्या आई-बापाची हौस होय. लग्न होऊन पाऊणशेपेक्षा जास्त वर्षे होऊन गेलीं तरी मला आमच्या लग्नाचा सोहळा चांगला आठवतो. आमचं वऱ्हाड मोठ्या थाटाने वाजतगाजत वधूच्या गावांत शिरलें. वधूचे वडील व त्याचे भाऊबंदहि वाजतगाजत गावाबाहेर आम्हास सामोरे आले. दोन्ही बाजूच्या प्रमुख आप्तानी एकमेकाच्या हातीं पानसुपारी व नारळ देऊन एकमेकाचे गळ्यास गळे लावून भेटी घेतल्या.

त्या वेळचीं वाजनीं, लग्नमंडपातील जमाव, मंगलाष्टके व त्यानंतरची मिरवणूक हीं मला चांगलीं आठवतात. लग्न झाल्यानंतर वधूकडच्या वायामाणसांनी रुसवत मोठया समारंभाने वाजतगाजत आमच्या जानवसात आणलें. पहाटे वरात निघाली. वरातीपुढे शिंग, हलग्या, ढोल, करड्या, वाजनी, ताशेवाले, बाजेवाले वगैरे आपापलें कौशल्य मिरवणुकींतील माणसांपुढे दाखवीत होतीं. मला व नववधूला एका शृंगारलेल्या घोड्यावर बसविलें होतें. दुपारी मांडवपरतणीचें टोलेजंग जेवण झालें.

आमचें लग्न म्हणजे मला गमतीचा खेळ वाटला. माझ्या पत्नीलाहि हा भातुकलीचा खेळच वाटला असावा! आमचें लग्न झालें त्या वेळीं मी माझ्या आजोळीं साळशी येथे गावठी शाळेंत शिकत होतों. आमच्या बालपणाच्या विवाहामुळे माझ्या शिक्षणात अडचण आली नाही व मॅट्रिक होईपर्यंत माझ्या राहणींतहि फरक पडला नाही. आमचें लग्न झाल्यावेळीं बालविवाह सर्व जातींत रूढ असे. वधूवरें वयात येईपर्यंत त्यांचा एकमेकांशीं बोलण्याचालण्याचा संबधसुद्धा येत नसे. पण वधूचा तिच्या सासूसासऱ्यांशीं हरघडी संबंध येत असे. माझी पत्नी दहा-बारा वर्षांची असताना सासरीं म्हणजे आमच्या घरीं नांदावयास येई. पण तिला किंवा मला त्यात विशेष काही वाटण्याचें कारण नव्हतें. मात्र ती जरा मोठी झाल्यावर तिला आपला नवरा घरीं नसणें पसंत नसावें. पूर्वीच्या वहिवाटीप्रमाणे वधूवरें वयात आल्यावरच त्यांच्या गाठीभेटी होत असल्याने, मी मॅट्रिक होईपर्यंत पत्नीजवळ नसणें यात मला विशेष वाटत नसे. मी विसाव्या वर्षी मॅट्रिक झालो व मला माझी जबाबदारी कळू लागली; तरी पण माझ्या विद्यार्जनासाठी पत्नीपासून मला दूर राहणें भाग होतें. पत्नीस मात्र माझें दूर राहणें पसंत नसावें. पण जुन्या मराठमोळ्या पद्धतीप्रमाणे तिने फारशी कुरकूर केली नाही. आताच्या प्रौढविवाहाच्या व व्यक्तिस्वातंत्र्याच्या काळात मात्र हें शक्य नाही. वास्तविक त्या काळींसुद्धा प्रौढ तरुणींनी आपल्या नवऱ्याच्या हौसेसाठी वा शिक्षणासाठी पाच सहा वर्षे नवऱ्यास बाहेर राहू देणें हें अपूर्वच होतें. पण माझ्या पत्नीने ही तपश्चर्या केली खरी! ती दहा-अकरा वर्षांची होताच तिला माझ्या बापाच्या घरीं जास्त दिवस नांदावयास जावें लागे. प्रथम प्रथम ती माझ्या आईला तिच्या कामात मदत करी. घरीं आईच्या हाताखाली घरचें कोणी माणूस नव्हतें म्हणून हळूहळू तिच्यावर कामाचा बोजा पडू लागला. आई अर्थातच तिच्या बरोबर काम करू लागे. त्या काळीं दळण्याकांडण्याच्या गिरण्या नव्हत्या. दळण तर घरींच करावें लागे. भात भरडणें, कांडप हीं कामें दोनतीन महिन्यांनी एकदाच करावयाचीं असल्याने त्यासाठी मात्र बाहेरची मदत घ्यावीच लागे. रोजचें दळण दळू लागण्यासाठी चाफुणा म्हारवाडे म्हणून एक बाई-पहाटे माझ्या पत्नीस दळू लागण्यासाठी येई. बाकी झाडलोट, जेवणखाण आई व बायको मिळून करीत.

मराठा कुटुंबात बाया माणसें नदीवरून अगर विहिरीवरून पाणी आणण्यास जात नाहीत. हें काम घरच्या पुरुषांचें अगर नोकराचें असे. आमच्या घरीं एक कायमचा

साल्दार गडी व एक छोकरा नोकरीस असे. छोकरा सूर्योदयापूर्वी गोठ्यातील जनावरें बाहेर घेऊन जाई. तोंवर साल्दार शेण काढी, गोठे झाडी व वैरणकाडी पाहून, पाण्याच्या कावडी आणी. मग न्याहारी करून शेताकडे जाई. असा जवळजवळ रोजचा नित्य कार्यक्रम असे.

मी मॅट्रिक झालों, तेव्हा आपल्या नवऱ्याचं शिक्षण संपलें व ते आता आपल्या गावीं कायम राहण्यास येतील, अशी माझ्या पत्नीची समजूत होती. वास्तविक माझीहि अशीच समजूत होती. पण माझं भाग्य बलवत्तर असल्यानें अगदी अचानकपणें व अनायासें मला माझ्या गुरूच्या—शाहू छत्रपतींच्या—भेटीचा लाभ झाला. त्यांनी हातीं धरून मार्ग दाखविला व माझ्या शक्तीबाहेरचें म्हणून अनपेक्षित असलेलें शिक्षण मिळविण्याचा मार्ग मला खुला केला.

माझ्या दृष्टीनें हें सर्व काही ठीक झालें. तथापि माझ्या पत्नीची निराशा झाली असावी. मी मॅट्रिकची परीक्षा होताच गावीं येऊन संसारांत पडेन, ही तिची आशा सफल झाली नाही. बरें, ही तिच्या मनाची विफलता तिला बोलून दाखवितांहि येईना. दैवयोगानें नवऱ्याच्या पुढे चालून आलेली संधि सोडा, जाऊ द्या, असेंहि तिला म्हणता येईना. शेवटी मीं जेव्हा तिला "काय करूं, कॉलेजांत जाऊं का?" म्हणून विचारलें तेव्हा ती म्हणाली, "मी काय सांगू? आपणास योग्य दिसेल तें करा. मी आताप्रमाणेच मामींच्या बरोबर येथील संसाराची उपसाभर करीन." आईलाहि मीं घरीं असावें असेंच वाटणार. पण त्या सुज्ञ साध्वीनेंहि "पुढे जा" असाच आशीर्वाद दिला.

कोल्हापुरास नवीनच निघालेल्या मराठा बोर्डिंगांत मी दाखल झालों व कॉलेजमध्ये नाव घातलें. आजपर्यंत हायस्कूलमध्ये होतों, आता कालेजमध्ये गेलों इतकेंच. माझें शिक्षण पुढे कोल्हापुरास राजाराम कॉलेजांत दोन वर्षे व पुण्यास शेतकी कॉलेजांत चार वर्षे चालू राहिलें. कोल्हापुराहून मला वरच्यावर गावीं जाता येई, पण पुण्याहून फक्त सुट्टींतच घरीं जाऊं शकें. तेवढाच पत्नीला माझा सहवास मिळे. बाकी तिचा आपला घरकामाचा रामरगाडा चालूच होता. मी गावीं शेती करीत राहिलों असतों तर तिला या उपसाभरीचें काही फारसें वाटलें नसतें; पण मी जवळ नसताना ही उपसाभर तिला पसंत नसणें स्वाभाविक होतें. मी १९०६ च्या फेब्रुवारींत कॉलेज फार्मवर सुपरिंटेंडेंट म्हणून नोकरीस लागलों. पुढे सहा महिन्यांनी चि० शंकररावाचा वडगावीं जन्म झाला. ते चालू लागल्यावरच पत्नीस पुण्यास आणून फार्मावरील सुपरिंटेंडेंटच्या बंगल्यात मी राहू लागलों. याप्रमाणे बालविवाहाच्या रूढीमुळे येणाऱ्या अडचणींस आम्हां उभयतांना तोंड द्यावें लागलें. तथापि माझ्या पत्नीनें मला विरोध दाखविला नाही व माझ्या आईशींहि तक्रार उपस्थित केली नाही हें तिचें सौजन्य व मनाचा मोठेपणा खरा.

पुढच्या आमच्या जीवनातसुद्धा असे दोन प्रसंग आले होते. सन १९१२ सालीं मला विलायतेस जाण्याची संधि आली त्या वेळींहि ती मुलें घेऊन घरीं माझ्या

आईवडिलांकडे राहिली. पण तो काल फक्त नऊ दहा महिन्याचाच होता. पुढे सन १९२१ सालीं असाच तिच्या सोशिकपणाचा मला दुसरा अनुभव आला. सन १९२० अखेर माझी प्रकृति ढासळली होती. सात-आठ जिल्ह्यात फिरावें लागे. माझें शेतकीसंशोधन, रेल्वे सोडून दूर खेड्यापाड्यात असल्याने राहण्याची गैरसोय असून वेळेवर जेवणखाण होत नसे. डॉक्टर मॅनचा तर संशोधनाबद्दल लकडा असे. माझे डॉक्टर तर म्हणत, "तुम्हास बऱ्याच दिवसाच्या विश्रांतीची जरुरी आहे."

पुढे लवकरच शेतकी खात्याचे डायरेक्टर किटिंगसाहेब सेवानिवृत्त होणार होते व त्याच्या जागीं डॉ० मॅन येणार होते. डॉ० मॅनच्या कारकीर्दीत कष्टाळू, इमानी माणसाला रजा मिळणें अवघड होतें. ते उघडउघड म्हणत की, "चुकार माणसाच्या मागे लागून काय मिळणार ? कष्टाळू माणसाच्या मागे लागलें तर जास्त काम होतें." या सर्व गोष्टींचा विचार करून मी किटिंगसाहेबास भेटलों आणि माझ्या सर्व अडचणी त्याना सांगितल्या व विचारलें कीं, तुम्ही पेन्शनवर जाण्यापूर्वी मला एक वर्षाची स्टडी लीव्ह द्या म्हणजे मी अमेरिकेस जाऊन शेतकीविषयक अर्थशास्त्राचा अभ्यास करीन. हिंदुस्थानात शेतकीविषयक अर्थशास्त्राचा अभ्यास झालेला नाही आणि त्या थंड देशात माझी प्रकृतीहि सुधारेल. त्याप्रमाणे त्यानी मला रजा देण्याविषयी शिफारस केली व माझी रजा मजूर झाली. मी पुण्यासच बायकोमुलास ठेवून दीड वर्ष अमेरिकेत गेलों. तेथे माझी प्रकृति लवकर सुधारली. शिवाय तेथे मला 'मास्टर ऑफ् सायन्स'ची परीक्षाहि देता आली. या दीड वर्षांच्या मुदतींत पत्नीने जबाबदारीने संसार चालविला व मुलाच्या शिक्षणाची व आरोग्याची नीट व्यवस्था ठेवली. याप्रमाणे पत्नीने माझ्यासाठी व आमच्या मुलासाठी पुष्कळ कष्ट घेतले आहेत. तिच्या मोठ्या मनाचा व सोशिक स्वभावाचा आम्हास पुरा फायदा झाल्याची जाणीव मला आहे. एखादी पदवीधर बाई तिच्या जागीं असती तर माझें उच्च शिक्षण व देशपर्यटन झालें असतें असें मला वाटत नाही. असो.

माझी विश्वविद्यालयीन पदवीपरीक्षा पास होताच, फेब्रुवारी सन १९०६ त शेतकी विषयाचा डेमॉन्स्ट्रेटर व फार्मचा सुपरिंटेंडेंट म्हणून मी नेमला गेलों. आता स्वतंत्र बिऱ्हाड करून राहण्याचें मीं ठरविलें व पत्नीनेहि पुण्यास येण्याची इच्छा प्रदर्शित केली. सुपरिंटेंडंटसाठी लहानसा बंगलाहि कॉलेजजवळ तयार झाला होता. किरकोळ रजा घेऊन मी गावीं गेलो व पत्नी, थोरल्याचा मुलगा शंकरराव, वहिणीची तीन वर्षांची मुलगी हीराबाई व माझी आई याना पुण्यास आणून संसार थाटला. आता आमच्या घरीं स्वयंपाक करण्यास बाई व धुणीभांडीं करण्यास मोलकरीण होती. फार्मांवरील भाजीपाला व डेअरींतील उत्तम दूध माफक दराने मिळे. वडील गावाहून धारचे भात, जोंधळे, कडधान्य व गूळ पाठवीत. घरीं गावीं आमच्याकडे दोन म्हशी असत. बऱ्याचदा तिकडून पाचें शायफ तूप येई.

मला पुण्याच्या आसपास काम पडे, म्हणून माझ्या वरिष्ठाने मला लागेल तेव्हा सरकारी गाडी वापरण्याची परवानगी दिली होती, आणि मीं लागलीच बायसिकलहि घेतली. त्या वेळीं थोड्याच लोकांकडे सायकली असत. पुढे मला एका इनामदार स्नेह्याची धमनीहि वापरावयास मिळाली. ही धमनी दहाबारा वर्षे पडून होती. इनामदाराची आई हयात असताना ही धमनी वापरली जाई. मीं त्याना विचारलें की, "धमनी आपण विकत असाल तर मी घेतों." ते म्हणाले, "आता कोणी बैलाच्या धमन्या वापरीत नाही, व तिला गिऱ्हाईकहि मिळणार नाही. तुम्हास पाहिजे असल्यास घेऊन जा. कारण ती आमच्याकडे पडूनच राहणार. मात्र तुम्हास टप दुरुस्त करावा लागेल व नव्या गाद्या घालाव्या लागतील. आपण पुण्यास थोडेच कायम राहणार! दुसरीकडे बदली झाली म्हणजे गाडी परत करा. झालें." माझ्या स्नेह्याची सूचना मला पटली. वाटेल तेव्हां सरकारी बैलगाडी वापरण्याची मला परवानगी होतीच. मीं इनामदाराची सारवट दुरुस्त करून घेतली. ज्या ज्या वेळीं आम्हास बाहेर जावयाचें असे त्या वेळीं फार्मवरील कान्हेजी जातीचे उंच, एकशिवडी, पाढऱ्याशुभ्र रंगाचे, डौलदार शिंगाचे बैल बापू गाडीवान घेऊन येई. एका बैलाचें नांव बहिऱ्या व दुसऱ्याचें बड्या. बैल चपळ होते. बापूने त्याच्यासाठी माझ्याकडून घुंगरी चाळ करून घेतले होते. बापूची माझ्यावर फार श्रद्धा असे.

सन १९०८च्या मे महिन्यात मला बढती मिळून मी इन्स्पेक्टर झालों. त्या वेळी आम्ही फार्मजवळच रंगराव पाटलाच्या पडळींत राहात होतों. घरीं बायको आणि शंकरराव व आनंदीबाई ही मुलें असत. कधीकधी आई माझ्या बहिणीच्या मुलीस (हौसाबाईस) घेऊन पुण्यास येई व महिना-पंधरा दिवस राही. आम्ही सारवटींतून शहरांत व शहराबाहेर फिरावयास जात असू. घरीं दुधासाठी म्हैस असे. शेजारीं माझ्या आश्रयास असलेले दोन फील्डमेन शिवरामराव खानविलकर व आर० एन० साळोखे असत. माझ्याकडे दोन शिकारी कुत्रींहि होतीं. एकदरींत आमचें कौटुंबिक जीवन सुखाचें होतें.

मी ह्या काळात (सन १९०६ ते १९११) नवीनच स्थापलेल्या शेतकी कॉलेजात शेतकी विषयाचा इन्स्ट्रक्टर व कॉलेजास जोडलेल्या फार्मचा सुपरिंटेंडेंट होतों. हें कॉलेज म्हणजे सरकारने हातीं घेतलेल्या शेतकी खात्याच्या वाढीचें पहिलें पाऊल होतें. सरकारला हें कॉलेज आदर्शभूत करावयाचें होतें. सध्या उभ्या असलेल्या कॉलेजचें बांधकाम जोरात चालू होतें.

अशा वेळीं माझ्याशीं थोडाफार संबंध असलेली एक सूचना आमचे त्या वेळचे डायरेक्टर किटिंग यानी सरकारात पाठविण्याचें ठरविलें. ही सूचना म्हणजे चार तरुण हिंदी पदवीधर निवडून त्याना उच्च शिक्षणासाठी सरकारी खर्चाने विलायतेस पाठवून तयार करून आणावयाचे. याप्रमाणे किटिंगसाहेबांनी दोन बी० ए० (एस० एल० आजरेकर व व्ही० एच० गोणेहळ्ळी) व दोन एल० ए० जी० (जी० डी० मेहता व

पी० जे० भट) याची निवड केली. मी पहिल्या वर्गांत पास झालों होतों. माझा स्वभाव व माझें काम किटिंगला पसत असूनहि माझी निवड झाली नाही याचें कारण मला उमजेना व मी थोडा नाराज होतों. किटिंगसाहेब वरचेवर फार्मवर येत व फार्म सुपरिंटेंडेंट या नात्याने मला त्याच्याबरोबर फार्मवर फिरावें लागे. मी त्याच्याशीं मोकळ्या मनानें बोलत असें. एकदा असेच फिरत असताना मीं विलायतेस पदवीधर पाठविण्याचा प्रश्न काढला व म्हटलें, "आपण दोन एल० ए० जी० पदवीधर उच्च शिक्षणासाठी विलायतेस पाठवीत आहात. मी पहिल्या वर्गांत पास झालेला एल० ए० जी० आहें. हाडाचा शेतकरी आहे. वडिलांच्या हाताखाली दोन वर्षें शेती केली आहे. मी का निवडलें गेलों नाहीं कळेना." यावर साहेब हसून म्हणाले, "तुमचें कॉलेजात मिळविलेलें ज्ञान व प्रत्यक्ष मिळविलेला अनुभव पुरा आहे. ज्याना आम्ही परदेशीं पाठवितों त्याना शेतीचा प्रत्यक्ष अनुभव नाही. म्हणून अनुभव मिळविण्यासाठी त्याना आम्ही पाठवीत आहोंत." त्यावर मी म्हणालों, "मला शेतीचें ज्ञान व अनुभव आहे म्हणून का मी मागे राहावें? व ज्याना अनुभव कमी त्यानी माझ्या पुढे जावें!" त्यावर साहेब म्हणाले, "हें माझ्या लक्षात आहे. तुम्हीं नाराज होण्याचें कारण नाही. तुमची व त्याची एकच ग्रेड राहील." पुढे मी या बाबतींत फारसा बोललों नाहीं.

मी सुपरिंटेंडेंट डिव्हिज्नल इन्स्पेक्टर असताना कॉलेजवर किंवा कॉलेजजवळ राहणारा अधिकारी काय तो मी एकटाच असें. त्या वेळीं जवळपास चहाचें दुकानहि नव्हतें. कॉलेजमधील शिक्षक माझे जुने सहाध्यायी व स्नेही असत. स्वाभाविकपणें माझ्या घरात ही मंडळी वरचेवर चहास येत. आमच्या घरीं म्हैस असे व आमच्या येथील चहा चांगला होई, हे एक दुसरें कारण. पत्नी हौसेने चहा करून देई.

आमची कौटुंबिक जीवननौका याप्रमाणे फेब्रुवारी १९०६ ते २४ मार्च १९१२ पर्यंत सुखाने चालली होती. विलायतेस निघालों त्या वेळीं मुलें लहान होतीं. मोठा मुलगा शंकरराव साडेपाच वर्षांचा होता, आनंदीबाई अडीच वर्षांची व धाकटी मुलगी ताई दीड वर्षाची असावी. पत्नीला चारपाच महिने गेले होते. म्हणून तिला मुलें घेऊन गावीं आईवडिलांकडे पाठविलें. मीं तारीख २३ मार्च सन १९१२ रोजीं मुंबई सोडली व विलायतेस निघालों. माझ्या वहिणीचीं मुलें आमच्या घरींच असत. छोटा शंकरराव माझ्या वडिलांचा लाडका नातू. नहीण सासरीं असल्याने माझ्या आईचें लक्ष आपल्या मुलीच्या मुलांकडे जास्त असणें स्वाभाविक होतें. मला वाटतें, माझ्या बायकोस याबद्दल थोडाफार विषाद वाटला असावा. तथापि गावाहून मला जीं पत्रें येत त्यावरून घरीं काही कुरबूर झाल्याचें दिसत नव्हतें.

मी विलायतेस असताना तारीख १० ऑगस्ट रोजीं पत्नी वडगावीं बाळंत झाली. मुलगा झाला. माझ्या आईने त्याचें नाव विलायतराव असे ठेविलें होतें. मीं तारीख २४ सप्टेंबर रोजीं लंडन सोडिलें व हॉलंडमधून जर्मनीस जाऊन व स्वित्झर्लंडमधून

इटलीतील ब्रिंडीसी बंदरास येऊन पोचलों. तेथून जहाजातून पोर्ट सय्यद येथे उतरून एक आठवडाभर इजिप्त पाहून तारीख २५ रोजीं मुंबईस व २६ ला पुण्यास येईन, असें डायरेक्टर ऑफ ॲग्रिकल्चर मि० स्मार्ट यास आगाऊ कळविलें होतें. कशासाठी मला माहीत नाही पण स्मार्टसाहेबांचा माझ्याबद्दलचा ग्रह चांगला नव्हता, असें दिसतें. मी विलायतेस जाण्यापूर्वी कायमचे डायरेक्टर किटिंग यानी स्वतः आपण एक वर्षाच्या रजेवर जाताना, कोंकणभागासाठी एक एक्स्ट्रा डेप्युटी डायरेक्टरची दरमहा दोनशे रुपये पगाराची जागा निर्माण करावी व मी विलायतेतून परत येताच ती मला द्यावी, अशी योजना मुंबई सरकारकडे पाठविली होती. सरकारने तशी जागा निर्माण केली. एका हिंदी गृहस्थाला फक्त सात वर्षाच्या नोकरींत रुपये दोनशे पगाराची जागा देणें स्मार्टसाहेबाना आवडलें नसावें. मी स्वदेशीं येण्यापूर्वीच त्यानी ती जागा श्री० गोणेहळ्ळी (नाईक) यास दिली. अर्थात् मी माझ्या पूर्वीच्या डिव्हिजनल इन्स्पेक्टरच्या जागीं पुण्यास यावयाचा. पण याच वेळीं स्मार्टसाहेबानी माझें डिव्हिजनल इन्स्पेक्टर मध्यभागाचें सदरस्टेशन पुण्याहून खानदेशात जळगावास बदलल्याचा हुकूम काढून तो मला मुंबई बंदरावर पोचविला. मीं मुंबईहून पुण्यास न येता परस्पर जळगावास जावें असें मला त्यात कळविलें होतें. या हुकुमामुळे मला मुलामाणसाना भेटण्यासाठी गावीं जाण्यास किरकोळ रजा मागण्यास अवसर राहिला नाही व मुलाबाळास न भेटता मला परस्पर मुंबईहून जळगावास जाणें भाग पडलें. जळगावास गल्यावर मीं तेथे भाड्यानें घर घेतलें व वडिलाना हकीकत कळवून माझ्या बायकोमुलास व आईस जळगावास आणून पोचविण्याची विनंती केली. त्याप्रमाणे आइ, बायको व मुलें सन १९१२च्या डिसेंबरच्या पहिल्या आठवड्यात जळगावास आलीं. पण तेथे येताच दोन्ही लहान मुलें (ताई व विलायतराव) आजारी पडलीं. ताई डिसेंबरमध्यें वारली व विलायतराव जानेवारीच्या पहिल्या आठवड्यात वारला.

तरुणपणी माझं मन बरेंच घट्ट असे. शिवाय खानदेशात शेतकीच्या औताचे व बियाचे डेपो काढणें व त्याचबरोबर मराठा समाजाची संघटना करणें यात मी गढून गलों होतों; यामुळे मला दुःखाचा हळूहळू विसर पडला. पुरुषाच्या मानाने बायकाचें हृदय कोमल असतें. एकापाठीमागून एक अशीं दोन मुलें गमावल्यामुळे पत्नीस फार दुःख झालें. त्यातून ती पुन्हा गरोदर होती. त्यामुळे घरीं फार अडचण झाली. दुःखात सुख म्हणजे माझी बदली ॲक्टिंग प्रोफेसर ऑफ ॲग्रिकल्चर म्हणून पुण्यास शेतकी कॉलेजात होण्याचें ठरलें. जास्त अडचणी येऊं नयेत म्हणून मीं माझ्या मावशीस बोलावून घेतलें होतें. मला तारीख २० एप्रिल १९१४ रोजीं प्रोफेसरच्या जागचा चार्ज घ्यावा म्हणून हुकूम आला. मीं एकट्याने पुढे जाऊन कामाचा चार्ज घ्यावा व पत्नीस बाळतपणानंतर पुण्यास न्यावें असे मी म्हणत होतों. पण तिला मागे राहणें पसत पडलें नाही व ती म्हणाली कीं, आपल्या बाळतपणास

पधरा दिवस तरी लागतील, म्हणून मी तुमच्याबरोबरच पुण्यास निघण्यात काही धोका नाही. मावशीनेहि तिला पाठिंबा दिला आणि आम्ही ता. १९ एप्रिल रोजीं जळगावाहून पुण्यास निघालों. आम्ही मनमाडास पोचण्यापूर्वीच बायकोच्या पोटात दुखू लागल. पुण्यास जाताना मनमाडास गाडी बदलावी लागते. मनमाड स्टेशनावर उतरताच मीं स्टेशनमास्तरास भेटून विनती केली की, आमच्यासाठी बायकाचा सेकंडक्लासचा डबा अगर कम्पार्टमेंट राखून ठेवा. त्याप्रमाणे त्याने तशी सोय केली. मी दुसऱ्या डब्यातील सेकंड क्लासमध्ये बसलो. मनमाडहून गाडी सुटण्यापूर्वी मी पुण्याजवळच्या लोणी येथील शेतकी शाळेचे हेडमास्तर, माझे जिवलग मित्र कृष्णाजी माधवराव पवार, यास सविस्तर हकीकतीची तार केली आणि लोणी स्टेशनावर गाडी घेऊन येण्यास विनती केली. त्याप्रमाणे पवारमास्तर स्टेशनवर आमची वाट पाहात होते.

आम्ही लागलीच स्टेशनहून पवारमास्तराच्या घरीं गेलों. तेथे मास्तराच्या आईने व बायकोने बाळंतिणीची खोली तयार करून ठेवली होतीच. बिऱ्हाडीं पोचल्यावर तासाभरात बायको बाळंत झाली व तिला मुलगा झाला. दुसऱ्या दिवशीं मी एकटाच पुण्याला जाऊन प्रोफेसरच्या जागवर रुजू झालों. मुलाचें बारसे होईपर्यंत आमचें बिऱ्हाड लोणीसच होत. मीच रोज लोणीहून पुण्यास जाई येई. लोणी शेतकी शाळेतच मुलाचे बारसे घातले व त्याचे नाव दिनकरराव असे ठेवले.

नतर आम्ही पुण्यास फर्ग्युसन कॉलेज-रोडवर शेतकी कॉलेजपासून जवळच राहातेकराच्या बगल्यात बिऱ्हाड हलविलें. श्री. पवार यानीच ही सोय आगाऊ केली होती. वास्तविक माझी सोय कॉलेजवराल प्रोफेसर ऑफ ॲग्रिकल्चरच्या बगल्यात व्हावयास पाहिजे होती. पण तो काळ इग्रजी सत्तेचा व त्यातूनहि जागतिक युद्धा पूर्वीचा होता. म्हणून गणेशखिंड डिव्हिजनचे एक्झिक्युटिव्ह इजिनिअर रावसाहेब काळे ह्यानी साहेबाचा बगला एका हिंदी माणसाच्या वास्तव्याने बाटू नये म्हणून दूरदर्शीपणाने त्या बगल्याची दुरुस्ती व रंगरंगोटी करण्याचे आगाऊच ठरविलें होतें. त्यामुळे मला सरकारी बगला मिळाला नाही. ॲक्टिंग प्रोफेसरचें काम सहा महिने केल्यावर माझी बदली पुण्याहून कोकणभागाचे ॲक्टिंग एक्स्ट्रा डेप्युटी डायरेक्टर म्हणून रत्नागिरीस झाली.

आम्ही रत्नागिरीस एक वर्ष होतों म्हणण्यापेक्षा माझी बायको व मुलं तेथे एक वर्ष होतीं असे म्हणणें बर. कारण मला दमणपासून ते गोव्यापर्यंतच्या कोकणपट्टीत फिरती करावी लागे आणि कोकणपट्टीतील हा प्रवास काही समुद्रातून व काही चागले रस्ते नसलेल्या डोंगरमागातून पायीं करावा लागे. त्या वेळीं सरकारी मोठे अधिकारी पोल्यावरून जात, पण खालचे अधिकारी डोलीतून प्रवास करीत. मला दुसऱ्या माणसाना वाहून नेणे पसत नसल्याने मी डोलींत बसत नसें. जेथे चागले रस्ते असत तेथे घोडागाडी, ती मिळाल्यास टांगा करीं. नाही तर पायींच डोंगर तुडवीं.

सरकारी काम तर असेच, पण मला या वर्षात कोकणातील शेतकऱ्यांची व शेतीची परिस्थिति, तेथील खंड, जमीन व विक्री याची माहिती करुन घ्यावयाची होती. समुद्राकाठची माल्वण, सावंतवाडी, पणजी व कारवार ही शहरे पाहावयाची होतीं. तसेच त्या भागातील शेतकऱ्याचा आर्थिक व सामाजिक स्थिति समजून घ्यावयाची होती. म्हणून मला असा प्रवास करण जास्त उपयुक्त होत. त सोयीचे पडले व जी माहिती हवी होती ती मला मिळवता आली. मी जशा देशभागात पुरेच वेळा नायकामुलांसह फिरती करीत असे तस कोकणात करणें शक्य नव्हते. शिवाय एप्रिल सन १९१५ मध्ये आईवडिलांस येऊन मी महिनाभर रामेश्वरास गेल्यावेळीं बायको व मुल रत्नागिरीसच ठेवली होतीं.

रत्नागिरीस असताना त्या भागातील काही मराठे मंडळींचा परिचय झाला होता. खुद्द रत्नागिरीस त्या वेळा माधवराव मोरे नावाचे एक्साइज कलेक्टर होते. त्याचे वडीलहि एक्साइज कलेक्टर होऊन सेवानिवृत्त झाले होते. हे कुटुंब सुशिक्षित असून, कुटुंबातील माणसे मनमिळाऊ होतीं. मी रत्नागिरीस असताना गोविंदराव जाधव (भास्करराव जाधव याचे धाकटे बंधु) तेथे मुनसफ होते. ते डॉक्टर नल्वडे नावाच्या मराठा गृहस्थाच्या घरीं भाड्याने राहात शिवाय शेजारच्या गावची (मिऱ्याची) बरीच सावंत मंडळी ओळखीची झाली होती. मसुऱ्याचे इनामदार व खोत श्रीमंत बाबासाहेब गावकर यांची माझ्याकडे ये जा असे. मीहि त्यांच्या आमंत्रणावरून त्यांच्या गावीं गेलों होतों. मी व पत्नी, गोविंदराव जाधव व माधवराव मोरे यांच्याकडे जात असू व ती मंडळीहि आमच्याकडे येत असत.

मी राहत असलेला बंगला बराच मोठा होता. त्याच्या पुढे लहानशी बागहि होती. चिरंजीव शंकरराव शाळेस जाई तो, आनंदीबाई व धाकटा दिनकर (बाबा) यास बागमध्ये बागडण्यास मुबलक जागा होती आम्हीं एक सारवट गाडी कायमची भाड्याने ठेवली होती. मला ज्वळच चार मैलावर असलेल शिरगाव फार्म तपासण्यास जावें लाग. त्या वेळीं पत्नी व मुल मजबरोबर सारवटींतून येत. सर्व जण सध्याकाळीं समुद्रकिनाऱ्यावर फिरावयास जात असू. त्या काळात तरी समुद्रकिनाऱ्यावर फिरावयास जाणारीं माणस दिसत नसत. मुंबईस जशीं मुलंमाणस समुद्रकाठीं फिरावयास जात व मुलें बॅंडवेंडवळ वाळूत खेळत, तशी फिरण्याची गोडी रत्नागिरीच्या लोकास लागली नव्हती.

पत्नीला शिकविण्यासाठी आम्ही एक मास्तरीण पाहात होतों. पण मराठ्याच्या घरीं शिकवणीसाठी ब्राह्मण मास्तरीण मिळाली नाही. म्हणून आम्हीं एका खिश्चन बाईची योजना केली. ही बाइ फार सुशील होती. पत्नीबरोबर ती आमच्या मुलानाहि शिकवीत असे.

मी रत्नागिरीस असताना ब्रह्मदेशाच्या थिबा राजाला इंग्रज सरकारने रत्नागिरीस नजरकैदेत ठेविलें होत. शहराच्या पूर्वेस, बाहेर कात्याळ माळावर एक प्रशस्त बंगला

बांधून त्यात वास ठेविले होते. त्याच्यावर देखरेख करण्यासाठी एक युरोपियन अधिकारी (सेक्रेटरी म्हणून) होता. माझ्या मनातून राजाला भेटावें असे होतें. पण विचारपूस करता मला कळलें की, त्याच्या भेटीस जाताना, बाहेर पादत्राणें काढून, त्याच्या दिवाणखान्यांत गुडघ्याने रांगत जावें लागतें. म्हणून मीं त्याच्याकडे जाण्याचा बेत रहित केला. थिबा राजाला एक मुलगी होती. मला वाटतें, थिबा राजा वारल्यावर तिने त्या युरोपियन सेक्रेटरीशीं लग्न केलें. थिबा राजाचें आता कोणी राहिलेलें दिसत नाही. त्याच्यासाठी बांधलेला बंगला आता रहदारीचा बंगला झाला आहे.

मी रत्नागिरीस असताना आई व वडील यांना घेऊन दक्षिण हिंदुस्थानचा प्रवास करण्याची संधि मला मिळाली. या प्रवासात, दक्षिण हिंदुस्थानातील क्षेत्रें, कोइमतूर येथील शेतकी कॉलेज व प्रयोगक्षेत्र पाहिलें. रामेश्वराची यात्रा केली. आठ दिवस सिलोनला जाऊन पौराणिक काळची लंका पाहिली, व दक्षिणेंतील मद्रासी ब्राह्मणांची अरेरावी पाहिली. तिकडे त्या काळीं ब्राह्मणेतरांनी नुसतें पाहिलेलें अन्न विटाळतें असें ब्राह्मण मानीत व तो दृष्टिदोष ठरे. अतिशूद्रास मोकळेपणाने गावात हिंडता येत नसे. समोरून ब्राह्मण येत असला तर आपली सावली त्याच्या अंगावर पडू नये, म्हणून तो एक प्रकारचा आवाज काढून, येणारा ब्राह्मण पुढे निघून जाईपर्यंत आपण खाली नमत असे. आमची रामेश्वराची यात्रा व कन्याकुमारीजवळच्या रामाच्या सेतूजवळचें समुद्रस्नान हीं अविस्मरणीय झालीं.

रत्नागिरीहून माझी बदली सन १९१५ सालीं मध्यभागाचा डेप्युटी डायरेक्टर म्हणून पुण्यास झाली. तेथे आमची राहण्याची घडी चांगली बसली होती. घरीं मोटार होती. ड्रायव्हर, स्वयपाकी व एक मोलकरीण होती. शिवाय एक सरकारी शिपाई बिन्हाडात असे. संध्याकाळीं ऑफिसातून आल्यावर, पत्नीस व मुलास घेऊन मी मोटारने गावाबाहेर सोलापूररोड, सातारारोड किंवा नगररोडकडे फिरावयास जाई. असल्या सहलीत लहानसान शिकार (ससे, तीतर, पकुर्डी किंवा बटेर) मिळे. त्या काळीं मोटाररहदारी फार कमी असल्याने, शिकार मिळण्यास फार भटकावें लागत नसे.

सन १९१८च्या पहिल्या तिमाहींत पुण्यास फार प्लेग झाला व आम्हास शहर सोडून नदीपलीकडे भांबुर्ड्याजवळ, विश्राम रावजी घोले यांच्या त्या वेळीं मोकळ्या, चराऊ माळरानात तंबू मारून राहावें लागलें होतें. पत्नी गरोदर होती; पण मुलें शिकत असल्यामुळे, तिला बाळतपणास आईकडे वडगावास जाता आलें नाही. म्हणून तिला मंगळवारातील जनाना हॉस्पिटलमध्येच ठेवणें भाग होतें. तेथेच चिरंजीव नानासाहेबाचा जन्म तारीख २३ मार्च सन १९१८ रोजीं झाला. नंतर आम्ही सदाशिव पेठेंत, गाडगिळाच्या वाड्यात बिन्हाड करून राहिलों. तेथे असताना पत्नी दुखेतली व तिच्या गर्भाशयात वारेचा काही भाग राहून गेला. पण त्या वेळीं तें कोणासच उमजलें नाही. त्याचा परिणाम तिच्या प्रकृतीवर झाला व तिची प्रकृति फार खालावली. डॉक्टर लोकांनी तिला क्षय झाला असें सांगितलें. म्हणून मी रजा घेऊन

कोल्हापुरास गेलों. तेथें कोल्हापुरचे दरबार सर्जन डॉ० टेंगडी यानीहि क्षयच आहे असें सांगितलें; इतकेंच नव्हे तर, *त्यानी पुढाकार घेऊन टेंबलाबाईजवळ बांधलेल्या* सॅनिटोरियममध्ये तिची राहण्याची सोयहि केली. पण आम्ही तेथें गेलों नाही. त्या वेळीं शहरात डॉ० वाटवे म्हणून एक प्रसिद्ध डॉक्टर होते. त्यानीहि हा क्षयच असावा, असें मला सांगितलें. तथापि आपण खात्री करून घेऊन या, असें म्हणून त्यांनी तिच्या रक्ताची व खाकऱ्याची तपासणी केली. त्यात त्याना क्षयाचे जंतु आढळून आले नाहीत. म्हणून आशा वाटून त्यानी परत औषध सुरू केलें. थोड्याच दिवसात त्याना संशय आला की, तिच्या गर्भाशयात काही तरी बिघाड झाला असावा. तेव्हा त्यानी एका अनुभवी नर्सकडून तिची तपासणी करविली. त्या नर्सेलाहि गर्भाशयात काही तरी आहे असे आढळून आलें. म्हणून डॉ० वाटवे यानी सल्ला दिला की, बायकोस घेऊन अमेरिकन मिशन दवाखान्यात मीं जावें. त्याप्रमाणे तेथें गेलों व डॉ० व्हेलला भेटलों. प्रथमदर्शनी डॉ० व्हेललाहि वाटलें की, ही केस क्षयाचीच असावी. मीं त्याना डॉ० वाटव्यानी केलेलें निदान सांगितलें. तेव्हा डॉ० व्हेलने परत रक्त व खाकरा तपासला व सांगितलें की, "क्षय नाही खरा, पण बाई इतकी अशक्त झाली *आहे की तिला पोटाची मोठी शस्त्रक्रिया सोसवणार नाही. कदाचित् ती ऑपरेशन* टेबलावर दगावेल." मी म्हणालों, "शस्त्रक्रिया केली नाही तर ती कुचनत कुचनत मरणार. शस्त्रक्रिया केली तर मात्र तिचा जगण्याचा काही तरी संभव आहे, म्हणून शस्त्रक्रियेचा धोका मी पत्करतां." डॉ० व्हेल यानी ऑपरेशन केलें. आमच्या नशिबाने माझी पत्नी वाचली. हळूहळू तिची प्रकृतीहि सुधारली. मात्र त्या वेळेपासून तिला दम्याचा विकार जडला.

माझी रजा संपेपर्यंत आम्ही वडगावीं राहून नंतर पुण्यास गेलों. महाराष्ट्रात शाहूमहाराजांच्या पाठिंब्याने, मुंबईच्या कौन्सिलात ब्राह्मणेतर पार्टीचा बोलबाला असे. कौन्सिलच्या बैठकीच्या वेळीं मी या सर्व मंडळीला एक खाना देई. हॉटेलमध्ये पार्टी देणें मला पसंत नसे व त्या वेळीं हिंदुसमाजात तशी प्रथाहि पडली नव्हती. अर्थात् अशा पार्टीचा बेत घरींच करावा लागे. मंडळीच्या जेवणाची व पानसुपारीच्या व्यवस्थेची सर्व जबाबदारी पत्नीवरच पडे. माझ्या पुण्यातील वास्तव्याच्या पूर्वार्धात पुण्यास पदवीधर सुशिक्षित मराठे फारच कमी होते. कोल्हापुरचे शाहूमहाराज यानी पुणें हें मराठासंघटनेची चळवळ सुरू करण्याचें केंद्र ठरविलें. याच सुमारास मराठे मंडळींनी मराठा शिक्षण परिषदेची चळवळ हातीं घेतली होती. त्यामुळे मराठा पुढाऱ्याची पुण्यास ये जा वाढली. बाबुराव जेधे, लक्ष्मणराव टोसर व बाबूराव जगताप यानी ही चळवळ उचलून धरली. पण बहुसंख्य मराठ्यात जागृति होण्यास बराच अवधि लागला.

शाहूमहाराज पुण्यास वरचेवर येऊ लागले. पुण्यास रेल्वेस्टेशन जवळ ताडीवाला रोडवर त्यांचा स्वतःचा बंगला (पन्हाळा लॉज) होताच. तेथे त्याची राहण्याजेवण्याची

व गाडीघोड्याची सोय असे. पण बाहेरून येणाऱ्या इतर लोकांची गैरसोय असे. देवासचे तुकोजीराव महाराज व त्यांचे बधु भाऊसाहेब महाराज हे बहुधा लक्ष्मणराव ठोसराच्याकडे उतरत. बडोद्याचे खासेराव जाधव हे माधवराव घोरपड्याच्याकडे उतरत. श्रीमंत खासेसाहेब महाराज, देवास व बडोद्याचे रामचद्रराव माने पाटील माझ्याकडेच येत. जेथे मॅन्शन तर मराठ्यांची धर्मशाळाच बनली होती. कोणास अडचण असली, तर ते थेट जेथे मॅन्शनमध्ये चतुरगाळे टाकीत. मी शेतकी खात्यातील महाराष्ट्रात वावरणारा अधिकारी, शिवाय टेकन मराठा एज्युकेशन असोसिएशनचा सेक्रेटरी असल्याने, माझ्याकडे वरचेवर येणारी मडळी बरीच असत. माझीं सरकारी व सार्वजनिक कामे अशा तऱ्हेचीं होतीं की, मला ह्या मडळींची ये जा पाहिजे होती. त्याचा मला उपयोग होई. पण ह्या मडळींच्या चहापाण्याची व जेवणाखाण्याची जबाबदारी माझ्या पत्नीवर बराच पडे. ही जबाबदारी ती आस्थेने पार पाडी.

पुण्यास माझा मित्रपरिवार मोठा असे. त्यात शेतकी कॉलेज व शेतकी खात्यातील अधिकारी बरेच असत. आमच्या खात्याच्या निरनिराळ्या शाखेच्या कचेऱ्या कॉलेजातच होत्या. माझे घर शेतकी कॉलेजाजवळ होतें. त्या काळीं जवळपास चहा कॉफीचीं व फराळाचीं दुकानें शहरातच कमी, तर कॉलेजाजवळ कोठून असणार! यामुळे ही मडळी, वेळोवेळी, आमच्याकडेच चहास येत. मला चागल्या प्रतीचा चहा आवडे. आमच्या घरीं म्हैस असावयाची त्यामुळे आमच्याकडचा चहा चागला होई. रावबहादूर जी० के० भेळकर, असिस्टट प्रोफेसर ऑफ् अग्रिकल्चर, तर म्हणावयाचे की, चागला चहा पाहिजे असेल तर चला जाऊ पी० सी० पाटलाच्या घरीं. या स्नेह्यांच्या चहापाण्याची व पाहुण्यांच्या जेवण्याखाण्याची उपसाभर पत्नी अगत्यपूर्वक करी.

मध्य भागात सहासात जिल्हे असल्याने मला फिरतीचें काम बरेंच पडत असे. शिवाय मीं होऊन काही सशोधनाचें व लिखाणाचें काम अगावर घेतलें होतें. हें काम जास्त व दगदगीचें झालें आणि त्यामुळे माझी प्रकृति खालावली होती व माझें वजनहि फार कमी झालें होत. मला डॉक्टरानी सल्ला दिला की, "शक्य असल्यास तुम्ही वर्ष-सहा महिने विलायतेस अगर कोणत्या तरी थड देशात जाणें बरें." हें ऐकून पत्नी म्हणाली, "खरेच, तुम्ही माग विलायतेस गेला, तेव्हा तुमची प्रकृति फार चागली झाली होती. तुम्हास वाटत असल्यास व तशी रजा मिळत असल्यास वर्ष सहा महिने विलायतेस जाण्यास माझी हरकत नाही. मी मुलाना घेऊन पुण्यास राहीन. मुलें आता जाणतीं झालीं आहेत. त्यांच्या शिक्षणात अडचण येणार नाही." हे तिचे शब्द ऐकून मला समाधान व आश्चर्य वाटलें आणि तिच्या आत्मविश्वासाबद्दल जास्त अभिमान वाटला. मला वाटलें होतें की, माझी आईच तेवढी धैर्यवान व जबाबदारी घेणारी. पण माझ्या आईच्या, पत्नीच्या व त्याचप्रमाणे माझ्या सुल्तमावाच्या बायकोच्या (गगूबाईच्या) प्रत्यक्ष उदाहरणावरून माझी खात्री

पटली की, मराठा स्त्रिया जरूर पडल्यास आत्मविश्वासाने संसाराची व मुलानाळाची जबाबदारी घेऊ शकतात. पत्नीशी बोलणे झाल्यावर मी, पडत्या फळाची आज्ञा मिळाल्यासारखी, एक वर्षाची रजा घेऊन अमेरिकेची वाट धरली.

माझ्या ह्या दीर्घ मुदतीच्या गैरहजेरींत, आमच्या खात्यांतील माझे परमस्नेही रावसाहेब कृष्णाजी माधवराव पवार व त्याचप्रमाणे दुसरे स्नेही दादासाहेब (मुक्ताजीराव साळे) व गणपतराव शिंदे यांची माझ्या पत्नीस व मुलानाळास फार मदत झाली. संसारात लागणारा बाजारहाट व मुलास लागणारे कपडेलत्ते रावसाहेब पवार करून देत. माझा बँकेचा व्यवहारहि तेच पाहात. गांवी आईने आपल्या जावयाच्या मदतीने आमची शेतीभाती ठाकठीक चालविली होती. लक्षात ठेवण्यासारखी गोष्ट म्हणजे पत्नीने ज्या वेळीं मला अमेरिकेस जाण्याची अनुमति दिली त्या वेळीं ती गरोदर असून जवळजवळ तिचे दिवस भरत आले होते. मी अमेरिकेस निघाल्यावर महिन्या दीड महिन्यानेच ती प्रसूत झाली व तिला मुलगी (इंदुमती) झाल्याचें वर्तमान व मुलीचा फोटो मला लौकरच अमेरिकेंत मिळाला.

अमेरिकेचा दीड वर्षाचा प्रवास संपवून मी ऑक्टोबर सन १९२२ त परत आलों. माझं सरकारी काम चांगल झाल. याची दखल घेऊन हिंदुस्थान सरकारने मला १९२४ साली रावबहादूर ही पदवी दिली.

मी अमेरिकेहून परत आल्यानंतर थोड्याच दिवसांनी ग्वाल्हेरचे माधवराव महाराज शिंदे यांनी मुंबई सरकारकडे शेतकी कॉलेजचे प्रिन्सिपल डॉ० मॅन यांना आपल्या राज्यात डायरेक्टर ऑफ ॲग्रिकल्चर म्हणून दरमहा तीन हजार रुपये पगारावर द्यावें अशी विनंती केली. मुंबई सरकारने हे पत्र डॉ० मॅनकडे पाठवून त्याच मत विचारले. डॉ० मॅन यांनी मुंबई सरकारास कळविल की, त्याअर्थी ग्वाल्हेरच्या महाराजांनी मला न विचारता माझी मागणी केली त्याअर्थी मी जाण्यास कबूल नाहीं. मुंबई सरकारने त्याप्रमाणे शिंदेमहाराजांना कळविल. मॅनसाहेबांनी नकार दिलेला पाहून त्या मानी पुरुषाला आपल्या मागणीचा अव्हेर झाला असें वाटल व थोड्याच दिवसांनी त्यांनी मला चार दिवसांची रजा घेऊन ग्वाल्हेरीस येण्यास लिहिल. मी किरकोळ रजा घेऊन ग्वाल्हेरीस गेलों. तेथे त्या वेळीं माझे स्नेही श्रीमंत खासेसाहेब पवार हे होम मेंबर होते. त्यांच्यासमवेत मी महाराजांची गाठ घेतली. महाराजांनी मुंबई सरकारशीं झालेल्या आपल्या पत्रव्यवहाराची हकीकत मला सांगितली व मला विचारलें, "तुम्ही त्या जागेवर येता का? तुमच्या कामाबद्दल मीं पुष्कळ ऐकल आहे व खासेसाहेब तुमच्याविषयी नेहमी बोलत असतात. येता का? बोला. डॉ० मॅनला जो पगार मीं देऊ करत होतो तोच तुम्हाला देतों." मी म्हणालों, "महाराज, मुंबई सरकारने माझ्या अमेरिकेतील शिक्षणावर बराच खर्च केला आहे, व ते मला सोडणार नाहीत." महाराज म्हणाले, "बघू या तर खरें! मी मागणी करणार." त्याप्रमाणे महाराजांनी माझ्याबद्दल मागणी केली. डॉ० मॅनच त्या वेळीं

डायरेक्टर होते. त्यानी मुंबई सरकारास कळविले की, "रावबहादूर पाटील यांच्या अमेरिकेतील शिक्षणावर व प्रवासावर मुंबई सरकारने बराच खर्च केलेला आहे. शिवाय आम्हाला त्याची गरज फार आहे. या परिस्थितींत रावबहादूर पाटील यास आम्हाला सोडता येत नाही."

काही दिवसानी शिंदेमहाराजाची परत एकदा भेट झाली त्या वेळीं त्यानी मला विचारलें, "अमेरिकेतील तुमच्या शिक्षणावर मुंबई सरकारने कितीसा खर्च केला आहे?" मी म्हणालों, "आज मला नक्की आकडा सांगता येत नाही. तथापि सोळा ते वीस हजारापर्यंत खर्च झाला असावा." महाराज म्हणाले, "तो मीं दिला तर तुमचें सरकार तुम्हाला सोडील का?" मी म्हणालों, "डॉ० मॅन हट्टी आहेत. ते मला सोडणार नाहीत." महाराज म्हणाले, "मग एक तर तुम्ही तिकडचा राजीनामा देऊन ग्वाल्हेरीस आलं पाहिजे, किंवा मीं तरी तुम्ही सेवानिवृत्त होईपर्यंत वाट पाहिली पाहिजे." मी म्हणालों, "एकंदर परिस्थिति पाहता, आपण आत्ताच मला घेण्याचा आग्रह न धरणें बरें. मी आपला फार आभारी आहें. जर कधी काही माझं काम पडलं तर मला कळवा. मी तेवढ्यापुरती रजा घेऊन येत जाईन." महाराजानी शेवटीं सांगितलं की, "पेन्शन घेतल्यावर तुम्ही आमच्याकडे यायला पाहिजे, लक्षात ठेवा."

मी अमेरिकेहून परत येईपर्यंत पुण्याचे शेतकी कॉलेजात व त्याचप्रमाणे हिंदुस्थानातील कोणत्याहि शेतकी कॉलेजात शेतकीविषयक अर्थशास्त्र हा विषय स्वतंत्र रीतीने शिकविला जात नसे. म्हणून त्या वेळचे शेतकी कॉलेजचे प्रिन्सिपॉल डॉक्टर मॅन याच्याकडे मीं सविस्तर कारणे देऊन सूचना पाठविली की, मुंबई विश्वविद्यालयाने या विषयाची स्वतंत्र शाखा काढून तिच्यावर स्वतंत्र प्रोफेसर नेमावा व शेतकीसारख्या अतिमहत्त्वाच्या धंद्याचे शास्त्रीय दृष्ट्या संशोधन करावें आणि पुण्याच्या शेतकी कॉलेजात हा विषय शिकविण्याची व्यवस्था करावी. ही माझी सूचना डॉ० मॅनना फार आवडली व त्यानी ती सूचना आपल्या अभिप्रायासह मुंबई युनिव्हर्सिटीकडे पाठविली. युनिव्हर्सिटीच्या सिंडिकेटने या सूचनेचा विचार करून डॉ० मॅन यास कळविलं की, आज युनिव्हर्सिटीजवळ स्वतंत्र अर्थशास्त्र या विषयाची शाखा काढण्या इतकी सामग्री नाही व त्या विषयाचा अभ्यास केलेलें तज्ज्ञ माणसहि नाहीत. तथापि पुणें शेतकी कॉलेज जर हा विषय शिकविण्याची तरतूद करील तर युनिव्हर्सिटी हा विषय बी० एस०सी० ॲग्रिकल्चर या परीक्षेत ठेवील. डॉ० मॅननी हें सर्व प्रकरण माझ्या सूचनेसह मुंबई सरकारकडे पाठवून शेतकी कॉलेजात अर्थशास्त्राच्या प्रोफेसरची जागा निर्माण करावी अशी मागणी केली. ती सरकारने मान्य केली व डॉ० मॅनना कळविलं की, तुम्ही त्या जागेकरता योग्य माणूस मिळविण्याची तजवीज करा. डॉ० मॅननी लागलीच मुंबई सरकारास लिहून कळविलें की, शेतकीखात्यांत एक योग्य अधिकारी आहे. मला इंग्लंडहून किंवा अमेरिकेहून येणारा अर्थशास्त्राचा प्रोफेसर

नको. ज्याला हिंदुस्थानच्या शेतीचा पूर्ण परिचय आहे असाच माणूस येथील शेतकी विषयक अर्थशास्त्र शिकवू शकेल. आमच्याकडे रा० ब० पी० सी० पाटील नावाचे डेप्युटी डायरेक्टर आहेत. हे गृहस्थ जन्माचे शेतकरी असून त्यांनी शेतकी खात्यात पधरासोळा वर्षे उत्तम रीतीने काम केलें आहे. शिवाय ते अमेरिकेहून या विषयाचा अभ्यास करून नुकतेच परत आले आहेत. त्यांना जर सरकार या जागेकरिता नेमील तरच आपण हा विषय शेतकी कॉलेजांत शिकविण्यास अनुमति देऊ." यानंतर सरकारशीं बराच पत्रव्यवहार होऊन डॉ॰ मॅनची मागणी पास झाली व तारीख ४ माहे जून १९२५ रोजीं माझी शेतकीविषयक अर्थशास्त्राचा प्रोफेसर म्हणून शेतकी कॉलेजांत नेमणूक झाली. त्या वेळी डॉ॰ बर्न्स हे वनस्पतिशास्त्राचे प्रोफेसर व अॅग्रिकल्चरल कॉलेजचे प्रिन्सिपाल होते आणि डॉ॰ मॅन डायरेक्टर ऑफ अॅग्रिकल्चर होते. पण डॉ. बर्न्स मुंबई प्रांतात व पुढे दिल्लीस दुसऱ्या कामावर असत व मी अॅक्टिंग प्रिन्सिपाल असे. मी कॉलेजमधे प्रोफेसर नेमला गेल्यापासून शेतकी कॉलेजच्या दुसऱ्या व तिसऱ्या वर्षांच्या परीक्षेंत शेतकीविषयक अर्थशास्त्र हा स्वतंत्र विषय ठेवला गेला. थोड्याच दिवसानी पुण्याच्या शेतकी कॉलेजचें अनुकरण करून हिंदुस्थानातील इतर शेतकी कॉलेजांनीहि हा विषय शिकविण्याची तरतूद केली. माझी प्रोफेसर म्हणून नेमणूक झाल्यावर कॉलेजात शिकविण्याच्या कामाशिवाय शेतकीविषयक अर्थशास्त्राच्या संशोधनाचें काम मीं सुरू केलें व त्यासाठी माझ्या हाताखाली सरकारनें तीन-चार शेतकी पदवीधर मदतनीस म्हणून दिले. त्यात डॉ॰ टी॰ पी॰ शिरनामे, डॉ॰ के॰ एम॰ शहा व श्री॰ टी॰ बी॰ पवार हे होते.

सन १९२५ पासून ते १९३२ मध्ये सेवानिवृत्त होइपर्यंत मीं प्रोफेसरचें व प्रिन्सिपालचें काम केलें. कॉलेजमध्ये असताना मीं जें संशोधन केलें व त्यावर जीं पुस्तकें लिहिलीं त्यांची यादी या आत्मकथेच्या शेवटीं दिली आहे. मी प्रोफेसर असताना मुंबई युनिव्हर्सिटीचा फेलो होतों व काही वर्षे सिंडिकेटमधेहि होतो.

मी शेतकी कॉलेजात प्रिन्सिपाल असताना सन १९२६ साली कॉलेज फार्मच्या आवारात अखिल हिंदुस्थान शेतकी प्रदर्शन भरविलें गेलें. या प्रदर्शनात प्रांतिक सरकारें व हिंदी संस्थानें यानी भाग घेऊन आपापले स्टॉल बांधले होते व त्यात आपापल्या भागात होणारीं पिकें व त्या भागात असणाऱ्या उद्योगधंद्यांची मांडणी केली होती. त्याचप्रमाणे देशातील व परदेशातीलहि कारखानदारांनी आपले स्टॉल ठेविले होते. जरी या प्रदर्शनाची मुख्य जबाबदारी एका स्वतंत्र अधिकाऱ्याकडे होती तरी प्रदर्शन कॉलेजच्या आवारात असल्याने प्रिन्सिपाल या नात्याने माझ्यावरहि त्याची जबाबदारी होती. आमच्या खात्यातील निरनिराळ्या शाखांच्या मुख्यांनी स्टॉल ठेवले होते. मी व माझे असिस्टंट यांनी आम्हीं केलेल्या संशोधनाचा स्टॉल ठेविला होता. रेव्हेन्यू खात्यामार्फत प्रांतातील खेडोपाडीं प्रदर्शनाच्या जाहिराती वाटल्या होत्या. प्रदर्शन पाहण्यास येणाऱ्या लोकांना रेल्वे खात्याने गाडीभाड्यात भरपूर सवलती

दिल्या होत्या. प्रदर्शन पाहण्यास येणाऱ्या लोकांना तात्पुरते राहण्यासाठी तट्ट्याचे माडव व खोल्या केल्या होत्या. तट्ट्याचे शेकडो सडास व आंघोळीच्या खोल्याहि तयार केल्या होत्या. पिण्याच्या व आंघोळीच्या पाण्याच्या सोईसाठी पाण्याचे नळ टाकून जागोजागी त्यास तोट्या बसविल्या होत्या. साडपाणी बाहेर नेण्याची सोय केली होती. कमी किंमतींत चहापाण्याची व जेवणाची सोय केली होती. औषधपाण्याचीहि तरतूद केली होती. रोज संध्याकाळी निरनिराळ्या उपयुक्त विषयावर मॅजिक लॅंटर्नच्या साहाय्याने व्याख्यानें होत. हजारो माणसाना तिकिटे देऊन प्रदर्शनाच्या आवारात सोडणे व बाहेर घेणे ही मोठी जबाबदारी होती; तरीपण शेतकी कॉलेजातील व शेतकी खात्यातील इतर अधिकाऱ्यांनी एकमेकाच्या सहकार्याने ती चांगली पार पडली. चोऱ्यामाऱ्या झाल्या नाहीत व लोकांची गैरसोय झाली नाही. लोकाना उपयुक्त औताची, यंत्राची, इंजिनाची व पंपाची प्रत्यक्ष माहिती झाली. निरनिराळ्या पिकांच्या जाती, निरनिराळीं खतें व त्यांचा प्रत्यक्ष पिकावर होणारा परिणाम पाहावयास मिळाला. इंजिनाने चालणारे ऊस गाळण्याच्या चरकाचे काम व कमी सर्पण लागणाऱ्या चुलाणाचे फायदे प्रत्यक्ष पाहावयास मिळाले. एकंदरीत प्रदर्शन फार उपयुक्त व यशस्वी ठरले.

या सुमारास लॉर्ड लिनलिथगो याच्या नेतृत्वाखाली रॉयल कमिशन ऑन ॲग्रिकल्चर देशातील शेतकी व सहकार या महत्त्वाच्या बाबीवर हिंदुस्थान सरकारला सल्ला देण्यासाठी नेमले होतें. मुंबई इलाख्यातील ठळक ठळक संस्थांच्या वतीने साक्षी झाल्या, त्याचप्रमाणे बऱ्याच सामाजिक कार्यकर्त्यांच्याहि साक्षी झाल्या. त्यात शेतकीविषयक अर्थशास्त्राचा प्रोफेसर व शेतकी कॉलेजचा प्रिन्सिपाल म्हणून माझीहि साक्ष झाली. त्यातील सांगण्यासारखी गोष्ट अशी की माझीं विधानें कमिशनला पटलीं, पण त्यातील एका सभासदाला (सर गंगाराम याना) मी नॅशनॅलिस्ट (स्वराज्यवादी) असेन असे वाटले आणि त्यानीं मुंबई सरकारच्या चीफ सेक्रेटरींना माझ्याविषयी एक पत्र लिहिलें. त्यात त्यानी पी० सी० पाटीलसारखा नॅशनॅलिस्ट ज्या महत्त्वाच्या संस्थेत पुष्कळ तरुण शिकत आहेत अशा शेतकी कॉलेजचा मुख्य नेमणे हें कितपत बरें आहे याचा सरकारने विचार करावा, असे सुचविले होतें. हे पत्र चीफ सेक्रेटरीने त्या वेळचे शेतकी खात्याचे डायरेक्टर डॉ० मॅन याच्याकडे पाठविलें. मॅनसाहेबानी त्याची प्रत माझ्याकडे पाठविली. या पत्रावर मीं दोन-चार दिवस विचार केला. एके दिवशी डॉ० मॅन इकडे काही दुसऱ्या कामाकरिता माझ्या आफिसात आल्यावेळीं त्याना जी माहिती पाहिजे होती ती मीं दिली, व ते जाण्यास परत निघाले तेव्हा मीं माझ्या टेबलावर असलेलें सर गंगारामचें पत्र हातात घेऊन विचारलें की, "या सर गंगारामच्या पत्राचें काय करायचें?" डॉ० मॅन म्हणाले, "द्या ते इकडे." मीं पत्र देतांच त्यानी ते फाडून जवळच्या केराच्या टोपलींत टाकलें व म्हणाले, "त्याचें असें करायाचं. हे पत्र मला आले आहे. मीं तें तुमच्याकडे पाठवावयास पाहिजेच होतें

असे नाही. पण तुमच्याबद्दलचा सरकारचा ग्रह कसा आहे हें तुम्हास कळावें याच हेतूने मीं ते तुमच्याकडे पाठविले इतकेच. मला जर सदर पत्राबद्दल विचारणा झाली तर मी त्यास योग्य उत्तर पाठवीन. तुम्हीं काळजी करण्याचें कारण नाही."

सन १९१५ सालीं माझी रत्नागिरीहून पुण्यास आय्० ए० एस्० मध्ये डेप्युटी डायरेक्टर म्हणून बदली झाली. त्या वेळीं मला सात-आठ जिल्ह्यात फार फिरती करावी लागे. त्या वेळी प्रपंचाची व्यवस्था, लहान मुलाची जोपासना व शाळेत जाणाऱ्या मुलाची व्यवस्था पत्नीलाच करावी लागे. हीं सर्व कामें तिने दक्षतेने पार पाडलीं व मुलाचे लाड पुरविले. चिरंजीव शंकरराव लष्करी शिक्षणासाठी विलायतेस निघाले तेव्हा त्याच्या ती आड आली नाही. पुढे धाकटे चिरंजीवहि सैन्यात जातों म्हणाले, त्यानाहि तिने अनुमति दिली. वेळोवेळी हे दोघे लढाईवर जाण्यापूर्वी आम्हास भेटण्यास येत, त्यावेळी तिने त्याना आशीर्वाद दिले.

उच्च शिक्षणाच्या अभावीं व काही अशीं मराठ्यांतील पडद्यासारख्या रूढीमुळे तिला जरी स्वतःच्या जबाबदारीवर सार्वजनिक कामात पडता आलें नाही, तरी मी जीं असलीं कामें हातीं घेई त्यात मला तिचा पाठिंबा मिळे. पुण्यास असताना तेथील निरनिराळ्या संस्थांचे कार्यकर्ते मजकडे वेळोवेळी येत. असल्या संस्थाना मी थोडेंफार द्रव्यसाहाय्य करी; पण त्याच्या चहापाण्याचें काम पत्नीकडेच असे. जर कोणी कार्यकर्त्या महिला आल्या तर त्याचा परामर्श ती घेई. महर्षि अण्णासाहेब कर्वे याची पत्नी बाया, यांची आमच्याकडे ये-जा असे. त्या आल्या म्हणजे थेट पत्नीकडे स्वयपाकघरात जात. दिवाळीच्या भाऊबीजेचा त्याचा आमच्यावर हक्क असे. पेन्शन घेऊन आम्ही कोल्हापुरास गेल्यावरसुद्धा बाया आमच्याकडे येत.

पुण्यास असताना जर कोणी बाहेरून मराठा घराण्यातील स्त्रिया आल्या, व त्या वेळीं सभा भरविणें झालें, तर पत्नीला तेथे जावें लागे. कोल्हापुरास गेल्यावर तिच्या इच्छेनुसार मीं एक मराठा मुलींसाठी वसतिगृह काढण्याचे ठरविले व रावसाहेब डी० आर० भोसले याच्या साहाय्याने तशी संस्था काढली. ह्या संस्थेस वेळोवेळी मिळून मीं पत्नीच्या वतीने एक हजार रुपयाची मदत केली. ही संस्था तीनचार वर्षे कशी तरी चालली. पण मराठ्यात पुढाकार घेऊन, शिक्षणसंस्था चालविणाऱ्या सुशिक्षित बाया पुढे न आल्यामुळे आम्हास ही संस्था रावसाहेब व्ही० टी० पाटील —ताराराणी विद्यार्थी-मंदिराचे चालक—याच्या हवाली करावी लागली. महिला वसतिगृहासाठी आम्हीं सरकारातून मिळविलेली जागा व जमा केलेले सुमारें सात हजार रुपये संस्थेबरोबर रावसाहेब व्ही० टी० पाटील याच्या हवालीं केले.

पत्नीच्या माहेरगावीं, मौजे शिंपे येथे, शाळेची इमारत नव्हती. ती बांधण्याच्या कामीं स्थानिक मदत म्हणून रक्कम जमा केली. त्यात मिसेस पाटील यानी ५०० रुपये देण्यासाठी सरकारात आगाऊ भरले होते. आता मौजे शिंपे येथे शाळाखात्याने चांगली इमारत बांधली आहे.

मी पेन्शन घेऊन कोल्हापुरास गेलें त्या वेळीं ग्वाल्हेरीस कै० महादजीमहाराज शिंदे यांचे चिरंजीव जयाजीराव गादीवर होते. त्यांच्या लहानपणीं मी वरचेवर महादजीमहाराजांकडे जात असल्याचें त्यांनी पाहिले होतें. गादीवर आल्यावर त्यांनी आपल्या वडिलांच्या पत्रव्यवहारात मला ग्वाल्हेरीस डायरेक्टर ऑफ अॅग्रिकल्चरच्या जागीं येण्याबद्दल आग्रह केल्याचें वाचलें होत. जयाजीरावमहाराजांनी मला बोलावून घेऊन सांगितलें, "माझ्या वडिलांची आपण ग्वाल्हेरीस नोकरीत यावें अशी फार इच्छा होती; पण तो योग जुळून आला नाही. आता आपण सेवानिवृत्त झाला आहात, तेव्हा आमच्याकडे यावें अशी माझी इच्छा आहे." मी म्हणालें, "आपल्या वडिलांनी मला फार चांगलें वागविलें हें मी कसा विसरेन? आपणहि आग्रहानें बोलावता त्याबद्दल मी फार आभारी आहे." माझ्या मनातून पुढे कोठेहि नोकरी करावयाची नव्हती म्हणून मीं टाळाटाळ केली आणि सांगितलें, "मनुष्याची काम करण्याची शक्ति कमी झाली म्हणजेच त्याला पेन्शन देतात. येथून पुढे माझ्या हातून कमचें काम होणार? आता आपण जर काही विवक्षित कामासाठीं बोलावलेंत तर मी आपल्या सेवेस हजर राहीन." पुढे काही दिवसांनी ती वेळ आली. महाराजांनी आपल्या राज्यातील शेतकी व सहकार आणि विकास यांची पाहणी करण्याकरिता एक कमिटी नेमली. त्या कमिटींत मिस्टर ब्रेन, आय्० सी० एस्०, पंजाबातील पेन्शनर कमिशनर, मिस्टर हिगिनबॉटम् एम्० एस्० (अमेरिका), प्रिन्सिपॉल, अॅग्रिकल्चरल कॉलेज, अलाहाबाद, प्रोफेसर व्ही० जी० काळे, एम्० ए०, अर्थशास्त्राचे प्रोफेसर, फर्ग्युसन कॉलेज, पुणें व मी असे चौघेजण होतों. या कमिटीचे सेक्रेटरी ग्वाल्हेर येथील कॉलेजचे प्रिन्सिपॉल बुल्ल होते. संस्थानभर महिना दीड महिना फिरून आम्हीं आमच्या सूचनांसह अहवाल महाराजांना सादर केला.

त्याचप्रमाणे मी सेवानिवृत्त झाल्याचें ऐकून देवास धाकट्या पातीचे महाराज श्री खासेसाहेब पवार यांनी मीं त्यांच्याकडे दिवाण म्हणून जावें अशी इच्छा प्रदर्शित केली. त्यांच्या पत्रातील सारांश असा: "माझें संस्थान लहान आहे. मला तुमच्या पूर्वीच्या पगाराइतका पगार देणें परवडणार नाही. तथापि तुमचा येथील खर्च भागविण्याइतका पगार, राहण्यास बंगला, एक मोटार व नोकरचाकर मला देता येतील तुम्हांला मनाप्रमाणे काम करण्यास भरपूर अवसर मिळेल. तुम्ही आल्यास मला फार आनंद होईल आणि माझा व तुमचा काळ सुखासमाधानात जाईल." मी त्यांना उत्तर दिलें त्याचा सारांश असा. "मी आपणाकडे वेळोवेळीं येऊन थोडे दिवस राहू शकेन, पण मीं आता नोकरी करावी असें माझें मन मला सांगत नाही. आजवर आपण बरोबरीच्या नात्यानें वागला, आता नोकर होऊन मी आपल्याकडे आलों तर आपणास पूर्वीप्रमाणे माझ्याशीं वागता येणार नाही. आपणास माझ्यासारखे कॉमनर (मध्यम वर्गातील) पुष्कळ स्नेही मिळतील, पण मला आपणासारखा राजा स्नेही मिळणार नाही. एक राजा (शाहू राजा) मिळाला होता. तो मराठा समाजाच्या

व माझ्या कमनशिबाने लौकरच हरपला. आपला स्नेह सन १९१२ पासून आजवर आहे; तसाच प्रेम ठेवा. पण मला आपल्या संस्थानात दिवाण म्हणून नेण्याचा आग्रह करूं नका." ह्या माझ्या म्हणण्यानें साहेबमहाराजांचें समाधान झालें नाही. त्यांनीं आपल्या राणीसाहेब श्रीमत सौ० जिजीसाहेब यांस, ज्या एका सत्पुरुषावर त्यांचा विश्वास होता त्यांस बरोबर देऊन माझ्याकडे पाठविलें. राणीसाहेबांचा परिचय साहेबमहाराजांच्या बरोबर विलायतेंतच सन १९१२ पासून झाला होता. या प्रेमळ सुचित्र राणीसाहेब व महाराजांच्या वृद्ध मातोश्री यांच्याबद्दल मला आदर असे व तो आजहि आहे. त्यांनाहि मी साहेबमहाराजांस जसें लिहिलें तसेंच नम्रतापूर्वक निवेदन केलें व म्हणालों, "माफ करा. मला आता नोकरी करावयाची नाहीं. मी आता हरि हरि म्हणत माझ्या शेतवाडीवर राहणार. मी पुण्यात असताना जसे येत होता तसेच आपण कधी कधी माझ्याकडे येत राहाल अशी उमेद आहे. मी पुण्यास असताना आपलेपणाने आमच्या घरीं येऊन आठचार दिवस राहत होता व आमची मीठभाकरी गोड करून घेत होता तसेंच प्रेम पुढे चालू ठेवा व कधीकधी येत जा. मीहि पूर्वीप्रमाणे देवासला येऊन आपला पाहुणचार घेत जाईन."

'शाहूमहाराजांच्या आठवणी' या प्रकरणात मी कोल्हापूरच्या रीजन्सी कौन्सिलात का व कसा गेलों याची साग्रत हकीकत दिली आहे. कौन्सिलात मी चार वर्षे शिक्षणमंत्री होतों. कौन्सिलमध्ये असताना माझ्याकडे शिक्षण, शेतकी, सहकारी संस्था, जंगल, व्हेटरनरी व म्युनिसिपालिट्या वगैरे खाती होतीं; हीं कामें पाहत असता मी "रीजनल सर्व्हे ऑफ इकॉनॉमिक रिसोर्सिस इंडिया, कोल्हापूर" म्हणजे दक्षिण महाराष्ट्रांतील आर्थिक उत्पादनाच्या साधनांची पाहणी या उपयुक्त विषयावर ग्रंथ लिहिण्याचें काम कौन्सिलच्या अनुमतीनें घेतलें होतें. तें माझ्या मंत्रीपणाचे मुदतींत पुरें झालें नव्हतें. हें काम मीं पुरें करावें अशी कौन्सिलची इच्छा होती व कौन्सिलने मला एक ॲसिस्टंट व एक टायपिस्ट दिला होता. कोल्हापूर संस्थानचा या कामीं बराच खर्चहि झाला होता. पण सन १९४७ सालीं कोल्हापूर संस्थान भारतात विलीन झालें, तेव्हा मुंबई प्रांताचे डायरेक्टर ऑफ ॲग्रिकल्चर, डॉक्टर उप्पल (जे मी प्रिन्सिपल असताना त्याच कॉलेजात प्रोफेसर होते) त्यांनी हें पुस्तक माझ्या पूर्वीच्या इतर पुस्तकाप्रमाणे, सरकारी पुस्तक म्हणून प्रसिद्ध केलें. या माझ्या मंत्रीपदाच्या नेमणुकीनें, शाहूमहाराजांनी सन १९०६ सालीं प्रदर्शित केलेले भाकीत पूर्ण झालें, हें पाहून माझ्या मनाला समाधान वाटलें.

कोल्हापुरास आम्ही ताराबाई पार्कमध्ये बांधलेल्या नव्या बंगल्यात राहत होतों. बंगल्यापुढे लहानशी पुष्पझाडांची बाग व बंगल्याच्या मागे फळझाडांची व भाजी-पाल्याची बाग होती. पत्नी बागेतील भाजीपाला व देवासाठी फुलें काढी व देवपूजा स्वतः करी. शाळेच्या सुटीच्या दिवशीं आम्ही आमच्या इंदूसह वडगावास जात असू. तेथे आमचा लहानसा बंगला होताच. अशा रीतीनें आमचें जीवन ठीक चाललें होतें.

पण ही शांतता वादळापूर्वीची असावी, असा ईश्वरी संकेत होता; कारण सप्टेंबर १९४० त एकाएकी आमची धाकटी मुलगी इंदुमती ॲपेंडिसायटिसच्या आजार होऊन अवघ्या आठ दिवसांत वारली. आजारात मुलीचे फार हाल झाले. मुलीचे ऑपरेशनच्या वेळीं व नंतर झालेले हाल व त्यानंतर तिचा झालेला अंत पत्नीच्या मनास फार लागला व तिचा सर्व उत्साह मावळला.

इंदु वारल्यावर थोड्याच दिवसांत कोल्हापुरास रीजन्सी कौन्सिल नेमलें गेलें व हिंदुस्थान सरकारने मला त्यांत एक मंत्री होण्याबद्दलची विनंती केली. माझ्या दु:खी मन:स्थितींत विरंगुळा पडण्यास हें शहरांतीलच काम बरें पडेल, हें जाणून मीं तें पत्करलें. माझ्याकडे असलेलीं खातीं माझ्या आवडीचीं असल्याने मी त्या कामांत गढून गेलों आणि इंदूच्या विरहाचा मला हळूहळू विसर पडू लागला.

पण माझ्या पत्नीचे तसें नव्हतें. इंदु हें सर्वांत धाकटें मूल, शेंडेफळ. शस्त्रक्रियेंत कापाकापीमुळे झालेले तिचे हाल व यातना पत्नीच्या मातृहृदयास असह्य झाल्या. मुलीच्या अंगांतून पपाने ओढून काढलेलें रक्त, पायावरील व हातावरील लशचे लाव माप यांचे दृश्य, स्वतः मरेपर्यंत, तिच्या मनःश्चक्षूपुढे उभें राही. इंदूच्या मरणापूर्वी घरीं पत्नीस सोबत काय ती इंदूची. भाऊसाहेब उत्तर हिंदुस्थानांत, बाबासाहेब माळव्यांत व नानासाहेब अहमदनगरास, मुलगी आनंदीबाई जावयाबरोबर सोलापूर जिल्ह्यांत माळव्यास, अशीं चोहोंकडे चार मुलें असल्याने, पत्नीला मी व इंदूखेरीज घरीं सोबत नव्हती. यामुळे इंदूचें अनपेक्षित हृदयद्रावक मरण व तिचा विरह तिच्या आईला फार जाचला. त्यावेळ जुन्या वहिवाटीप्रमाणे एक वर्षाच्या आंत जर दुसऱ्या मुलाचें लग्न झालें नाहीं तर पुढे दोन वर्षे लग्न करता येत नाहीं, हें जाणून आम्हीं चिरंजीव बाबासाहेबाचें लग्न लवकर करावयाचें ठरविलें. पत्नीने मन कठीण करून स्वतः उभें राहून हें लग्न फेब्रुवारी सन १९४१ त उरकून घेतलें. पुढे दोन वर्षांनीं धाकटे चिरंजीव नानासाहेब याचेंहि लग्न झालें. नानासाहेब कोल्हापुरासच राजाराम रायफल्समध्ये कॅप्टन होते आणि ते स्वतंत्र बिऱ्हाड करून आमच्या जुन्या बंगल्यांत राहत होते.

पत्नीला दम्याच्या आजारापासून त्रास होतच असे. तथापि नेहमीप्रमाणे सकाळीं स्नान करून ती देवपूजा करी व काहीं तरी टिपणें टिपणें करीत बसे. आम्हा दोघांचें जेवण झाल्यावर मी नवीन धरलेल्या कामावर जाईं. सन १९४४ सालीं मी मंत्रीपद सोडलें. तथापि त्या वेळीं अगोदर घेतलेलें लिखाणाचें काम घरीं करीं.

दरसाल चारसहा आठवडे आम्ही भाऊसाहेबाच्याकडे दिल्लीस व बाबासाहेबांकडे ग्वाल्हेर-भेलसा वगैरे भागांत, माळव्यांत जात असू. तेथून केव्हा केव्हा हरिद्वार, अयोध्या, प्रयाग अगर काशीयात्रेस जात असू, हेतु हा कीं या ना त्या निमित्ताने इंदूचा विरह कमी व्हावा. सवड व रजा मिळाल्यास, आलटूनपालटून भाऊसाहेब व बाबासाहेबहि मुलेंबाळें घेऊन आमच्याकडे कोल्हापुरास येत.

सन १९४७ पासून आइच्या वाधक्यात आम्हा तिला कोल्हापुरास नेल होत. सन १९४८ ४९ मधील अकरा महिने आम्हास फार वाइट गले. त्या वेळीं घरीं दोन आजारा माणस आई व पत्नी. पत्नीचा दम्याचा विकार वाढला होता, तरी ती सकाळीं उठून स्नान करून देवपूजा करी व चहा घेऊन हळूहळू चालत बगल्यामागच्या बागतील एका ठराविक आम्याच्या झाडाखाली शून्य दृष्टीने आभाळाकडे पाहत राही. तिच्या अशा स्थितीत मी काही वेळ सोबत करण्याचा प्रयत्न करीं पण त्याचा फारसा उपयोग होत नसे. सन १९४८ सालीं बाबासाहेबांची पत्नी व मुल (पाच वर्षांचा उदय व साडेतीन चार वर्षांचा प्रताप) आमच्याकडे काही दिवस राहण्यास आलीं होतीं. त्या वेळीं हीं मुलं रोज बागत झाडाखाली बसलेल्या आपल्या आजीकडे जात. मुल कोल्हापुरात असताना तिच मन रजत असे. त्याच्या खेळात तिच मन गुत. मुलात लहानसान भाडण व्हावयाचीं, त्या वेळीं छोटा प्रताप आजीकडे तक्रार करून सागे, "आजी, मला सापडलेला पेरू उदय पळवतो व मला मारतो." प्रताप आजीचा लाडका नातू. या लहान नातवडाचे तटे मिटविण्यात व त्याना खाऊ देऊन त्याची समजूत घालण्यात पत्नीच्या मनाला काही वेळ दुःखाचा विसर पडे व तिच्या मनाला विरगुळा मिळे.

बाबासाहेबांचीं बायको-मुल परत ग्वाल्हेरीस गेल झाल ! 'ये रे माझ्या मागल्या' म्हणतात त्याप्रमाणे पत्नी नेहमीप्रमाणे सकाळीं देवपूजा करून बागतील ठराविक झाडाखाली, एकलकोडेपणें आभाळाकडे शून्य दृष्टीने पाहत बसू लागली. एकदा अशी बसली असताना एके दिवशीं ग्वाल्हेरहून प्रताप पोलिओने आजारी असल्याची तार आली. मी त्याच दिवशीं निघून दुसऱ्या दिवशीं ग्वाल्हेरीस पोचलों पण मी तेथे पोचण्याचे आधले रात्रींच प्रतापच प्राणोत्क्रमण झाल होत मी ग्वाल्हेरीस पोचलो व प्रताप वारल्याची तार कोल्हापुरास पत्नीस मिळाली

ग्वाल्हेरीस मुलग्यास व सुनेस चार सात्वनाचे शब्द सागून मी लागलीच परत निघालों आणि कोल्हापुरास घरीं आलों. पत्नीने काय विचारावें व मीं काय सागावें? मुलीच्या मरणाने हाय खालेल्या तिच्या मनास आपल्या लाडक्या कोवळ्या नातवाच आकस्मिक निधन सहन झाल नाही ती फार अशक्त झाली. तिने आपली निरवानिरव केली व कायमच अथरुण धरल.

पत्नीच्या शेवटच्या दुखण्यात तिला तिच्या विधवा चुलतसुनाचा—गगूबाइ हैबतराव व आवूबाइ श्रीपतराव—याचा फार फार उपयोग झाला त्यानी तिची मनोभाव शुश्रूषा केली. हें मला फार जाणवण्याच कारण, घरीं त्या वेळीं आमचीं मुलें, सुना व मुलगीहि नव्हती. ज्येष्ठ चिरंजीव शंकरराव व त्याची बायको दिल्लीस, दुसरे बाबासाहेब व त्याची बायको ग्वाल्हेरीस व धाकटे चिरंजीव नानासाहेब कांम्पिप्यात होते. नानासाहेबांची बायको व मुलें स्वतत्र बिऱ्हाड करून आमच्या दुज्या बगल्यात माडीवर राहत व आमची मुलगी आनदीबाइहि त्याच बगल्यात तळमजल्यावर

स्वतंत्र बिऱ्हाड करून राहत होती. त्यांचीं मुलेबाळें व संसार त्यांना पाहावा लागे. गंगूबाई व आकूबाई यांनी, माझ्या आईच्या शेवटच्या आजारातल्याप्रमाणेच, पत्नीच्या शुश्रूषेचाहि सर्व भार अंगावर घेतला होता. जर त्या प्रेमळ चुलतभावजयांनी ही जबाबदारी उचलली नसती तर मी काय करणार होतो? पत्नीचे हाल झाले असते व मला मरणप्राय दुःख झालें असतें.

माझ्या आईप्रमाणे पत्नीचें मन घट्ट नव्हते. आईस जगले तरी वाहवा, न जगलें तरी वाहवा. मरणाची तिला भीति वाटत नव्हतीच; पण पत्नीला आपण जगावें, मुला नातवडांचे ऐश्वर्य पाहावें, असें वाटे. त्यामुळे ती कष्टी असे. या वेळीं नानासाहेब काश्मीर आघाडीवर होते. त्यांना तार केली. ते लगलीच आले. तात्पुरतें पत्नीला बरें वाटलें. पण आपले दिवस भरले आहेत हें जाणून कोणास काही, कोणास काही, असें स्वहस्तें तिने दिलें व निरवानिरव करून तारीख ४ फेब्रुवारी सन १९४९ रोजीं इहलोक सोडला. तिच्या निधनाच्या वेळीं चिरंजीव नानासाहेब व त्यांची पत्नी व त्यांच्या मुली व आमची मुलगी आनंदीबाई जवळ होतीं.

पत्नीचा अंत्यविधि कोल्हापुरासच झाला. आमचीं दुसरीं मुलें तिसऱ्या दिवशीं आलीं. तिचा अंत्यविधि कोल्हापुरास (दक्षिण काशीत) पंचगंगा नदीवर झाला. तिसरे दिवशीं माती सावडली. मातीला तिचे तिघेहि चिरंजीव, शंकरराव, दिनकरराव व नानासाहेब, हजर होते. और्ध्वदेहिक झाले. रक्षा पंचगंगा, आमच्या गावाजवळची वारणा व नरसोबाचे वाडीजवळ कृष्णेंत टाकली. पुढे काही दिवसांनी थोडी ठेवलेली रक्षा हरद्वारास गंगेत विसर्जन केली. दिवस घातल्यावर, मुलें परत परप्रांतीं आपापल्या कामावर गेली. बंगल्यात मी आता एकटाच होतो. अर्थात नोकरचाकर होते, ती गोष्ट निराळी.

पत्नीचा सहवास मला दीर्घकाळ लाभला. अगदी आमच्या लहानपणापासून माझ्यासाठी व आमच्या संसारासाठी तिला भारी कष्ट पडले. माझ्या इच्छेविरुद्ध ती कधीहि वागली नाही. माझी आई व पत्नी एकाच वर्षी थोड्या अंतराने वारल्या. आईचें वय सत्याण्णव व पत्नीचें वय सत्तर वर्षांचें होतें. मी त्या वेळीं बहात्तर वर्षांचा होतो. ज्या दोघींच्या आधारावर मला, आमच्या सांसारिक जीवनात, काही पाहावें लागलें नाही, त्या दोघीहि माझ्या वृद्धापकाळीं मला व जगाला सोडून देवाघरीं गेल्या. म्हातारपणीं मी पोरका झालों. माझ्या आयुष्यातील अतीव प्रेमाचे झरे आटले. खराखुरा गृहस्थाश्रम व त्यातील सौख्य मावळलें.

आता दुसऱ्यावर—मग ते घरचे असोत वा नोकर असोत—अवलंबून राहणें बरें वाटेना. आता आपली राहणी कशी ठेवावी, याचा मी विचार करू लागलो. माझ्या आईवडिलांना दुसऱ्यावर अवलंबून राहणें बिलकूल आवडत नसे. माझ्या मनाची घडी तशीच होती. ती लगलीच कशी बदलेल? (आज सन १९६४त तिला नरीच मुरड पडली आहे.) म्हणून पूर्वीप्रमाणे स्वतंत्र राहण्याचें ठरविलें. गडीमाणसें,

म्हैस, मोटारड्रायव्हर तसेच राहिले. ही व्यवस्था सन १९४९ ते १९६० पर्यंत चालविली. घरीं नोकरचाकर, स्वयंपाकी, मोटारड्रायव्हर होते. दुधासाठी म्हशी होत्या. ही सर्व सुखसोयींची अनुकूलता असूनहि आपण आता परावलंबी झालों, असें वाटू लागलें आणि तें खरेंच होतें. घरात जागोजाग विजेच्या बत्तीचे बल्ब असले तरी कोणी तरी स्विच् दिल्याशिवाय दिवे लागत नाहीत, तसेंच झालें. पत्नी असताना मी उठण्यापूर्वी न्हाणींत ऊन पाण्याचा तांब्या येई, पाठोपाठ चहाची तरईहि येई. जेवणापूर्वी, स्नानाचें पाणी पाठवू का, अशी विचारणा होई. जेवणात काय असावें याचा विचार करण्याचें काम माझें नव्हतें. आता हे स्विच् देण्याचें, म्हणजे सांगण्याचें, मागण्याचें काम स्वतःवर आलें व जीवन नवें भासू लागलें.

# जुन्या महाराष्ट्रांतील गावरहाटी



जुनें महाराष्ट्र या शब्दप्रयोगाने मी फक्त पूर्वीच्या मुंबई प्रांतातील सातपुड्याच्या दक्षिणेकडील मराठी जिल्हे व संस्थानें असा अर्थ घेतला आहे. जुन्या काळीं प्रत्येक गाव जवळजवळ स्वावलंबी राज्याप्रमाणे एक स्वतंत्र घटक असावा, असें माझ्या लहानपणीं वृद्ध माणसांनी सांगितलेल्या हकीकतीवरून दिसतें. शेतकऱ्यानें मिठाशिवाय स्वतःस लागणारे सर्व जिन्नस पिकवावे. सूत व लोकर कातावीं, लत्ताकपडा गावांतच बनवावा, मोट नाडा, पायताण-जोडा चांभाराकडून आणि नांगर, कुळव, वगैरे औत सुताराकडून गावींच तयार करावीं, बांधकाम, घडई-जुडई, पोळें, घागरा रांजण, फार काय तोड्याची बंदूक व तिला लागणारा दारूहि गावांतच तयार झाली पाहिजे, असा लोकांचा कटाक्ष असे.

गावच्या शिवारातील पिकाची राखण परस्पर गावकरीच करीत. त्यामुळें गावांतील निरनिराळ्या धंदेवाल्यांस एकमेकांवर अवलंबून व विश्वासून राहावें लागे आणि त्यामुळें गावांत जूट नांदे. प्रत्येक वेळा शेजार शेजारच्या गावांत थोडीफार चुरस असे.

सरकारी कामासाठी गावांत वतनदार गावकामगार (पाटील व कुलकर्णी) असत. फार जुन्या काळीं त्यांना रोख तनखा मिळत नसे. पण माझ्या लहानपणीं इनाम जमिनींखेरीज त्यांना दरसाल थोडी रक्कमहि हक्कदारी म्हणून मिळे. तथापि जुनी सरंजामी पद्धत रेंगाळत होतीच. जमिनीवरील सरकारसारावसुलीच व त्यावर देखरेख करण्याचें काम वतनदार देसाई, देशमुख व देशपांडे यांच्याकडून काढून प्रत्येक पेटेगांव (तालुका) करितां पगारी मामलेदार नेमले गेले. तथापि सरकारी कामासाठी देसाई देशमुखांस पूर्वी दिलेल्या इनाम जमिनी त्यांच्याकडेच असत. त्यांना त्यावर नंतर आकार धारा लागत नसे. रुपयामागे आणा-दोन आणे जुडी भरावी लागे.

जमीनवसुलीची कामे जरी देसाई देशमुखाकडून काढून घेतला होतीं, तरी पूर्वापार वहिवाटीप्रमाणे गावचे लोक त्याचा मानपान त्याना देत. गावच्या सणावाराच्या समारंभात त्याना अग्रस्थान मिळे.

इंग्रज, पोर्तुगीज व फ्रेंच लोक हिंदुस्थानात येण्यापूर्वी आपल्या देशात काडतुसी बंदुका नव्हत्या, पण तोड्याच्या बंदुका होत्या. असल्या बंदुकीच्या नळीत वरून दारू घालून त्यावर कागदाचा बट्टा गजाने ठोकून बसवीत. नळीस मागच्या बाजूस दस्त्याजवळ काना (बारीक भोक) असे. या कान्यातहि चिमूटभर दारू घालीत. दस्त्यास चाप असे. चापाच्या पुढच्या तोंडात तोडा (पेटलेला काकडा) बसविता येई. चाप दाबताच तोडा कान्यातील दारूस लागून बार होई. म्हणून असल्या बंदुकीस चापाची नळी म्हणत. आता असल्या बंदुका उपयोगात नाहीत.

प्रत्येक गावास देसाई देशपांडे नव्हते. आता जसे तालुके आहेत, तसे पूर्वी परगणे असत. परगण्यात चारसहा तर्फा (भाग) असत आणि प्रत्येक तर्फेवर देसाई देशपांडे असत. माझा गाव शिराळा परगण्यापैकी तर्फ सातवें, कसबा सरुडा जवळ असल्याने, आमच्या गावचा देसाई सरुडचा, पण देशपांडे शिराळ्याचा असे. देसाई व देशपांडे यांच्या इनाम जमिनी आमच्या गावीं आजहि आहेत, पण आता त्यावर भर आकार पडतो. देशपांडे ब्राह्मण असून त्याना चांगले लिहितावाचता येई व ते आपला कारभार आपणच पाहत. देसाई मराठे असत, पण त्याचे दप्तरी काम करणारा दिवाणजी ब्राह्मण असे.

मी सरुडास मराठी दुसऱ्या तिसऱ्या इयत्तेत असताना, तेथील देसाईणबाईचा गावात चांगला बोज असे. सरुडच्या आसपासच्या गावात तिच्या जमिनी (देसकती) असत. जमिनीच्या मोठ्या भागाच्या वसुलीसाठी तिच्याकडे शिपाई असे. जमाखर्चाच्या व इतर लिहिण्याच्या कामासाठी एक ब्राह्मण दिवाणजी असे. जुन्या वहिवाटीप्रमाणे गावच्या सनदी शिपायापैकी दोन तीन सनदी शिपाई देवडीवर तिच्या दिमतीस असत. घरात तीनचार बाया नोकरीस असत. तिचा दत्तक मुलगा आनासाहेब लहान असल्याने कोर्टकचेरीसाठी व सरकारी तिजोरीतून नक्त नेमणुकीची रकम आणण्यासाठी तिलाच जावें लागे. देसाईणबाईस जेव्हा पन्हाळ्यास अगर मलकापुरास आपल्या कामासाठी जावें लागे, त्या वेळीं ती मेण्यातून जाई. मेणा वाहण्याचें काम सनदी भोयाना करावें लागे. दत्तक मुलगा माझ्याच वर्गांत होता. दसऱ्यात सीमोल्लंघनाचे वेळीं काही सनदी नोकर, जुन्या तोड्याच्या बंदुकाना व गंजलेल्या तरवारींना दस्ते (गवसणी) घालून व त्या खांद्यावर टाकून, या तरुण देसायापुढे चालत. देसाईणबाईच्या नोकराचा परिवार मोठा असे. बाईचा रोजखर्चहि बराच होता. वार्षिक उत्पन्न (जमिनीचा खंडभाग व नक्त नेमणूक) किती, आपला खर्च किती व सावकाराचें कर्ज किती हें फक्त दिवाणजीला माहीत. "पैसे संपले" असें दिवाणजीने सांगावें; "हजारपाचशे कोणाकडून तरी आणा, पेठ्यातून रसद आली म्हणजे

पालटल्यावर कुळकर्ण्यांच्या अमदानींत गावनोकराना अण्णाचे (कुळकर्ण्यांचे) गुलाम बनणे भाग पडले. कलेक्टराशिवाय सगळी ब्राह्मणशाही होती. कलेक्टर मात्र इग्रज असे. ज्या लहानलहान कोकणी गावात गावसनदी नसत तेथील पाटलाला अण्णाचें दप्तर काखोटीला घेऊन त्याच्याबरोबर तालुक्याच्या गावी जावें लागे.

हा फरक होण्याचे कारण पूर्वीची परपरा असलेल्या ब्राह्मणवर्गाने काळाचीं पावले ओळखून, इग्रजी राज्यात नवीन निघालेल्या शाळात भराभर शिरून शिक्षण घेतलें. मराठे व इतर ब्राह्मणेतर याना शिक्षणाची किंमत त्या वेळीं कळली नाही. साहजिकच ब्राह्मणाची सुधारणा झाली व त्याच्या हातात सत्ता गेली.

ब्राह्मण ब्राह्मणेतर ही समस्या जातिभेदापेक्षा विद्येच्या फरकामुळे निर्माण झाली व त्यातून ब्राह्मण ब्राह्मणेतर वाद उत्पन्न झाला. म्हणजे ब्राह्मण ब्राह्मणेतर असा हा जातीचा प्रश्न नाही, तर हा प्रश्न विद्येच्या जोरावर सहजी वाढत गेलेल्या अधिकाराचा आहे. कोल्हापूर जिल्ह्यात जुनी वतनदार कुळकर्ण्यांची पद्धत नाहीशी होऊन, पगारी तलाठ्याची पद्धत आज चाळीस वर्षे तरी चालू आहे. मात्र जमिनी कुळकर्ण्यांकडेच आहेत. शाहूमहाराजानी कुळकर्णीवतनें नष्ट केलीं याचा अर्थ त्याचा वशपरपरेने कुळकर्णी असण्याचा हक्क काढून घेतला, पण त्या कामासाठी देण्यात आलेल्या इनाम जमिनी त्याच्याकडून काढून घेतल्या नाहीत. फक्त त्या जमिनींवर सारा बसवून त्या त्याच्याचकडे रयतावा म्हणून ठेविल्या. पण वतनदार कुळकर्ण्यांनी त्यासाठी मलतें काहूर उठविलें. त्यामुळे बाहेरील लोकाचा गैरसमज झाला. ब्राह्मणेतरात अलीकडे बराच विद्याप्रसार झाल्याने बहुसख्य तलाठी सध्या मराठे किंवा तत्सम जातीचे आहेत. पण आज (१९६३–६४) शिपाईवड्याच्याच नव्हे तर या ब्राह्मणेतर तलाठ्याच्या राहण्याजेवण्याचीसुद्धा व्यवस्था पाटलालाच करावी लागते.

ग्रामपचायती, जिल्हा लोकल-बोर्डे व प्रातिक कायदे मडळें यात लोकाचीं मतें मिळवूनच आता कोणाचा झालें तरी शिरकाव होतो. ब्राह्मणेतरात शिक्षणप्रसार झाल्याने आणि आमच्या भागात मराठेच बहुसख्य असल्याने बहुशः तेच निवडले जातात त्यामुळे आता मराठ्याना ब्राह्मणाचा हेवा करण्याचें कारण उरलें नाही. एवढें खरें की त्यानी फार सावधगिरीने व सचोटीने आपलीं कामें केलीं पाहिजेत. सध्या जिल्हा-लोकल-बोर्डापासून ते कायदेमडळापर्यंत, किंबहुना लोकसभेतसुद्धा, बरेच विद्वान् मराठे निवडून येतात आणि समाधानाची गोष्ट ही की आज तरी त्यापैकी बरेच जण निरपेक्षपणें व आत्म विश्वासाने आपलीं कामें करीत असल्याचें पाहून मजसारख्या जुन्या काळातील वृद्ध मराठा माणसाला साभिमान आनद वाटतो. अशा वेळीं त्यापैकी काही कर्तव्यदक्ष मन्त्र्याचीं, जिल्हा-लोकल-बोर्डातील काही सभासदाचीं व प्रादेशिक काँग्रेस कार्यकर्त्यांचीं नावें डोळ्यासमोर येतात, पण तीं देणें बरें नाही.

जुन्या अमदानीत गावच्या पुढाऱ्यांबद्दल लोकात आदर असे. पुढारीहि आपली जबाबदारी ओळखून नि:पक्षपातीपणाने वागत. त्या वेळीं आताच्याप्रमाणे

कब्जेदलाली नव्हती. कब्जेकपावती झाल्याच तर पुढारी लोक पैसे खाऊन खऱ्याचें खोटें व खोट्याचें खरें करण्यास धजत नसत. पण पुढे पुढे असले घाणेरडे प्रकार वाढले. मला वाटतें, अलीकडे स्वातंत्र्यप्राप्तीनंतर अशा प्रकारास खेड्यापाड्यातून थोडाफार आळा बसत चालला आहे. पण वरच्या पातळींत सुधारणा दिसत नाही. आपण काँग्रेसवाले म्हणून खादीटोपीच्या जोरावर काही पुढारी लोकांसच नव्हे तर सरकारी अधिकाऱ्यांसहि दमदाटी देण्याचा प्रयत्न करतात, असें ऐकू येत.

जुन्या काळीं मोठ्या गावांत व कसब्याच्या गावातहि सणावारादिवशीं मोठाले जमाव जमत. अशा ठिकाणीं लावण्या, पोवाडे गाइले जात. तमाशेहि होत. बत्तीस शिराळ्यासारख्या मोठ्या गावीं नागपंचमीच्या दिवशी सापाचा (नागाचा) खेळ पाहण्यास सभोवारच्या गावचे हजारो लोक येत असत व आजहि येतात. शिराळ्यास वैशाख महिन्यांत गोरखनाथाची जत्रा भरते. अशा वेळीं कुस्त्यांचे व दांडपट्ट्याचे फड होत. वीसपंचवीस हजार लोक सभोवारच्या गावांतून येत. पण फडात शिस्त असे. मी ल्हानपणीं गोरखनाथाचे यात्रेस जाई. पलूसयेळावीचे देसाई असल्या फडाचे प्रमुख असत. अशा प्रमुखानी फडाभोवती नुसती काठीने रेघ मारली तरी ती ओलांडून कोणी पुढे जात नसत. कोणी पुढे सरकलेंच तर देसायानी "माग हटा!" म्हणताच रेटारेट करून तीं माणसें मागे हटत.

गावांत मामलेदार, फौजदार अगर शाळाधिकारी येण्याची वार्ता मिळाल्यास गावचे पाटीलकुळकर्णी आपल्याबरोबर दहापांच माणसें घेऊन त्यांना गावच्या सीमेवर सामोरे जात. त्या काळीं हे अधिकारी बहुतेक पायींच येत असल्याने ते आपल्या स्वागतार्थ आलेल्या लोकांबरोबर पीकपाण्यासंबंधी व रोगराईसंबंधी बोलत बोलत गावाकडे जात. मला आठवतें, कोल्हापूर संस्थानचे मुलकी खात्याचे मुख्य अधिकारी रावसाहेब ल्याटे सुमारें १८८५-८६ सालीं तपासणीस आले होते. ते सारवट[1] गाडींतून बाबवडे सरूडहून आमच्या गावीं आले होते. आमच्या गावीं येताच त्यांनी कामगार पाटलास सांगून माझे चुलतआजे बापूजी पाटील यांस बोलावून घेतलें. पीकपाण्याबद्दल बोलणें झाल्यावर ते म्हणाले, "मी दोन वर्षांमागे तुम्हास हापूस जातीच्या आंब्याचीं दोन कलमें दिलीं होतीं तीं कशीं काय आहेत?" "घरामागे परड्यात लावलेलें कलम नुकतेंच उदीर लागून मेलें. पण शिवारात लावलेले रोप चांगलें वाढलें आहे." असें बापूजी पाटील म्हणाले. "चला, कलम कां मेलं तें आपण पाहू." असें म्हणून रावसाहेब उठले. कलम पांचसहा फूट वाढून

१ सारवट (धमनी) म्हणजे नीटनेटकी बैलगाडीच. पण ती सभोवती बंद असून, तिला खिडक्या असत व आंत चढण्यास तिला पाठीमागे व्यवस्थित दार असे. वर अर्धवर्तुळाकार छपट टोप असे. गाडीत खाली पाय सोडून फळ्यावर बसण्याची सोय असे. फळ्यापाशी सामान राही. गाडीत झोपण्यासाठी सोय करता येई.

नवर बाळले होते. त्या कलमाजवळ शेणीचा ढुडवा होता व त्याचेखाली घुशीने बिळें पाडलीं होतीं. तें पाहून रावसाहेब म्हणाले, "शेणीचा ढुडवा रोपाजवळ नको होता. बरें, असो. मीं सात-आठ कलमें आणलीं आहेत तीं सारवर्दीन आहेत. त्यापैकी दोन तुम्हांला देतो. पण कलमाची काळजी मात्र घ्या. मी परत पुढच्या वर्षी आल्यावर तीं पाहीन."

आताचे अधिकारी क्वचितच अशी आठवण ठेवून झाडें पाहतील. तसे काही अपवाद मला माहीत आहेत. त्यापैकी मिस्टर किटिंग हे आय्० सी० एस्० असून सन १९०६ ते १९२० पर्यंत मुंबई प्रांताच्या शेतकी खात्याचे मुख्य होते. मिस्टर पेरी (हेहि आय्० सी० एस्० असून कोल्हापुरास सन १९४० ते १९४४ पर्यंत रीजन्सी कौन्सिलचे मुख्य होते.) किंवा आठदहा वर्षामागे बेळगाव व सोलापूर येथे कलेक्टर असलेले शंकरराव पांडुरंग मोहिते, अशीं अपवादात्मक उदाहरणे फार थोडीं. पण एवढे खरें की, जर सरकारी अधिकारी लोकांत मिसळले तर पुष्कळशी उपयुक्त कामें सहज होतात व लोकात त्याच्याबद्दल आदर वाढतो. अलीकडे सुमारे १९४० पासून प्रत्येक जिल्ह्यात वनमहोत्सव होतात. मोठया अधिकाऱ्याच्या हस्ते काही रोप लावलीं जातात. मग खेड्यापाड्यातून हजारो रोपें विनामोल वाटलीं जातात. पण पुढे त्याची जोपासना होत नाही व अधिकारीहि त्याच्याकडे लक्ष देत नाहीत. ही परिस्थिति मीं स्वतः कोल्हापूर कौन्सिलात मन्त्री असताना पाहिली आहे. दरसाल लाखलाख रोपें वाटली जात. त्यापैकी शेकडा दहा जरी जगलीं असतीं तरी आज खेड्यातून बरीच वनश्री दिसली असती.

सुमारे १९०० पर्यंत पूर्वापार जुन्या पद्धतीप्रमाणे बैत्यांबलुत्याचे काम चाले. सुतार, लोहार, चांभार, कुंभार, न्हावी, वगैरे वत्तीं आपल्या धंद्यात मोडणारीं शेतकऱ्याचीं कामें करीत. सुताराने विनामजुरा शेतकऱ्याचीं आउतें दुरुस्त करावींत; कुंभाराने त्यास मातीच्या घागरा व गाडगीं मडकीं पुरवावीत व मांग रामोशी यानी गावाची व शिवाराची राखण करावी. गुरव ग्रामदेवतेची पूजा करी. लोकाकडून आलेले नैवेद्य देवास दाखवी. सोनव नारळ आल्यास फोडून देवास दाखवी व एक मकल आणणाऱ्यास देई. खोबऱ्याचा प्रसाद वाटी. काही धनाच्या घरीं नियमितपणे रोज सकाळीं जाऊन त्याच्या देव्हाऱ्यातील देव पुजी. नैवेद्याची भाकरी त्यास मिळे. गावातील मुली आपल्या सासरी जाताना त्याच्या बरोबर शिदोरीची दुरडी घेऊन जाई. लोकाच्या घरीं श्राद्ध महाळाच्या जेवणास पत्रावळी व द्रोण पुरवी. जेवणास सुरुवात होण्यापूर्वी पक्तींतील माणसास गंध लावी. या कारू नारूच्या कामाचा मोबदला शेतकऱ्याने मळणीच्या वेळीं खळ्यावर आपल्या उत्पन्नाप्रमाणे व बैयाकडून घेतलेल्या कामाच्या प्रमाणात बैतें (सुपातून दाणे) त्याच्या पदरात टाकावेत. कोणा मजूरदाराकडे अगर भटब्राह्मणाकडे शेती नसली तरी त्याचींहि काम कारूनारू विनामोबदला करीत. शिवाय कारू-नारू आपसात एकमेकाचीं कामें मोफत

करात. न्हाव्याने कुंभाराची हजामत करावी तर कुंभाराने त्यास घागरी मडकीं पुरवावीं, वगैरे वगैरे.

पूर्वीहि आताप्रमाणे मोठ्या गावात आठवड्याचा बाजार भरे. त्या वेळीं आसपासच्या गावचे शेतकरी धान्य व भाजीपाला बाजारात विकावयास आणीत. त्या गावचे शेटे-महाजन व रामोशी त्या मालापैकी काही माल हकाने मागून घेत, त्यास पसकी म्हणत. शेटे बाजारात लोकांच्या उपयोगासाठी धान्य मोजण्याचीं माप पुरवीत.

गावच्या राखणीच काम रामोश्याकडे असे. तोहि एक बलुतेदारच असे. शिवाय गावचे लोकहि गावसरक्षणाची सामुदायिक जबाबदारी अंगावर घेत. चावडीत अगर मुख्य देवळात 'सोटेवाले' ठेवण्याची पद्धत असे. ल्हानल्हान गावात रोज रात्रीं चार पाच सोटेवाले चावडीवर येत. सोटा म्हणजे तीन फूट लांबीची जाड बाबूची काठी असून तिच्या एका टोकाला भोक पाडून त्यात चामड्याच्या वादीची मुदन असे. गावचा तराळ आळीपाळीने सध्याकाळीं जेवण्यापूर्वी हे सोटे, ज्यानी त्या दिवशी सोटेवाल्याच काम करायच त्याच्या घरीं नेऊन टाकी. तराळ म्हणजे गावचा शिपाई. जेवण झाल्यावर सोटे घेऊन घरातील एक तरुण चावडीवर झोपण्यास जाई. हे सोटेवाले रात्रीं एकदोन वेळा गावात गस्त घालीत. गाव मोठा असला व गावात बरेच सनदी नोकर असले तर ते गावरामोशास बरोबर घेऊन रात्रीं एकदोन वेळा गस्त घालीत.

पुढे काही दिवसांनी मुल्की पाटलाप्रमाणे दर गावास पोलिसपाटील वेगळा नेमला गेला. तोहि पाटील घराण्यातील असून त्याच्याकडेहि पाटील इनाम-जमिनीचा काही हिस्सा असे. त्याच वेळीं सरकारने पोलिसखातेंहि निर्माण केलें. त्यानतर तालुक्याच्या ठिकाणीं फौजदार आले. तालुक्यात फौजदाराच्या हाताखाली काही पोलीसठाणीं असत. ठाण्यावर तीनचार शिपाई व एक नाईक असे. त्या वेळीं पोलिसात लिहितावाचतां येणारे शिपाइ अगर नाईक वगैरे नसत. फौजदारास मात्र लिहितावाचता येण जरूर होत. सन १९०९ सालीं मुंबई प्रांतासाठी पुण्यास प्रथम पोलिसस्कूल निघाल. त्या वेळेपासून पोलिसखात्यात पुष्कळ सुधारणा झालेली दिसते. हें पोलिसस्कूल पुढे नाशिक येथे नेण्यात आल.

मला वाटत, सुमारें १८८० ते १८९० च्या कालखडात फारशी कज्जेदलाली नव्हती. आताप्रमाणे लोक उठल्यासुरल्या कोर्टात जात नसत. गावचे पुढारीच पक्षकाराची समजूत घालून तटे मिटवीत. काही उदाहरणें देण्यापूर्वी येथे हृ सांगितल पाहिजे की, उपरिनिर्दिष्ट कालखडात मल्कापूर (विशाळगड) ही जहागीर होती. या जहागिरींत चौसष्ट खेडीं होतीं. म्हणजे साधारण तालुक्याएवढी ही जहागीर होती. या जहागिरीचा सर्व कारभार—मुल्की, फौजदारी, जगल व न्यायनिवाड्याचीं कामें—मामलेदाराच्या दर्जाचा एकच अधिकारी चालवी. त्यास कारभारी म्हणत.

मला बरोबर आठवतें की, मी मलकापुरास शिकत असताना तेथील कचेरींत एकहि वकील नव्हता. सुमार १८९१ सालीं मी त्या निन्हाडात राहत असे त्या निन्हाडात श्रीयुत राणे नावाचा गृहस्थ कोंकणांतून मलकापुरास वकिली करण्यासाठी आला होता. त्याला वकिलीचें काम मिळेना म्हणून कंटाळून चारसहा महिन्यातच त्यानें गाशा गुंडाळला. पुढे जहागिरदारास सुमार १८९२–९३ साल मुखत्यारी मिळाल्यावर त्यानी व त्याच्या पर्सनल ॲसिस्टन्टने (पूर्वी हा जहागिरदाराचा बी. ए. पास झालेला शिक्षक असल्याने त्यास ट्यूटर म्हणत) मराठी जाणणाऱ्या दोन ब्राह्मण गृहस्थास (त्यापैकी एक शाळामास्तर होता, त्याचे नाव गोगटे. दुसऱ्याचे नाव गद्रे.) उत्तेजन देऊन थोडी कायद्याची माहिती घेण्यास सांगितलें; व तीनचार महिन्यानी त्याची परीक्षा घेऊन त्याना वकिलीच्या सनदा दिल्या. हेच मलकापूर जहागिरींतील पहिले वकील. मलकापुरास प्रथम जे मुन्सफ नेमले गेले, त्याचे नाव टिमये. त्याचा मुलगा माझ्या वर्गांत सन १८९३ ९४ सालीं असल्याचें मला आठवत. मला वाटतं, या मुन्सफाने कायद्याची परीक्षा दिली नव्हती. पण त्या काळात मुन्सफ कोर्टात कामे नेण्याची प्रथा पडली नव्हती. म्हणून मुन्सफाला कामहि फारसे नसे. पण १९४७ साली जेव्हा विशाळगड जहागीर कोल्हापूर संस्थानासह मुंबई प्रातात विलीन झाली, त्या वेळीं जहागिरदार सुशिक्षित असूनहि त्याच्याकडे एक पर्सनल असिस्टट, एक मामलेदार, एक महालकरी, एक फौजदार असे अधिकारी होते. त्या वेळीं मलकापूरचे रहिवासी वकील पाचसहा तरी असावेत. शिवाय कोल्हापुराहून पुष्कळ वकील नेहमी येत. जुन्या काळीं कोल्हापूर संस्थानात, म्हणजे आताच्या कोल्हापूर जिल्ह्यासाठी, शहरात कचेरा असलेले एक सरन्यायाधीश व एक सदरअमीन आणि राज्यात दुसऱ्या ठिकाणीं दोन मुन्सफ असावेत, असे वाटतें. अलीकडे तीसचाळीस वर्षांत दावे फार वाढलेले असून कोर्टकचेऱ्या करण्यात लोकाचा वेळ व पैसा फार खर्च होऊ लागला आहे. मला स्वत लाहि त्याचा थोडा तरी अनुभव घ्यावा लागला आहे, त्याची माहिती मनोरजक वाटेल.

मी १८९१ ९२ साला मलकापुरास इंग्रजी शिकत असताना, माझ्या वडिलाच्या ओळखीच्या एका वैश्यवाण्याच्या घरी राहत असे. आम्ही त्यास पोटगीबद्दल दाणेदुणे देत असे. त्या घरात एक वृद्ध बाई व तिचे दोन मुलगे होते. हे उदीम व्यापार करात असे. बाई फार सज्जन होती. तिने आपल्या मुलात व माझ्यात बिलकुल फरक केला नव्हता. जी भाजीभाकरी तिच्या घरीं होई ती आपल्या मुलाबरोबर मला वाढी माझी इंग्रजी तिसरी इयत्ता झाल्यावर मी पुढच्या शिक्षणासाठी कोल्हापुरास व नतर पुण्यास गेलों.

पुढे काही दिवसानी ती वृद्ध बाई निवर्तली. तिच्या मुलाचा व्यापारात चागला जम बसला. काही काळ लोटल्यानतर ते दोघेहि तरुण साथींत वारले. त्या बाईच्या नावबाने आपल्या मेहुण्यास पार्तीत घेऊन, बापाने घातलेली दलालीची वखार चालू

ठेवली व तो व्यापारहि करू लागला. त्याने सुमार १९१७ साली माझ्याकडे चार महिन्याच्या मुदतीने दोन हजार रुपये मागितले. मी त्यास म्हणालें, "बाबारे, स्नेह्यांशीं व नातलगांशीं देवघेव करणें बरें नाही." पण त्याने आग्रहच धरला. "ही देवघेव नव्हे. हगामापुरती उसनवारी समजा." असेहि तो म्हणाला. मला त्या तरुण गृहस्थाच्या आजीबद्दल फार आदर असे. म्हणून "नाही, होय" म्हणत मीं त्याला दोन हजार रुपये रजिस्टर पोस्टाने पाठविले. मीं त्या रकमेबद्दल कागदपत्र या प्रॉमिसरी नोट मागितली नाही. पुढे सहासात महिन्यांनी आपण होऊन त्यानेच प्रॉमिसरी नोट पाठविली. मीं पैसे मागितले पण त्याच्याकडून ते आले नाहीत. तो व त्याचा भागिदार मेव्हणा यांच्यात बाधा आली. त्याने आपलें घर व जमीन बायकोच्या नावें केली, नतर दुसऱ्या नातलगाच्या नावावर केली व माझ देणें एकट्या भागिदारावर टाकू लागला. पुढे मी सन १९३१ साली त्याच्याकडे मल्कापुरास गेलें. त्या दोघा भागिदाराना घेऊन खुद्द जहागिरदाराकडे गेलो. मला त्या जहागिरदाराबद्दल आदर असे. मीं त्याना सर्व हकीकत सांगितली व म्हणालें, "ज्या बाईच्या घरात मी आपलेपणाने राहिलों, जेवलों, तिच्या नातवावर दावा करणें मला पसत नाही. त्याने निम्मी रक्कम दिली तरी मी प्रॉमिसरी नोट परत करीन. जर त्यास ती निम्मी रक्कमहि एकाच वेळीं देण्यास परवडत नसेल तर ती रक्कम दरसाल शभर रुपयांच्या हप्त्यांनी बिनव्याजी द्यावी. जर तेंहि करणें त्यास शक्य नसेल तर त्याने मला सांगावं, 'साहेब, तुमचें बरें चालले आहे, मला या पुन्या रकमेची सूट द्या.'" पण यापैकी तो काहीच करीना. "भागिदाराकडून पाहिजे तर वसूल करा. दुकानचें त्याच्याकडून फार येणें आहे." असें तो बोलू लागला, तेव्हा जहागिरदार म्हणाले, "रावबहादूर, आपण मोठ्या मनानें सूट देत असताना तो जर तुमचें ऐकत नाही, तर तुम्ही कोर्टांत जाणें बरें." वास्तविक खरें भाडण दोघा सरकतदारात शिरोनाचें, पण मी त्यात सापडलों गेलो. मी पुष्कळ सवलती देतो म्हणालों. 'पैसे सोडा' म्हणत असल्यास 'सोडतों' असेहि म्हणालें असताना, हा माणूस ऐकत नाही, याचा राग येऊन मी नाइलाजाने कोर्टांत गेलों. पुढे फ्याळला, तेव्हा माझे जामात—जे कोल्हापूर व मल्कापूर कोर्टांत वकिली करतात ते—मला म्हणाले, "आपण दगदग घेऊ नका. मला फक्त मुखत्यारपत्र द्या. मी सर्व काही पाहून घेईन. हे काम मध्येच सोडणे बरें नाही. आता हा नुसता पैशाचा प्रश्न राहिला नसून इभ्रतीचाहि प्रश्न आहे." मी लागलीच मुखत्यारपत्र देऊन मोकळा झालें व माझ्या जामातांनीच या कज्जाचा शेवट लाविला. सन १९३१ ते १९६१ पर्यंत हा दावा चालला. दर खेपेस निकाल माझ्यासारखा होई, पण त्यातील एक प्रतिवादी, देणेकऱ्याचा मेहुणा, पुढच्या कोर्टांत, नतर हायकोर्टांत जाई. निकाल माझ्यासारखा झाल्यावर तो आपल्या बायकोच्या नावें परत दाव्यास सुरुवात करी. जेव्हा तो वारला तेव्हा त्याच्या मुलाने हार खाल्ली व त्याचें एक समाईक कोठारघर माझ्या ताब्यात आलें.

मला बरेच वेळा वाटे की, मी राग गिळला असता तर बरें झालें असतें. तीस वर्षे त्रास झाला. त्रास घेण्याइतकी रक्कमहि नव्हती, किंवा त्याच महत्त्वहि मला नव्हतें. पण दावा तडीस न्यावा लागला. माझ्या येण्याच्या सुमारें पाच पट किंमतीच त्याचें कोठार माझ्या ताब्यात मिळाल, तथापि माझ्या देण्याइतकीच रक्कम घेऊन मी त घर त्या दोघा सरकारदाराच्या हवाली केलें. सांगण्याचा मुख्य हेतु, कोर्ट-कचेऱ्यात किती दगदग पडते याचा अनुभव मलाहि आला आहे.

प्राचीन काळीं महाराष्ट्रात प्रत्येक गावास ग्रामपचायत असे. बहुतेक सर्व सामाजिक कामें गावचे गावातच होत. ही उपयुक्त प्रथा इंग्रजी राजवटींत नाहीशी होत चालली होती. इंग्रजी अमदानीत सर्व सत्ता व गावकाम सरकारनें आपल्या हातीं घेतलीं. यामुळे परस्पर सहकार्यानें सार्वजनिक कामें करण्याची पद्धत नाहीशी होत चालली व त्यामुळे गावातील शिस्त कमी होत गेली. गावचें काम तें आपल काम ही भावनाहि मावळू लागली. गावात स्वच्छता कमी झाली व हळूहळू ह काम सरकारच असे लोक समजू लागले.

ही चूक इंग्रजाच्या लक्षात फार उशिरा आली व त्यानी स्थानिक स्वराज्याच्या काही बाबी लोकावर सोपविल्या. स्वराज्य मिळाल्यापासन हल्लीचें सरकार परत ग्रामीण जनतेस विश्वासात घेऊन त्याच्याकरवीच गावकाम करून घेण्याचा प्रयत्न करात आहे. मोडली घडी परत कशी बसते ह पाहावयाचें आहे. कारण मध्यतरीच्या काळात परस्परावरचा विश्वास कमी झाला व स्वत पेक्षा गावची निगराणी महत्त्वाची ही भावना नष्ट झाली. तथापि महाराष्ट्रराज्य मनोभावें ग्रामपचायतीचें पुनरुजीवन व जोपासना करात आहे. परमेश्वर करो आणि आपली ही पारपरिक प्रथा सुफल होवो.

माझ्या लहानपणीं ग्रामपचायती जीव धरून होत्या. पण जबाबदारीचीं काम ग्रामपचायतीच्या अगावर घ्यावीं, अशी जिल्हा व ताउका अधिकाऱ्याची मनापासन इच्छा दिसत नसे. तथापि, पचायतीच्या लहानसान कामात ते खीळ घालीत नसत. हल्लीच्या पद्धतीप्रमाणे, माझ्या लहानपणीं, ग्रामपचायतीच्या सभासदाच्या निवडणुका होत नसत. आपल्या वजनामुळे व शीलमुळे प्रतिष्ठा पावलेल्या पुढाऱ्यावर लोकाचा विश्वास असे व असल्याच लोकाची ग्रामपचायत बनें. जरी असली पचायत सरकार-नियुक्त नसली तरा सरकारने नेमलेले ताउका अधिकारी पचायतीच्या कामात आपण होऊन ढवळाढवळ करीत नसत. ग्रामपचायतींत गावचा पाटील, जेथे देसाई असेल तेथे तो, गावातील निरनिराळ्या जातींतील काही अनुभविक माणसें, एखादा महार व बैत्यापैकी एकदान माणस असत. कुळकर्णी हा पचायतीचा सभासद नसावा अस वाटतें, पण गावकामगार पाटील अगर दुसरा कोणी सभासद लिहिणारावाचणारा नसेल, तर लिहिण्याचें काम कुळकर्ण्यास करावें लागे. पचायतीचे ठराव लोक मानीत कचित् पचायतीच्या ठरावाविरुद्ध कोणी कधीकाळी ताउक्यात तक्रार गुदरली तरच मामलेदार चौकशी करी. ग्रामपचायतींत गावच्या सार्वजनिक कामाचा

विचार होई. पाणवठ्याची व्यवस्था, देवालयाची साफसफाई व दुरुस्ती, शेताच्या हद्दीनद्दल्च्या तक्रारी व गावात होणारे गुन्हेहि पचायतीपुढे येत. गावात पचायतीचा दोज असे. ज्या गावात पचायतीवर लोकांचा पूर्ण विश्वास असे, त्या गावातील पचायती गभीर स्वरूपाच्या गुन्ह्याचीहि चौकशी करीत. माझ्या ल्हानपणीं आमच्या गावात गभीर स्वरूपाचे दोन गुन्हे घडले होते. गुन्ह्याच्या कामात झालेल्या पचायती मीं पाहिल्या आहेत. त्या वेळीं माझे वडील चिमणाजी पाटील हे पोलिसपाटील असून सरपच होते.

आमच्या गावच्या हरि शिंपेकर नावाच्या एका गरीब मजुरदार शेतकऱ्याच्या मुलग्याने आपल्या घराच्या दुरुस्तीसाठी शेजाऱ्याच्या शेतातील बाभळीची जाडजूडशी फादी तोडली आणि ती तो डोईवर घेऊन कुचनत कुचनत घरीं जात होता. इतक्यात झाडाचा मालक रागाने शिव्या देत त्याच्या अगावर धावून आला व त्याने त्या तरुणास ढकलून दिलें. धक्क्यासरशी तो तरुण खाली पडला व त्याच्या छातीवर ती बाभळीची फादी पडली. रक्ताची गुळणी घेऊन तो मुलगा जागच्या जागीं मरण पावला. बाभळीचा मालक धावून गावात आला. झाली हकीकत गावात पसरली. मेलेल्या तरुणाचे आईबाप रडत-ओरडत जेथे मुलगा मरून पडला होता तेथे गले. त्याच्यामागून गावातील पोरासोराच ल्टारहि गले. त्यात मी पण होतो जमलेल्या लोकांपैकी कोणी तरी पळतपळत जाऊन माझ्या वडिलास व दुसऱ्या काही माणसास बोलावून घेतल. नतर काही माणसानी तें प्रेत हातावर घतल व सव माणसे देवळावर आलीं. आमच्या गावीं देऊळ, चावडी व पचायतीची जागा एकच असे. शिवाय पचायतीचे ठराव देवळात झाल्याने त्याला गाभीर्यहि असे. माझे वडील म्हणाले, "हरी, झाली गोष्ट फार वाईट झाली. आता पुढे काय?" तो म्हणाला, "पाटील, ज्यान माझ्या पोरास ठार मारल त्याच्यावर खटला भरा." माझे वडील म्हणाले, "बरें, आपण तुझ्या म्हणण्याप्रमाणे करू. पण खटला भरला तरी आता तुझा मुलगा परत येईल काय?" "नाही." "बरें, ज्या माणसाने त्यास ढकलल तो फाशी गल्याने तुझा मुलगा परत येइल काय?" "नाही." "तुझ्या मुलास दुसऱ्याने चिडून ढकल्ल्यामुळे तो खाली पडला व कमनशिबाने त्याच्या अगावर लाकूड पडून मेला खरा, मग गावातील दुसऱ्या एका तरुण पोराचा का जाव घेतोस?" ज्याने त्या मुलास ढकलल तो व त्याचा बाप यानी माझ्या वडिलाचे व हरि शिंपेकर याचे पाय धरले. वडील म्हणाले, "झाली गोष्ट होऊन गली तुम्ही गावकरी माझा विचार ऐकत असाल तर मी पोलिसपाटील म्हणून पचनामा करतो की 'हरीचा मुलगा दुसऱ्याच लाकूड नेत असता, मालकाने त्याला रागाने शिव्या देऊन हाक मारली. मुलगा पळत असताना, पाय घसरून पडला, व त्याच्या अगावर लाकूड पडून तो मेला.' तुम्हा सर्वांस हें कबूल असेल तर पोलिसठाण्यावर वर्दी न देता आपण प्रेताची व्यवस्था लावू या." वडिलानी पुन्हा विचारलें, "मी तसा रिपोर्ट करू ना!"

"हो, तसेच करा." असे लोक म्हणाले. नंतर प्रेताचे दहन झाले. पुढे या गोष्टीची वाच्यता झाली नाही. कदाचित् पोलिसगेटनाइकास कळलें असेलहि, तरी पण त्यानेहि या गोष्टीकडे कानाडोळा केला असावा.

दुसरें प्रकरण आगीचे होते. माझ्या वडिलांचे चुलते बापूजी पाटील यांच्या गवताच्या मोठ्या गजीस आग लागली. आग मोठी असल्याने विझविता आली नाही. आपोआप पेटण्यासारखी गजीची जागा नव्हती. बापूजी पाटलाचा धाकटा मुलगा भाऊराव हा वीसएक वर्षांचा देखणा तरुण पैलवान होता. त्याची राघू चिंचवडा नावाच्या मजुराच्या तरुण रुपवान बायकोशीं दाट मैत्री असे. ती दोघे पुष्कळ वेळा उघडउघड थट्टामस्करी करताना दिसत असत. लोकांना ही मैत्री गैरवाजवी वाटे. या तरुण मुलीच्या नवऱ्याला आपल्या बायकोशीं असलेली भाऊरावाची सलगी आवडणें शक्य नव्हतें खरें, पण तो गरीब माणूस या गोष्टीला आळा घालू शकेना. भाऊरावाना दरडावून बोलण्याचीहि त्याची हिंमत नव्हती. एके रात्रीं रागाच्या भरात त्याने पेटलेलें शेणकूट एका लोटक्यात घेऊन बापूजी पाटलाच्या गजीला आग लावली व आपण जवळच्या गावास निघून गेला. आमच्या गावात अशा आगी लागत नसत; गावात तंटेबखेडेहि फारसे होत नसत. माझे वडील पोलिसपाटील असल्याने त्यांना राघू चिंचवड्याचा दाट संशय आला. त्यांनी काही टारगट पोरास व राघूस चावडीवर बोलाविलें. पण राघू घरीं नसल्याचें त्यांना समजलें. तराळ पाठवून वडिलांनी राघूस बोलावून घेतलें. तो चपापलाच व भीतभीत चावडीवर आला. त्याला वडिलांनी दरडावून विचारलें, "कोणीं आग लावली?" तो घाबरुन म्हणाला, "पाटील, मी नाही लावली. मी कालच गावाला गेलों होतों." वडिलांनी रुद्रावतार धारण केला व पायातील जोडा हातात घेऊन जमिनीवर आपटला व म्हणाले, "खरें सांगितलेस तर सुटशील, नाही तर तुरुंगात जावें लागेल, लक्षात ठेव." "चुकलों पाटील" असे तो म्हणाला. बापूजी पाटील तर समजदार वृद्ध माणूस. त्याला आपल्या मुलाचे असले गैरवर्तन आवडत नव्हतेंच; मग ते कशाला जास्त बोलतात? पोलिसनाईकहि येऊन गेले. पण माझ्या वडिलांवर, इतर पंचावर व गावच्या पुढीवर त्याचा पूर्ण विश्वास असल्याने त्यांनीहि या कामात हात घातला नाही. शेणाच्या गादीवर टाकलेल्या राखेतील पुणगी वाऱ्याने उडून आग लागली अशाीं असेच धरुन आगीचे प्रकरण गावातच निकालात निघालें.

आमच्या गावच्या तीनचार महारांची बरीच शेती होती. त्यापैकी जनकू हा एक वृद्ध महार होता. त्यास मूलबाळ नव्हते. तथापि त्याच्या घरीं त्याच्या भाऊबंदापैकी अप्पा म्हणून एक तरुण, घरच्या माणसासारखाच राहत असे. अप्पाचें लग्नहि जनकूनेंच करुन दिलें होतें. अप्पास एक मुलगी व माझ्या वयाचा मुलगा होता. जनकू महार मरला, तेव्हा आपल्या मागे आपली जमीन व घर उपड राखा अप्पास द्यावें असे त्यास वाटलें. त्याने वर्ष गावातील पुढाऱ्यास बोलवून

दाखविलें व याबद्दल काय करावें लागेल म्हणून त्याना विचारलें. गावच्या पुढाऱ्यानीं (पचानीं) एकदा देवळावर गावचे पुढारी व समस्त महार याना बोलावलें. पचाच्या वतीनें माझ्या वडिलानीं प्रथम जनरूला "तुझा विचार काय आहे?" म्हणून विचारलें. तो म्हणाला, "मीं अप्पाला लहानाचा मोठा केला. त्याला दोन मुलें आहेत. मी आता थकलों आहे. अप्पाच आता मला सांभाळील. माझें घर व जमीन अप्पास द्यावीं म्हणजे मीं त्याला पाळल्याचें सार्थक होईल." माझे वडील जनरूच्या भाऊबंदास उद्देशून म्हणाले, "समस्त महार मडळी, ही बाब तुमची आहे. अप्पा हा तुमच्या जातीचें लेकरू आहे. जनरूनें त्याला आपला म्हटलें आहे व त्यास तो आपली मठी व स्वत.ची वतनी जमीन देऊ इच्छितो. तुमची त्यास हरकत आहे का?" सर्व महारानी "आमची हरकत नाही" असें सांगितलें. नतर माझ्या वडिलानीं गावपंचास विचारलें की, "तुम्ही पाचामुखीं परमेश्वर म्हणून गावातल्या गावात जर जनरूची विनती कबूल करीत असाल तर मी तसा 'महजर' लिहितों." सर्वांनी कबूल केलें. त्याप्रमाणे झालेला ठराव आमच्या जुन्या दप्तरीं होता. जनरू, अप्पा व अप्पाचीं मुलें यानी उठून गावकऱ्यास "जोहार" करून हात जोडले. जनरूने नतर समस्त महारवाड्यास जेवण घातलें.

मावळात वैशाख महिन्यात आगोटीचे दिवस म्हणजे पावसाचा हगाम आला की शेतकरी शेण, शेणकूट व वैरणकाडी गावाबाहेरच्या आपल्या कोठारातून म्हणजे सभोवार झिन्यादोन्याचें कुपण असलेल्या आवारातून काढून घरीं सोप्यात अगर माळ्यावर ठेवितात व घरें शाकारतात. याच वेळीं, आगोटीच्या हगामात गावातील देवळेंहि शाकारावयाचीं असतात. देऊळशाकारणीसाठी गावात दिवस पाळला जाई. दिवस पाळणें म्हणजे सर्वानुमत शिवारातील शेतीचीं कामें थाबवून त्या दिवशीं सार्वजनिक कामें करणें होय. आमच्या गावचा मुख्य देव ज्योतिबा व ज्योतिबाचा वार आदितवार असल्यानें, गावचा तराळ (तराळ म्हणजे जुन्या काळीं गावचा वतनदार शिपाई. त्यास गावचीं व सरकारी कामें करावीं लागत.) सध्याकाळीं सुमारें आठ वाजता "देऊळशाकारणीसाठी दिवस पाळायचा होऽऽ" असें मोठ्याने ओरडून गावभर सादवी. शाकारणीस तुराट्या, मोळाचे (एक जातीचें गवत) वासे व सुम (बारीक दोर), थोडीं कौलें व काही वाकच्या लागतात. यापैकी ज्याच्या घरीं तुराट्या असतील त्यानी तुराटीचे कवळे अगर भारे आणावे, ज्याच्या घरीं मोळ्दारीच्या पळ्या असतील त्याने त्यापैकी काही पेंढ्या आणाव्या, कोणीं शिडी आणावी आणि कुभाराकडून, महार लोकाकरवी, चारसहा पाट्या कौलें आणावीं. देवळावर माणसें जमताच कांही जण मोळाचे वासे वळीत. काही माणसें शिडी लावून देवळाच्या छपरावर चढत व फुटकीं कौलें खालीं घेत. जेथे छपरावर कौलाचा तोटा येई त्या ठिकाणीं नवीं कौलें वर नेलीं जात. कोणी वळचणीस कामट्या बाधीत. या प्रकारें शाकारणी चाले. आषाढ महिन्यात आमच्याकडे पाऊस फार असावयाचा.

अशा एखाद्या आदितवारीं 'दिवस पाळून' त्या दिवशीं जत्रा करावयाची. जत्रेच्या दिवशीं लागणारा बकरा (मेंढा, शक्य तर मेंढी) व कोंबडा कोंबडी कापलीं जात. गावकऱ्यांपैकीं कोणी तरी बकरा व कोंबडी लावी (कापी). बकऱ्या कोंबड्याची किंमत हिस्सेरशीनें वतनदार पाटील यांच्या वरातून वसूल केली जाई. त्याचप्रमाणें तांदूळ, पीठ, चटणी मीठहि गोळा होई. जेवणाचे राधप देवळाच्या एका सोप्यात होई. गावातील व महारवाड्यातील सर्व पुरुष व मुले जमा होत. जेवणाच्या वेळीं पाऊस पडत नसल्यास पंक्ति उघड्यावर बसत. पाऊस पडत असल्यास दाटण करूनहि देवळातच माणसें जेवावयास बसत. महार रामोशी मात्र देवळाबाहेर बसत.

श्रावणात, भाताच्या कोळपणी झाल्या व विशेषकरून खडवें (उघडीप) पडल तर एखाद्या पाळक दिवशीं गावातील पुरुष मंडळी, गावातल्या गल्ल्या व पाण वठयाच्या वाटा मुरूम टाकून दुरुस्त करीत. पावसाळ्यात जनावरांच्या वर्दळीनें व शेणामुतानें गावातील रस्त्यावर बसरित पावळ चिखल होई व नदीच्या पाणवठयावर निसरडें होई. म्हणून पाणवठे व सडका दुरुस्त करणें जरुरीचें असे. श्रावणात सर्व लोक सोमवार करीत. म्हणजे त्या दिवशीं फक्त फराळ (शेंगा, गूळ किंवा राजगिऱ्याचे लाडू) करीत. केळीं खाण्यास हरकत नसे. पण त्या काळीं फळें विकत घेणें लोकांना परवडत नसे. आमच्या भागात श्रावण महिन्यात शेतकामातून थोडी फुरसत असते व श्रावण महिन्यात मधूनमधून खडवे पडतें. अशा श्रावण सोमवारीं 'दिवस पाळून' गावातील सडका व पाणवठे दुरुस्त करीत. हें दुरुस्त करणें म्हणजे गावाबाहेरील माळावरचा मुरूम आणून विघटलेल्या वाटेवर टाकणें व त्यास थोडाफार धुमसण होय. पाणवठयाचे रस्तेहि याचप्रमाणें दुरुस्त करीत.

जरी त्या कालखंडात माणसें आताच्यापेक्षा कमी कपडा वापरीत व त्याना आताच्या इतकें चांगलें व भरपूर अन्न मिळत नसे, तरी पण त्यांच्यात जोम असे. ते कसे तरी दिवस ढकलीत नसत. आल्यागल्याचा परामर्श घेत. एकमेकाशीं आतापेक्षा एकोप्याने वागत. कुटुंबातील माणस एकमेकाशीं प्रेमानें वागत. आताप्रमाणें बेपर्वाई दाखवीत नसत. मी ज्या काळासंबधानें लिहीत आहे तो काळ स्वराज्याचा नव्हता आमचे राज होते पण ते परावलंबी होते. साध्यासुध्या लोकांचें जीवन समाधानाचं व प्रेमाचं होतें म्हणावयास हरकत नाही.

माझ्या लहानपणीं वाफेवर चालणारी आगगाडी नुकतीच मुंबई ते पुण्यापर्यंतच आली होती. वाफेवर चालणाऱ्या इंजिनाचा फक्त मोटाल्या गिरण्यात शिरकाव झाला होता. पण अगदीं अलीकडे सन १९०५ पर्यंत फारच थोड्या ठिकाणीं वाफेच्या शक्तीनें चालणारे पाण्याचे पंप दिसत. सन १९०८-०९ साली शेतकीखात्यानें वाफेचे इंजिन बसवून एका शेतकऱ्यास मोठ्या प्रमाणावर शेती करण्यास उत्तेजन

दिलें होत. तोपर्यंत माजरी ऊस फार्मवर मुद्दा इंजिनावर चालणारा चरक नव्हता. महाराष्ट्रांत फक्त सोलापूरच्या रा० ब० अप्पासाहेब वारदांच्या फार्मवर इंजिनावर चालणारा मोठा चरक नुकताच बसविला होता. इंजिनाचा चरक कसा चालतो हें पाहण्यास मलाच आमच्या खात्यानें पाठविलें होतें. माझा अहवाल पाहून शेतकी खात्याचे डायरेक्टर यानी तसला घाणा माजरा शुगरकेन फार्मवर बसविण्यास परवानगी दिली होती.

माझ्या अगदी लहानपणीं आमच्या गावीं रॉकेलच्या चिमण्या (दिवे) देखील आल्या नव्हत्या. घरातून पणत्या, टाणवाया व समयाच असत. सुखवस्तु ब्राह्मण व व्यापारी लोक दिव्यासाठी येरोल (गोडें) तेल वापरात. शेतकरी लोक एरंडेल तेल वापरीत. शेतकरी घरींच एरंड्याची आरड काढीत. आरड काढणें म्हणजे उखळांत पहारीनें एरंड्या कुटावयाच्या व एका मोठ्या पातेल्यात त कूट टाकून त्यात भरपूर पाणी घालून, त्या पाण्यास उकळी येईपर्यंत त चुलीवर ठेवावयाचें. नतर भांड खाली उतरून ठेवावयाच. भांडें थंड झाल्यावर पाण्यावर आलेला तेलाचा तवंग हाताने काढून दुसऱ्या भांड्यात साठवावयाचा. तेलाबरोबर थोडें पाणी येत तें खाली बसतें. वर आलेलें तेलच एरंडेल. उजेडासाठी लागणाऱ्या दिव्याशिवाय, गाड्यांच्या चाकास व ऊस गाळण्याच्या लाकडी घाण्याच्या वंगणासाठीहि या एरंडेल तेलाचा उपयोग करीत. सन १८९४ पर्यंत शहराच्या रोषणाईस येरोल वा खोबरेल तेलाचा वापर करीत त्या वेळीं विजेचे दिवे तर नव्हतेच, पण रॉकेलहि फारसें नव्हतें.

कै० शाहूमहाराजांचें लग्न सन १८९१ सालीं झालें व त्याना मुखत्यारी सन १८९४ सालीं मिळाली. हे समारम पाहिल्याचें मला आठवतें. त्या दोन्ही समारंभाच्या वेळीं कोल्हापूर शहरातील मुख्य मुख्य रस्त्यावर रोषणाई केली होती. त्या वेळीं रस्त्याच्या दोन्ही बाजूस लाकडी डांब रोवून, त्यावर सहा इंची फळ्या ठोकून, त्या फळ्यावर पणत्या किंवा काचेचे ग्लास ठेवले होते. ग्लासात तीन इंच पाणी व त्यावर अर्धापाऊण इंच खोबरेल घालून, ग्लासाच्या तोंडावर वात धरण्यासाठी पातळ पत्र्याची तिवई अगर कुत्र बसविलेलें असे.

मलकापुरास मी शिकत असतांना त्या वेळच्या वहिवाटीप्रमाणे शहरातील व्यापारी, सरकारी नोकर, कारभारी, फौजदार, कारकून व पागेंतील भले लोक (स्वार) सीमोल्लंघनाच्या स्वारीनंतर पंताच्या वाड्यातील अंबाबाईच्या पुढल्या दालनात श्रीमतास सोनें देण्यासाठी जमत असत. तो एक लहानसा दरबारच असे. श्रीमत मुख्य जागीं गादीवर तक्क्यास टेकून बसत, त्यांच्या बाजूस ओळीनें मुख्य मुख्य अमलदार बसत. दालनात मधूनमधून मेणबत्त्या लावलेले स्टँड असत. चौकाच्या मध्यभागीं वर झुंबर असे. त्यातहि मेणबत्त्या लाविलेल्या असत. कारभाऱ्यानी सोनें (आपट्याचीं पानें) श्रीमतास दिल्यानंतर बाकीचे लोक (व्यापारी वगैरे) सोनें देऊन, पानसुपारीचा समारभ झाल्यानंतर आपापल्या घरीं जात.

त्या काळाडात दळण्याच्या गिरण्या कोणासहि माहीत नव्हत्या. दळणकांडण घरच्या घरींच होत असे. गरीब व मध्यम वर्गांतील कुटुंबांत बायामाणसें पहाटेस सुमारें चार वाजतां उठून नाचणे किंवा जोंधळे जात्यावर दळीत. त्या वेळीं पहाटे गांवभर स्त्रियांचीं जात्यावरील गोड गाणीं ऐकूं येत. खेडेगांवांत सूर्योदयाच्या वेळीं कांहीं कांहीं बाया आपल्या दारापुढे लोटझाड करीत; कोणी न्याहारीसाठीं भाकरी भाजीत. नंतर कांहीं बाया पुरुषांबरोबर शेताकडे कामास अगर रानणीस जात. दुपारीं कांहीं बाया कधींकधीं भरडलेले भात किंवा नाचणे कांडीत. उखळावरील गाणीं जात्यावरील गाण्यापेक्षा निराळीं असत. मुसळाच्या ठेक्यावर तीं म्हटलीं जात. ज्या वेळीं असलें काम नसे, अगर बाहेर पाऊस पडत असे त्या वेळीं शेजारपाजारच्या बाया जमून, जुन्या व फाटक्या कपड्यांच्या गोधड्या (वाकळा) शिवीत. खेड्यांत तरी त्या वेळीं गाया दिसत नव्हत्या.

खेड्यांत पुरुष माणसाचें अंथरूणपांघरूण म्हणजे त्याचें घोंगडें. घरीं बैठकी-साठीं एखाद गोणपट असावयाचें. शहरांत सधन लोकांच्या घरीं एक दोन गाद्या असावयाच्या. आमच्या भागांत पलंग वा बाज नसे. बाजल्याचा उपयोग फक्त बाळंतिणीला शेकशेगडी करण्याकरितां करीत. शेतकऱ्यांच्या घरीं बायकांना काय किंवा पुरुषांना काय कपडे कमीच असत. तेच ते कपडे धुवून वापरीत. आमचा भाग मावळ, म्हणजे पाऊस जास्त; शिवाय कापूस न पिकणारा असल्यामुळे कपड्याचा वापर फारसा नसे. सुखी शेतकऱ्याच्या घरीं पुरुषाच्या अंगावर एक खादीचें धोतर (दहाहाती, दुहेरी), नेसावयास चौकोनी दीड हात लांबीरुंदीचा खादीचा रुमाल, डोईस पागोटें व पायांत पायतण. प्रत्येकास एक घोंगडी ठेवावी लागच. तिचा उपयोग रात्रीं पांघरावयास व पावसाळ्यांत इरल्याचें आंत खोळ करून डोईवर घेण्यास होई. फक्त बाजारहाटास अथवा परगांवीं जातांना सुखवस्तु शेतकरी पांच हाती पंजे (पंचा) नेसे व कांहीं जण आंगडें अगरसा किंवा पैरण घालीत. ठेवणीचे कपडे लग्नकार्याच्या वेळीं किंवा सणावाराच्या दिवशीं बाहेर निघायाचें झाल्यास घालीत. बायामाणसांच्या ठेवणीच्या कपड्यांत एक चांगली भाडी वा पैठणी असावयाची. बायकांच्या अंगावर दहापांच पुतळ्या, साजाचे डोरलें, हातांत चांदीचे पोकळ गोठ व पायांत कांशाचीं जोडवीं असत. अर्थात् श्रीमंत लोकांच्या बायका हातांत सोन्याचे गोठ व पायांत चांदीचीं जोडवीं घालीत. असल्या कुटुंबांत एखादें सोन्याचें कडें असे. सणावारीं तें एखादा तरुण हातांत घाली.

त्या काळाडात मुलामुलींचीं लग्नं अल्पवयांत होत, हें अन्यत्र सांगितलेंच आहे. मुलगी सासरीं नांदावयास जातांना तिच्याबरोबर टुरडींतून शिदोरी देण्याचा परिपाठ असे. शिदोरी कधीं पुरणपोळ्यांची, कधीं छुगकामावरीची असावयाची. गांवच्या गुरवानें किंवा न्हाव्यानें शिदोरीची टुरडी डोक्यावरून न्यावयाची. मुलीला पोंचवीत दहावीस शेजारणी गांवाबाहेर यावयाच्या. गांव सोडतांना मुलीच्या व

करड्या वाजवीत. मोठ्या गावात कोणी तरी सुखवस्तु श्रद्धाळु गृहस्थ भजनासाठीं मुद्दाम प्रशस्त जागा राखून ठेवी आणि टाळ, मृदंग, वीणा याची सोय करी. खेडेगावात भजनाची जागा देवळातच असे. शौकिन तरुण शेतकरी सध्याकाळीं जेवणानंतर एकत्र जमून गाणीं म्हणत. गाण्यात लावण्या, पोवाडे, भेदिक गाणीं असत. सणाच्या दिवशीं देवाल्यात सामुदायिक आरतीसाठी लोक जमत, त्या वेळीं गुरव, डवरी, गाधळी व जगम आपआपलीं वाद्य घेऊन हजर राहत. श्रावण महिन्यात आमच्याकडे बरीच उघडीप असे. भाताच्या कोळपणी होऊन गेलेल्या असावयाच्या. अशा वेळीं लोकास—निदान वृद्ध आणि पोक्त माणसास—पुरसत मिळे. याच सुमारास देशभागातील कोणी तरी पुराणिक हटकून यावयाचा व त्यास गावकऱ्याचा आश्रय मिळावयाचा. हे पुराणिक आमचे गावीं ज्योतीबाच्या देवळातील लाकडाच्या सोप्यात बसून रामायण, महाभारत, निदान रामविजय, हरिविजय, अथवा भक्तिविजय वा भक्तलीलामृतासारख्या पोथ्या हावभाव करीत वाचावयाचे व त्याचा सुबोध अर्थ सागावयाचे. त्याच्या गळ्यात गावात मिळत असलेल्या फुलाचे हार असावयाचे. रोजचे अध्याय सपल्यावर सवानी उठून आरती करावयाची व खिरापत (लाह्या व खडीसाखर) वाटून त्या दिवसाचा कार्यक्रम सपवावयाचा व पुराणिकास स्वयपाक करण्यास मोकळें करावयाचे. असल्या पुराणाच्या वेळीं गावातील वृद्ध पुरुष व बाया हजर असत.

आपल्या देशात भाऊबदकी जुन्या काळापासून आहे. राजघराण्यात व ल्हानमोठ्या जहागिरदारातच नव्हे तर मराठा समाजातहि भाऊबदकीचा घातुक वारसा आला आहे, असे म्हणावें लागतें. असे वाटण्याचे कारण अशा तऱ्हेचीं भाडणें मला माझ्या युरोपच्या व अमेरिकेच्या प्रवासात दिसून आलीं नाहींत.

पौराणिक काळीं कौरवपाडवाचीं, ऐतिहासिक काळीं सातारा-कोल्हापुरचीं व मावळातील देशमुखाचीं भाडणे असत. अगदी अलीकडे (स. १९३० पर्यंत सुद्धा) देवास सस्थान मोठी व छोटी पाती यात काय कमी भाऊबदकी होती ? त्याबद्दल लिहिण्याचें हें स्थळ नव्हे. येथे फक्त प्रस्तुत काळच्या आमच्या खेडेगावातील भाऊबदकीची त्रोटक हकीकत देणे जरूर दिसतें.

मला प्रथम स्पष्ट सागितलें पाहिजे की, माझ्या गावातील भाऊबदकी त्या भागातील इतर गावाच्या मानाने पुष्कळ चागली आहे. तथापि आमच्या गावीं भाऊबदकी अगदीच नाही असें म्हणणे बरोबर होणार नाही. त्याअर्थी माझ्या वेळचे खेळ, तमाशे, दळणवळण, ग्रामपचायती, कोर्टकचेऱ्या याची थोडी माहिती मी देत आहे, त्याअर्थी त्या वेळच्या आमच्या भाऊबदकीस वगळणें म्हणजे तिच्यावर अन्याय केल्यासारखें होईल.

माझ्या आजोबाच्या (पितामहाच्या) वेळीं आमच्या गावीं त्यास भाऊबंदकी माहीत नाही. याचे कारण त्याचे भाऊबंद त्याना दबून होते, इतकेच नव्हे तर माझ्या वडिलांच्या वेळीं सुद्धा तसेंच होत. माझे वडील व चुलते आणि चुलत चुलते याच्यात वितुष्ट नव्हत, म्हणून आमचे दूरचे भाऊबंद दबून होते. जरी माझ्या ल्हानपणीं माझ्या गावीं भाऊबंदकीचे तटेबखेडे नव्हते, तरी पुढे माझ्या पिढींत त्यानी वर डोके काढले. आमचे जवळचेच भाऊबंद, म्हणजे माझ्या वडिलाचे भाऊ व चुलत भाऊ, याच्यात चांगला सलोखा होता तरी त्याच्या मुलात म्हणजे माझ्या चुलतभावात व चुलतचुलत भावात भाऊबंदकीने डोकें वर काढलें.

माझ्या ल्हानपणीं माझे चुलते व चुलत चुलते एकोप्याने उसाचा फड उभारीत. चुलत-चुलत्याकडे पाटिलकीचा हक्क नसल्याने पाटिलकीबद्दल वाद उद्भवला नाही. पुढे माझ्या चुलत्याचीं मुलं व चुलत-चुलत्याचीं मुलं यात हळूहळू भाऊबंदकीचें वातावरण उत्पन्न होत चाललें. माझ्या वडिलास चार बधु, पण चुलतभाऊ दोनच, यामुळे माझे वडील व चुलते याच्यापेक्षा, त्याच्या दोन चुलत भावात जमीन जास्त असे. शिवाय एका चुलत-चुलत्याच्या मुलास त्याच्या बायकोकडून कांही दौलत मिळाली होती त्यामुळे चुलत-चुलत्याच्या मुलाचें प्रस्थ वाढलें. याबद्दल माझ्या चुलतभावास व मला हवा वाटला नाही आणि आम्ही आमच्या चुलतचुलत भावाशीं सलोख्याने वागत असू.

माझ्या चुलत्याचीं त्याचप्रमाणे माझ्या चुलत-चुलत्याचीं मुलं कर्तीसवर्ती झालीं, तरी बरेच दिवस माझ्या चुलत्याचीं मुलं चुलत-चुलत्याच्या मुलाच्या कलाने चालत, तोंपर्यंत काही अडचण आली नाही. माझे दोन चुलतभाऊ अगदी तरुणपणींच वारले. त्या वेळीं त्याचीं काही मुलं अगदी ल्हान होतीं. त्याचा सांभाळ माझ्या आईला व मलाच करावा लागला. ही हकीकत दुसरीकडे दिलेली आहे. माझ्या चुलत्याच्या मुलापैकी एक मुलगा हुशार निघाला व तो हळूहळू स्वतंत्रपणें शेतीमाती पाहू लागला, त्याने थोडे पैसेहि मिळविले. मग त्याच्यात (चुलत्याचे नातू व चुलत चुलत्याचे नातू याच्यात) मतभेद होऊ लागले. तेंव्हा चुलत चुलत्याच्या नातवानी माझ्या चुलत्याच्या मुलास व नातवास उसाच्या फडातून वगळलं. त्या मुलाना आधार काय तो माझ्या आईचा व माझा. आईच्या विचाराने मीं त्याना भाडवल पुरवून त्याचा उसाचा फड उभा केला. मी जरी गावीं राहत नव्हतों तरी मलाहि त्या फडात वाटा ठेवावा लागला. हा फड दरा चालला व तेणेंकरून ल्हानशा गावात दोन प्रमुख गट झाले, हेंच आमच्या भाऊबंदकीच कारण.

पुढे एका चुलत चुलत्याच्या मुलग्याने अदूरदर्शीपणाने माझ्या चुलतभावाच्या मुलग्याशीं तटा करून त्यास मारहाण केली. मारहाण करणारा तरुण दुष्ट नाही, पण अजाण व आडदांड आहे, शिवाय तो माझ्या बहिणीचा जावईहि आहे मला जें वाटत होत की आमची भाऊबंदकी वाईट नाही, त असत्य ठरू लागल.

विशेषकरुन मला वाईट वाटण्याचें कारण, ज्या मुलग्याच मारहाण केली, त्याच, त्याच्या भावास व त्याच्या आईस मुख्य आधार म्हणजे मी व माझी आई होतों. या मारामारीबद्दल मला बहिणीच्या जावयाचा व त्याच्या वडिलाचाहि राग आला; तो इतका कीं मी बेचैन झाला व मला ताप चढला. मनांतील रागाची उसळी बाहेर पडल्यावाचून मला आराम पडणार नाहीं असें वाटून, मीं ज्या तरुणानें मारहाण केली त्यास, त्याच्या भावास व बापास बोलावून घेतलें. त्याच वेळी ज्या तरुणास मारहाण केली त्यास व त्याच्या भावास व आईसहि बोलावून घेतलें. नतर सर्वांसमक्ष सांगितलें कीं, "माझें वय बरेंच झालें आहे. मीं सुख भोगलें आहे. मला दैत्यासारखे तीन मुलगे आहेत. आता मला काही मिळवावयाचेंहि राहिलें नाहीं. मी मेलों तरी माझ्या वडिलाचा वंश बुडत नाहीं. लक्षात ठेवा. मला गोळी फारच चांगली मारता येते. हेंहि लक्षात ठेवा कीं, महादेव अगर आनंदराव याच्याशी कोणीं विनाकारण मारामारी केली तर त्याच्यावर मी गोळी घालावयास चुकणार नाहीं." संतापाच्या भरात जें मी बोललों त्याचा इष्ट परिणाम झाला व त्या वेळेपासून पुढे मारामारीचे व दाडगाईचे प्रसंग आले नाहीत.

तथापि भाऊबदकी नाहीशी झाली, असें म्हणावयास मी तयार नाहीं. पण त्यानंतरची भाऊबदकी, जी थोडी आहे ती, कागदी; ती कोर्टकचेरींत चालते. मला हेंहि येथे सांगितलें पाहिजे कीं, ज्या आमच्या भाऊबंदाच्या तरुण मुलानीं तारुण्याचे मदात मारामारी केली, ते आज माझ्या मुलाशीं फार चांगल्या रीतीनें वागतात. आज ते गावाचे पुढारीहि आहेत. माणसानें रागाच्या आहारीं जाऊ नये म्हणतात, पण ज्या बोटावर मोजण्यासारख्या प्रसंगीं, माझा तोल सुटून मी रागाचे आहारी गेलो, त्यांपैकी हा एक प्रसंग होता. काहीहि असो, ह्या माझ्या निकराच्या बोलण्याचा चागला उपयोग झाला. मी व माझीं मुलें, ज्या ज्या वेळीं गावीं जातों, त्या त्या वेळीं आम्ही या आमच्या भाऊबंदाच्या घरीं जातों व त्याचें आदरातिथ्य स्वीकारतो.

गल्या शतकाच्या शेवटच्या दशकातसुद्धा महाराष्ट्रात दळणवळणाचीं साधनें फारच अपुरीं होतीं. माझ्या जन्माच्या आदल्याच वर्षी (१८७६ साली) महाराष्ट्रात मोठा दुष्काळ पडला व माणसांची फार उपासमार होऊ लागली. त्या वेळीं कोल्हापूरचे पोलिटिकल एजट यानी बरींच दुष्काळी कामें काढलीं. त्या दुष्काळात कोल्हापूर आजरा हा मोठा रस्ता बांधण्याचे काम सुरू झालें. त्याच वेळीं माझ्या गावाजवळून जाणाऱ्या पिंपळी-कापशी-मल्लापूर-अणुरकुरा ह्या दुय्यम रस्त्याचें कामहि सुरू झालें. हीं कामें बरेच दिवस चालली होतीं. तत्पूर्वी आमच्या गावच्या वीसपंचवीस मैलांच्या परिसरात घोडागाडी चालण्यासारखा एकहि रस्ता नव्हता. तेव्हां कोल्हापुराहून पन्हाळ्यास व पांड्यास जाण्यास कच्चे रस्ते होते म्हणतात. या दुष्काळात कोल्हापुरच्या इतर

भागातहि असलीं काम झाला. अशा काळीं रस्त्याच्या अभावीं मालाची नेआण करण्याचा एकच माग म्हणजे मुटाचे बैल व घोडे. बैलाच्या पाठीवर मूट घालून, त्यावर गोणी (पोतीं) लादून मालाची नेआण करीत. खेड्यापाड्यातून कापडाचे ल्हान ल्हान व्यापारीसुद्धा, बैलावरुनच लुगडीं, खण, धोतरें वगैरे सणगाचे गठ्ठे आठवड्याच्या बाजारास नेत असत. मी मलकापुरास सन १८९१ सालीं शाळेस गलों, त्या वेळीं कोल्हापूर रत्नागिरी रस्ता तयार असल्याने त्यावर बैलगाडयाची रहदारी बरीच असे. तथापि त्या वेळीं सुद्धा मलकापूर पेठत शेकडो मुटाचे बैल असत. मी ज्या घरीं बिऱ्हाडास असे त्याच्या घरींहि एक मुटाचा बैल (त्याचें नाव हणम्या) होता. त्या बैलावरुन घरातील तरुण खेड्यापाडयातून हरभरे, वाटाणे, मसूर, वगैरे जमा करुन मलकापुरास विक्रीसाठी आणीत. त्याच्या घराजवळच शिंपी जातीचे दोन मिरजकर बंधु राहत. त्याच्याकडे वीसपंचवीस बैलाचा तांडा होता. मिरजकर या बैलाच्या पाठीवरुन वाटाणे, हरभरे, डाळ व इतर धान्यें रत्नागिरी, राजापूर अगर सगमेश्वरास नेत व परत येताना मीठ, नारळ, खोबर वगैरे मलकापुरास आणीत. मला वाटतें, हा त्याचा व्यवसाय निदान सन १९०० पर्यंत तरी चालला असावा. पण जसे रस्ते झाले तशा बैलगाड्या वाढल्या व निदान रस्ते असलेल्या भागात मुटाच्या बैलाची वाहतूक बद पडली. गाडीतून माल नेणें वा बैलाच्या पाठीवरुन माल नेणे हे त्या भागातील रस्ते व इतर सोयी यावर अवलंबून असणार. फार कशाला, आजसुद्धा सह्याद्रीच्या आजूबाजूस मावळात जेथे रेल्वे किंवा बैलगाडी जाण्यासारखे रस्ते नाहीत, तेथे ल्हान ल्हान तट्टावर गोण्या लादून मालाची नेआण करतात. मी सन १९४१ ते १९४५ पर्यंत कोल्हापूर रीजन्सी कौन्सिलात शिक्षणमंत्री असताना, माझ्याकडे जगलखातेंहि असे. त्या वेळीं भुदरगड, कोळीक व पाटगाव भागात बैलावरुन व घोड्यावरुन माल नेताना पाहत असे. मला वाटत, आजहि तेथे तीच पद्धत चालू असावी. देशभागात मात्र आता गोणीचे बैल व घोडी राहिलीं नाहीत. तेथे दराखोरीं नसल्याने, चागल्या सडका नसल्या तरी, कच्या रस्त्याने बैलगाडी नेता येते.

सुमारें सन १८८६ सालीं कोल्हापुरास आगगाडी आली. त्याच्या पूर्वी काही वर्षे पुणे-बंगलोर रेल्वे झाली होती. अलीकडे पचवीस-तीस वर्षांत आगगाडी व बैलगाडी याच्याबरोबर मोटार ट्रकची स्पर्धा चालू आहे. मोटारीबद्दलच्या आठवणी सागण्यापूर्वी ट्रायसिकल (तीनचाकी) व बायसिकल (दुचाकी) मीं केव्हा पाहिली तें सागतो. मलकापुरात इग्रजी दुसऱ्या इयत्तेत शिकत असताना (सन १८९३ ९४ सालीं) मीं प्रथम ट्रायसिकल पाहिली. ती तेथे प्रथम त्या वेळचे तरुण जहागिरदार श्रीमत आबासाहेब यानी आणली होती. येथे हेहि सागणें जरूर आहे की या जहागिरदाराकडे स्वाराचे चार पाच मोठे घोडे व गाडीचे (रथाचे) सहा तरी घोडे असावेत. त्याच्या पागेंत सुमारें साठ घोडेस्वार असत. तरुण जहागिरदार दोन घोड्याच्या रथातून फिरावयास जात. त्या वेळीं रथापुढे दोन व माग दोन असे चार स्वार दौडत. वाड्यातून बाहेर

निघताना व आत जाताना नगारखान्यासाठून रथ आई, त्या वेळीं नगारा वाजविण्याची वहिवाट होती. नगारा वाजला म्हणजे स्वारी आली असे समजून रस्त्यावरील लोक बाजूस उभे राहून श्रीमंतास मुजरे करीत. पेठतून रथ जाताना दुकानदारहि बाहेर येऊन श्रीमंतास आदराने मुजरे करीत. हा देखावा खरोखर राजेशाही दिसे. जहागिरदार त्या वेळीं कोल्हापुरात सरदारहायस्कूलात इंग्रजी शिकत होते. तेथे त्यानी राजाराम हायस्कूलच्या तालीममास्तराची (मि० रुस्तुमजीची) ट्रायसिकल पाहिली होती. तसलीच ट्रायसिकल आनासाहेब यानी सन १८९३।९४ त मलकापुरास आणली होती. जहागिरदार ट्रायसिकलवरून जातानासुद्धा नेहमीप्रमाणे दहा हात रेशीमकाठी धोतर नेसून अंगात अंगरखा, डोकीस जरीकाठी पांढरा रुमाल बांधीत. ट्रायसिकलच्या पुढे दोन व माग दोन घोडेस्वार असत. वाड्याबाहेर नगारखान्यातून निघाले म्हणजे लोक मुजरे करात. अथर्ल हृदय आज विलक्षण वाटेल. पुढे सन १८९४ त मी कोल्हापूर हायस्कूलमध्ये गेलों, त्या वेळीं मीहि आमच्या तालीम मास्तराची ट्रायसिकल पाहिली. पुढे लवकरच शहरात दोन बायसिकली दिसू लागल्या; एक बाळासाहेब गायकवाड (इनामदार) यांची व दुसरी कार्वेकर नावाच्या खिश्चन विद्यार्थ्याची. कार्वेकर माझ्या वर्गात होते.

पहिली मोटारगाडी मी मुंबईस मॅट्रिकच्या परीक्षेस गेलो होतो त्या वेळीं (सन १८९९ च्या डिसेंबरात) पाहिली. ही मोटार लाकडाच्या छत्र बिनटपाची होती. मोटार चालली म्हणजे लोक अचंब्याने तिच्याकडे पाहत, व उभी राहिली म्हणजे तिच्या सभोवार लोकांची गर्दी जमे.

ज्या कोल्हापुरात सन १८९४ मध्ये दोन बायसिकली होत्या, त्याच शहरात आज (१९६३।६४ सालीं) १४,००० सायकली, ४६२ मोटारी व सुमारें २७५ बसेस आहेत. १८९९ साली ज्या मुंबई शहरात पहिली मोटार दिसली तेथे आज सुमारें ९०,००० मोटारी दिसतात. पन्नास साठ वर्षांत केवढा हा फरक!!

मी मलकापुरास असताना कोल्हापूरचें टपाल एक माणूस पिशवी पाठीवर बांधून नेत असे. हातात घुंगुर बांधलेला सुमारें पाच फूट लांबीचा भाला घेऊन तो दुडक्या चालीने जलद जात असे. गावातून अगर गावाजवळून जाताना पळत जात असे. म्हणून या व्यक्तीला दुरदुडक्या असं म्हणत. सुमारें दहा मैलांवर त्याला दुसरा माणूस भेटे. पुढे पत्रव्यवहार वाढला तेव्हा हातगाडीतून दोन माणसं टपाल नेत. इकरल्यावर लोकांची ये-जा वाढली व लोक टांग्यातून जाऊ लागले. या वेळीं घोड्याचे टपालटांगे झाले. हे काम मक्त्याने दिलें जाई. मक्तेदार टांग ठेवीत. अशा टांग्यांतून टपालाबरोबर उतारूहि येत असत. जवे रेल्वेची सोय झाली तेव्हा टपाल रेल्वेतून जाई. सर रघुनाथराव सबनीस (कोल्हापूरचे माजी दिवाण) सांगत की, "आम्ही मॅट्रिकच्या परीक्षेस टांग्यातूनच कोल्हापुरातून पुण्यास गेलो होतो. त्या वेळीं पुणे-मिरज रेल्वे नव्हती." मलकापुरास रेल्वे फार उशिरा

आली. मी तेराचौदा वर्षांचा असताना, छत्रपति शाहूमहाराजांचें (१८९१ सालीं) लग्न झालें, त्या वेळी प्रथमच मीं आगगाडी पाहिली. एखादे वर्षेच आधी ही व्यवस्था झाली असावी. मावळ भागांतून लग्नमहोत्सव पाहण्यास हजारो लोक कोल्हापुरास आले होते. त्यांतील पुष्कळ लोक आगगाडी कशी चालते त पाहण्यास स्टेशनच्या आसपास उभे राहत. काही जाता तर दुरूनच गाडीला नमस्कार करून नारळ फोडीत. त्यांना आगगाडी हा दैवी चमत्कार वाटे. मिरज पढरपूर रेल्वे तर अगदी अलीकडे झाली.

मी त्या वेळीं मल्कापुरास मराठी चौथी इयत्ता शिकण्यास गेलों, त्या वेळीं तेथे एक पोस्ट ऑफिस होत. जवळपास वीस मैलांच्या परिसरात दुसरें पोस्ट ऑफिस नव्हतें. मला वाटतें, त्या वेळीं फक्त तालुक्याच्या मुख्य ठिकाणींच पोस्टाची सोय असे. मल्कापूर पोस्ट ऑफिसात त्या जहागिरींतील चौसष्ट खेड्यांतील पत्रांचा बटवडा करण्यासाठी एकच पोस्टमन असावा. ही व्यवस्था सन १९४०पर्यंत चालली असावी; मला नक्की सागता येणार नाही. पोस्टमन आठवड्यातून एकदाच खेड्यांतील पत्रे वाटी. तो फक्त मोठ्या गावीं जाई. माझा गाव ल्हान असल्याने पोस्टमन पत्रें एक तर आमच्या गावचा कोणी माणूस मल्कापुरास बाजारास गला तर त्याच्याजवळ देई किंवा कापशीस गेला तर तेथील कोणाजवळ तरी देई. माझी मनीऑर्डर गली तर मात्र माझ्या वडिलास सागून पाठवी, अगर ती जास्ती रकमेची असल्यास आमच्या गावींहि जाई. कारण त्या वेळीं त्यास चार सहा आणे बक्षीस मिळत असावेत. वडिलांच्या जमाखर्चांत तशा काही नोंदी आहेत. त्या काळीं लोकांत पत्रव्यवहार कमी असे. शिवाय कोल्हापूर संस्थानात गावाशीं होणारा सरकारी पत्रव्यवहार मुल्की शिपायामार्फत होई. ही जुनी पद्धत सन १९४२ साली मी रीजन्सी कौन्सिलात असताना बद झाली, व सरकारी टपालसुद्धा पोस्टामार्फत जाऊ येऊ लागलें.

तारखात्याची स्थापना पोस्टखात्याबरोबरच झाली असावी. ल्हानल्हान शहरात पोस्टमास्तर व तारमास्तर एकच असे. शहरात जरी तार पाठविण्याची सोय असे, तरी खेडेगावात तारा पोस्टाच्या शिपायाबरोबरच जात.

विमानाची कल्पना व सोय अगदी अलीकडची आहे. मी कोल्हापूर हाय स्कूलमध्ये असताना सुमारें १८९६–९७ सालीं एक जण वैमानिक म्हणून आला होता. त्याच्याजवळ सुमारें पधरा-वीस फूट व्यासाचे एक पातळ मेणकापडी बलून होतें. त्यात उष्ण हवा अगर दुसरा कसला तरी धूर भरण्याची सोय असे. बलून चागलें भरलें म्हणजे उभें केलेल्या जागीं तंबूप्रमाणे दिसे. त्याच्या बुडाशीं ल्हान तोंड असून तें सरकगोरीनें बद करण्याची सोय असे. त्याच्या तोंडास वैमानिकास बसण्यासाठी हलकेंसें मचान असे, आणि त्यावर तो माणूस एक कापडाचें पॅराशूट (छत्री) घेऊन बसे. नवर त्याचे साथीदार जमिनीस जखडलेलें तें बलून सोडीत. वरून हळूहळू वर जाई. मला वाटतें, तें तीनचारशे फुटाच्या वर गेल्यावर वैमानिक

'पॅराशूट' घेऊन खाली उडी टाकी. उडी टाकण्यापूर्वी बलूनच्या तोंडाची सरकदोरी ओढून मग उडी टाकी. बलूनमधील हवा कमी होत गेल्यावर तें वाऱ्याने वाहत वाहत मैल-दोन-मैलावर जाऊन पडे. पॅराशूट खाली येत असता आपोआप उघडे व तें त्या माणसासह हळूहळू वाऱ्याच्या झोताबरोबर खाली येई. महाराजांनी बरेच घोडेस्वार मैदानात उभे केले होते. ते बलून व पॅराशूट जातील तिकडे ते जात. चांगली उघडी जागा पाहून वैमानिकाने पॅराशूटसह खाली उडी टाकली व उतरला. त्याला फारसा धक्का लागला नाही. बलून पुढे एका झाडावर पडले. हेंच मीं पाहिलेलें पहिलें विमान. पुढे मीं दुसरें विमान अमेरिकेत (सन १९२१-२२ सालीं) मॅडिसन विस्कॉन्सिन) युनिव्हर्सिटीत पाहिलें. मी त्यांत बसलो नव्हतों. मला वाटतें, पुढे कांही दिवसांनी पुण्यास सुमारें १९२७-२८ सालीं एक लहानसें विमान आलें होतें. त्यात सातआठ माणसें बसूं शकत. सुमारे वीसपंचवीस मिनिटांच्या हवेंतील फेर-फटक्याच १२ रुपये तिकीट होतें. मी त्यांत बसलो नाहीं, पण माझी पत्नी बसली होती. पुढे विमानाची ये जा सुरू झाल्यावर पुष्कळ वेळां मी विमानांतून ग्वाल्हेरास, दिल्लीस व श्रीनगरला गेलो होतों. पण हीं विमानें खेळवजा नव्हतीं. तीं विमानें मोठीं असून त्यात सुधारणा झाल्या होत्या.

डाव्या बाजूस मराठ्याचा असे मोठाले दोन हौद होते. त्यातील मोठाल्या कारंजातून पाणी सारखे उच उडत राही. त्यापैकी उजवीकडचा होद अलीकडेच बुजविला गेला. देवालयाच्या आवारातील, दत्ताच्या देवालयाच्या मागे असलेलें मनकर्णिका कुंडहि बुजविले गेले. हे लक्षात ठेवणे जरूर आहे की, हे हौद व कुंडें फार गलिच्छ झाली होतीं. हौदाशेजारच्या घरातील मोऱ्यांचे पाणी त्यात पडत होतें. देवळाचे चारहि दरवाजे चांगल्या स्थितीत आहेत. मुख्य जुने देऊळ तसेच आहे. फरक एवढाच की, त्या वेळीं देवालयात मिणमिणत्या पणत्या असत, त्याऐवजी आता झगझगीत विजेच्या बत्त्या आल्या आहेत. दुसरा मोठा बदल म्हणजे गाभाऱ्यात ब्राह्मणेतरास जाण्यास मनाई असे. आता पुजाऱ्यास तसा कायद्याने मज्जाव करता येत नाही; तरी पण ब्राह्मणेतरास त्रास होतोच.

महाद्वारातून परत बाहेर पडल्यावर रस्त्याच्या पलीकडे लहानसें तळें होतें. त्यास कपिलतीर्थ म्हणत. ते अलीकडे बुजविलें गेले आणि आता त्या प्रशस्त जागेत भाजीपाला, फळफळावळ, कडधान्यें, डाळी व तांदूळ यांचा मोठा बाजार भरतो. पश्चिमेस रंकाळ्याकडे जाताना वाटेंत बुधवारपेठेकडे (आताच्या शिवाजी पेठेकडे) जो 'वरुणतीर्थ' नावाचा तलाव होता, तोहि बुजवून आता तेथे महात्मा गांधींचा भव्य पुतळा उभारला गेला आहे. या सोलगट भागाचा एक मोठा उघडा आखाडा (स्टेडियम) करावा, अशी आमच्या रीजन्सी कौन्सिलची कल्पना होती, पण ती कल्पना अमलात येण्यापूर्वीच रीजन्सी कौन्सिल बरखास्त झाले.

या वरुणतीर्थातील पाणी उत्तरेच्या सखल भागातून (साकोलीमधून) पुढे जाई. साकोलींत फारच दलदल असे. या दलदलींत रोज गाड्याच्या गाड्या आळू निघे. शहरास बाराहि महिने आळूची भाजी मिळे. आता साकोलीतील दलदलीचा निचरा करून ती कोरडी केली आहे व त्या जागवर उत्तम इमारती झाल्या आहेत. त्र्यंबोलीजवळ खराळें म्हणून लहानसेंच पण खोल तळें असे, तेंहि आता बुजविलें गेले आहे. शहराच्या बाहेर दक्षिणेस पद्माळें तळें होतें. त्याच्या समोवार कै० छत्रपति राजाराममहाराजांनी रेसकोर्स तयार केला होता. या तलावांत गाळ फार साचल्यामुळे रीजन्सी कौन्सिलने त्यातील पाणी काढून ती जागा शेतीखाली आणली आहे. रेसकोर्सच्या इमारतींत व्हेटरनरी दवाखाना आला आहे व उत्तरेच्या बाजूस एक मोठी शाळा बांधली आहे. त्या वेळीं म्युनिसिपालिटी, शेतकी, शिक्षण व व्हेटरनरी खातीं माझ्याकडे होतीं. खाराळें व महारतळें हीं दोन गाळाने भरलेलीं तळीं शहराच्या मध्यभागीं होतीं. खाराळें होतें त्या ठिकाणीं आता एस्० टी० स्टँड झाला असून त्यास लक्ष्मीपुरी असें म्हणतात. याशिवाय पूर्वभागात कोटी तीर्थ होतें. पश्चिमेस रंकाळा तलाव चांगल्या स्थितींत आहे. इतर तीर्थें नामशेष झालीं आहेत.

राजाराम हायस्कुलात मी शिकत असताना विद्यार्थ्यांची संख्या छहाशेपर्यंत असावी. पहिल्या पाच इयत्ता गुजराच्या पश्चिम टोकास नागपूरकराच्या वाड्यात

असत, आणि सहावी व मॅट्रिकचे वर्ग नगारखान्याजवळील हायस्कुलांत असत. याच जागत राजाराम कॉलेजचे प्रीव्हियस व इंटरमीजिएट हे दोन्ही वर्ग असत. कॉलेजच्या या दोन्ही वर्गांत मिळून सुमारें पाऊणशे विद्यार्थी असावयाचे.

सन १९०० सालीं राजाराम कॉलेजमध्ये फक्त दोनच मुली होत्या. मी प्रीव्हियस मध्ये असताना माझ्या वर्गात यमू वेळवकर नावाची एक मुलगी होती. मुलींनी हायस्कुलांत व कॉलेजांत जाणें म्हणजे त्या काळीं एक दिव्य असे. लोक, विशेषत: पुढारलेल्या जातींतील स्त्रीपुरुष, त्याना नांवें ठेवीत आणि तरुण मुले त्यांची फार चेष्टा करीत; वर्गात त्याना शिक्षकाच्या टेबलाजवळ बसण्याची सोय केली जाई. त्या वेळीं राजाराम हायस्कूलमध्येसुद्धा बी० ए० झालेले शिक्षक फार थोडे होते राजाराम हायस्कूलशिवाय दुसरीं तीन लहानलहान हायस्कुलें (प्रायव्हेट हायस्कूल, न्यू इंग्लिश स्कूल व मिशन हायस्कूल) होतीं. मिशन हायस्कूल शहर म्युनिसिपालिटीच्या पश्चिमेस एका खासगी वाड्यात होतें.

राजाराम कॉलेज व राजाराम हायस्कूल या दोहाचे प्रिन्सिपल मि० कँडी नावाचे एक इंग्रज गृहस्थ होते, व व्हाइस प्रिन्सिपल श्रीयुत परांजपे व नंतर मि० दस्तूर नावाचे पार्शी गृहस्थ होते. कँडी व दस्तूर साहेबी पोशाखात यावयाचे. या दोघाखेरीज बाकीचे प्रोफेसर व शिक्षक धोतर नेसून, पायांत लाल जोडे, डोकीस रुमाल व अंगात पैरण व कोट घालून येत. बहुतेकांच्या मिशा लांब असत. वर्गात ब्राह्मण, वैश्य व लिंगायतांचीं मुलें डोकीस रुमाल घालीत, मराठ्यांचीं मुलें पटके बांधीत. आताच्याप्रमाणे वर्गात कोणीहि बोडके येऊ शकत नसत. त्या काळीं कोणी बोडका गृहस्थ किंवा विधवा बाई आडवी गल्यास अपशकुन मानला जाई. माझ्या वेळीं कोल्हापुरात डोक्यास टोपी घालण्याची वहिवाट नव्हती. पण पुण्या मुंबईकडे बरेच विद्यार्थी टोप्या (हंगेरियन कॅप) घालीत.

सन १८८९च्या सुमारास कोल्हापुरास प्रथमच आगगाडी आली. त्या वेळीं शहराच्या बाहेर पूर्वेस स्टेशन बांधलें गलें. पुष्कळ वर्षे जवळपास इमारती नव्हत्या. कै० श्री० गोविंदराव कोरगावकर सांगत की, शाहूमहाराज व्यापाऱ्याना बोलावून आणून "स्टेशनजवळ घरे बांधा, आम्ही जागा फुकट देतों" असें सांगत. महाराजानी त्याना, कै० श्रीमंत बाळासाहेब मिरजकर, जिवाजीराव सावंत, दत्ताजीराव कागलकर, दत्ताजीराव इंगळे व बाळासाहेब गायकवाड, त्याचप्रमाणे स्टेशनाच्या पाठीमागं चिंचलीकर, घोरपडे, विचारे व जाधवराव याना फुकट जागा देऊन तेथील वस्ती वाढविली व हळूहळू शाहूपुरी वसती गेली. कोल्हापुरास त्या काळीं गुळाची बाजारपेठ नव्हती हें ऐकून आजच्या पिढीस आश्चर्य वाटेल. गूळबाजार शाहूपुरी वसविल्यानंतर सन १९०४-५ साली आला असावा. आजचे स्वतंत्र गूळ-मार्केट व त्यासाठी रेल्वेस्टेशन हीं अगदी अलीकडचीं आहेत.

त्या काळींसुद्धा शहरांत पेठापेठांनी तालमी असत. कोल्हापूरचे लोक कुस्तीचे शौकीन असत व आजहि आहेत. जशा पुण्यातील विद्वान् लोकानी हौसेने, झीज सोसून,

इंग्रजी शाळा काढल्या, तथा कोल्हापुरातील शौकीन वस्तादानी आपआपल्या पेठेतील लोकांच्या मदतीने प्रशस्त व भक्कम तालमी बांधल्या व त्यात आपली स्वत:ची थोडीफार कमाईहि ओतली.

कोल्हापुरात त्या काळीं एकहि चहाकॉफीचें दुकान नव्हतें. चहाकॉफीची लोकाना ओळखसुद्धा नव्हती, असें म्हटलें तरी चालेल. आताच्याप्रमाणे विश्रांतिगृहेंहि नव्हतीं. अंबाबाईच्या देवळासमोर, महाद्वार रोडवर एका दुकानात मसाल्याचें दूध मिळे. तेथे खुर्ची वा टेबल नसे. एकदोन लाकडी पाट मात्र असत. चहाकॉफीचा व सिगरेटचा खप होण्यासाठी युरोपियन व्यापारी फार खटपट करीत व त्या कामीं झीजहि सोशीत. याचें १९११ सालीं मीं पाहिलेलें उदाहरण मनोरंजक होईल. सन १९११ च्या डिसेंबरात अलहाबादेस एक मोठें शेतकी प्रदर्शन भरलें होत. मुंबई सरकारच्या शेतकी खात्याने मला तें पाहण्यास पाठविलें होतें. या प्रदर्शनात आसामातील एका युरोपियन कंपनीने एक मोठा चहा कॉफी स्टॉल उभारला होता. या स्टॉलमध्ये निरनिराळ्या प्रतींच्या चहाचे, कॉफीचे व बिस्किटाचे नमुने आकर्षक रीतीने माडले होते. या स्टॉलच्या जवळच दोन शामियाने उभारून, त्यात लोकाना चहाबिस्किटें खाण्यासाठी, टेबल व खुर्च्या ठेविल्या होत्या. कंपनीचे नोकर लोकाना चहा, कॉफी व बिस्किटें देत. टेबलावर सिगरेटच्या व काड्यांच्या पेट्या ठेवलेल्या असत. कशाबद्दलहि पैसे द्यावे लागत नसत. बाहेर जाताना चार कप चहा होइल इतकी चहाची पूड, सुंदर कागदी पिशवींतून देत. या पिशवीवर चांगला चहा कसा करावा याची माहिती दिलेली असे. चहाकॉफीचा शामियाना सोडून बाहेर जाताना सिगरेट पाहिजेत का? म्हणून कंपनीचे नोकर विचारीत. गंमत पाहण्यास जमलेल्या बघ्यांच्या घोळक्यात सिगरेट फेकीतहि. अशा प्रदर्शनात युरोपियन व्यापाऱ्यानी मुक्त हाताने केलेला खर्च फुकट गेला नाही. लोकाना चहा कॉफी व चिरूट सिगरेटचें व्यसन लागलें आणि युरोपियन व्यापाऱ्यानी पुढे खूप पैसे मिळविले.

आता मध्येच सोडलेल्या अंबाबाईच्या देवळापुढील मसाल्याच्या दुधाची व मिठाईच्या दुकानाची हकीकत सागतों. महाद्वारात मिठाईचीं फक्त दोन दुकानें होतीं, एक मिठाईचें दुकान गुजरीच्या पूर्व टोकास असे. शहरात ब्राह्मणांच्या दोनतीन खानावळी होत्या. त्यात ब्राह्मणेतरास घेत नसत. सध्याच्यासारख्या शाकाहारी व मांसाहारी खानावळी (हॉटेल) त्या काळीं नव्हत्या.

तसेच सकाळीं चहानवर ब्रेकफास्ट (न्याहारी) घेण्याची वहिवाट नव्हती. फार तर लहान मुलाना पिसट (मऊ भात) देत. फक्त दुपारीं एक जेवण व संध्याकाळीं एक जेवण घेण्याची वहिवाट होती. शहरांत एकच लक्ष्मीविलास नांवाचें नाटकगृह होतें. वर्षातून एकदोन वेळ एखादी नाटक कंपनी आठपधरा दिवस कोल्हापुरास येई. थिएटर-सिनेमा निघाले नव्हते.

पंचगंगवर स्नानास जाणाराची गर्दी असे; पण तेथहि खोबळंओबळें असे. तेथे मोठाले तीन घाट होते. आजहि ते दिसतात. त्यात एक 'ब्राह्मणघाट' असे, दुसऱ्यास 'रजपूतघाट' व तिसऱ्यास 'शूद्रघाट' म्हणत.

कोल्हापुरास सन १८९५-९६ साली फक्त एकच बायसिकल (दुचाकी) दिसे. मोटारी नव्हत्या. बसेस तर अगदी अलीकडच्या आहेत. त्या वेळीं घोड्याचे टांगे व बैलाच्या धमन्या (सारवटी) होत्या. राजवाड्यावर चारचाकी घोड्याचे रथ असत. त्याच्या चाकांना लोखंडी धावा असत. या रथाचा घडघड आवाज ऐकू येताच 'स्वारी' (महाराज) आली, असें लोक ओळखत. हुजूरस्वारीच्या रथाच्या मागें व पुढे लाल डगलेवाले स्वार असत, व त्यांच्या हातांत लाल झेंडा असलेले भाले असत. त्यांच्या डोक्यास पट्टयापट्टयाचा मोठा साफा असे व पायांत गुडघ्यापर्यंत लांब बूट असत. लोकांना राजाबद्दल व राजघराण्याबद्दल फार आदर असे; म्हणून रथाचा घडघड आवाज ऐकताच पेठेतील दुकानदार बाहेर मुजरा करावयास येत. तसेंच, रस्त्यावरील पादचारी लोक अदबीनें उभे राहून, महाराजास वाकून मुजरे करीत.

आमच्या पिढीनें जे राजेरजवाडे, जहागिरदार इनामदार पाहिले, इंग्रज रियासत पाहिली, तसें आमच्या पूर्वीच्या पिढीस पाहावयास मिळालें नव्हतें व पुढच्या पिढीस पाहावयास मिळणार नाहीत. आम्ही हिंदुस्थानातील देशी व इंग्रजी राज्यपद्धत पाहिली; तिचा ऱ्हास पाहिला व तिच्या जागीं आलेलें प्रजासत्ताक स्वराज्य पाहात आहात. जुने हिंदी राजे जरी इंग्रजी आधिपत्याखाली होते, तरी ते सर्वाधिकारीच होते. माझ्या लहानपणचा काळ स्वस्थतेचा होता. राज्यातील लोकांवर कसलीच जबाबदारी नव्हती. बहुतेक हिंदी राजे ख्यालीखुशालींत जास्त वेळ घालवीत. कोठेहि जा—मी निदान मोठ्या संस्थानापैकी म्हैसूर, कोल्हापूर, ग्वाल्हेर, इंदूर व बडोदें येथील स्वाऱ्या पाहिल्या आहेत—हिंदी राज्यात ठराविक सणाच्या दिवशीं, राजाची, आपल्या लवाजम्यासह अठरा कारखाने घेऊन, जंगी स्वारी (मिरवणूक) निघे. उदाहरणार्थ, कोल्हापुरात दसऱ्यात, पांचव्या माळेच्या दिवशीं (पंचमीच्या दिवशीं) किंवा सीमोल्लंघनाच्या दिवशीं स्वारी निघे. स्वारींत रिसाला, पायदळ व तोफखाना असे. रिसाल्यास कोल्हापुरात लालडगलाहि म्हणत, कारण घोडेस्वाराच्या अंगात तांबड्या रंगाच्या बनातीचे डगले असत. पायात गुडघ्यापर्यंत बूट, डोईस मोठा पट्टया पट्टयाचा साफा, कमरेस लांब तरवार, हातात निशाण फडकत असलेला भाला असे. तोफा ओढविलेल्या गाड्यास शृंगारलेले उत्तम एकजात एकरंगाचे बैल असावयाचे. बैल सजविलेले असून त्यांच्या अंगावर किंमती झुली असावयाच्या. तोफांची रांगच्या रांग असावयाची. त्याचबरोबर शिकारीच्या चित्त्याच्या चारसहा गाड्या असावयाच्या. चित्त्यांच्या अंगावर किंमती झुली असावयाच्या. पायदळात शिपायांच्या खांद्यावर बंदूक व कमरेस तरवार असावयाची. कवायतीच्या पल्टणीबरोबर (इन्फन्ट्री) जुन्या चालीच्या लष्करफडातील शिपायांच्या रांगा असावयाच्या.

स्वारींत चारसहा मोठाले हत्ती असावयाचे. कोल्हापूर व बडोदें येथे महाराज सोन्याच्या अंबारीत बसत. बरोबर चवऱ्या व मोर्चेलवाले असत. काही हत्तींवर चांदीचे हौदे असत. हत्तींची झाड व कान रंगवून, त्यांच्या गळ्यांत दागिने घालून सजविलेले असत. दोन्ही बाजूस पाठीवर लोंबत्या घंटा असत. त्या हत्तींच्या डौलदार चालीवर ठणठण वाजत. काही हत्तींबरोबर साठमार चालत असत. बरोबर दहापांच शृंगारलेले घोडे असत. घोड्याच्या गळ्यात चांदीच्या वा चांदीचें पाणी दिलेल्या कोयऱ्यांच्या माळा, आयाळाच्या केसांच्या रंगीत रेशमात विणलेल्या वेण्या, गळ्याखाली लोंबणाऱ्या चवऱ्या, चांदीचें पाणी दिलेल्या मुदाच्या लेंड्या व खोगिरावर भरजरी जरतारी झुली असावयाच्या. घोड्याच्या एका पायाच्या गुडघ्यात चांदीचा खुळखुळ वाजणारा मोठा पोकळ वाळा, रंगदार जगर रेशमी म्होरकी, त्यावर दोन्ही कानाच्या-मध्ये तुरा, आखडून बांधलेल्या लगाम व सोंगत ठराविक प्रकारचे कपडे घालून चालणारा मोतद्दार असा घोड्यांचा थाट असे. कवायती पल्टण-एकजात सारखी चाले. लष्करफडाचे शिपाई मान मराळच दिसत, हे खरे!

स्वारीबरोबर चौघड्याचे हत्ती, उंट, शिवाय बँड, शिंगें, म्हलारवाल्या व हल्ग्या वाजत असावयाच्या. स्वारी जात असता पादचारी रस्त्याच्या बाजूस उभे राहून मुजरे करीत. काही स्वाऱ्यांत कलावंतिणींचे ताफे असत; स्वारीबरोबर सरदार, मानकरी, घोड्यांच्या रथांतून अथवा घोड्यावरून जात असत. कोल्हापुरास दसऱ्यात पंचमीच्या दिवशीं असली स्वारी जुन्या राजवाड्यांतून निघून दीड दोन मैलावर असलेल्या टेंबलाईचे दर्शनास जाई. तसेच, सीमोल्लंघनाच्या दिवशीं संध्याकाळीं सोनें लुटण्यास (शमीपूजनास) स्वारी दसरा चौकात जाई. शमीपूजन संपताच अकरा तोफांची सलामी होई व गावात एकमेकामध्ये सोने वाटण्यास आरंभ होई. स्वारी राजवाड्यात परत आल्यावर काही वेळाने दरबारात स्वारीस सोनें (आपट्याचीं पानें) देण्याचा समारंभ होई. नेहमी, स्वारीचा घोड्याचा रथ नगारखान्याच्या दरवाजांतून बाहेर जाताना किंवा वाड्यात येताना नगारा वाजे. नगाऱ्याचा आवाज ऐकताच लोकांस स्वारी येत असल्याचे कळे. पादचारी तेथल्या तेथे उभे राहून स्वारीला अदबीने मुजरे करीत, व व्यापारी दुकानदारहि बाहेर येऊन वाकून मुजरे करीत.

शाहूमहाराजांच्या काळीं, वेळोवेळीं कुस्त्यांची मैदाने व्हावयाचीं. साठमाऱ्या व्हावयाच्या. साठमारीचा खेळ फार धोक्याचा असे. साठमाराच मैदान मोठं असून ठराविक पद्धतीवरच बांधावं लागत. साठमार हत्तीस चिडवतात, तेव्हा हत्ती चाल करून एखाद्या साठमारावर चालून जातो. अशा वेळीं दुसरे साठमार चपळाईने त्यास वाचविण्यासाठी हत्तीला मागून भाल्याने टोचतात. हत्ती मागे फिरताच ते आपल्या लपण्याच्या जागा गाठतात. हीच गंमत असते, पण त्यात धोकाहि असतो. पाहून एकदीन वेळा नव्या राजवाड्यावरच्या दरबार हॉलात दरबार भरे. दरबारात जहागिरदार, मानकरी व अधिकारी यांच्या ठराविक जागा असत.

असले प्रकार संस्थानातच होत, असें नाही. ब्रिटिश अमदानींत मुंबईप्रांताचे गव्हर्नर, पावसाळ्याच्या मोसमात, पुण्यास गणेशखिंड बंगल्यात (ज्या इमारती स्वराज्य मिळाल्यावर पुणें विश्वविद्यालयास दिल्या गेल्या त्यात) मोठा ल्वाज्मा घेऊन राहत. त्या हंगामात ते एक मोठी लेव्ही (दरबार) भरवीत. ह्या दरबारास जरी काही मोठ्या लोकाना आमंत्रण असल, तरी बहुतेक अधिकाऱ्यास गव्हर्नरसाहेबाच्या सेक्रेटरीस लिहून आमंत्रण मागून घ्यावें लागे. दरबारास जाऊं इच्छिणाऱ्या लोकास एक तर खास युरोपियन तऱ्हेचा अगर पूर्ण हिंदी पद्धतीचा पोशाख घालवा लागे. दरबारात जाताना गव्हर्नरसाहेबाचे ए० डी० सी० हे लोकाचे पोशाख निरखून पाहत कॉलर, नेकटाय व बूट इत्यादिक पद्धतीचे नसले तर त्या लोकाना ते बदलून येण्यास सांगत. दरबार हॉलमध्ये गेल्यावर गव्हर्नरसाहेबाशीं कसा हात मिळवावा, ह्याची तालीम होई. गव्हर्नरसाहेब दरबार हॉलमध्ये येताच त्याना खडी ताजीम द्यावी लागे.

मला रावबहादूर पदवी असल्याने व मी आय्० ए० एस्० मधील नोकर असल्याने मला लेव्हीस जावें लागे व मलाहि असली कवाईत करावी लागे. दरबार खलास झाल्यावर बागत चहापार्टी होई. निरनिराळ्या प्रकारची पेयें व दारूहि ठेविलेली असे. पार्टी झाल्यावर घोड्याचे खेळ होत नतर रिसाल्यातील लोकाचे पेग स्टिकिंग (भरधाव घोड्यावरून जाता जाता भाल्याने अल्गत जमिनींत रोवलेल्या खुंट्या उचलणें) होई.

हा झाला प्रांतिक गव्हर्नरचा दरबार. ह्याशिवाय पुण्यास डेक्कन सरदाराचा दरबार डिस्ट्रिक्ट जज्जाचे अध्यक्षतेखाली होई. त्यात लहान लहान राजे, जहागिरदार व पदवी मिळालेले सरकारी व खाजगी लोक याना जावें लागे. त्यातहि कोणाची कोणती खुर्ची हें ठरलेलं असे. ह्या दरबारातील खुर्चीस सुद्धा त्या वेळचे सरदार हपापलेले दिसत. मी हजर असलेल्या एका दरबारात फल्टणचे फार वृद्ध राजे बापूसाहेब आलेले दिसले. त्याना मुख्य दरवाजापासून आपल्या खुर्चीपर्यंत चालण्याची ताकद नव्हती, म्हणून त्याना दरवाजापासून खुर्चीपर्यंत पालखीतून आणावें लागले.

इतकेंच काय, १९११ सालीं हिंदुस्थानचे मरहूम राजाधिराज पंचम जॉर्ज व महाराणी मेरी यांच्या आगमनाप्रीत्यर्थ दिल्लीस (त्या वेळीं आताची नवी दिल्ली नव्हती) मोठा दरबार भरला होता. याच प्रसंगीं नव्या दिल्ली राजधानीचा पाया घातला गेला. या दरबारास हिंदुस्थानातील बहुतेक संस्थानिक आपआपल्या वैभवासहित आले होते. माझ्या एका स्नेही राजाने (मालोजीराव घोरपडे, राजेसाहेब मुधोळ, यांनी) मला आग्रह करून दरबार पाहण्यास नेलं होतें. त्या वेळीं कोल्हापूरचे शाहू छत्रपतीहि दिल्लीस गले होते. ह्या वशिल्याने मला प्रेक्षकांच्या मंडपात चागली जागा मिळाली होती. सदर दरबारात प्रथम लॉर्ड हार्डिंज, नतर कमांडर इन चीफ (सरसेनापति) व व्हाइसरॉयच्या कौंसिलचे सभासद ह्याचे मुजरे झाले. नतर हैदराबादचे हल्लीचे निझाम (हे त्या वेळीं तरुण असून त्यांना नुकतीच मुखत्यारी

मिळाली होती) ह्यानी मुजरा केला. त्यानतर श्रीमत सयाजीराव महाराज गायकवाड, बडोदे, याची पाळी आली. त्यानीहि मान वाकवून मुजरा केला; पण घाईतीत मुजरा करुन मागे सरत सरत जाण्याऐवजी मागे वळून आपल्या जागीं गेले. शिवाय महाराजानी त्या दिवशीं जी० सी० आय्‌०चा चादहि गळ्यात घातला नव्हता. महाराज स्वराज्यवादी आहेत असें सर्व लोक मानीत. चोहोंकडे महाराजाच्यावर काहूर उठले, व खुद्द नामदार गोपाळ कृष्ण गोखले यानी सल्ला दिली की, महाराजानी दिलगिरी व्यक्त करुन माफी मागावी. तेवढ्यावर सुद्धा मागलें नाही व महाराजाना आपल्या काही विश्वासू अधिकाऱ्याना काढून टाकावें लागले. या दिल्ली दरबारास हजर असलेल्या राजे महाराजापैकी आज फक्त हैदराबादचे निझाम व इंदूरचे सर तुकोजीराव तेवढे दिसतात.

पुणे शहरास गतकाळीं पेशव्याची राजधानी म्हणून महत्त्व होतें. आजहि राजकीय क्षेत्रात पुण्यास महत्त्व आहे. बदलत्या काळात पुणे आपल्या जबाबदारीस जागलें नाही, असें म्हणता येणार नाही. मराठा राज्य नष्ट झाल्यावर पुण्यातील पुढाऱ्यानी राष्ट्रीयवादाची चूड विझू दिली नाही. जरी पुढाऱ्यात जहाल व प्रागतिक असे भेद पडले तरी दोघाचाहि मुख्य हेतु एकच होता. शैक्षणिक क्षेत्रात तर पुणे आघाडीवर राहिले.

पेशवे साताऱ्या छत्रपतींचे सर्वाधिकारी बनल्यावर पुण्यास विशेष महत्त्व आलें. पहिले बाजीराव महत्त्वाकांक्षी कर्तबगार पुरुष होते. त्यानीच पुण्याचा शनिवारवाडा बाधला व शहरास राजधानीचें स्वरुप दिलें. नवीन ब्राह्मण सरदार बनविले व त्याना शहरात मोठाले वाडे बाधण्यास उत्तेजन दिलें.

पेशवाईच्या उत्कर्षानंतर कोकणातून चित्पावन (कोकणस्थ) ब्राह्मणाची पुण्याकडे रीघ लागली ई साहजिकच होतें. जिकडे चरितार्थ चागला चालेल, जेथे चागली संधि आहे, तिकडे माणूस धावतो. आजसुद्धा कोकणस्थ देशावर, विशेषकरुन मुंबई, पुणे, खानदेश, वऱ्हाड, हैदराबाद इकडे नवीन काढण्यास जातात. किंवा विद्यत मागासलेले कोकणातील लोक (कुणबी, मराठे, भडारी) मुंबई, सोलापूर, अहमदाबाद इकडे गिरण्यात काम मिळतें म्हणून जातातच की!

पशवे सरकार, त्याचे इनामदार व इतर सुखवस्तु ब्राह्मण-ब्राह्मणेतर, त्या काळीं, आताच्यापेक्षा ब्राह्मणास पूज्य मानीत, अनुष्ठानें व ब्राह्मणभोजनें घालीत व ब्राह्मणास दानधर्म करीत. हुशार, कर्तबगार ब्राह्मणाना नोकऱ्या मिळत, तर भिक्षुकी करणाराना मुबलक दानधर्म मिळे व त्यात ते रमून असत.

पेशवाई नष्ट झाली व राज्यकर्ते बदलले तरी राज्ययत्र चालविण्यास लागणारी यत्रणा, उद्यम दर्जाची माणसे, ज्यानी मराठा अमदानींत राज्याचा गाडा ओढला तीं

(ब्राह्मण, सारस्वत, कायस्थ प्रभू) तयार होतीच. इंग्रज आले तरी त्याना असल्या माणसाची जरुरी होतीच. ही गरज ह्या शिक्षित समाजाने भरून काढली. नव्या इंग्रजी अमदानींत दुय्यम दर्जाचे अधिकाऱ्यास इंग्रजी भाषेचें ज्ञान हवें होतें, ही गोष्ट पटीत पांढरपेशा वर्गाने लागलीच हेरली व इंग्रजी राज्यात नवीन निघालेल्या इंग्रजी शाळात जाऊन ते लोक लवकर तयार झाले. अशा रीतीने इंग्रजास पाहिजे असलेल्या प्रकारचा माणसे तयार झालीं व त्या वर्गाची आर्थिक व सामाजिक स्थिति सुधारली. याच्या उलट मराठासमाज, जो त्या वेळेपर्यंत तरवारीच्या जोरावर सुस्थितींत होता, तो मागे पडला. शिवाय दुसरें असे की, मराठ्याच्या शिपाईगिरीच्या कामात व शेतकीधंद्यात लिहिण्यावाचण्याची फारशी जरुरी नसल्याने त्याचें शिक्षणाकडे दुर्लक्ष झालें. दक्षिण महाराष्ट्रांतीलच नव्हे तर अखिल महाराष्ट्रांतील, म्हणजे वऱ्हाड, मराठवाडा व दक्षिणेतील मराठी जिल्हे व संस्थानें यातील, मराठा समाज इंग्रजांनी हिंदुस्थान देशाचें सार्वभौमत्व बळकाविल्यापासून फार दुर्बळ झाला. मराठासमाज स्वराज्यात आपल्या मनगटाच्या जोरावर सुखाने राहत होता, तो इंग्रजी राज्य झाल्यापासून मागे पडला याचें कारण पहिल्यापासून या समाजाचें शिक्षणाकडे दुर्लक्ष हे होय. लिहिण्यावाचण्याचें दप्तरी काम (कारकुनी काम) मराठ्यासाठी ब्राह्मण व कायस्थ करीत होते. गावचें दप्तर ब्राह्मण कुळकर्णी सांभाळी. तसेंच मराठा इनामदार, देसाई, देशमुख याचें खासगी व सरकारी दप्तरी काम ब्राह्मण दिवाणजीच करीत असत, हें मींसुद्धा पाहिलें आहे. त्या वेळीं दिवाणजीचें *काम करणारे ब्राह्मण आपल्या मराठा यजमानास धनी मानीत;* इतकेंच नव्हे तर त्यातील बऱ्याच दिवाणजी ब्राह्मणानी आपलीं मूळ उपनावें टाकून, ते ज्याच्या पदरीं दिवाणजीचें काम करीत त्या मराठा धन्याचीं उपनावें धारण केलीं आहेत. घोरपडे, घाटगे, आंग्रे, इत्यादि ब्राह्मण दिवाणजींनी घेतलेलीं उपनावें मूळचीं त्याच्या मराठा मालकाचीं उपनावें आहेत असे दिसून येत. तसेंच, त्या दिवाणजींपैकी पुष्कळाचीं वतनेंहि पूर्वीचीं मराठ्याचीं होतीं, हाहि इतिहास सांगतो. मराठासमाजहि भोळेपणाने व अज्ञानामुळे या पंडित, पुरोहित वर्गाला धार्मिक बाबतींत तरी गुरु मानी.

ज्या वेळीं इंग्रजी सत्तेचा वरवंटा सर्व देशावर फिरला त्या वेळीं मराठ्याच्या प्रभावी भुजा एकदम लुळ्या पडल्या आणि या समाजाचा जोडधंदा जो शेतकी व लष्करी पेशाचा होता तो कोलमडून फक्त शेतीच त्याचा धंदा झाला. फार तर अव्वल इंग्रजी अमदानींत नवीनच निघालेल्या पोलिस, पायदळ व घोडदळ खात्यात त्याना काही वाव असे. खालचा वर्ग तर गिरण्यातील कामगार बनला. याचे उलट ब्राह्मण, सारस्वत व कायस्थ—ज्यानी पहिल्यापासून दिवाणजीचीं (कारकुनी पेशाचीं) कामं करण्यात कुशलता संपादन केली होती—अशा लोकाना इंग्रज अधिकाऱ्याचे हाताखाली कारकुनी सहजासहजी मिळाली. इंग्रजाना असल्या दिवाणजीची फार गरज होती. येथे हेंहि लक्षात ठेवलें पाहिजे की, याच दिवाणजी

पेशातील लोकाना दुय्यम अधिकारी (अव्वल कारकून, मामलतदार, मुन्सफ, फौजदार, शाळा व नगरारा त्यातीलच लहान लहान अधिकारी) म्हणून नेमले जात. आताप्रमाणे त्या काळस डात वि वविद्यालयातल्या परीक्षेवर भिस्त ठेवता येत नसे. उच्च शिक्षणाचा प्रसार झाला नव्हता. ज्यांना मराठीत अगर इतर प्रादेशिक भाषत चागल लिहिवाचता येई व ज कामापुरत इग्रजी जाणत, अशी माणस पहिला वर्ग मुन्सफाच्या जागेपर्यंतसुद्धा चढत. ब्राह्मण व कायस्थ जातात अशा रीतीने पुढे आलेली माणस पुष्कळ असत. मराठ्यात अशी उदाहरणे निदान खालघात तरी फार नाहीत. मी फक्त मराठ्यातील एक नाव घेण्यासारख उदाहरण ऐकल आह त म्हणज माझे स्नेही कृष्णाजी माधवराव पवार याच्या वडिलाचे. माधवराव पवार याना नाल्नोध लिहितावाचता येत असे. ते प्रथम मुन्सफकोर्टात शिपाई होते. ते हुशार असल्यान त्यानी मुन्सफाची मर्जी सपान्न केली. माधवरावाच्या वरिष्ठाने त्याना दसरद म्हणून रेकॉर्डोतील रुमाल काढून देण, परत जागच्या जागी ठेवण, हे काम समजावून दिला. रुमालावर नावे लिहिलेली असत. काही रुमालावर इग्रजी नाव असत. ता ओळखण्यास मुन्सफानी माधवरावास शिकविले. पुढे त्याची तैल्बुद्धि पाहून त्याना थोड इग्रजी शिकविले लोकरच ते इग्रजी वाचू व बोलू लागले. ह पाहून मुन्सफानी त्याना इग्रजी कारकून नेमले. मुन्सफाच्या मदतीने चढत चढत ते वेलीफ, क्लार्क ऑफ धी कोर्ट, अव्वल कारकून व पुढे स्वत मुन्सफहि झाले. शेवटी ते माल्वणास पहिला वर्ग मुन्सफ होऊन सेवानिवृत्त झाले त्यानी चागल नाव कमाविल व आपल घराणे पुढे आणले ब्राह्मणादि शिक्षित जातींना पूर्वापार शिक्षणाच महत्त्व पटल्याने, त्यानी इग्रजी अमदानींत निघालेल्या शाळा, हायस्कुल व कॉलेज याचा पुरेपूर फायदा घेतला. अशी वस्तुस्थिति होती.

सन १८८०-८३ साली पुण्यातील काही प्रागतिक पुढाऱ्यानी देशातील दुरवस्था व अवनति थाबविण्याचे प्रयत्न सुरू केले. या मडळींत न्यायमूर्ति महादेव गोविंद रानडे, लोकमान्य बाळ गगाधर टिळक व गोपाळराव आगरकर अशी प्रसिद्ध माणस होती. यातील बहुतेक जण पुण्याच्या सावजनिक सभेचे सभासद होते. मागासलेल्या वर्गापैकी हरि रावजी चिपळूणकर नावाचे सधन सरदार व गगाराम भाऊ म्हस्के नावाचे मराठा वकीलहि सार्वजनिक सभेचे सभासद होते. सार्वजनिक सभेत विचारविनिमय होऊन डेक्कन एज्युकेशन सोसायटीची स्थापना झाली, पुढे त्यातूनच फर्ग्युसन कॉलेज निघाले या सोसायटीचे अध्यक्ष त्या वेळचे तरुण छत्रपति शाहूमहाराज होते. कोल्हापूर दरबारने या सोसायटीला साठ हजार रुपयाची देणगी दिली होती

पुण शहरात याप्रमाणे घटना अमलात येण्याच्या पूर्वी थोडीं वर्षे अगोदर, माळी, मराठा आदि विद्येत मागासलेल्या जातींत स्वत च्या अज्ञानाची व हीनावस्थेची जाणीव झालेली दिसते. सन १८७३ च्या सुमारास महात्मा ज्योतीराव फुले

नावाच्या माळी सुधारकाने 'सत्यशोधक' समाजाची स्थापना केली होती. पुढे याचे अनुयायी कृष्णराव भालेकर, ज्ञानोबा कृष्णाजी ससाणे, गणपत सखाराम पाटील, विश्राम रामजी घोले, रावबहादूर नारायणराव लोखंडे व सीताराम हरि चिपळूणकर यानीहि बहुजनसमाजात जागृति करण्याचे प्रयत्न चालविले होते. भालेकर यांनी १८७५ साली 'दीनबंधू' नावाचे साप्ताहिक काढून शतकऱ्यांच्या अडचणींस वाचा फोडली होती.

सत्यशोधक समाजाच्या एका सभेत समाजाने मागासलेल्या वर्गास एक धोक्याची सूचना दिली होती ती अशी - आपमतलबी भटाब्राह्मणाच्या फसव्या पोथ्यांच्या वाचनाने दिशाभूल करून घेऊ नका. या सभेचा अहवाल विष्णुशास्त्री चिपळूणकर यांनी निबंधमालेच्या चव्वेचाळिसाव्या लेखात दिला आहे. त्याचे शीर्षक 'शूद्रांच सभेचा अहवाल' असे आहे हें लक्षात ठेवणं जरूर आहे.

पुण्याच्या कर्मठ ब्राह्मणानी अस्पृश्यास मोकळेपणाने शहरात फिरू दिले नाही. ब्राह्मणेतराचा वेळींअवेळीं अपमान केला व त्याच्याहि पुढे जाऊन वैदिक धर्मास नावें ठेवण्यास व स्वामी दयानंद सरस्वतींसारख्या पूज्य व्यक्तीचा व त्याच्याबरोबर न्यायमूर्ति महादेव गोविंद रानड्यासारख्याचाहि अपमान केला होता. त्यातील एक प्रसंग: स्वामी दयानंद सरस्वती यानी आर्यसमाजाची स्थापना केली होती. आर्यसमाजाचीं तत्त्वें पंजाबातच काय पण महाराष्ट्रातील विद्वानानाहि मान्य होती. आर्यसमाजाला हिंदु धर्मात शिरलेला वर्णाश्रम नको होता. आर्यसमाजाची वेदावर फार भिस्त होती व आहे; १८७५ साली स्वामी दयानंद सरस्वती पुण्यास दौऱ्यावर आले होते. स्वामींबद्दल पुण्यातील उदारमतवादी ब्राह्मण ब्राह्मणेतर पुढाऱ्याना आदर होता. त्याचा व्याख्यानें रोज सध्याकाळीं बुधवार पेठतील बलवंतसमोर भिडे याच्या दिवाणखान्यात होत. या कार्यक्रमात न्यायमूर्ति रानडे विशेष लक्ष घालीत. व्याख्यान साधार आणि बोधप्रद होत. स्वामींची वाणीहि रसाळ होती. काही दिवस व्याख्यानें झाल्यावर न्यायमूर्तींच्या घरीं पुढारा मडळींची सभा भरून स्वामींची मोठी मिरवणूक काढण्याचें लोकानी ठरविलें. स्वामींचे ग्रंथ पालखींत घालून पालखी निघावी, पालखीमागून हत्तीवर हौद्यातून स्वामींनी निघावें, मिरवणुकीबरोबर बँड असावा, असें ठरविलें गेलें. ही बातमी कर्मठ उपाध्यायी पक्षाला कळली. आधीच या लोकाना आर्यसमाजाचे वावडें; त्यात आर्यसमाजाच्या अध्वर्यूंनी ब्राह्मण वस्तीच्या पुण्यात येऊन एवढा मान मिळवावा हें त्यास आवडलें नाही. म्हणून त्यानी स्वामींची विटंबना करावयाचा घाट घातला.

विरुद्ध पक्षाच्या या कारवाईची खबर उदारमतवादी रानड्यांच्या पक्षाला कळली. तेव्हा रानड्यानी गंगारामभाऊ म्हस्के याच्या सूचनेवरून पोलिसबंदोबस्ताची व्यवस्था केली. त्या दिवशीं स्वामींना निरोप देण्याची सभा भरली, त्या दिवशी रोजच्याप्रमाणे चार वाजता भिडे याच्या दिवाणखान्यात व्याख्यानासाठी मंडळी

जमली. व्याख्यान मार्मिक असून आध्यात्मिक विचाराने परिप्लुत होतें. स्वामींनी आपल्या रसाळ वाणीने समारोप केला व पुणेकराचा निरोप घेतला. हारतुरे झाल्यावर आगाऊ ठरल्याप्रमाणे स्वामींचे ग्रंथ पालखींत ठेवले. स्वामींस हत्तीवरील हौद्यात बसविलें व मिरवणूक चालू झाली. इतक्यात विरोधी पक्षाने काढलेली गर्दभानदाची स्वारी निघाली. ही मंडळी 'रामानंद स्वामी की जय' असा जयजयकार करीत, अद्वातद्वा बोलत स्वामी दयानंदाच्या मिरवणुकींत शिरली. त्या वेळीं पाऊस पडत होता व सडकेवर चिखल झाला होता. गर्दभानदाच्या मिरवणुकीतील माणसांनी दयानंदाच्या मिरवणुकीवर चिखल फेकण्यास सुरुवात केली. पोलिसांनी या गुंडास हाकून लाविलें; तथापि न्यायमूर्ति रानड्यांना चिखलाचा व शेणाच्या गोळ्याचा प्रसाद मिळालाच, असें न्यायमूर्तींच्या पत्नीने 'आमच्या आयुष्यातील काही आठवणी' या पुस्तकांत पुण्यातील त्या वेळच्या ब्रह्मवृंदाच्या खेळाचें वर्णन केलें आहे.

माझा स्वतःचा अनुभव देण्यापूर्वी पुण्याच्या पार्श्वभूमींतील आणखी एक प्रसिद्ध झालेली घटना देतो. १८९० सालीं न्यायमूर्ति माधव गोविंद रानडे यांच्या घरीं एक भोजनसमारंभ झाला. या मेजवानींत चाळीसपन्नास पाहुणे होते. बहुतेक ब्राह्मणच होते; तथापि त्यांत डॉ० विश्राम रावजी घोले, रावबहादूर नारायणभाई दाडेकर व रावबहादूर गणपतराव मानकर हे ब्राह्मणेतरहि होते. लागलीच दुसऱ्या दिवशीं 'पुणेवैभवा'त मेजवानीची हकीकत प्रसिद्ध झाली; त्यात पाहुण्यांच्या जाती व पंक्ति कशा बसल्या होत्या याचा नकाशाहि आला होता. हा वृत्तांत वाचून इतिहासप्रसिद्ध घराण्यातील बळवंतराव नातू यांनी श्री० शंकराचार्यांकडे गाऱ्हाणें केलें. श्रींनी फिर्यादीची चौकशी करण्यासाठी पुण्यास एका शास्त्र्यास पाठविलें. भवति न भवति होऊन मेजवानीस गेलेल्या ब्राह्मणांनी (यांत न्यायमूर्तींचेंहि नांव होतें) प्रायश्चित्त घ्यावें असें ठरलें ही गोष्ट मी पुण्यास जाण्यापूर्वी काही वर्षें घडली होती. पण असल्या अडचणी सोसूनहि काही प्रागतिक व उदारमतवादी ब्राह्मणांनी मागासलेल्या समाजाच्या चळवळीस उत्तेजन दिलें आहे, याबद्दल माझ्या पिढीचे मराठे त्यांचे आभारी आहेत.

ज्या काळीं पुण्यास फुले, मालेकर व गंगारामभाऊ म्हस्के प्रभृति सामाजिक सुधारणेचा प्रयत्न करीत होते, त्याच काळीं त्या वेळचे तरुण बडोदाधिपति श्रीमंत सयाजीराव गायकवाड यांनाहि मराठा समाजाच्या हीनावस्थेबद्दल खेद वाटत असे व ते त्या समाजास कसे वर आणता येईल याचा विचार करीत होते. त्यांनी मराठ्यांचे वेदोक्त हक्क शाबीत करण्याचा प्रयत्न चालविला होता. अशा वेळीं गंगारामभाऊ म्हस्के यांना ही संधि बरी वाटून त्यांनी बहुजनसमाजांत जागृति करण्याचें ठरविलें. पुण्यांतील उदारमतवादी ब्राह्मण आपणास मदत करतील अशी त्यांनी अपेक्षा केली व त्याप्रमाणे न्यायमूर्ति रानडे यांचा सल्ला घेतला. रानडे म्हणाले, "आपण जरूर प्रयत्न करू या. बहुजनसमाज सुधारल्याशिवाय लहानशी

ब्राह्मण जात काय करू शकेल?" लागलीच गंगारामभाऊनी एक सभा बोलाविली. त्यात न्यायमूर्ति रानडे, सरदार कुपुस्वामी मुदलियार, खानबहादूर नवरोजी फ्रामजी, खानबहादूर काझी शहाबुद्दीन, प्रोफेसर गोपाळ कृष्ण गोखले, हरि नारायण आपटे, रावबहादूर सीताराम विश्वनाथ पटवर्धन, वगैरे पुढारी होते. विद्येत मागासलेल्या मराठादि जातींत विद्याप्रसार कसा करावा याची चर्चा तारीख ८ जानेवारी सन १८८३ रोजी हिराबागतील टाउन हॉलमध्ये झाली. सभेचे अध्यक्ष सर वुइल्यम वेडरबर्न होते. याच सभत मराठ्याच्या शिक्षणास मदत करण्यासाठी स्वतंत्र संस्था स्थापावी असे ठरलें. तीच सध्याची 'डेक्कन मराठा एज्युकेशन असोसिएशन' होय.

गंगारामभाऊ म्हस्के याच्या विनंतीवरून छत्रपति शाहूमहाराज याचे वतीने कोल्हापूर दरबारने दरसाल रुपये तीनशेचे वर्षासन मंजूर केले. त्याचप्रमाणे श्रीमंत सयाजीराव महाराज गायकवाड यानी सालीना रुपये चोवीसशेचे वर्षासन चालू केलें. फलटणचे राजेसाहेब श्रीमंत बापूसाहेब निंबाळकर यानी सालीना रुपये दीडशे देण्याचे ठरविलें. न्यायमूर्ति रानडे यानी आपल्या नांवें दरमहा तीन रुपयाची स्कॉलरशिप जाहीर केली. पुढे त्यानी या कामासाठी आपल्या मृत्युपत्रात एक हजार रुपये ट्रस्टमध्ये ठेवण्याची व त्याचें व्याज डेक्कन मराठा एज्युकेशनला मिळण्याची व्यवस्था केली. न्यायमूर्तींच्या इच्छेप्रमाणे तें व्याज आजतागायत संस्थेस मिळत आहे. या संस्थेचे पहिले अध्यक्ष फलटणचे राजे श्रीमंत बापूसाहेब व पहिले चिटणीस गंगारामभाऊ म्हस्के होते.

या ठिकाणीं पुण्यातील प्रागतिक विद्वान् ब्राह्मणानी केलेल्या शिक्षणविषयक कामगिरीचा उल्लेख करणें आवश्यक वाटत. या त्यांच्या कामगिरीमुळे आधीच तयार असलेल्या ब्राह्मणादि पुढारलेल्या जातींचा विशेष फायदा झाला असला तरी त्यानी केलेल्या कामाच लोण हळूहळू महाराष्ट्राच्या निरनिराळ्या भागातील व जातींतील लोकांत पोचल. या त्यांच्या लोकोपयोगी कामगिरीबद्दल महाराष्ट्रातील सर्व जनता त्याची ऋणी राहील. शिवाय त्यानी घालून दिलेला धडा पुण्याप्रमाणे सध्याच्या महाराष्ट्र राज्यातल्या इतर शहरात लोकानी धीमेधीमे गिरविला. या कामगिरीमुळे देशाची उन्नति होण्यास फार मदत होत आहे.

मी १९०२ सालीं पुण्यास आल्यावेळीं वर सांगितलेल्या प्रकारचीं लोकोपयोगी स्वार्थत्यागाचीं कामें न्यू इंग्लिश स्कूल, नूतन मराठी विद्यालय, भावे स्कूल, हिंगण्याचा अनाथबालिकाश्रम, फर्ग्युसन कॉलेज व न्यू पूना (सर परशुरामभाऊ) कॉलेज वगैरे शाळा पाठशाळांतून चाललीं होतीं. त्यात अनेक विद्वानानी (विशेषेकरून गोपाळ कृष्ण गोखले, गोविंद चिमणाजी भाटे, धोंडो केशव कर्वे, केशवराव कानिटकर, वै० का० राजवाडे, डॉ० र० पु० परांजपे व ताकारखाऊ वगैरे मंडळींनी) निःस्वार्थीपणाने, अल्प वेतनावर जें काम केलीं, त्याचें अनुकरण महाराष्ट्रातील निरनिराळ्या शहरीं जैन, लिंगायत, मराठे व महार वगैरे निरनिराळ्या थरातील लोकानी केलें आणि

आज त्याचे परिणाम स्वराज्याचा गाडा सुव्यवस्थित चालविण्यात, उद्योगधंदे व कारखाने काढण्यात व पाटबंधारे बांधण्यात दिसून येत आहेत.

मी १९०२ साली शेतकी शिक्षणासाठी पुण्यास कॉलेज ऑफ् सायन्समध्ये दाखल झालो त्या वेळीं मुठानदीच्या पलीकडे पश्चिमेस पुणें शहर पसरलें नव्हतें. खडकी, घोरपडी, येरवडणे हीं स्वतंत्र गावें होतीं. लष्करी सोयीसाठी खडकी, घोरपडी येथे लष्करी छावण्या असत. घोरपडीच्या आग्नेयेस वानवडी आहेच. पुण्याचें डेक्कन कॉलेज खडकीच्या हद्दींत मोडे. पुणे कॅंप स्वतंत्रपणे आपली म्युनिसिपल कामें चालवी. मुठानदीपलीकडे शनिवार पेठेच्या वायव्येस भांबुर्डा गाव आहे. आता हा गाव व शेजारची आबादी (वसाहत) 'शिवाजीनगर' नावाने पुणे कॉर्पोरेशनमध्ये मोडते. त्याचप्रमाणे येरडवणे हा गाव हा सध्याच्या डेक्कन जिमखान्याच्या दक्षिण-नैर्ऋत्येस होता. तो गावसुद्धा आता पुण्यात मोडतो. मुठा नदीच्या पलीकडे भांबुर्डे हद्दींत फारच थोडीं घरें होतीं. पुणे-खडकी रोडच्या दोहीं बाजूस शेती होती. लकडी पुलावरून पुढे जाताच उजव्या बाजूस पुलाची वाडी होती. यात जुनी सात आठ घरें व एक देऊळ होतें. १९६१ सालीं पानशेत व खडकवासला धरणें फुटून मुठा नदीस एकाएकीं फार मोठा पूर आला. लकडी पुलावर बारा फूट पाणी होतें असे ऐकतो. या महापुरात पुलाच्या वाडींतील घरें वाहून गेली वा जमीनदोस्त झालीं.

जुन्या रेल्वे पुलाजवळ मुन्सफ कोर्ट होतें. त्याच्या पुढे उलट बाजूस गणेशखिंड रस्त्याकडे तोंड करून कॉलेज ऑफ् सायन्सची इमारत होती. त्याच्या पुढे पश्चिमेस जनावराचा दवाखाना होता. जवळच रस्त्यापलीकडे डॉक्टर भांडारकर यांचा बंगला होता. तेथे रेल्वे पूल नव्हता. पुढे सुमारें अर्ध्या मैलावर सध्या असलेल्या शेतकी कॉलेजला लागून 'मोदीबाग' म्हणून एका पार्शी गृहस्थाचा बंगला होता. याच रस्त्यावर पुढे पिवळा (पील साहेबाचा) बंगला होता. त्याच्या उलट बाजूस दोन जुने बंगले होते. नंतर डाव्या बाजूस चतु:शृंगीचें देऊळ, पुढे उजव्या बाजूस गव्हर्नरचा बंगला (ज्यात सध्या पुणे विश्वविद्यालय आहे), एवढ्याच इमारती होत्या. चतु:शृंगी-पासून खडकी स्टेशनपर्यंत चराऊ रान व बरकस शेती होती.

गणेशखिंड रस्त्यावरच्या जमिनी हलक्या असल्याने एकरीं शंभर रुपयास विकत मिळत. शेतकी कॉलेज व फार्मांच्या बाजूच्या जमिनी बऱ्यापैकी असल्याने त्याना, मला वाटतं, सरकारने एकरीं दीडशे ते अडीचशे रुपये दिले असावेत. मलाच त्या वेळीं फार्मसाठी जमिनी विकत घ्याव्या लागल्या होत्या.

लकडी पुलापासून थेट भांबुर्ड्याजवळील नदीकाठच्या देवालयापर्यंत, सध्याच्या जंगलीमहाराज रोडवरसुद्धा दाट फड्ये व वेकताड होते. नदीपलीकडे येरडवण्याच्या बाजूस इमारती नव्हत्या. वुइमेन्स युनिव्हर्सिटी, डेक्कन जिमखाना व पी० वाय्० सी० जिमखाना अर्थात् त्या वेळीं नव्हते.

डेक्कन जिमखाना कॉलनी व मैदानहि नव्हत. डाव्या बाजूस भांबुर्ड्यांच्या

पाटलाचें घर (त्यास पाटलाचा बंगला म्हणत), पुढें रामनारायण बंगला (आता तो रामदास शहाच्या मालकीचा झाला आहे), त्याच्या पलीकडे थोड्या अंतरावर कनालच्या पलीकडे नुकत्याच बांधलेल्या फर्ग्युसन कॉलेजच्या थोड्या इमारती होत्या आता ह्या कॉलेजचा विस्तार फार झाला आहे. त्या काळीं या कॉलेजच्या पलीकडे आता असलेलें लॉ कॉलेज, भांडारकर इन्स्टिट्यूटसुद्धा नव्हती. रामनारायण बंगल्याच्या पुढची पालखीची ल्हानशी जागा मात्र होती तेथून पुढें वाकड्याच्या गांपर्यंत वस्ती नव्हती. वाकडेवाडींत थोडीं घरें होतीं. शेतकी कालेज नव्हतें. शिवाजी मेमोरियल व शिवाजीनगर स्टेशनहि नव्हतें सध्याच्या शेतकी कॉलेजच्या व फार्मच्या जागा शेती होती. या शेतींत दोन पडळी (जनावरें बांधण्याचे गोठे व घर) व दगडू नावाच्या माळ्याचें घर, गोठा व एक मोठी विहीर होती. ती अजूनहि आहे. पुढें डेअरा फार्म होतें. डेअराच्या अलीकडे श्रीधर विठ्ठल दाते याचा एका मोठ्या कंपाउंडांत प्रशस्त बंगला होता. मोठ्या अक्षरांत 'सदावर्त' असें त्याचें नाव कमानीवर लिहिलेलें असलें तरी तेथें पांथस्थ ब्राह्मणाची सोय झालेली मीं कधी पाहिली नाही. लोक म्हणत, म्युनिसिपालिटीचा कर चुकविण्यासाठी त्या धूर्त गृहस्थानें हें नाव दिलें आहे.

# माझी सामाजिक सेवा



ज्या सामाजिक संस्थेशीं माझा प्रथम संबंध आला, ती संस्था म्हणजे कोल्हापूर शहरातील व्हिक्टोरिया मराठा बोर्डिंग (सध्याचे शाहू वसतिगृह) होय. त्याची हकीकत अशी : करवीर राज्याचीं अधिकारसूत्रें इंग्रज सरकारने तारीख २ माहे एप्रिल सन १८९४ रोजीं, श्री शाहू छत्रपति यांच्या हवालीं केलीं. शाहूमहाराज लहानपणापासून सर्वसामान्य लोकांशीं मिळूनमिसळून वागत. राज्यसूत्र हातीं घेतल्यावर थोड्याच दिवसात त्यानी दरबारातील त्या वेळच्या राजकीय स्थितीचें व आपल्या राज्यातील लोकांच्या आर्थिक व सामाजिक स्थितीचें बारकाईने निरीक्षण केलें. त्यात त्याना आढळून आलं की, आपली शेतकरी प्रजा शिक्षणाभावीं गाढ अज्ञानांधकारात चाचपडत आहे. स्वजातीय मराठा शेतकऱ्यांना गरिबी व अज्ञान यामुळे राज्यकारभाराचें व कोणत्याहि व्यापारधंद्याचें महत्त्व कळत नाही, आणि त्याचा परिणाम म्हणजे सरकारदरबारात व व्यापारधंद्यात आपले सगेसोयरे व जातभाई दिसत नाहीत.

महाराजानी निरनिराळ्या खात्याचा, त्याचप्रमाणे खेड्यापाड्यातील लोकस्थितीचा परिचय करून घेण्यासाठी निरनिराळ्या पेठ्यात ल्हानल्हान दौरे काढले. त्यात त्याना असें दिसून आले की, महत्त्वाच्या मुख्य जागावर युरोपियन अगर पारशी वर न्याय, मुल्की व खासगी खात्यातील ल्हानमोठे सर्व अधिकारी ब्राह्मण होते. पोलिस खात्यात शिपायाच्या वरच्या जागा (नाईक, जमादार, वगैरे) ब्राह्मणाकडेच असत. सर्व खात्यातील कारकूनहि ब्राह्मणच होते. शाळाखात्यात प्राथमिक शिक्षकापासून विद्याधिकाऱ्यापर्यंत ब्राह्मणच असत. पट्टेवाले, हुजरे, पोलिस शिपाई, घोडेस्वार आणि लष्करफड वगैरे खातीं (ज्यात कमी पगारावर माणसें असत) त्यातच मराठ्याचा भरणा असे.

महाराजाना अधिकार मिळाले, त्या वेळीं खासगी खात्यात व इतर खात्यांतहि मराठे कारकून नव्हते. एक-तर मराठे लोक विद्येत मागासलेले व दुसरें, त्याना वरिष्ठ अधिकाऱ्याची सहानुभूति व पाठिंबा नव्हता.

शाहूमहाराजाना वर्णाश्रम व जातिसंस्था पसंत नव्हत्या. त्याना तर वाटे की, हें वर्णाश्रमधर्माचें व जातीचें वेड आपल्या देशाच्या अवनतीस कारण झालें आहे. ते सत्कुळी वा ब्राह्मणकुळी यासारख्या सनातनी कल्पनाच्या आहारीं जात नसत. ते मराठा जातींतील पुढाऱ्यास सांगत की मराठा जात तरी एक माना व आपलेपणाने सर्व बांधवाना हात देऊन पुढे आणण्याचा प्रयत्न करा. महाराजाचा जीव मराठ्यासाठींच तळमळे असे नाही, तर सर्व मागासलेल्या स्पृश्यास्पृश्यांबद्दल त्याना आपुलकी वाटे.

एकदा खुद्द शाहूमहाराजानीच एका जैन अंडर ग्रॅज्युएटची आपला खासगी (पर्सनल) कारकून म्हणून केलेली नेमणूक त्याना मागे घ्यावी लागली. कारण कौन्सिलने टिपण केलें की, या पगारावर पदवीधर ब्राह्मण मिळत असता, ब्राह्मणेतर अंडर-ग्रॅज्युएट नेमणें कौन्सिलास पसंत नाही. अशा परिस्थितींत महाराजाना फक्त एकच मार्ग दिसला, तो म्हणजे मागासलेल्या जातींनी आपापल्या जातीसाठी विद्यार्थी-वसतिगृहें स्थापन करून आपली मुलें सुशिक्षित करणें हा होय.

शाहूमहाराज आपणास मोठे म्हणवून घेत नसत. ते बालपणापासूनच मराठादि आपल्या नोकरवर्गांत मोकळ्या मनाने मिसळत. त्याच्या जंगल शिकारी कोल्हापूर संस्थानच्या पश्चिम भागातील सह्याद्रीच्या दऱ्याखोऱ्यात आणि चित्त्याकडून हरणाच्या शिकारी पूर्वेकडील रायबाग मिरजसारख्या कमी पावसाच्या रुक्ष भागात होत असत. असल्या शिकारींत महाराज आठवडेच्या आठवडे घालवीत. अशा वेळीं ते लोकाशीं एकजीव होत. त्यामुळे गरिबाची राहणी, आमटीभाकर, जेवण करण्याची गाडगीं मडकीं व घोंगडी वाकळ, याचीं त्याना पुरेपूर माहिती होती. त्याचा ओढा गरिबाकडे असे. हे शेतकरीच आपली जातगंगा, असं ते मानीत आणि त्याची स्थिति सुधारून त्याना पुढे आणण्याचा प्रयत्न ते करीत. असल्या प्रयत्नात अडचणी आल्या तर ते मुकाट्याने सोशीत. त्यानी आपल्या सूक्ष्म निरीक्षणाने विचारांतीं ठरविलें की, या गरीब लोकास शिक्षण मिळालेंच पाहिजे. यासाठी त्यानी आपल्या संस्थानात प्राथमिक शिक्षण मोफत व सक्तीचें करण्याचा निश्चित केला व तसा कायदाहि पास केला. तेवढ्याने भागत नाही, कारण पुढे दुय्यम व उच्च शिक्षण मिळाल्याशिवाय या लोकास व्यापारधंद्यात वा सरकारदरबारात वाव मिळत नाही, हें ओळखून मराठादि शिक्षणात मागासलेल्या समाजांतील मुलाकरिता शिक्षणासाठी स्वतंत्र वसतिगृहेंच पाहिजेत, असें त्याच्या मनाने घेतलें, पण एवढ्या मोठ्या समाजातील हजारो मुलासाठी ही सोय सरकारातून (दरबारातून) होणें अशक्य होत, हेंहि पण महाराज जाणून होते. म्हणून त्यानी विद्येत मागासलेल्या जातींच्या पुढाऱ्याना बोलावून, त्या जाती का मागे राहिल्या, हें त्यास समजावून सांगितलं आणि त्याना आपल्या मुलासाठी म्हणा, किंवा आपल्या

गणगोताच्या मुलांसाठी म्हणा, वसतिगृह बांधल्याशिवाय त्यांचा इतर जातीप्रमाणे जीवनव्यवहार टिकाव लागणार नाही, हें पटवून दिलें. इतकेच नव्हे तर ते स्वतः उरकून करून असली वसतिगृहे बांधतील, तर दरबार त्यांना लहान मोठी वर्षासने देईल असें आश्वासनहि दिलें.

यापूर्वीच महाराजांनी आपल्या आतार्ची, मानकऱ्यांची व गावगींतील मराठा नोकरांची काही मुलें, त्याचप्रमाणे खेड्यांतील मराठा पाटलांचीं काही मुलें, अशा पधरावीस मुलांची राजवाड्यावर राहण्याजेवण्याची सोय केली होती. राजवाड्यावर ठेवलेल्या मुलांपैकी फारच थोडीं मुलें चांगली शिकली, बरीच चढेल निघालीं, हा अनुभव पाहून प्रथम मराठ्यांच्या मुलांसाठी एक वसतिगृह बांधण्याचे त्यांनी ठरविलें.

योगायोग असा की, महाराजांच्या मनात मराठा विद्यार्थी वसतिगृहाची कल्पना घोळत असतानाच, मी डिसेंबर १८९९ अखेर मॅट्रिक परीक्षा पास झालो. त्या काळात खेड्यांतील शेतकरी पाटलाच्या मुलाने मॅट्रिक होणें म्हणजे एक अद्भुत गोष्ट समजली गल्याने, ही बातमी स्थानिक वर्तमानपत्रात आली आणि ती महाराजांच्या 'रीडर'ने महाराजांना निवेदन केली. महाराजांना फार आनंद वाटला व त्यांनी मला किती तरी आतुरतेने घोडेस्वार पाठवून बोलावून घेतलें.

श्रीशाहूमहाराजांच्या प्रोत्साहनाने नवीन स्थापन होणाऱ्या व्हिक्टोरिया मराठा बोर्डिंगमध्ये मी दाखल झालो. मी या संस्थेचा पहिलाच विद्यार्थी म्हणावयास काही हरकत नाही. या संस्थेत श्रीशाहूमहाराज स्वतः लक्ष घालीत. महाराजांच्या आज्ञेवरून श्रीमंत दत्ताजीराव घाटगे (काकासाहेब) यांच्या अध्यक्षतेखाली मराठा समाजातील प्रमुख गृहस्थांची सभा भरली व तींत मराठा एज्युकेशन सोसायटीची स्थापना करण्यात आली. महाराजांचे जनक बंधु श्रीमंत बापूसाहेब घाटगे, कागलकर (मोठ्या पातीचे जहागिरदार), चुलते दत्ताजीराव घाटगे, कागल (छोट्या पातीचे जहागिरदार), महाराजांचे मेहुणे मामासाहेब खानविलकर, आप्पासाहेब शिंदे म्हैसाळकर, रावसाहेब दाजीराव विचारे, एल० सी० ई०, इंजिनिअर, रावसाहेब भास्करराव जाधव, एम्० ए०, एल्एल्० बी०, व रावसाहेब जिवाजीराव सावंत बी० ए० हे कार्यकर्ते ह्या वसतिगृहास सुरुवातीसच लाभले. संस्थेच्या सुरुवातीस गुरुवर्य नानासाहेब साखणे यांनीहि वसतिगृहाच्या उभारणीस पुष्कळ मदत केली. ह्या वसतिगृहात मी दोन वर्षे होतो. कॉलेजमध्ये माझ्या वर्गात त्या वेळीं आर० आर० पवार (रजिस्ट्रार, कोऑपरेटिव्ह सोसायटीज, बडोदें), कैलासवासी पी० के० शिंदे, इंजिनिअर, व साताराचे एस्० बी० जाधव हे असत. श्रीयुत जाधव पुण्यास सायन्स कॉलेजात इंजिनिअरिंगचा अभ्यास करीत असताना विद्यार्थी दशेतच वारले.

जरी ह्या वसतिगृहाचें उद्घाटन तारीख १८ एप्रिल १९०१ रोजीं झालें, तरी वसतिगृहाची खरी सुरुवात वास्तविक सन १९०० च्या जानेवारींत पन्हाळगडावर झाली होती. दत्ताच्या देवालयात प्रथम आमची राहण्याची सोय केली गली; जेवणहि

देवळाच्या आवारात असलेल्या सोप्यात होइ. शिधासामग्री सरकारतूनच येई, व सोवळेकरी (स्वयपाकी) सरकारतूनच मिळाला होता

कोल्हापूर शहरात प्लेग कमी झाल्यावर क्वारंटाइन उठलें व महाराजांचा कॅप कोल्हापुरास गेला. त्याच वेळीं आमचें तात्पुरतें स्थापलेलें बोर्डिंगहि कोल्हापुरास आलें. प्रथम या बोर्डिंगची सोय सरकाऱ्यातील फारेस्ट ऑफिसात केली होती. ही लहान इमारत दुमदार होती; पण त्यात खोल्या नव्हत्या. शिवाय स्वयपाकास व मुलास जेवावयास बसण्यास पुरेशी जागा नव्हती. हें महाराजांच्या लक्षात येताच त्यानी महाद्वार रस्त्यावरील खानविलकराच्या वाड्यात तें न्यावयाचे ठरविलें. तेथे आम्ही थोडे दिवस गेलाहि. आम्हाला दिलेली जागा दुसऱ्या मजल्या वरची होती व तीहि पुरेशी नव्हती. तेथून बोर्डिंग रविवार पेठेंतील मुसाऱ्याच्या वाड्यात गेलें; तेथेहि गैरसोयच होती. शेवटी आम्ही जुन्या बुधवारातील दुतोंडी मारुतीजवळच्या मुसाऱ्याच्या मोठ्या वाड्यात गेला. ती जागा मात्र बरी होती. शिवाय जवळच बोर्डिंगचे सुपरिटेंडंट रावसाहेब शिवाजीराव सावंत राहत होते. तेथ आम्ही एक वर्षभर राहिलों.

या दरम्यान रिसाल्याजवळच्या दसराचौकाच्या पलीकडे जुन्या म्युझियमची (पुराणवस्तुसंग्रहालयाची) मोकळी असलेली इमारत महाराजांच्या लक्षात आली. प्लेगच्या वेळीं तेथे प्लेग हॉस्पिटल होत. इमारत चौसोपी होती व त्यात खोल्या करण्याची सोय होती. शिवाय जवळपास मोकळी जागाहि मुबलक होती.

वसतिगृहात येणाऱ्या विद्यार्थ्यांचे पहिला व दुसरा असे दोन वर्ग केले होते. पहिल्या वर्गात जेवणाऱ्यास दरमहा सात रुपये द्यावे लागत. यात भात, चपाती, तूप, भाजी, व रोज मास मिळे. दुसऱ्या वर्गास मास आठवड्यातून एक वेळ असे व त्यास चार रुपये द्यावे लागत. सोवळेकरी (स्वैपाकी) वाड्यावरून मिळाला होता खोलीभाडें, दिवाबत्ती, याचा खर्च काही दिवस हुजूर खाजगीतून होइ.

ज्या वेळीं छत्रपतींचे आप्तस्वकीय वा दूरचे संस्थानिक कोल्हापुरास पाहुणे म्हणून येत, त्या वेळीं शाहू महाराज आपला मुलगा अक्कासाहेब व युवराज याना त्यांच्या बरोबर देऊन त्याना आमचे बोर्डिंग दाखवीत. वसतिगृहातील विद्यार्थ्यांस महाराज वेळोवेळीं वाड्यावर तागास (जेवणास) बोलावीत. वाड्यावर होणाऱ्या ठराविक समारंभास व मुद्दाम करविलेल्या नाटकास महाराज मुलांना आवर्जून आमंत्रण पाठवीत. सरकारी पॅलेस थिएटरात होणाऱ्या कुस्त्यांच्या दंगलीसहि बोलावून त्यांची बसण्याची व्यवस्था करीत.

मी पुण्यास सायन्स कॉलेजात गल्यावर व नंतर रेल्वे खात्यात नोकर झाल्यावर सदर वसतिगृहाशीं माझा निकट संबंध राहिला नाही. तथापि मी ज्या ज्या वेळीं कोल्हापुरास जाई त्या त्या वेळीं मराठा वसतिगृहास भेट देत असे. या वसतिगृहाच्या गेन समेलनास मुख्य पाहुणा व जुना विद्यार्थी म्हणून मी हजर होतो. त्या वेळीं

सेक्रेटरी, श्री० रंगराव हरि चौगुले यास हॉस्टेल सुपरिंटेंडंट आणि श्री० बाळासाहेब भीमराव पवार यास पगारी असिस्टंट सुपरिंटेंडंट म्हणून नेमले. श्री० बाळासाहेब पाटील व रंगराव चौगुले यांनी विशेष लक्ष घालून जमिनीच्या खंडाभागाची नीट व्यवस्था लावली. तसेंच फ्रेझर मार्केट व शिवाजी मार्केट यामधील भाड्याने दिलेल्या इमारतींची व जागांची थकलेलीं भाडीं कार्यकारी मंडळाच्या मदतीने वसूल करण्याचा निश्चय करून या घरभाड्याच्या कामाची पुनर्व्यवस्था केली. अशा रीतीने संस्थेच्या कामास व्यवस्थित स्वरूप आणलं गेलं. या कार्यकारी मंडळाच्या कारकिर्दींत जुन्या इमारतीस लागून पूर्वेकडे वीस खोल्यांची एक इमारत सुमारें चाळीस हजार रुपये खर्च करून बांधली. व तिला 'शहाजी विभाग' हें नांव दिलें. ही इमारत बांधताना मीं कार्यकारी मंडळास सुचविलें की, जुन्या विद्यार्थ्यांपैकी ज्यांना शक्य असेल त्यांनी एक एक हजार रुपये प्रत्येकीं देणगी द्यावी व त्यांचीं नावें त्या त्या खोलीस द्यावीं. त्याप्रमाणें मीं एक हजार रुपये दिले. या संस्थेच्या माजी विद्यार्थ्यांपैकीं बरेच जण आज महाराष्ट्र राज्यात मंत्री, उपमंत्री, सेक्रेटरी, वगैरे मोठ्या अधिकाराच्या जागेवर विराजमान आहेत. तसेंच कांही जण व्यापारउद्योगात व इतर धंदेव्यवसायात पुढे आलेले आहेत. त्यांनी मनावर घेतल्यास ही वीस खोल्यांची इमारत 'शहाजी विद्यार्थी विभाग' म्हणून गणला जाईल. याशिवाय छप्पन हजार रुपये खर्च करून आणखी एक इमारत बांधण्याचें काम हातीं घेतलं आहे. या सर्व अडचणींच्या काळात मी कार्यकारी मंडळाचा अध्यक्ष होतों.

वृद्धापकाळामुळे कोल्हापुरास एकटें राहणें मला अडचणीचें होऊं लागलें. म्हणून सन १९६० सालीं मी माझे धाकटे चिरंजीव कर्नल नानासाहेब यांच्याकडे हैदराबादेजवळ गोवळकोंड्यास राहण्यास गेलों. त्यामुळे वसतिगृहाच्या कार्यकारी मंडळाच्या सभांना मला हजर राहता येईना. म्हणून मीं माझ्या जागीं दुसरा चेअरमन नेमा असं कार्यकारी मंडळास कळविलें. आता माझ्या जागीं श्री० सर्जेराव माने हे कार्यकारी मंडळाचे अध्यक्ष आहेत. वसतिगृहांत एकूण अडीचशें विद्यार्थी राहतात. भोजनक्लबाची जबाबदारी अंगावर घेण्यास विद्यार्थी तयार नसल्यामुळे भोजनक्लब सध्या बंद आहे. पन्नास विद्यार्थ्यांच्या जेवणाचे डबे त्यांच्या घरून एस्० टी० ने येतात. बाकीचे विद्यार्थी गावातील खानावळींत जेवून वसतिगृहात राहण्यास व अभ्यास करण्यास येतात.

मराठा बोर्डिंग म्हणजे आमचें गुरुकुल असं म्हटल्यास हरकत नाही. या गुरुकुलात आमच्या नशिबाने आम्हास राजर्षि शाहूमहाराजांसारखे कुलगुरु मिळाले. एखाद्या मठात किंवा एखाद्या संप्रदायाच्या पाठशाळेंत जसे पोथीपुराण शिकवितात व धर्मावर व्याख्यानं देतात त्याप्रमाणे महाराज आम्हास व्याख्यान देत नसत. महाराजांची शिकवणूक त्यांच्या स्वतःच्या वागणुकीवरून आम्हास मिळे.

स्कॉलरशिप घ्यावी लागली नाही." मी संस्थेच्या कामासाठी तेथें गेलों असल्यामुळे माझ्याजवळ संस्थेचे अहवाल व विद्यार्थ्यांची यादी होतीच. लागलीच यादी व अहवाल काढून यादींत असलेलें त्याचे नाव मीं त्याना दाखविलें, व त्याच्याकडे येणे असलेली बाकी रकमहि त्यास सांगितली. तेव्हा ते खजील होऊन म्हणाले, "मी अगदीच विसरलों होतों." पुढे या उपरिनिर्दिष्ट विसरभोळ्या डॉक्टरने परतफेड केली की नाही हें मला सांगता येत नाही. अशीं बरींच उदाहरणें आहेत.

मी या संस्थेचा मुख्य चिटणीस सन १९१६ ते १९२१ पर्यंत होतो. त्या वेळी बडोद्याचे खासेराव जाधव हे कार्यकारी मंडळाचे अध्यक्ष असत. पुढे सुमारें १९२२ सालीं ते वारले व त्यांच्या जागीं अध्यक्ष म्हणून माझी निवड झाली. सन १९२३ ते १९५३ पर्यंत मी या कार्यकारी मंडळाचा अध्यक्ष होतों. बरीच वर्षे काम केल्यावर हें अध्यक्षाचें काम दुसऱ्या कार्यकर्त्यांने करावें, अशी मीं कार्यकारी मंडळास विनंती केली; पण दोन तीन वर्षे त्यानी माझी विनंती मानली नाही. शेवटी बडोद्याचे राजरत्न आर्० एस्० माने पाटील यानी आता अध्यक्ष व्हावें असे सुचवून मी अध्यक्षपदाचा राजीनामा दिला. तथापि संस्थेने व्हाइस चेअरमन म्हणून कार्यकारी मंडळात माझें नाव ठेवलेंच आहे. सध्याचे सेक्रेटरी श्री० विठ्ठलराव सातव, बी०ए०, एल्०एल्० बी० वकील दक्षतेने काम पाहतात. जॉइंट सेक्रेटरी म्हणून एस्० एस्० शिर्के काम करीत व त्यानंतर कु० श्री० मा० बाबर व पुण्यातील कार्यकारी मंडळाचे सभासद संस्थेचें काम दक्षतेने करतात. मी फक्त वार्षिक सभेला तेवढा हजर राहतों.

श्री० गंगारामभाऊ म्हस्के याचे स्मारक व्हावें अशी माझी फार दिवसापासून इच्छा होती. त्यासाठी सेवानिवृत्तीनंतर मी स्वखर्चाने कोल्हापुरास दोन वर्षे संस्थेची स्वतंत्र कचेरी चालवून महाराष्ट्रात दोन-तीन दौरे काढले. सुमारें सहासात हजार रुपयेहि जमविले. माझ्या या सर्व मेहनतीच्या व प्रवासात केलेल्या खर्चाच्या मानाने ही रक्कम अल्पशीच होती हें खरें. पण मराठा तरुणाना, विशेषेंकरून संस्थेच्या जुन्या विद्यार्थ्यांना, गंगारामभाऊसारख्या ध्येयवादी व द्रष्ट्या पुढाऱ्याचें कायमचें स्मरण राहावें या दृष्टीने त्याचें स्मारक उभारण्याची माझी इच्छा सफल झाली यातच मला समाधान वाटतें.

या संस्येतून मला सुमारें दोनशेसाठ रुपये स्कॉलरशिप म्हणून मिळाले असावेत. या रकमेची तर मीं परतफेड केलीच, पण त्याशिवाय सुमारें पधरासे रुपये तरी मीं संस्थेला दिले असावेत. विशेषतः उपचिटणीस व नंतर मुख्य चिटणीस असताना या संस्थेचें दप्तर मीं पद्धतशीर बनविलें व संस्थेच्या जुन्या विद्यार्थ्यांकडून परतफेड करण्याची घडी बसविली, याबद्दल मला अभिमान वाटतो. हें काम करताना पुष्कळ वेळा मला अपमानहि सहन करावा लागला आहे; पण मराठ्याने फुकट अगर दान म्हणून कोणाकडूनहि मदत घेऊ नये, मदत घ्यावीच लागली तर ते कर्ज अगर उसनवार समजून परतफेड करण्याची तत्परता दाखवावी, यावर माझा कटाक्ष आहे.

या वेळीं पुण्यास काही मराठा विद्यार्थी सायन्स कॉलेज, डेक्कन कॉलेज, बी० जे० मेडिकल स्कूल, व पोलिस ट्रेनिंग स्कूल¹ या संस्थामध्ये शिकत होते. शाहूमहाराज कोल्हापुराहून वरचेवर पुण्यास येत असत. येण्यापूर्वी मला अगर श्रीपतराव शिंदे यांना आगाऊ कळवीत. मी पुण्यातील काही मराठे स्नेह्यांना घेऊन महाराजांच्या बंगल्यावर (पन्हाळा लॉजवर) जाई. कधी कधी महाराजच माझ्याकडे अगर श्रीपतरावाकडे येत व आम्हास घेऊन बाबुराव जेध्याकडे जेधे मॅन्शनमध्ये जात. रात्रीच थांबून बाबुरावांना खाली बोलावीत व उद्या सकाळीं पन्हाळा लॉजवर या असें सांगत.

पुण्याच्या मराठ्यांचा स्वाभिमान जागृत होऊं लागला व त्यांच्यांत मराठेपणाची जाणीव झाली, हें पाहून महाराजांना वाटूं लागलें कीं, पुण्यासारख्या ऐतिहासिक महत्त्वाच्या शहरात—जेथें स्थानिक पुढाऱ्यांनी बऱ्याच शैक्षणिक व सामाजिक संस्था चालविल्या आहेत, जेथें सरकारनेंहि डेक्कन कॉलेज, शेतकी कॉलेज, मेडिकल स्कूल, पोलिस ट्रेनिंग स्कूल अशा शिक्षणसंस्था काढल्या आहेत, जेथें मुंबईप्रांताचे गव्हर्नर व निरनिराळ्या खात्यांचे मुख्य अधिकारी यांचे सदर स्टेशन असल्याने आपणांस व इतर मराठा संस्थानिकांस वेळोवेळीं जावें लागतें अशा या ठिकाणींच—मराठ्यांनीहि आपली मध्यवर्ती संस्था काढावी. तसें त्यांनी मला वेळोवेळी बोलूनहि दाखविलें होतें.

त्या वेळीं पुण्याचे बाबुराव गणपतराव जगताप हे हायस्कुलांत शिकत होते. सन १९१० सालीं ते कॉलेजमध्ये शिकत असतांना लक्ष्मणराव टोसर यांनी काही मराठा विद्यार्थ्यांच्या साहाय्याने 'मराठा भ्रातृमंडळ' नांवाची संस्था काढली. बाबुराव जगताप हे त्या संस्थेचे सेक्रेटरी होते. भ्रातृमंडळाचा उद्देश गरीब मराठा विद्यार्थ्यांना पुस्तकांची मदत देणें, त्यांना एकत्र आणून त्यांस सद्विचार करण्यास लावणें व त्यांचीं वार्षिक संमेलनें भरविणें असा होता. या संस्थेचे अध्यक्ष शेतकी कॉलेजचे प्रिन्सिपाल डॉ० मॅन हे होते. मीहि या संस्थेच्या कार्यकारी मंडळांत होतों. या भ्रातृमंडळास पुण्यातील मराठा व्यवहारी मंडळाचें साहाय्य असे. तसेंच श्रीशाहूमहाराजांचे जामात, देवासचे श्रीमंत तुकोजीराव महाराज पवार व त्यांचे बंधु भाऊसाहेब हेहि वरचेवर पुण्यास येऊं लागले. त्यांचा लक्ष्मणराव टोसर यांच्याशीं दाट परिचय झाल्यामुळे खुद्द श्रीमंत तुकोजीराव महाराज, त्यांचे बंधु भाऊसाहेब व कोल्हापूरचे मराठा पुढारी भास्करराव जाधव हेहि या संस्थेच्या कामांत चांगलें लक्ष घालीत.

या मंडळाचीं वार्षिक संमेलनें वेताळ पेठेंतील रावसाहेब काळुरामभाऊ मन्साराम नाईक यांच्या भव्य प्रासादांत उत्साहानें व मोठ्या दणक्यानें भरत. या संमेलनास मुंबई कोल्हापुराहून पोक्त व वजनदार मराठा गृहस्थ येत असत व त्यांचीं मराठा समाजसुधारणेवर व्याख्यानें होत. तरुणांचे शारीरिक खेळ होत. वक्तृत्व

१. त्या वेळीं मुंबई प्रांताचें पोलिस ट्रेनिंग स्कूल पुण्यास गणेशखिंड रोड व सध्याचा गोखले रोड यांच्या कोपऱ्यातील प्रशस्त पटांगणांत होते. पुढें काही वर्षांनी ते नाशकास हलविलें गेलें

स्पर्धाहि लागत. असल्या समेलनाच्या वेळीं भास्करराव कामटे, डेप्युटी सुपरिंटेंडेंट ऑफ पोलिस, यांच्याबरोबर त्यांचे चिरंजीव एन्‌० एम्‌० कामटे (सध्या पेन्शनर इन्स्पेक्टर-जनरल ऑफ पोलिस), त्याचप्रमाणे पुण्यांचे व्यापारी सावळाराम महादजी ढोकर यांच्याबरोबर त्यांचे चिरंजीव के० एस्‌० ढोरकर (जे पुढे अ‍ॅडव्होकेट व लेखक म्हणून प्रसिद्धीस आले ते) हेहि येत. हीं दोन्ही मुलें फार उत्साही व वरदरीत दिसत.

भ्रातृमडळाचे सेक्रेटरी बाबुराव जगताप यांचे चुलते रावबहादुर रामजी पाडुजी जगताप हे त्यावेळीं डेप्युटी सुपरिंटेंडेंट ऑफ पोलिस होते. त्यांना आपल्या पुतण्याने पोलिसखात्यात शिरून आपल्याप्रमाणेच मोठे अधिकारी व्हावें असे वाटे. म्हणून बाबुराव हे बी० ए० होताच त्यांनी त्या वेळचे इन्स्पेक्टर-जनरल ऑफ पोलिस मिस्टर केनेडी यांना विनती केली की, बाबुरावांना पोलिस ट्रेनिंग स्कूलमध्ये पाठवावें व पास झाल्यावर त्यांना पोलिस इन्स्पेक्टरची जागा द्यावी. ही त्यांची विनती मान्य होऊन बाबुरावास पोलिस ट्रेनिंग स्कूलमध्ये पाठविलें गेलें. पण बाबुराव पास होण्याच्या आधीच केनेडीसाहेबांच्या जागीं मिस्टर गूटर नावाचे दुसरे इंग्रज गृहस्थ आले. त्यांनी बाबुरावास एकदम इन्स्पेक्टरची जागा देण्याचें नाकारलें व सब इन्स्पेक्टरची जागा देऊ केली. पण बाबुरावांनी ती जागा पत्करली नाही व ते बडोद्यास गेले. तेथे श्रीमत सयाजीराव महाराजांनी त्यांना लष्करी खात्यात लेफ्टनंटची जागा देऊन महाराणीसाहेबांचे ए० डी० सी० केलें. ते बडोद्यास अर्धीच वर्षे होते; पण त्या कामात बाबुरावांचे मन रमेना. तेव्हा त्यांनी महाराजास सांगितलें की, "पुण्यास जाऊन तेथे शैक्षणिक कार्यात पडावें अशी माझी इच्छा आहे." त्या विद्याप्रेमी महाराजांना तें पटलें व त्यांनी बाबुरावांना आपल्या नोकरींतून मुक्त करून आशीर्वाद दिला की, "तुमच्या हातून मागासलेल्या समाजाची सेवा घडो." सन १९१८ च्या मे महिन्यात बाबुराव पुण्यास आले व ज्या शुक्रवार पेठेंत पूर्वी मराठा भ्रातृमडळाची लायब्ररी होती, त्याच पेठेंत त्यांनी भाड्याची एक जागा घेऊन तेथे काही मित्रांच्या मदतीने जुलै १९१८ त मराठी व इंग्रजी शिक्षणाचे वर्ग सुरू केले. याच वर्गांचें रूपांतर पुढे शिवाजी स्कूलमध्ये कसें झालें, याची हकीकत पुढे येईल.

पुण्यास त्या वेळीं मराठा समाजात शिक्षणविषयक जागृति होत होती तेव्हा एकदा विठ्ठलराव शिंदांनी मोकरवाडींत मराठा इतिहासावर व्याख्यानमाला सुरू केली होती. आम्ही चाळीसपन्नास तरुण हजर होतों. बडोद्याचे इंजिनिअर जयराम जनार्दन सावंत यांचें व्याख्यान होतें. विषय बाजीप्रभू व पावनखिंडीची लढाई असा होता. मी अध्यक्ष होतों. मी व सावंत प्लॅटफॉर्मवरील खुर्च्यांवर बसलो होतों. विठ्ठलराव शिंदासह बाकीची मडळी प्लॅटफॉर्मखाली जाजमावर बसली होती. सावंतांच्या व्याख्यानाला बराच रंग आला होता. इतक्यात एक साधारण सडपातळ गृहस्थ, डोक्यास काठेवाडी धर्तीचें पागोटें, अंगात खादीचा आखूड अंगरखा व खादीचा पंचा नेसलेले, बाहेरून एकटेच सभेत आले. विठ्ठलरावांनी त्यांना पाहताच पुढे जाऊन

त्याना आपल्याजवळ बसवून घेतले. विठ्ठलरावाखेरीज आम्हा कोणालाहि त्या नवख्या गृहस्थाची ओळख नव्हती. व्याख्यान सफल, समारोप झाला आणि विठ्ठलराव शिंदे अध्यक्षाचे व व्याख्यात्याचे आभार मानण्यास उठले. प्लॅटफॉर्मच्या जवळ येऊन त्यांनी त्या नवख्या गृहस्थाकडे बोट करून सांगितलें, "हे सज्जन कोण आहेत हें आपणास माहीत नाहीसे दिसतें. हे दुसरे कोणी नसून दक्षिण आफ्रिकेंत हिंदी समाजाचे पुढारी म्हणून ज्यांच्यासंबंधी आपण वृत्तपत्रांतून वाचतों तेच हे गांधीजी होत ते नुकतेच दक्षिण आफ्रिकेतून परत आले आहेत. त्यांचें दर्शन झाल याबद्दल आपणा सर्वांना आनंद वाटेलच."

आम्ही अगदी विस्मयांत पडलों व सर्वांनी त्यांना आदराने नमस्कार केला. गांधींसारख्या जगप्रसिद्ध पण मीं त्या वेळपर्यंत न पाहिलेल्या महात्म्यापुढे अध्यक्ष म्हणून बसण्याचा प्रसंग आलेला मला आठवतो. हेंच माझं गांधीजींचें पहिलं दर्शन. नंतर दुरून त्यांना अनेक वेळा पाहिलं, मुंबई प्रांताच्या उत्तरभागाचा डेप्युटी डायरेक्टर असताना व माझे सहाध्यायी डी० के० भट, एल्० एजी०, अहमदाबादेस डेप्युटी कलेक्टर असताना आम्ही दोघे गांधीजींना भेटण्यास साबरमती आश्रमांत गलों होतों. आम्हांस पाहताच ते आपल्या पर्णकुटींतून बाहेर आले. आमच्या कमनशिबाने तो दिवस त्यांचा मौनाचा होता. श्रीयुत भटांनी माझी ओळख करून दिली. गांधीजींनी नमस्कार करून ओठावर बोट ठेवून मौनव्रतांत असल्याचें दिग्दर्शित केलें. जवळच कोणी आश्रमाचे अधिकारी होते त्यांना आम्हांस आश्रम, त्यांतील गाई व डेअरी दाखविण्यास खुणेने सांगितलें. अशा गांधीदर्शनाची आठवण मी आदरानें पाळतों.

पुण्यातील आम्हा मराठा तरुणांस वाटू लागलं की, आपण एकत्र जमून गप्पागोष्टी करण्यासाठी व बैठे खेळ खेळण्यासाठी आपला एक क्लब असावा. लागलीच आम्हीं बुधवार पेठेंतील नाहुलीच्या हौदाजवळ एका माडीवर चांगली प्रशस्त जागा भाड्याने घेऊन 'मराठा सोशल क्लब'ची स्थापना केली. या क्लबाचा पहिला अध्यक्ष मीच होतों क्लबांत लक्ष्मणराव ढोसर, बाबुराव जेधे, बाबुराव जगताप, गोपाळराव नाईक (ॲडव्होकेट), गोविंदराव साळवी (वकील), रावबहादूर दुबे, गणपतराव शिंदे, शिवाय नुकतीच फौजदारीची परीक्षा पास होऊन नोकरीस लागलेले श्रीपतराव शिंदे, विठ्ठलराव वराळे, सावंत व राणे हे पोलिस अधिकारीहि होते.

या क्लबांत मराठा समाजाच्या शिक्षणाचा व त्याच्या खालावलेल्या सामाजिक परिस्थितीचा चर्चेवर खल होई. एके दिवशीं असाच गप्पागोष्टी चालल्या असताना विठ्ठलराव झेंडे यांनी सुचविलें की, मराठ्यांची श्रीशिवाजी सोसायटी नावाची एक संस्था असावी, तिनें बाबुराव जगताप यांनी चालविलेली मराठी व इंग्रजी शाळा आपल्या ताब्यात घेऊन वाढवावी व त्या शाळेसाठी चांगली इमारत बांधावी. असल्या कामांत आपणास मराठा राजेरजवाड्यांची खात्रीने मदत होईल. पण

प्रथम आपण, स्थानिक मराठ्यानी, काही रक्कम जमविणे वगैरे. त्यासाठी आपण इमारत फंड काढून स्वत:चे आकडे टाकू या. या उत्साही वातावरणात त्याच बैठकीस सहासात जणानी एकेक हजार रुपये देण्याचीं वचनें दिलीं. त्यात विठ्ठलराव झेंडे व मी होतो. श्रीशिवाजी सोसायटी व तिच्या शाळेसाठी इमारत फंड हे काही दिवस रोजच्या चर्चेचे विषय झाले. आणि एका सभावजा बैठकीत या गोष्टीचा परत खल होऊन प्रत्येकी हजार रुपये देणगी देणाऱ्यांची सख्या सतरा किंवा अठरा झाली.

याच सुमारास श्रीशाहूछत्रपतींच्या मनात मराठ्याचें सघटन करून त्यांच्या-कडून समाजाचें शैक्षणिक व सामाजिक कार्य करून घ्यावें व त्यासाठी पुणेकर मराठ्याचा उपयोग करून घ्यावा अशी कल्पना घोळत होती. एकदा श्रीशाहूमहाराज पुण्यास आले त्या वेळीं मी त्याना पुण्यास मराठा तरुणानी चालविलेल्या ल्हान ल्हान सस्थाची व त्यानी केलेल्या प्रगतीची सायंत हकीकत निवेदन केली. महाराजाना आनद झाला. ते म्हणाले, "तुम्ही योजिलेली शिवाजी सोसायटीची कल्पना मूर्त स्वरूपात आणण्यासाठी मी पचवीस हजार रुपयाची देणगी देईन. पाहिजे तर तुम्ही तसे जाहीर करा." महाराजानी दिलेल्या प्रोत्साहनावरून पुण्यातील मराठा पुढाऱ्यास हुरूप आला व बाबुराव जेध्यासारख्या पुढाऱ्यानी द्रव्यनिधि जमविण्याचा चग बाधला. अशा तऱ्हेने सोसायटीच्या कार्यास १९१८ सालीं सुरुवात झाली. सोसायटीचे अध्यक्ष शाहू महाराज व सेक्रेटरी देवासचे खासेसाहेब महाराज हे असावे असे ठरले. बाबुराव जगताप यानी शुक्रवार पेठेंत स्वत:च्या हिमतीवर सुरू केलेल्या ल्हानशा शाळेस अशा रीतीने शिवाजी सोसायटीचें मोठ स्वरूप आले.

श्रीमत खासेसाहेब पवार हे आपल्या मातोश्री, पत्नी व दोन मुलें याना घेऊन विद्याभ्यासासाठी विलायतेस लडन शहरीं राहात असत. सन १९११ पूर्वीच त्याची लडन मॅट्रिक परीक्षा पास झाली होती. ते आय्० सी० एस्० चा अभ्यास करीत होते सन १९१२ साली मला मुबई सरकारने युरोप देशातील शेती व सहकारी सस्था याच निरीक्षण करण्यासाठी पाठविले, त्या वेळीं माझ्या बोटींत श्रीमत सयाजीराव महाराजाचे पुतणे शकरराव गायकवाड हे होते. श्रीमत खासेसाहेब लडनमध्येच राहात, पण माझा त्याचा त्या वेळपर्यंत परिचय झाला नव्हता. मी लडनला गेल्याची माहिती शकरराव गायकवाडामार्फत खासेसाहेब यास मिळताच ते व त्याची पत्नी श्रीमती सौ० जिजीबाई-साहेब या दोघानी माझी नॉर्थब्रुक सोसायटींत गाठ घेतली. त्या वेळेपासून माझा त्याचा दृढ परिचय झाला व त्याच्या हयातीअखेरपर्यंत आम्ही निकटवर्ती स्नेही बनलो होतो. मी युरोपात नऊ दहा महिने होतो. युरोपमध्ये असताना मी आठदहा दिवस फिरतीवर जाई व परत येऊन आठवडाभर लडनमध्ये घालवी. या प्रवासात पश्चिम युरोपातील बेल्जम, हॉलड, डेन्मार्क, वगैरे देशात मीं लडनहून सफरी केल्या. एकेका देशाची सफर करून मी परत लडनला येई व तेथे काही दिवस मुक्काम करीत, असे. लडनमधल्या

मुक्कामात वरचेवर श्रीमंत खासेसाहेबांच्या भेटी होत. ते कधीकधी मुद्दाम जेवणाचा बेत करीत. एकदा समुद्रकिनाऱ्यावर नोमर येथे राहावयास गेले असताना तेथे मीहि त्यांच्याबरोबर गेलो होतो. त्यांच्या सहवासात असताना, त्यांनी मजकडून शाहूमहाराजांच्या शिक्षणविषयक चळवळीची व पुण्यात नवीनच स्थापन झालेल्या शिवाजी मराठा सोसायटीची माहिती घेतली. त्यांच्या मनाने घेतले की पुणे हेंच मराठ्यांच्या कार्यक्षेत्रास योग्य स्थळ आहे व पुणेकरांनी शाहूमहाराजांच्या प्रोत्साहनाने शिवाजी मराठा सोसायटी स्थापून मराठ्यांची सर्वांगीण उन्नति करण्यास जो प्रारंभ केला आहे त्यास्तव आपण मदत करावी. त्यांनी लंडनहून ग्वाल्हेर येथील आपले आप्त जहागिरदार यांना पत्रें लिहून शिवाजी मराठा हायस्कूलकरवा चांगले शिक्षक तयार करण्यासाठी पाच जणांकडून प्रत्येकी दरमहा पन्नास पन्नास रुपयांच्या फ्लोशिप्स मिळविल्या. शिवाजी मराठा सोसायटी व शिवाजी मराठा हायस्कूल यांच्यामार्फत कोणतें काम करून घ्यावयाचें याची आम्ही चर्चा करीत असू.

सन १९१२च्या ऑक्टोबरमध्ये खासेसाहेब माझ्याबरोबरच सहकुटुंब स्वदेशीं परत आले. देवासला ते आपल्या मोठ्या बंधूचे (मल्हारराव महाराजांचे) दिवाण म्हणून काम करीत. मल्हारराव महाराजांनी बहुतेक राज्यकारभार आपल्या या विद्वान् बंधूवर सोपविला होता. खासेसाहेब वरचेवर सहकुटुंब पुण्यास येऊन शिवाजी सोसायटीच कार्य बारकाईने पाहत पुण्यास असतांना त्यांचा मुक्काम बहुतेक माझ्याकडेच असे. कधीकधी ते श्रीमंत मानकरीणबाई (या इनामदार बाई खासेसाहेबांच्या पत्नीच्या मावशी लागत) यांच्याकडेहि राहात. पुढे त्यांच्या मनातून श्रीशिवाजीमहाराजांचा अश्वारूढ पुतळा पुण्यास प्रमुख ठिकाणीं उभा करण्याचं आलं.

त्या काळीं शिवाजीमहाराजांचें नाव इंग्रज राज्यकर्त्यांना झोंबत असे. तथापि पहिल्या जागतिक युद्धात मराठा सैनिकांनी इंग्रज राज्यकर्त्यांसाठी जें रक्त सांडलं त्याची राज्यकर्त्यांना जाणीव होती. "श्रीशिवाजीमहाराज की जय!" अशा घोषणा रणांगणावर त्यांनी ऐकल्या होत्या. त्यामुळे पूर्वीप्रमाणे त्यांना शिवाजीच्या नावास विरोध करणें अडचणीच वाटे. ही संधि पाहून, श्रीमंत खासेसाहेबांनी अश्वारूढ पुतळ्याची सूचना मराठा समाजापुढे मांडली. पुष्कळ लोकांची समजूत होती की इंग्रज राज्यकर्ते शिवाजीमहाराजांचा पुतळा उभारण्यास संमति देणार नाहीत. मीसुद्धा खासेसाहेबांना म्हणालो, "अहो, खुद्द कोल्हापुरास, शिवाजीमहाराजांच्या वंशजांच्या राजधानींत, शिवजयंतीचा उत्सव करण्यास रेसिडेंट अडचण आणी. अशी वस्तुस्थिति असता, तुम्ही तर शिवाजीमहाराजांचा अश्वारूढ पुतळा महाराष्ट्राच्या जुन्या राजधानींत उभा करावा म्हणता. हें जमेल का?" खासेसाहेब म्हणाले, "पाटील साहेब, ज्या महात्म्याने हिंदुधर्म राखला त्यांच्या आम्ही भावी पिढीने जिवापाड खटपट करून निदान त्यांची आठवण कायम टिकविण्यासाठी प्रयत्न नको का करायला?

मी ग्वाल्हेर, इंदोर, देवास व धार येथील राजाचा पाठिंबा मिळवू शकेन. आपण दोघे छत्रपति शाहूमहाराज यांच्याकडे जाऊ या व प्रयत्न तर करू या."

या वेळीं महात्मा गांधींची स्वराज्यविषयक चळवळ जोरांत होती व स्वराज्या साठी लोक उतावीळ झाले होते. देशात अशांतता माजली होती. म्हणून इंग्रज राज्यकर्त्यांनी हिंदुस्थानवासियांची समजूत घालण्यासाठी युवराज प्रिन्स ऑफ वेल्स यांना हिंदुस्थानात दौऱ्यावर पाठविण्याचें ठरविलें. स्वराज्यवादी पुढाऱ्यांनी इंग्लंडच्या युवराजाच्या दौऱ्यावर बहिष्कार पुकारला होता. तसेच युवराज जर शिवाजी महाराजांचा पुतळा बसविण्यास आलेच तर त्या समारंभावर कडक बहिष्कार घालण्याचें ठरविलें होत. इंग्रजांना मराठादि लढवय्या जातींचा पाठिंबा पाहिजे होता. म्हणून आमच्या मराठे मंडळींनी असें ठरविलें कीं, पुण्यास शिवाजीमहाराजांच्या अश्वारूढ पुतळ्याचा पाया बसविण्यासाठी इंग्लंडचे युवराज प्रिन्स ऑफ वेल्स यांना आमंत्रण द्यावें व महाराष्ट्रांतील मराठ्यांचा इंग्रजांस पूर्ण पाठिंबा आहे, हें दाखविण्यासाठी पुतळ्याचा पाया घालण्याच्या वेळींच महाराष्ट्रांतील पाटील लोकांची परिषद पुण्यास भरवावी, म्हणजे इंग्लंडच्या युवराजांना मराठ्यांचा पाठिंबा मिळविण्यासाठी श्रीशिवाजीमहाराजांच्या पुतळ्याचा पाया घालण्याचें आमंत्रण स्वीकारणें भाग पडेल. या गोष्टी ठरल्यानंतर, मी लवकरच विशेष अभ्यासासाठीं रजा (स्टडी लीव्ह) घेऊन अमेरिकेस गेलो. त्यामुळे हा मराठ्यांचा व मराठे राजेरजवाड्यांचा आजवर कधीहि न भरलेला अद्भुत मेळावा पाहण्यास मला मिळाला नाही. तथापि संस्थेचे सेक्रेटरी व माझे परमस्नेही के० के० एन्० पवार इकडच्या सर्व हकीकती मला लिहून कळवीत. शिवाजीमहाराजांच्या पुतळ्याचा पाया घालण्याचा समारंभ व पाटील परिषद मोठ्या थाटाने तारीख १९ नव्हेंबर सन १९२१ रोजीं यशस्वी रीतीने पार पडल्याचें मीं अमेरिकेंत वाचलें.

मराठा समाजाच्या कमनशिबानें शाहूमहाराज सहा महिन्याच्या आतच निवर्तले. पण त्यांचे चिरंजीव राजाराममहाराज, ग्वाल्हेरचे माधवराव शिंदे व इंदोरचे तुकोजीराव महाराज होळकर यांच्या साहाय्याने श्रीमंत दासेसाहेब महाराज पवार यांची, अमरकीर्ति क्षत्रियकुलावतंस श्रीशिवछत्रपतींचा अश्वारूढ पुतळा उभारण्याची आकांक्षा फलद्रूप झाली.

पुण्यास श्रीशिवाजीमहाराजांचें स्मारक म्हणून एक हायस्कूल व जमल्यास एक कॉलेज असावें, अशी श्रीशाहूछत्रपतिमहाराजांची इच्छा सन १९१२ सालापासून होती. त्यांपैकी पहिला भाग शिवाजी मराठा हायस्कूल सन १९१८ सालीं स्थापन झाल्याने पुरा झाला. श्रीमंत दासेसाहेब महाराज यांचे अविरत श्रम व श्रीशाहूमहाराजांचा दृढ निश्चय फळास येऊन तारीख १९ नव्हंबर १९२१ रोजीं श्रीशिवाजीस्मारकाचा पाया ~ ~ युवराज प्रिन्स ऑफ वेल्स यांचे हस्तें घातला गेला. हें स्मारक घडवून आणण्याच्या कामीं श्रीमंत अलिजाबहादूर माधवराव महाराज शिंदे यांनी फार कष्ट

घेतले व द्रव्यसाहाय्यहि केलें. सर तुकोजीरावमहाराज होळकर, श्रीशाहूमहाराज छत्रपति व सांगलीचे राजेसाहेब सर चिंतामणराव पटवर्धन वगैरे राजे लोकांनी तत्परतेने साहाय्य केलें होतें.

शाहूमहाराज तारीख ५ माहे मे सन १९२२ रोजीं निवर्तल्यावर शिवाजी स्मारकाच्या कामाची धुरा श्रीमंत माधवरावमहाराज शिंदे यांनी उचलली; पण त्यानाहि काळाने लौकरच ओढून नेलें. सन १९२६ पासून शिवाजी स्मारक कमिटीच्या अध्यक्षाचें जबाबदारीचें काम त्या वेळचे तरुण छत्रपति राजाराममहाराज यांच्यावर पडलें व त्यांनीहि आपल्या पूर्वजाच्या स्मारकाची जबाबदारी आपलीच असें मानून ती तनमनधनेंकरून पार पाडण्याचें ठरवून पत्करली. पण पूर्वसंकल्पित उद्देशांत व इमारतींतहि परिस्थितीनुसार बदल करावा, असें संस्थेचे ऑनररी इंजिनिअर दिवाणबहादूर वी० पी० जगताप यांचें म्हणणें पडलें. त्यांचें मत लष्करी शिक्षणास महत्त्व द्यावें असें होतें. अर्थातच इमारतहि 'सैनिक स्कूलच्या' धर्तीवर होणें जरूर होतें. राजाराम छत्रपति व आम्ही स्मारक समितीचे सभासद यांनी जगतापांचें म्हणणें मान्य केलें. पहिल्या जागतिक युद्धांत मराठा ज्वानांनी नावाजण्यासारखा पराक्रम केला होता व पुष्कळांनी धारातीर्थीं देह ठेवले होते. इंग्रजांना मराठ्यांनी सांडलेल्या रक्ताची जाणीव होती व त्याची कामगिरी रुजू होती. लोकांस वाटत होतें कीं, इंग्रज सरकार लौकरच भारतांत एक मिलिटरी ॲकॅडमी काढील. अशा वेळीं आपण विद्यार्थी तयार केले तर त्यांना त्या ॲकॅडमींत प्रवेश मिळेल,' हें जाणून स्मारक कमिटीने विलायतेंतील पब्लिक स्कूलच्या धर्तीवर हायस्कूलची आखणी केली. आणि त्याप्रमाणे सन १९३० सालीं ही इमारत बांधली गेली.

संस्थेची सर्व जबाबदारी राजाराममहाराज छत्रपति यांनी घेतली आणि ती उदार अंतःकरणाने पार पाडली. हें स्कूल आर्थिक अडचणींत असतांना राजाराम महाराजांचें औदार्य व चिकाटी आणि त्यांचे दिवाण रावबहादूर दादासाहेब सुर्वे यांचें मनोधैर्य यामुळे ही संस्था त्या वेळीं टिकाव धरू शकली. संस्थेचा रौप्यमहोत्सव तारीख २० सप्टेंबर १९५७ रोजीं केंद्रसरकारचे शेतकीमंत्री डॉ० पंजाबराव देशमुख यांच्या हस्तें झाला. त्या वेळी मी स्वागताध्यक्ष होतों. या समारंभानंतर त्याच दिवशीं डॉ० पंजाबराव देशमुख यांच्या हस्तें नवीन वसतिगृहाची कोनशिला बसविली गेली.

श्रीशिवाजीस्मारकाची इमारत बांधण्याचें काम कै० रावबहादूर दुबे कन्त्राटदार यांच्याकडे सोपविलें व ब्रॉंझ धातूचा अश्वारूढ पुतळा तयार करण्याचें काम प्रख्यात शिल्पकार कै० म्हात्रे यांजकडे सोपविलें. म्हात्रे यांच्याकडून पुतळा वेळेवर आला नाही म्हणून पुढे थोड्या दिवसांनी सध्या उभा असलेला पुतळा दुसरे शिल्पकार श्रीयुत

पब्लिक स्कूल म्हणजे स्वतःचें वसतिगृह असलेलें व ज्यांत पहिल्यापासून इंग्रजी भाषेतून शिकविलें जातें व विद्यार्थ्यांस शिस्त लावण्यांत येत असें हायस्कूल

करमरकर यांच्याकडून करवून घेऊन त्याची स्थापना झाली. श्रीशिवाजी मेमोरियलची पहिली कल्पना, एक मोठे इतिहासविषयक पुस्तकालय, जुने रेकॉर्ड (दप्तर), जुनी उपयुक्त पुस्तक व संशोधनास लागणारे साहित्य, जुन्या काळातील हत्यारे ठेवण्याचे शस्त्रागार हीं असावीत, अशी होती. पण स्मारक सोसायटीचे सेक्रेटरी कै० दिवाणबहादूर वी० पी० जगताप, इंजिनिअर, यानी दूरदर्शीपणाने इमारतीची आखणी विलायतेंतील पब्लिक स्कूलच्या धर्तीवर केली. दिवाणबहादूर जगताप याना पैसा कसा किफायतशीर गुंतवावा हें चांगले समजे. त्यानी लागलीच पुणे रेल्वेस्टेशनजवळ मुळा नदीच्या कांठीं सुमारें पंचवीस एकर जागा स्मारकाच्या वतीनें घेऊन टाकली. ही जागा सध्या विद्यार्थ्यांस घोडदौडीसाठी व निरनिराळ्या प्रकारच्या खेळासाठी उपयोगी पडते.

या स्कूलचे पहिले प्रिन्सिपल कर्नल हचिसन याच्या कारकिर्दींत ही शाळा जोरात चालली हचिसनच्या मागून कर्नल वूट, नतर कॅमेरॉन याच्या वेळींहि स्कूलची व्यवस्था ठीक होती. त्यानतर सस्थेचे सेक्रेटरी दिवाणबहादूर जगताप आपल्या एकट्याच्या जबाबदारीवर काम करू लागले व वेळोवेळीं प्रिन्सिपलच्या जागीं योग्य माणसे निवडली गेली नाहीत. त्यामुळे सस्थेच्या कामात शिथिलता व गैरव्यवस्था झाली. जगतापाच्या निधनानतर रावबहादूर दादासाहेब सुर्वे, सस्थेचे अध्यक्ष राजाराममहाराज याचे खास प्रतिनिधि म्हणून, काहीसे स्वतत्रपणे काम करीत. जगतापाच्या कारकिर्दींत दादासाहेब त्याच्या सल्ल्याने काम करीत. परतु जगतापाच्या निधनानतर दादासाहेब सुर्वे स्वत.च कोणाचाहि सल्ला न घेता प्रिन्सिपलच्या नेमणुका वगैरे गोष्टी करीत. सन १९२१ ते १९२६ च्या दरम्यान त्यानी प्रिन्सिपलच्या जागवर ज्या माणसाच्या नेमणुका केल्या, त्याच्याविषयींच्या पूर्ण माहितीच्या अभावीं लायक माणसाची निवड झाली नाहीं. त्यामुळे सस्थेची फार आबाळ झाली व शाळेस दरसाल पधरा ते वीस हजार रुपयाची तूट येऊ लागली. ही तूट छत्रपति राजाराममहाराज उदारपणाने भरून काढीत. सस्थेची अनास्था आम्हास, विशेषेकरून मी, विठ्ठलराव घाटे व बाबूराव घोलप, यास आवडली नाही. त्यामुळे घाटे आणि घोलप यानी सस्थातून अंग काढून घतल. मला मात्र जबाबदारींतून अग काढणे बरे वाटलें नाही.

ही परिस्थिति सुधारण्यासाठी मीं श्रीयुत घाटे व घोलप याचें मन वळवून त्यास सस्थेच्या कमिटीवर पुन्हा येण्याबद्दल गळ घातली. माझी विनती मान्य करून ते सस्थेंत परत आले. पुढे आम्ही शाळेच्या सुधारणेचा विचार करीत असताना घाटे म्हणाले का, "माझ्या परिचयाचे श्री० एन्० एल० खानोलकर नावाचे गृहस्थ सिंधिया पब्लिक ग्वाल्हेरला स्कूलमध्ये काम करीत आहेत. मी त्यास लिहून त्याची समति घेतों. तुम्ही ग्वाल्हेरच्या महाराजाशीं पत्रव्यवहार करा." या त्याच्या सूचनेप्रमाणे मीं जिवाजीराव शिंदेमहाराजास पत्र पाठवून, "खानोलकर यास श्रीशिवाजी प्रिपरेटरी मिलिटरी स्कूलच्या प्रिन्सिपलच्या जागसाठी आम्हास द्यावें" अशी विनती केली. ती मान्य

होऊन, खानोलकर यांची सदर जागीं जून १९५७ साला नेमणूक झाली. खानोलकरांना पब्लिक स्कूलचा चोवीस वर्षांचा अनुभव असल्यामुळे, त्यांच्या कारकिर्दीत शाळेचें काम सुरळीत व व्यवस्थित चाललें असून, संस्थेची उत्तरोत्तर प्रगति होत आहे. आता आपल्या देशातील पब्लिक स्कूल्समध्ये या स्कूलचा दर्जा चांगला मानला जातो.

मी पहिल्यापासून या मेमोरियल सोसायटीच्या गव्हर्निंग बॉडीचा सभासद होतो त्या वेळेपासून आजपर्यंत मी या मंडळात काम करीत आहें. सन १९५७-१९५८ साला रावबहादूर दादासाहेब सुर्वे यांना कांही अडचणीमुळे सभेस हजर राहता येईना. म्हणून त्यांच्या गैरहजेरीत सभेच्या अध्यक्षाचें काम मला करावें लागे. सन १९५८ साला त्यांनी अध्यक्षपदाचा राजीनामा दिला व त्यांच्या जागीं अध्यक्ष म्हणून माझी निवड झाली. त्या जागेवर मी सप्टेंबर १९५९ पर्यंत होतों. पुढे वृद्धापकाळामुळे मी कोल्हापूर सोडून माझे कनिष्ठ चिरंजीव नानासाहेब यांच्याकडे गावळकांड्यास राहण्यास गेलें व अध्यक्षपदाचा राजीनामा दिला. माझ्या जागीं श्रीमंत विजयसिंगराव डफळे, राजेसाहेब जत, यांची नेमणूक झाली. त्यांनीहि अलीकडे राजीनामा दिला. आता श्री० सभाजीराव घाटगे चेअरमन आहेत. मी या गव्हर्निंग मंडळाचा सभासद असून त्यांच्या सभांना हजर राहण्याचा प्रयत्न करतो.

शिवाजी मेमोरियल सोसायटी व तिने चालविलेलें श्रीशिवाजी प्रिपेरेटरी मिलिटरी स्कूल यांचें कामकाज गव्हर्निंग बॉडी व स्टँडिंग कमिटी यांच्या मार्फत चालतें. गव्हर्निंग बॉडीचे चेअरमन सध्या सभाजीराव घाटगे व स्टँडिंग कमिटीचे चेअरमन बाबूराव घोलप आहेत. या दोहोंचे चिटणीस, उपरिनिर्दिष्ट स्कूलचे प्रिन्सिपल हे असतात. श्रीशिवाजी मेमोरियल सोसायटीचे अध्यक्ष छत्रपति श्रीशहाजीमहाराज, कोल्हापूर, हे आहेत.

राजर्षि शाहूमहाराजांनी सन १९०१ सालीं स्थापिलेल्या श्रीशाहू वसतिगृहातील (आमच्या गुरुकुलातील), खुद्द कुलपति राजर्षींच्या पहिल्या तुकडींतील, एक छात्र असल्याचा अभिमान घेऊन मी त्या संस्थेतून बाहेर पडलों. आजहि शाहू वसतिगृह मला मातृतुल्य वाटतें. दुसरें असें की, सरकारी कामानिमित्त उत्तर व दक्षिण महाराष्ट्रात, कोंकणात व खानदेशात फिरण्याची व मराठा शेतकऱ्यांत वावरण्याची संधि मला सन १९०६ पासून मिळाली. तशी संधि त्या काळीं दुसऱ्या मराठा व्यक्तीस क्वचितच मिळाली असेल. अशा परिस्थितींत संधि मिळेल तेव्हा व तेथे मी श्रीशाहूछत्रपतींचा आदेश पोंचवीं व त्यांनी सुरवात केलेली वसतिगृहाची प्रथा पसरविण्याचा प्रयत्न करीं. जेथे तशल्या संस्था स्थापन झाल्या असतील त्यांना भेट देईं. माझ्या वेळचे कोल्हापूर मराठा बोर्डिंगातील तरुण जेथे जेथ गेले तेथे मराठा वसतिगृहें स्थापण्यास अनुकूल वातावरण निर्माण झालें.

याच सुमारास (सन १९०७ साला) मराठा शिक्षण परिषदेचा जन्म झाला होता. कोल्हापूरचे भास्करराव जाधव व दाजीराव विचारे (ज्यांनी सन १९०१ साला

शाहूमहाराजांच्या प्रोत्साहनाने कोल्हापुरास मराठा बोर्डिंग चालविलें होतें) यांच्यासारखी मंडळी मराठा शिक्षण परिषदेच्या मूळ उत्पादकांत असल्याने, जेथ जेथे परिषदेची अधिवेशनें भरलीं तेथे तेथे वसतिगृहाचा प्रचार झाला व मराठा वसतिगृह निघू लागलीं. महाराष्ट्रांत जागोजागीं मराठा वसतिगृहें निघालींच होतीं. वर लिहिल्याप्रमाणे मला अनायासें महाराष्ट्रभर फिरावयास मिळे, त्यावेळीं मी अगत्यानें नवीन निघालेल्या वसतिगृहास भेट देऊन माझा कोल्हापूरच्या मराठा वसतिगृहाचा अनुभव व त्यांतील कार्यकर्त्यांची कामगिरी निवेदन करीं, मार्गदर्शन करीं व जागच्या जागीं थोडीफार मदतहि देईं. असलीं वसतिगृहें अहमदनगर, सगमनेर, पंढरपूर, बारामती, नाशिक, जळगाव व नांदगाव येथे स्थापन झालीं. कोल्हापुरास जसें श्रीशाहू वसतिगृह हें मराठा चळवळीचें मध्यवर्ती केंद्र ठरलें, तसेंच नाशिक व जळगाव येथील वसतिगृह नाशिक व खानदेश जिल्ह्यात मराठा चळवळीचीं मध्यवर्ती केंद्र ठरली. सातारच्या कर्मवीर भाऊराव पाटलाच्या संस्था जरी मराठ्यांच्या म्हणून निघाल्या नाहींत तरी त्यांचा फायदा विशेषतः मराठा समाजालाच मिळाला. भाऊराव स्वतःच म्हणत, "माझे गुरुजी शाहूमहाराज व मी त्यांच्याच ध्येयाचा प्रचारक आहें." भाऊरावांनी व त्यांच्या सहकाऱ्यांनी सगळा सातारा जिल्हा हलवून सोडला. मराठा शिक्षण परिषदेनें बोर्डिंगाचें लोण वऱ्हाडासहि पोचविलें. हें बीज वऱ्हाडच्या सुपीक जमिनींत लौकर रुजलें व फोफावलें. पंजाबराव देशमुखांसारख्या कट्टर ब्राह्मणेतर पुढाऱ्यांनी तर फार मोठी कामगिरी केली. मराठवाडा व वऱ्हाड इकडील काम माझ्या सरकारी कार्यक्षेत्राच्या बाहेर असल्याने त्यात माझा संबंध फारसा आला नाहीं. ज्या संस्थांशीं माझा कांही संबंध येई त्याचीच माहिती माझ्या कथेत येणें बरें.

मी महाराष्ट्र व खानदेश भागाचा शेतकी इन्स्पेक्टर असल्याने मला जळगावास जावें लागे. सन १९१३-१४ मध्ये तर माझं सदर स्टेशन जळगावासच होतें. जळगावास शिक्षणाची सोय नव्हती. तेथे एक इंग्रजी तीनचार इयत्ता असलेलें मिडल स्कूल मात्र होतें.

एक वर्षानंतर माझं सदर स्टेशन पुण्यास परत आलें व तेथूनच मी वेळोवेळीं निरनिराळ्या जिल्ह्यात फिरतीवर जाई. या कपाशी पिकणाऱ्या भागाकडे, पैशाच्या व माणसांच्या अभावीं, आमच्या खात्याला लक्ष देता आलें नव्हतं. पश्चिम खानदेशांत धुळ्यास फक्त एक सरकारी फार्म निघालें होतं. सन १९०९ पासून माझी खानदेशांत ये जा सुरू झाली. सन १९१० सालीं शेतकी खात्याने जळगावास एक मोठें शेतकी प्रदर्शन भरविलें.

या प्रदर्शनांत झालेल्या घटनांची हकीकत देण्यापूर्वी खानदेशाच्या घटणीची त्रोटक माहिती देणें इष्ट होईल. गुजरातचा दक्षिण भाग पश्चिम खानदेशास लागून आहे. उत्तरेस सातपुड्यांत भिल्लांची मोठी वस्ती आहे. पश्चिम सातपुड्यांत व उत्तर सह्याद्रीच्या खोऱ्यांतहि कोळी व भिल्लांची बरीच वस्ती आहे. पूर्वी गुजरातेंत

अहमदाबादेस, त्याचप्रमाणे तापी-सातपुडयाच्या उत्तरेस नेमाड मुल्पासाठी व हाणपूर येथे, दिल्लीच्या बादशहाचे सुभेदार असत. सातपुड्याच्या उत्तरेस हिंदी भाषिक लहान लहान राज्ये होती. या कारणामुळे खानदेशात परप्रांतीय व परभाषीय लोकांची प्राचीन काळापासून आवक होणे साहजिकच होत. दक्षिण गुजरातत शेतीच्या मानाने शेतकरी लोकांची संख्या मोठी व त्या मानाने पूर्व आणि पश्चिम खानदेशात तापी नदीच्या काठी मुबलक काळीभोर जमीन असे. अशा परिस्थितीत मुसल्मानी अमदानींत चतुर व मेहनती गुजराती लेवे कुणब्यांनी खानदेशाकडे आपला मोर्चा वळविला असल्यास नवल नाही. खानदेशात येऊन त्यानी नवीन वतनवाड्या संपादिल्या. पुढे त्यांचा विस्तार झाला व स्वाभाविकपणें ते मुल्की वा स्थानिक बनले. मुसल्मानी अमदानींत काही रजपूत (रावळ) खानदेशात येऊन स्थायिक झाले होते.

खानदेशी मराठा दक्षिणेतील मराठयापेक्षा व गुजराती लोकांपेक्षा भोळसर, आहे त्यात समाधान मानून राहणारा; शिवाय त्यांची सांपत्तिक स्थितीहि बरी होती. शेतकीच्या धंद्यात लेवे हुशार, हिशेबी व महत्त्वाकांक्षी होते. इंग्रजी अमलात प्राथमिक शिक्षणाच्या शाळा निघाल्या तेव्हा त्याचा लेवे कुणब्यांनी पुरा फायदा घेतला; तसे तिरोळे कुणब्यांचे (मराठयांचे) झाले नाही. लेव्यांचीं मुलें भराभर शिकलीं. त्यांनी शेतकीबरोबर जोडधंदा म्हणून नवीन नवीन निघणाऱ्या शाळांत, शिक्षकाच्या नोकऱ्या पत्करल्या. मी खानदेशात गेल्यावेळीं प्राथमिक शाळांत शिक्षकांचा भरणा लेव्यांचाच होता. त्यांच्या खालोखाल स्थानिक व दक्षिणेंतून आलेले ब्राह्मण होते. मराठे व तिरोळे यांच्यात वास्तविक फरक नाही, तथापि जुनीं मराठी घराणीं (देशमुख व काही पाटील) आपल्यास मोठे समजत. तिरोळे कुणब्यात न्यूनगंड असला तरीहि ते खाऊनपिऊन सुखी असल्याने ते मराठा म्हणवून घेणाराचा हेवा करीत नसत. तिरोळे समाजात शिक्षण फार कमी असल्याने त्यांच्यातील शिक्षक विरळाच दिसत. या वर्गाची राहणी फार मागासलेली असे व त्यांचीं नांवेंहि दगडू, शेणफेडू, झिपरू, अशा प्रकारचीं असायचीं.

वर उल्लेखिलेल्या प्रदर्शनाच्या वेळीं मराठे, तिरोळे व लेवे कुणबी पुष्कळ जमले होते. त्या वेळीं आम्हीं मराठा शिक्षकांची एक सभाहि भरविली व विद्याप्रसाराचा आणि मराठ्यांच्या संघटनेचा विचार केला. तिरोळ्यांच्या न्यूनगंडाबद्दल चर्चा झाली व तिरोळे शिक्षकांनी आपलीं विशेषनामें बदलणें बरें, असे सभेने मत प्रदर्शित केले. प्रदर्शनाची मुख्य जबाबदारी माझ्यावर होती. डेप्युटी कलेक्टर व मामलतदार मला मदत करीत. त्या वेळीं शेतकऱ्यांनी एक मोठें जेवण घालावयाचें ठरविले. असल्या जेवणात सोवळे ब्राह्मण येण्याची अपेक्षा नव्हतीच. मला व सावद्याचे मामलतदार रावसाहेब कदम यानाच आमंत्रण होतें. जेवणाची व्यवस्था लेवे कुणबी व त्यांच्यातील शाळाधिकारी आणि एक वकील यांच्याकडे होती. मराठ्यात व तिरोळ्यात एकहि वकील नव्हता. एका सोप्यात एका बाजूस लेवे व दुसऱ्या बाजूस तिरोळे; व दोन्ही

पक्तीस जोडणाऱ्या आडव्या जागत, अधिकारी म्हणून, माझ्यासाठी व रावसाहेब कदम मामलतदारासाठी पाट व चौरग माडले होते. लेवे आणि तिरोळे याच्यातील रोटीव्यवहारासबधी माहिती आम्हास नव्हती. आम्ही त्या वेळीं हा प्रश्न उपस्थित केला नाही पण माझ्या मनाला ही पक्तीची माडणी पसत पडली नाही. खासगी विचारपूस करता कळले की, लेवे शाकाहारी असल्याने ते मराठ्याकडे जेवत नाहीत

मी डेक्कन मराठा एज्युकेशन असोशिएशनचा सेक्रेटरी असल्याने मला माहीत होत की लेवे विद्यार्थी मराठे म्हणून आमच्या सस्थतून स्कॉलरशिप घेत असत, पण कोणी परतफेड करात नसत हें माझ्या लक्षात आलें व वर्षाअखेर वार्षिक सभेंत हा प्रश्न निघून मराठ्याशिवाय इतरास स्कॉलरशिप न देण्याचे ठरल. जळगावास प्रदर्शन पाहण्यासाठी जी मराठे तिरोळे मडळी जमली होती त्याची एक खासगी बेठक घेऊन त्याच्यात सघटना कशी करावी व त्याच्यात इग्रजी शिक्षणाचा प्रसार कसा करावा याबद्दल थोडी चर्चाहि झाली.

यानतर चार पाच वर्षानी कायदेकौन्सिलाच्या पहिल्या निवडणुकी झाल्या मराठ्यात कोणी सुशिक्षित पदवीधर माणूस नव्हता. खानदेशातील जुन्या मराठ्याशीं माझा परिचय झाला होता. नेर, अमळनेर, नगरदेवळ, चाळीसगाव व चोपडे येथील देशमुख मला चागले ओळखीत. नेरच्या फत्तेसिंगराव देशमुखानी माझी धुळ्यास गाठ घेऊन मला आपल्या गावींहि शिकारीस नेलें होतें चोपड्याचे आनदराव देशमुख हे दहा बारा गावचे सरपाटील असून त्याच्या पुतण्याशीं माझ्या जामाताच्या बहिणीच लग्न झाल होतें. आनदराव देशमुख जळगावास माझ्याकडे वरच्यावर येत. त्याच वजन चोपडे भागात चागल होतें. मीं त्याना सुचविल की, तुम्ही निवडणुकीस उभे राहा. प्रथम ते धजेनात ते म्हणाले, "मला मतें कशीं मिळणार? मी फक्त मराठी जाणणारा माणूस." त्यावर मीं त्याना सागितले, "तुम्ही, आम्ही व तिरोळे यात वास्तविक फरक नाही. आपण सवाना मराठे म्हणू या. तुम्ही तिरोळ्याशीं सोयरीक करण न करण हा तुमचा वैयक्तिक प्रश्न आहे. तुमच्यासारख्या घरदाज व्यक्तीने, 'तुम्ही आम्ही एकच, तुमच्यापैकी वजनदार माणूस उभा करा किंवा सर्व एकजुटीने मदत करीत असल्यास मी उभा राहतो' असे म्हटलें, तर ते तुम्हालाच उभे करतील." याप्रमाणे ठरल. आनदरावानी जागोजाग सभा भरविल्या व निवडणुकींत फारसा खर्च न येतां ते निवडून आले.

त्याचा परिणाम असा झाला की, आज (सन १९६३ ६४ सालत) मराठे व तिरोळे हे राजकीय व सामाजिक चळवळींत मराठे म्हणून एकोप्याने वागतात अथात् ही सघटना मला सहज करतां आली. पुढे इद्रहद्व आम्हीं जळगावास मराठा बोर्डिंग काढण्याचाहि घाट घातला, पण त्याला बराच अवधि लागला. प्रदर्शनानतर पूर्व खानदेशातील तिरोळे व मराठे शिक्षकानी माझ्याकडे ये जा वाढली पण थोड्याच

दिवसानी सरकारने मला नऊ महिने विलायतेस विस्तृत शेतीचा व सहकारी चळवळीचा अभ्यास करण्यास पाठविले. विलायतेहून ऑक्टोबर सन १९१२ अखेर परत येताच, माझे सदर स्टेशन पुण्याहून जळगावास बदलले गेले. त्यामुळे तेथील स्थानिक मराठ्यांशी व त्यांच्यातील प्राथमिक शिक्षकांशी माझा जास्त परिचय झाला. प्राथमिक शिक्षकाना ठराविक तारखेस जिल्ह्याच्या गांवी ज्ळगावास यावें लागे; अशा वेळीं आम्ही ल्हान ल्हान खाजगी सभा भरवीत असू व त्यात मराठयांच्या शिक्षणाचा विचार करीत असू. अशाच एका सभेंत मागे झालेल्या विचारविनिमयाचा पुनरुच्चार होऊन सातआठ विरोळे शिक्षकांनी आपली विशेषनामं (दगडू, शेणफ्रेडू, झिपरू यासारखीं) बदलली. त्यापैकी एक झिपरू खंडेराव पाटील याच नाव जयवंत खंडेराव असे ठेविलें. ते आता वसतिगृहाचे सेक्रेटरी आहेत. त्या सभत भावी मराठा बोर्डिंगच्या संस्थापकांपैकी असोद्याचे मोतीराम महिपतराव पाटील, मुमरा बादचे तुकाराम रामजी पाटील, दौलतराव दामोदर पाटील व व्यंकटराव मोइटे यानी पुढाकार घेऊन मराठा बोर्डिंग काढावयाचें निश्चित केले. सन १९१७ सालीं एप्रिलच्या १७ तारखेस ज्ळगावास कलेक्टर रॉथफील्ड ह्यांच्या अध्यक्षतेखाली मोठी सभा भरविली. त्या वेळीं खासेराव जाधव, बडोदें, शिवाजीराव सावंत, डेप्युटी कलेक्टर पूर्व खानदेश, रावबहादूर रामचंद्रराव चव्हाण व मी हजर होतों. या सभेंत सर्वानुमतें असें ठरलें की पूर्व खानदेश जिल्ह्यासाठी विद्याप्रसारक समाज स्थापून त्या समाजामार्फत जळगावास एक मराठा वसतिगृह बांधण्यासाठी शहराशेजारी पाच दहा एकर जमीन खरेदी करावी व या सर्व कामासाठी द्रव्यनिधि गोळा करावा. पुढे त्याच सभेंत त्या कामासाठी एक कमिटीहि नेमली. मी मध्यभागाचा डेप्युटी डायरेक्टर होतों. पूर्व खानदेश जिल्ह्यातील शेतीसुधारणा व शेतकीप्रचारासाठी माझ्याकडे दोन फील्डमेन होते. त्यातील एक श्रीयुत केशवराव पाटील म्हणून हुशार तरुण मराठे होते. त्याना मराठा समाजात विद्याप्रसार व्हावा असे मनापासून वाटे. म्हणून मी त्यानाच मराठा वसतिगृहाचे पगारी सेक्रेटरी नेमण्याची सूचना कमिटीपुढे आणली. केशवरावांचा पगार कमी होता, पण त्यांची जागा कायम होती. मीं त्याना सुचविलें की त्यानी एक वर्षाची बिनपगारी रजा घ्यावी व आपल्यास हें काम कसें काय आवडतें ते पाहावें. त्यांच्या रजेच्या मुदतींत मीं व खासेराव जाधव यानी त्यांच्या पगाराची हमी घेतली. केशवरावाना तें पटलें म्हणून मीं आमच्या खात्याकडून त्याना बिनपगारी रजा मिळवून दिली. केशवरावानी उत्साहाने चागलें काम केलें. वसतिगृहासाठी फंड जमविण्यास स्थानिक कमिटीस त्यांची फार मदत झाली. या कमिटीने केशवरावास बरोबर घेऊन तालुक्यातून दौरे काढले. कमिटीचा उत्साह पाहून जिल्ह्यातील शेतकऱ्यानी दिलदारपणाने मदत केली. कामास आरंभ म्हणून सन १९१७ सालीं भाड्याने घर घेऊन त्यांत एक ल्हानसें बोर्डिंग स्थापिलें.

मी व देवासचे श्रीमंत खासेसाहेबमहाराज जुने स्नेही होतों. खासेसाहेब त्या

वेळीं ग्वाल्हेरीस होममेंबर होते. श्रीमंत माधवरावमहाराज शिंदे यांचा त्यांच्यावर फार लोभ व विश्वास असे. खासेसाहेबांनी श्रीमंत माधवरावमहाराजांचे लक्ष महाराष्ट्राकडे वळविण्याचे प्रयत्न चालविले होते. अशा वेळीं मी व खासेराव जाधव यांनी त्यांना ग्वाल्हेरच्या महाराजांकडून जळगावच्या मराठा वसतिगृहाला मदत मिळवून देण्याबद्दल विनंती केली. खासेसाहेबांनी योग्य वेळ पाहून श्रीमंत माधवरावमहाराजांच्या पुढे हा प्रश्न मांडला. शिंदेमहाराजांचें लक्ष खासेसाहेबांनी महाराष्ट्राकडे अगोदरच वळविलें होतें. महाराजांना खासेसाहेबांची सूचना पटली. त्या वेळीं माधवरावमहाराजांच्या मनात आपल्या मातोश्रींचें टिकाऊ स्मारक करावें असे घाटत होतें. योग्य संधि पाहून खासेसाहेबांनी सुचविलें की महाराजांच्या मातोश्रींचें स्मारक जळगावास एक वसतिगृह बांधून करणें योग्य होईल. एक तर दक्षिण महाराष्ट्राशी आपलें दळणवळण वाढेल. दुसरें, खानदेशांतील मराठे दिलदार आहेत. ते असल्या स्मारकास नावारूपास आणून खानदेशांतील विद्येत मागासलेला मराठा शेतकरी समाज पुढे आणतील.

सन १९१९ साली श्रीमंत माधवरावमहाराज शिंदे यांच्या अध्यक्षतेखाली मध्य हिंदुस्थानांत धारेस अखिल मराठा शिक्षण परिषद् भरली. त्या परिषदेंत मराठा शिक्षण परिषदेस सल्ला देण्यासाठी एक सल्लागार मंडळ नेमण्यात आलें व त्या वेळीं बराच मोठा फंड जागच्या जागीं महाराजांनी जमविला. या सल्लागार मंडळांत बरेच पुढारी होते. त्यांत श्रीमंत खासेसाहेब व मीहि होतों. थोड्या दिवसांनी जळगावच्या विद्याप्रसारक समाजानें शिंदेमहाराजांकडे वसतिगृहाच्या इमारतीच्या कामासाठी मदत मिळावी म्हणून विनंती अर्ज पाठविला. महाराजांच्या सूचनेवरून सल्लागार मंडळानें आपल्या फंडांतून पंधरा हजार रुपये कर्जाऊ देण्याचें मुक्रर केलें. जळगाव विद्या-प्रसारक समाजानेहि बरीच रकम जमा केली होती. इमारतीच्या बांधकामाची तयारी झाली व सन १९२२ सालीं जिजामाता वसतिगृहाच्या पायाचा दगड श्रीमंत माधवरावमहाराज शिंदे यांच्या हस्तें मोठ्या समारंभानें बसविला गेला. श्रीयुत केशवराव पाटील यांचा आत्मविश्वास वाढला आणि शेतकी खात्यांतील आपल्या जागेचा राजीनामा देऊन ते मराठा शिक्षण संस्थेचे आजीव सेवक झाले. त्यांचें अनुकरण श्रीयुत दगाजी शामराव पाटील यांनी केलें व आपल्या शिक्षकाच्या जागेचा राजीनामा दिला. लौकरच जळगावचें मराठा वसतिगृह नावारूपास आलें.

जळगावच्या प्रदर्शनाच्या वेळीं लहानसा स्फुलिंग पडला व त्यानें मोठें काम केलें. ज्या पूर्व खानदेशांत सन १९१० साली एकहि मराठा पदवीधर किंवा वकील नव्हता तेथ आज (सन १९६४ सालीं) महाराष्ट्र स्टेट कौन्सिलांत पूर्व खानदेशांतील चार सभासद आहेत, जिल्ह्यांत एकोणतीस मराठे वकील आहेत. सन १९१० सालीं मराठा शिक्षकांची संख्या चाळीसच्या आंत होती, ती आज सुमारें दोन हजार आहे. मराठा बोर्डिंगांतून आजवर पांचशेच्या वर पदवीधर झाले.

एक फार जुने (सन १९१६चे) प्राथमिक शाळेंतील शिक्षक श्रीयुत जयवतराव खंडेराव पाटील आज त्या सस्थेचे सेक्रेटरी आहेत. सस्थेच्या जुन्या विद्यार्थ्यांपैकी दादासाहेब निकम हे बॅरिस्टर असून पूर्व खानदेश विद्याप्रसारक समितीचे सेक्रेटरी आहेत. समितीने जिल्ह्यात दहा वसतिगृहे स्थापिलीं आहेत.



# माझा विलायतेचा प्रवास



चालू शतकाच्या आरंभीं मुंबई सरकारने शेतकी खाते सुधारून तें वाढविण्याचा निर्णय घेतला होता. स्वतंत्र नवें शेतकी कॉलेज बांधण्याचें काम सन १९०६ साली सुरू झालें. मी व माझे सहाध्यायी डी० एल० सहस्रबुद्धे, विनायकराव ताम्हणे व आणखी आठ-नऊ तरुण सन १९०५ अखेर एल० एजी० परीक्षा पास झालों. माहे फेब्रुवारी १९०६ मध्ये सहस्रबुद्धे ताम्हणे व मी अशा आम्हा तिघाच्या नेमणुका नवीन सुरू झालेल्या शेतकी कॉलेजच्या शिक्षकवर्गांत झाल्या. नवीन शेतकी कॉलेजचें शिक्षण व त्याचबरोबर निरनिराळ्या विषयांचें संशोधन व शेतकीविषयक ज्ञानाचा प्रसार करण्यासाठी, सरकारने शेतकी खातें वाढविण्याचें ठरविलें आणि जे० बी० नाइट, एम्० एस्०, या अमेरिकन शेतकीतज्ज्ञास प्रोफेसर ऑफ ॲग्रिकल्चर म्हणून नेमलें. पुढे थोड्याच दिवसानी डॉ० हॅरोल्ड एच्० मॅन या विद्वान् शास्त्रज्ञास नुकत्याच सुरू झालेल्या शेतकी कॉलेजचे प्रिन्सिपल नेमलें. शिवाय तीनचार अनुभवी हिंदी अध्यापक—चिब्बर (पार्शी गृहस्थ), डिक्सन (एक इंडियन खिश्चन) व भाडारकर हे तिघेजण अनुक्रमें वनस्पतिशास्त्र, कीटकशास्त्र, व ॲग्रिकल्चरल इंजिनियरिंग शिकविण्यासाठी नेमले. तसेच जास्त उच्च दर्जाचें शिक्षण घेण्यासाठी सरकारने नुकतेच पास झालेले चार पदवीधर विलायतेस पाठविण्याचें निश्चित केलें. शेतकीची पदवी घेतलेले दोन व बी० ए० झालेले दोन निवडावयाचे ठरलें. त्याप्रमाणे बी० ए० झालेल्यापैकी एस्० एल्० आजरेकर, व्ही० एच्० गोणेहळ्ळी शेतकीची पदवी घेतल्यापैकी जी० डी० मेथा व पी० जे० भट याना निवडण्यात

मी पहिल्या वर्गांत पास झालेलो असल्यामुळे माझी निवड होईल, असें मला वाटलें होतें. शिवाय प्रोफेसर ऑफ ॲग्रिकल्चर नाइट व खुद्द मि० किटिंग, डायरेक्टर

वर्षें, व १५ महिन्याची ताई) यांना वडगांवीं पोचवून, आईवडिलांचा आशीर्वाद घेऊन व इतर नातलगांना भेटून परत पुण्यास गेलों. वडगांवाहून माझे चुलतभाऊ गणपतराव मला पोचविण्यास बरोबर आले होते. पुण्यास थोडें राहिलेलें काम आटपून सध्याकाळच्या गाडीनें मुंबईस निघालों. पुण्यास स्नेह्यांचा भरणा असल्यानें बरेच स्नेही स्टेशनवर आले होते. कांहीं जण माझ्याबरोबर मुंबईसहि आले. ता. २३ रोजीं मुंबईतील मराठा ऐक्येच्छु मंडळाचे सभासद, रामचंद्रराव धामणस्कर, पेंडुरकर, बोले, कोरगांवकर, दामोदर सावळाराम यंदे, व तालचेरकर यांनीं मोठी सभा भरवून निरोप दिला. ता. २४ रोजीं दुपारीं ३ वाजतां बोट निघणार म्हणून आम्ही लवकरच बंदरावर गेलों. माझे चुलतभाऊ गणपतराव व पुण्या मुंबईचे बरेच स्नेहीहि बरोबर होते. मी एकदाच बोटीवर चढतांना पाहून गणपतराव गहिंवरले. सर्वांचा निरोप घेऊन पी० अँड ओ०च्या 'पर्शिया' नावाच्या बोटीवर चढलों. तीन वाजतां बोटीनें मुंबई बंदर सोडलें. मला पोचविण्यासाठीं आलेले आप्तस्नेहीहि परत फिरले. बराच वेळ हिंदुस्थानचा किनारा पाहत उभा होतों. किनारा दिसेनासा झाल्यावर केबिनमध्ये येऊन विचार करावं पडलों

मी ज्या बोटीनें निघालों होतों, त्याच बोटीनें श्रीमंत सयाजीरावमहाराज गायकवाड यांचे दोन पुतणे विलायतेला जाण्यास निघाले होते. मी विलायतेस जाण्यापूर्वी थोडेच दिवस छत्रपति शाहूमहाराजांचे दोन्ही चिरंजीव (युवराज राजाराम व दुसरे शिवाजीराव) विलायतेस शिक्षण घेण्यासाठीं रवाना झाले होते. त्यांची दैनंदिन व्यवस्था पाहण्यासाठीं गार्डियन म्हणून महाराजांनीं मिसेस् आयर्विन नावाची एक अमेरिकन बाई दिली होती, तीहि माझ्याच बोटीनें निघाली होती. शिवाय मुंबईहून निघालेलीं हिंदु व पार्शी माणसें बोटीवर होतीं. त्यामुळें सोबतीची उणीव भासली नाहीं. आमची बोट ता० २७ रोजीं एडनला पोचली. कांहीं तास तेथें थांबून बोट तांबड्या समुद्रांतून सुएझला निघाली. या चिंचोळ्या समुद्राच्या पूर्वेस अरबस्तानचा वाळूकामय प्रदेश व पश्चिमेस उत्तर आफ्रिकेंतील सुदान व दक्षिण इजिप्त देशांतील तसलाच रुक्ष भाग भकास दिसत होता. ता० ३१ मार्च रोजीं आम्ही सुएझला पोचलों. तांबडा समुद्र व भूमध्य समुद्र यांस, सुएझ ते पोर्टसय्यद सुमारें शंभर मैल लांबीच्या कालव्यानें जोडलें आहे. कालव्याची खोली तीस व रुंदी शंभर ते तीनशें फूट असावी. बोटी सुरक्षित जाण्यासाठीं कालव्यांतील गाळ यंत्रानें काढून बाहेर फेकण्याचें काम नेहमीं चालतें. कालव्यांतून बोटी जोरानें चालवितां येत नाहींत. शंभर मैलांच्या कालव्यांतून जाण्यास वीस तास लागले. पोर्ट-

दोनतीन तास बोट थांबली. तेवढ्या अवधींत शक्य तेवढें तें शहर हून घेतलें. पोर्टसय्यदहून ता० १ एप्रिलला बोट निघाली व ता० ४ रोजीं पांच वाजतां ती इटली देश व सिसिली बेट यांच्यामधून जात असतां, दोन्ही बाजूंच्या हिरव्यागार डोंगरांची शोभा अपूर्व वाटली. पुढें थोड्या वेळानें बोट कॉर्सिका व

सार्डिनिया बेटाच्या मधून गली, आणि ती ता० ६ एप्रिल रोजीं सकाळीं मार्सेल्सिला पोंचली. आता आमचा मुख्य समुद्रप्रवास सपला.

मार्सेल्सिमध्ये दिवसभर फिरून शहर पाहिलें. शहर मोठं व सुदर होत. लाबरुद रस्ते, बाजूने भव्य, उच्च इमारती व मोठमोठीं दुकानें दिसलीं. या दुकानातून आकर्षक पद्धतीने विक्रीचे जिन्नस माडले होते. रस्त्यावरच्या गाड्याचे घोडे केवढे तरी मोठे वाटले. मी मार्सेल्सहून रात्रीं आगगाडीने निघालों व ता० ७ रोजीं फ्रान्सच्या राजधानीस—पॅरिसला—पोंचलों. पॅरिस शहर पाहण्यास फक्त दोनच तास मिळाले तेवढ्यात जेवण घेता आलं नाही. जवळ खाण्याचे पदार्थहि नव्हते इतर प्रवासी वळलेल्या कोंबडीच्या तगड्या दातानी तोडताना पाहिल्यावर वाटलें, हे फ्रेंच लोक "तुम्हास थोडं पाहिजे का?" म्हणूनसुद्धा विचारीत नाहीत. कोणीं विचारलं असतें तर मी "काही हरकत नाही. द्या!" असें म्हणालों असतो. भुकेचा प्रताप काय असतो हे त्या लाबच्या प्रवासात कळून आलें. तो प्रसग जन्मभर विसरला जाणार नाही. त्याच वेळीं लाबच्या प्रवासात खाण्याचे जिन्नस बरोबर ठेवण्याचा धडाहि मी शिकलों. आम्ही फ्रान्स व इग्लड यांच्यामध्ये असलेल्या इंग्लिश खाडीवर फ्रान्सच्या कॅले बदरास तारीख आठ रोजीं पोंचलों. पुढे लागलीच बोटीने दोन तासानी इग्लडच्या डोव्हर बदरात उतरलों. तेथे गाडी तयार होतीच. त्या गाडीने लडनला पोंचलों इग्लडच्या राजधानीचं हें शहर त्या देशाच्या आग्नेय कोपऱ्यात आहे, माझे वरिष्ठ व स्नेही किर्टिंग हे त्या वेळीं रजेवर इग्लडमधील सास्लबरी काउंटींत होते. त्यानी लडनमधील आपल्या एका स्नेह्यास मला उतरून घेण्यासाठी स्टेशनवर पाठविलें होतें त्याच्याबरोबर मी जेथ हिंदी विद्यार्थी राहत असत त्या नार्थब्रुक सोसायटींत, २१ क्रॉम्वेल रोड येथे, उतरलों. दुसऱ्या दिवशीं इंडिया आफिसमध्ये जाऊन मीं आल्याची रीतसर वर्दी दिली.

मी इग्लडला गल्यावेळीं उत्तरायण होतं. नुकताच वसतऋतु सुरू झाला होता. थडीचा हगाम सपून थोडथोड ऊन पडू लागलं होतें हिवाळ्यात पर्णरहित झालेल्या झाडास पालवी फुटत होती. तिकडचे लोक एकमेकास, "कोकिळाचे कुहू कुहू ऐकलेत का?" अशी पृच्छा करीत होते. गहू, सातू व ओट ह्यांच्या परण्या थोड्याफार झाल्या होत्या.

मी लडनला पोंचताच, माझे स्नेही किर्टिंग याचे टेफ्ट(सास्लबरी)हून पत्र आलं की, मीं त्याच्याकडे दहापधरा दिवस राहण्यास जावें. त्याप्रमाणे मी त्यांच्या गावीं ता० १३ एप्रिल रोजीं गलो. माझ्याबरोबर सामान फारस नव्हत. थोड होतें ते मी रेल्वेच्या डब्यातून खाली उतरून ठेवून उभा होतों. किर्टिंगसाहेब आपली मोटार स्टेशनबाहेर उभी करून प्लॅटफॉर्मवर मी जेथ उभा होतों तेथे आले. नमस्कार चमत्कार झाल्यावर ते "चला जाऊ या" अस मला म्हणाले, तरी मी उमजलो नाही. हमालाची वाट पाहत उभाच होतों. "का, पाटील, थाबलात का? हमालाची

काय गरज? तुमची पेटी तुम्ही एकीकडे व मी एकीकडे धरून जाऊ या. सामान जास्त नाही व येथे हमाल लोकास हमाली जास्त द्यावी लागते." आम्हीं बाहेर येऊन मोटारींत सामान ठेविलें. लागलीच त्यानी मोटार सुरू केली. जाताना ते म्हणाले, "येथे मजकडे ड्रायव्हर नाही. ड्रायव्हरला पगार फार द्यावा लागतो. बहुतेक लोक मोटार स्वत च चालवितात." त्याच्या घरीं जाताच सामानासह मोटार उभी करून आम्ही त्याच्या बंगल्यात गेलो. लागलीच मिसेस् किटिंगने चहा व नास्ता आणून ठेविला. येताना साहेबानी आगाऊ सागितलें होतें कीं, आपला राहता बंगला लहान आहे. शिवाय त्याच्याकडे कोणी पाहुणे येणार होते. म्हणून त्यानी माझी उतरण्याची सोय राहत्या बंगल्याजवळ असलेल्या आपल्या दुसऱ्या एका घरात (कुळाच्या बिऱ्हाडी) केली होती. मी त्या घरात उतरलो व तेथेंच माझी बसण्याउठण्याची व झोपण्याची व्यवस्था होती. स्नान, चहा, जेवण साहेबाच्या घरींच होई.

जेरॉल्ड किटिंग हे टेफट गावचे जमीनदार आहेत. ते परमेश्वरकृपेने अद्याप हयात असून, त्याचें वय सध्या नव्वदच्या वर आहे. इंग्लंडमधील जमीनदाराना शेतसारा भरावा लागत नसे. उत्पन्नावरचे कर वगैरे द्यावे लागत. वास्तविक टेफटची जमीनदारी किटिंगचे वडील बंधु मॉरिस वॉल्टर किटिंग ह्याची. मॉरिस वॉल्टर त्या वेळीं ऑक्सफर्ड विश्वविद्यालयात प्राध्यापक होते. ते जेरॉल्ड किटिंगपेक्षा वयाने जरी मोठे होते तरी त्याच्यापेक्षा तरुण व सुदृढ दिसत. इंग्लंड देशामध्ये कोणासहि म्हातारा अगर जास्त वयाचा म्हटल्यास त्यास आवडत नाही. त्यातून जर कोणी त्याच्या वायकोदेखत त्याचं वय जास्त आहे असें म्हटलें, तर त्यास व त्याच्या पत्नीस अपमान वाटतो. ही गोष्ट मला माहीत नव्हती. मी एकदा सहज जेरॉल्ड किटिंग व त्याची पत्नी बसलेली असताना म्हणालों, "आपले धाकटे बंधु आपल्यापेक्षा बरेच कमी वयाचे असावेत; नाही? अगदी तरुण व सुदृढ दिसतात!" हें माझ बोलणें जेरॉल्डच्या पत्नीस रुचलें नाही. ती म्हणाली, "माझे पति वृद्ध व अशक्त आहेत काय?" ही माझी चूक पुढे मला फार उपयोगी पडली. किटिंगच्या भावास मूलबाळ नव्हतं व त्याची मिळकतहि चागली होती, म्हणून त्याने व त्याच्या पत्नीने ही जमीनदारी जेरॉल्ड किटिंगला देऊन टाकली होती. आपल्या देशात अशा गोष्टी क्वचित् घडतात.

जेरॉल्ड किटिंगला जेराल्डाइन नावाची मुलगी व एड्गर नांवाचा मुलगा अशीं दोन अपत्यं होता. त्या वेळीं मुलीचें वय सुमारं अकरा-बारा वर्षांचें व मुलाचें सात वर्षांचं असावें. किटिंग कुटुंबाचे मुख्य फार्म व त्यातील मॅन्शन किटिंग बंधुद्वय विद्यार्थी-दशेत असताना त्याच्या मातोश्रीने एका सधन कुळास खंडाने दिलें होत. ही व्यवस्था तशीच चालू होती. जेरॉल्ड किटिंगने स्वत स राहण्यासाठी एक लहानसा बंगला बाधला होता आणि जवळची थोडी शेती, त्यावरचं दुभतं घर, जनावराचा गोठा दुसऱ्या एका लहानशा कुळास खंडाने दिला होता. याशिवाय जेरॉल्डच्या मालकीची सुमारे तीनशे एकरांची एक राई (वुडलँड) होती. किटिंगला झाडाझुडपाची फार आवड असे.

आम्हा हिंदवासियांचा जगामध्ये दर्जा काय होता व स्थान कोठे होतें याचा कल्पना येण्यासाठी ह्या कुटुंबात राहत असताना घडलेल्या दुसऱ्या एका प्रसंगाची हकीकत द्यावी असे मला वाटतें. ही हकीकत देण्यापूर्वी मला सांगितलं पाहिजे की ज्या इंग्रज कुटुंबात मी राहत होतो तें किंग कुटुंब खानदानीच व सुसंस्कृत होतें. तुसडया स्वभावाचं नव्हतं. जेरॉल्ड किंग आय० सी० एस० असून त्या वेळीं मुंबई प्रांताचे डायरेक्टर ऑफ ॲग्रिकल्चर होते. जेरॉल्ड किंगची बायको मेरियन घरदाज कुटुंबातील होती. सर हेन्री कॉटनचे बंधु जेम्स कॉटन यांची ती मुलगी, ती सुविद्य व प्रेमळ होती. मी या कुटुंबात असताना एकदा जेरॉल्ड किंगचा सासरा जेम्स कॉटन हा आला होता. कॉटन घराण्यातील लोकाना हिंदी लोकांबद्दल सहानुभूति वाटत असे. त्याना हिंदी संस्कृति आवडत होती. मी, जेम्स कॉटन व जेरॉल्ड किंग बोलत होतों इतक्यात बाहेरून किंगचा मुलगा एड्गर खेळून पळत पळत घरीं आला. तेव्हा जेम्स कॉटनने प्रेमाने त्याचा हात धरून माझ्याकडे पाहून म्हटलं, "मिस्टर पाटील, हा पाहा आमचा दुसरा इंडियन". त्या मुलास 'इंडियन' (हिंदी) म्हणवून घेणं आवडलं नाही. तो गुरगुरून, आपल्या आजास ठोसा लगावून म्हणाला, "नाही नाही, मी इंडियन नाहीं." जेम्स कॉटनला अर्थातच वाईट व कससेच वाटलें. सांगण्याचा हेतु हा की अगदी प्रेमळ, घरदाज कुटुंबातील मुलासमुद्धा 'हिंदी' म्हणजे नित लोक व आपण जेते असे वाटे. ज्या वातावरणात तो मुलगा हिंदुस्थानात वाढला होता, त्यात त्याला तसें वाटणें अस्वाभाविक नव्हतं.

मी टेफटल सुमारें पधरा दिवस होतों. या अवधींत किंगनी मला आपल्या मोटारींतून बरेच फिरविलें व इंग्लंडमधील रीतिरिवाज समजावून सांगितले. तेथे पाहिलेल्या सर्व गोष्टी मी सांगत नाहीं. मला आता त्याची चांगलीशी आठवणहि नाही. तथापि एक न विसरणारी गोष्ट आठवते. मी व किंग एके दिवशीं सकाळीं पायीं बरेच लांब फिरत गेलों. रस्त्याने जात असताना मला किंग त्या भागातील शेतकऱ्यासंबंधी माहिती देत होते. त्याच रस्त्याने आमच्या जरा पुढे एक वृद्ध शेतकरी खांद्यावर एक सातआठ फूट लांबीचा लाकडी सर, एक फळकुटण, एक पहार व सुतारी हत्याराची पिशवी घेऊन हळूहळू चालला होता. तो कशासाठी जात असावा, हें किंगनी ताडलें होतें. पण मला तसें न दाखविता त्यानी मला विचारलें, "हा गृहस्थ कोण असावा व कशासाठीं हें सामान घेऊन जात असावा?" मी म्हणालों, "त्यात विचारण्यासारखं काय आहे? हा कोणी तरी लोकलबोर्डांचा अगर इंजिनिअरिंग खात्यातील कामगार (मजूर) असावा. त्याच्या खांद्यावर गावाचं नाव लिहिलेला बोर्ड दिसतो. पुढच्या तिकाटण्यावर गावाची पाटी दिसत नाही तिथे तो बहुधा ती पाटी लावील." किंग म्हणाले, "तसें नव्हे." मीं विचारलें, "मग काय असावें?" तेव्हा त्यानी "तुम्हीच त्याला विचारा." असं सांगितलं. मीं त्या माणसास "आपण कोणत्या गावीं राहता व हें सामान कशासाठी व कोठे

नेतां?" म्हणून विचारलें. त्यावर त्यानें सांगितलें कीं, "मी एक रिटायर्ड शेतकरी आहे. मला आता शेतकाम होत नाही. माझा मुलगा शेती पाहतो. समोरच्या तिकाटण्यावर या रस्त्याला दुसरा नवा फाटा फुटतो त्याच्या नावाची ही पाटी आहे. वाटसरू कधी कधी चुकून भलत्या रस्त्यानें जातात. हें पाहून मी स्वतःच्या शेतावरचा एक जुना लाकडी डांब व फळीचा तुकडा घेऊन तेथें जात आहे. हें पाहा, या फळीवर नवा रस्ता कोणत्या गावास जातो त्या गावाचें नाव घातलें आहे. बसल्या बसल्या नावाची पाटी तयार केली. खटरफटर सामानातील एक लाकडी डांब घेतला. त्या तिकाटण्यावर हा फळीचा डांब लावून टाकतों, म्हणजे वाटसरू सहसा रस्ता चुकणार नाहीत." याच्या उलट आपल्या देशांत पुष्कळ स्वार्थी लोक लोकोपयोगी लहानसान वस्तूहि उचलून आपल्या घरीं नेतात. मला पुष्कळ उदाहरणें देतां येतील. वाचकांनाहि असलीं उदाहरणें माहीत असतील. माझ्या गावातील एक उदाहरण देतों. शाहूवाडी तालुक्यातील पिशवी कापशी रस्ता आमच्या गावावरून जातो. आमच्या गावाजवळ एक मोठा ओढा आहे. त्या ओढ्यास ओलांडून हा रस्ता जातो. पावसाळ्यात ओढ्याचें पाणी उंचावरून खाली पडत म्हणून ह्या ओढ्यास लोक 'धबधबीचा ओढा' असें म्हणतात. रस्ता एका घसरणीवरून येऊन तावडतोब वळसा घेतो. त्यामुळे घसरणीवरून बैलगाड्या पळत पळत खालीं येताच त्याना वळसा घेऊन ओढा ओलांडावा लागतो. रस्त्याला लागून खाली लहानशी दरी आहे. कधी कधी काळोख्या रात्रीं या वळणावर गाड्या उलटतात. गाड्यांना अपघात होऊ नये म्हणून सरकारनें (त्या वेळीं इकडे लोकलबोर्ड नव्हता) धबधब्याच्या बाजूस चार चार फुटावर दोन अडीच फूट उंचीचे दगड रोवले होते. मी कोल्हापुरास हायस्कूलमध्ये शिकत असताना, माझ्या एका नातलगानें त्या दगडापैकीं काढून आणलेला एक दगड मला आपल्या घरीं दाखविला व किती छान आहे म्हणून पृच्छा केली. "काय किंमत पडली? कशासाठी घेतलास?" म्हणून विचारता त्यानें सांगितलें कीं, "धबधबीच्या ओढ्याच्या काठीं सरकारनें अलीकडे असे दगड रोवले आहेत. फार चांगले आहेत. त्यापैकीं आणला हा एक." माझ्या सूचनेवरून त्यानें तो परत नेऊन जागच्या जागीं रोवला खरा, पण हा प्रकार आमच्या लोकांचा आप्पलपोटेपणा व सार्वजनिक कामाची अनास्था दाखवीत नाही का? विलायतेतील व आपल्या देशातील सर्वसामान्य लोकांच्या दृष्टिकोनात किती फरक आहे पाहा. मला वाटतें, अलीकडे (सन १९५० नंतर) आपल्या मनोवृत्तींत सुधारणा होत आहे.

युरोप व अमेरिकेंतील वरच्या वर्गातील डब्याच्या संडासात साबणाच्या लहान लहान वड्या व हात पुसण्याकरिता छोट्या छोट्या रुमालाच्या चवडी प्रवाशांच्या उपयोगासाठी ठेवलेल्या असतात, पण त्यापैकीं एकहि वस्तु कोणी खिशांत घालीत नाही. आपल्याकडील पहिल्या वर्गाच्या डब्यातील गाद्यांचें कापड कापून नेल्याचें पुष्कळांनी पाहिलें असेल. इंग्लंडमधील व आमच्याकडील प्रवाशांची

मनोवृत्ति ही अशी आहे. हळूहळू परिस्थिति बदलत आहे हें दु:खात सुख मानून घ्यावें.

क्रिटिंगच्या ज्या छोट्या कुळाच्या घरीं मी राहत होतों असें मीं सांगितलें, त्याचा एक मुलगा प्राथमिक शिक्षण घेऊन पोलिसखात्यात नोकर होता व एक दुय्यम शाळेंत शिकत होता. एका मुलीचें हायस्कूलशिक्षण पुरें झालें होतें व दुसरा शाळेंत जात होती. त्याच्याकडे एक औताचा घोडा, पाच गायी, सात डुकरें व सुमारें पन्नास कोंबडीं होतीं. त्याची बायको स्वयपाकपाणी पाहून या जनावरांची व कावड्याची जोपासना करी व आपल्या मुलीस त्याच्या कामात मदतहि करी. मोठ्या मुलीकडे गायींचें दूध काढणें, लोणी काढण, जनावराचा गोठा साफ करणें व त्याना वेळच्या वेळीं चदीवैरण देणें, वगैरे काम असे. धुलाई घरींच करीत. घरातील सामानसुमान, तसबिरी, कपाटें व खुर्च्या झाडूनपुसून रोजच्या रोज साफ करीत. त्याचप्रमाणे बूटपॉलिश करणें व रोजचा जमाखर्च लिहिणें मुलीच करीत. सर्व कामें उत्साहानें होत. ताक करताना मुलीचे पाय जमिनीवर ठरत नसत. गात, नाचत ती लोणी काढण्याचें 'चर्न' नावाचें यंत्र भराभर चालवी. माझी खोली तीच झाडीत पुसत असे व माझ्या बुटास पॉलिशहि तीच करी. कुटुंबातील कपड्याबरोबर माझेहि कपडे धूत असे. शेतातील भाजीपाला काढणें, बागतील फुलें काढणें, हेंहि तिचेंच काम. तिचा भाऊ बापास शेतात मदत करी. बहिणीनें शेतातून काढलेलीं फळें व भाजीपाला बाजारपेठेत नेऊन द्यो त्याची विक्री करा. सध्याकाळीं कपडे बदलून घरच्या टांग्यातून हें कुटुंब थोडा वेळ फेरफटका करून येई. अशा वेळीं छोट्या शेतकऱ्याच्या व सुखवस्तु कुटुंबातील मुलामध्ये फरक दिसत नसे. सर्वांना सकस अन्न व अंगभर कपडा मिळे. सर्वांच्या पायात बूट असत मीं तेथे असताना पाहिलें की दीड महिन्याच्या वासरास साठ ते नव्वद रुपये किंमत येई व पाच महिन्याच्या डुकरास पन्नास ते साठ रुपये येत. आज किंमती फार वाढल्या असाव्यात. दूध निघे त्यातील लोणी काढून तें ठराविक डेअरीस विकीत. मलई काढलेलं दूध (सेपरेटेड दूध) गाईच्या वासराना व डुकराना देत. वासरू गाईस पिऊ देत नसत. हातावरच धार काढण्याचा तिकडे प्रघात आहे.

टेफच्या मुक्कामात क्रिटिंगसाहेबानी मला ज्वळपासची शेती दाखविली. त्याच्या काउटीचें मुख्य शहर सालस्बरी येथील फार प्राचीन काळचें प्रार्थनामंदिरहि (कॅथीड्रल) दाखविलें. हें प्राचीन काळचें प्रार्थनामंदिर भव्य असून प्रेक्षणीय आहे. याच काउटीमध्ये असलेलें 'स्टोन हेंज'हि पाहिलें. फार जुन्या काळीं तिकडील लोक सूर्योपासक होते असें दिसतें. त्यानी सुमारें ३'×३'×२०' फूट, उंचच्या उंच, ओबडधोबड घडलेले दगडी खांब अशा रीतीनें रोविले आहेत की त्यापैकी एका रेषेंत असलेल्या दोन खांबाच्या रेषेत सूर्य उगवत्या दिवशीं अयन बदलतें असें सांगतात.

टेफहून परत लंडनला आल्यावर हिंदुस्थानातून उच्च शिक्षणासाठी आलेल्या बऱ्याच विद्यार्थ्यांच्या मीं गांठी घेतल्या. त्यात बडोद्याहून आलेले विनायकराव पवार

होते. ते पुढे ग्वाल्हेरास मोठ्या जागेवर होते. कोल्हापुराहून आलेले बी० पी० जगतापहि त्यात होते. या दोन्ही तरुणांचा परिचय पुण्यास भ्रातृमंडळात झालेलाच होता. डॉक्टर श्रीधर व्यंकटेश केतकर यांचा परिचय या वेळीं झाला की सन १९२१ सालीं मी अमेरिकेस जाताना लंडनमध्ये झाला हे नक्की आठवत नाही.

मी विलायतेस जाण्यापूर्वीच छत्रपति शाहूमहाराजांनी थोरत पडलेल्या पुण्यातील मराठा समाजात जागृति करण्याचे काम सुरू केले होते. महाराजांच्या तालमीत वाढलेला कोल्हापूरचा एक पायिक व पुण्यात वावरत असलेल्या चारदोन मराठा तरुणांतील एक पदवीधर तरुण म्हणून त्या वेळीं पुण्यातील मराठा समाज मजकडे बघत असे. श्रीमंत खासेसाहेबांच्या चौकस दृष्टीतून मी चुकणें शक्य नव्हते. सन १९१२ साली ते देवासहून परत विलायतेस जाताना मुद्दाम दोन दिवस पुण्यात राहिले होते. त्या वेळीं माझा व खासेसाहेबांचा प्रत्यक्ष परिचय नव्हता. मी एक शाहूमहाराजांच्या विश्वासातील कोल्हापूरचा तरुण, पुण्याच्या शेतकी खात्यातील एक अधिकारी म्हणून ते मला दुरून जाणत. पुण्यास येताच ते डायरेक्टर ऑफ ॲग्रिकल्चरच्या ऑफिसात माझा शोध घेण्यासाठी गेले. या ऑफिसात गणपतराव शिंदे नावाचे एक मराठा गृहस्थ माझे स्नेही होते. श्रीमंत खासेसाहेब त्यांना भेटले व माझ्याबद्दल त्यांनी चौकशी केली. मी नुकताच विलायतेस गेल्याचे त्यास समजलें. गणपतरावांना खासेसाहेबांनी सांगितलें की आपण त्यांची चौकशी करीत होता असे पाटीलसाहेब यास पत्राने कळवा. गणपतरावांनी मला विलायतेस पत्र पाठवून तसे कळविलें. त्यातच त्यांनी खासे-साहेबांचा लंडन येथील पत्ता कळविला व मीं खासेसाहेबांना भेटावें असे सुचविलें.

श्रीमंत खासेसाहेब हे देवास छोट्या पातीचे महाराज श्रीमंत मल्हारराव पवार यांचे बंधु. मल्हाररावांना मूलबाळ नव्हतें, व खासेसाहेब हे त्यांचे जवळचे नातलग होते. शिवाय खासेसाहेबांवर त्यांचे प्रेम असे, म्हणून त्यांनी आपल्या पश्चात् खासेसाहेबांना गादी मिळावी या हेतूने त्यांना युवराज म्हणून जाहीर केले होतें. मी खासेसाहेबांकडे वेळ ठरवून गेलों, तेव्हा त्यांच्या घरीं त्यांच्या मातोश्री यशोदाबाईसाहेब, पत्नी जिजीबाई-साहेब, मुलगा भाऊसाहेब (वय सुमारे ७), मोठी मुलगी अलकनंदाबाई (वय ५), जिजीबाईसाहेबांची एक मावसबहीण, श्री. संपतराव गायकवाड यांची कन्या चंद्रप्रभा (वय सुमारे ११), खासेसाहेबांचा एक मामेबहीण पुतळाबाई मार्णे (वय सुमारे ६), शिवाय एक मराठा नोकर, एक इंग्लिश गव्हर्नेस (मुलांवर देखरेख करणारी बाई), एक नर्स (दाई) व एक कुक् (स्वयंपाकी) असा परिवार होता. घर मोठें असून त्यात बिलियर्ड टेबल होतें. मी विलायतेस जाण्यापूर्वीच खासेसाहेबांची लंडन-मॅट्रिकची परीक्षा पास झाली होती व ते आय्० सी० एस्० चा अभ्यास करीत होते. त्यांच्याकडे त्यांना शिकविण्यासाठी म्हणून डॉ० सायमन नांवाचे एक विद्वान् इंग्रज येत असत. खासेसाहेब व त्यांची पत्नी ई दोघेजण सुसंस्कृत, प्रेमळ, गुणसंपन्न व रसिक असून या कुटुंबातील वातावरण प्रसन्न असे. खासेसाहेब व त्यांच्या पत्नी आणि मातोश्री मला आगत्याने बोलावीत

व मीहि त्याच्याकडे अगत्यपूर्वक जात असे. त्याच्याकडे कधीकधी इंदूरचे मार्तंडराव भगवन—श्रीमंत तुकोजीरावमहाराज होळकराचे भाचे—येत. मार्तंडराव तगडा तरुण असून तो तोतरा बोले. एकदा मार्तंडराव आले असता मीहि त्याच्याबरोबर जेवणास होतो. त्या दिवशी मुद्दाम हिंदी राजेशाही पद्धतीचा बेत होता. खुद्द जिजीबाईसाहेबांच्या देखरेखीखाली वाटाणेभात (पुलाव) व कांद्याचा रस्सा केला होता. विलायतेत हिंदी विद्यार्थ्यांस, त्या वेळी, देशी जेवण क्वचितच मिळे. म्हणून ते विशेष सलगीच्या मित्राच्या घरी मोकळेपणाने ताव मारीत. आज मार्तंडरावानी तसेच केले. मी त्याना म्हणालो, "मार्तंडराव, हे काय चालविले आहे!" ते आपल्या तोतऱ्या शब्दात म्हणाले, "पण पाटीलसाहेब हा हा मा माझा दोष नाही. मा मावशीबाईनी इतका सु-सुंदर स्वैंपाक बनविला आहे की तो तो खा खावासाच वाटतो. त्याला मी काय करू?" खासेसाहेबांच्या कुटुंबात व त्यांच्या परिवारात गेलेले अविस्मरणीय क्षण मला नेहमी आठवतात व माझ्या मनाचा आनंद दुणावतो. मी युरोपच्या प्रवासात आठनऊ महिने असताना, लंडन येथे श्रीमंत खासेसाहेबांचा माझ्याशी जो स्नेहसंबंध जडला, तो कायम टिकला. अलीकडच्या काळात मराठा समाजात जी मोठी माणसे होऊन गेली, त्यात खासेसाहेबांचे स्थान बरेच उच्च आहे.

या सुमारास, म्हणजे मी लंडनला जाण्यापूर्वी काही आठवडे, कोल्हापूरच्या श्रीशाहूमहाराजांचे दोन्ही पुत्र—युवराज राजाराम व राजकुमार शिवाजी—शिक्षणासाठी लंडनला गेले होते. त्यांच्याबरोबर कागलकर चिरंजीव आप्पासाहेब, बाळासाहेब परमेकर, शंकरराव नेसरीकर व बापूसाहेब इंगळे अशी सरदारांची मुलेहि होती. प्रथम काही दिवस महाराजांचे बंधु श्रीमंत बापूसाहेब कागलकर व दिवाण सर रघुनाथराव सबनीस हे राजकुमारांची व्यवस्था लावण्यास गेले होते. राजकुमारांच्या अभ्यासावर लक्ष ठेवण्यासाठी व त्यांच्या राहण्याजेवण्याची व्यवस्था पाहण्यासाठी डॉ० आयर्विन व त्यांची पत्नी मिसेस् आयर्विन यानी जावयाचे ठरले होते. पण दुर्दैवाने आयर्विनसाहेब वारल्यामुळे महाराजानी हे काम मिसेस् आयर्विनवरच सोपविले होते. मला व श्रीमंत खासेसाहेब पवार याना प्रथम वाटले की, बाई माणसाऐवजी एखादा विद्वान् इंग्रज गृहस्थ महाराजांनी नेमावयास पाहिजे होता. पण वस्तुस्थिति अशी होती की, महाराजाना राज्यकर्त्या इंग्लिश लोकांचा पुरेपूर अनुभव होता; म्हणूनच त्यानी अमेरिकन माणसाची निवड करून ही अडगळ बेतावेताने टाळली असावी. साहेबाने सुचविलेल्या गोष्टीत फरक करणे त्या काळात राजेलोकाना जड जाई. युवराज राजारामहाराज फार मनमिळाऊ दिसले. स्वतःपेक्षा आपला भाऊ शिवाजीराव याच्या व इतर सोबत्यांच्या सोयीकडे ते प्रथम पाहत व मग आपली सोय बघत.

लंडन येथे काही दिवस असताना, मी कोल्हापूरच्या राजपुत्रांच्या गाठी घेतल्या. नंतर शहर सोडून, दुसऱ्या भागात लोक कसे राहतात हे पाहण्यासाठी दौरे काढण्याच

मीं ठरविलें. प्रथमतः इंग्लंडच्या आग्नेय भागात वाई (कॅंटर्बरी) येथ ता. २ मे रोजीं गेलों, तथे सातआठ दिवस राहून, तेथील शेतकी कॉलेज, फार्म व डेअरी (दूधघर) ही पाहिलीं. त्या डेअरामध्ये सातआठ दिवस काम केलें. स्वळपासची शेतीहि पाहिली. नतर तेथून जवळच असलेल्या, इंग्लंडच्या दक्षिण भागातील राय (काउंटी डॉरसेट) या गावीं गेलों. तेथील शेती व सामाजिक स्थिति पाहिली. तेथे मला दिसून आलें की, आपल्या देशातल्याप्रमाणे तिकडे मजुराच्या पाठीवर मुकादम नसतो. मालक मजुरांबरोबर काम करूं लागतो. शेती मोठी असली व एकापेक्षा जास्त जागीं काम चाललें असलें तर मालक एकाच जागीं काम करीत राहतो, मात्र दुसराकडे काम कसें चाललें आहे तें मधूनमधून बघून येतो. मजुरीचा दर आठवड्यावर ठरलेला असतो. नतर मी चार दिवस लंडनला परत गेलों.

लंडनमधील एका ओळखीच्या गृहस्थाच्या साहाय्याने, इंग्लंडच्या दक्षिण भागातील लिचेट (मॅट्र्याव्हर्स) येथे राहत असलेल्या मि० पेपर नावाच्या एका मध्यम स्थितींतील शेतकऱ्याच्या घरीं एक आठवडाभर राहिलों. त्या शेतकऱ्याचा दिनक्रम पाहिला. त्याच्या घरीं दहा बारा गाई, काही डुकरें व कोंबड्या होत्या. त्याच लग्न झालें नव्हतं. त्याची वृद्ध आई झाडलोट व स्वयपाकपाणी करीत असे तो स्वत गायी पिळी, लोणी काढी व सर्व शेतकाम पाही. तो जरा मोठा शेतकरी नव्हता तरी खाण्यास खस पोटभर अन्न व अगभर कपडे घालण्यास चुकत नसे. शिवाय त्याच्याकडे एक ट्रॅप (गाडी) व एक घोडा होता. या गाडींतून तो विकावयाच्या जिनसा बाजारात नेऊन विकी व घरीं लागणाऱ्या जिनसा घेऊन येई. त्याचा गाईचा गोठा व लोणी काढण्याची जागा फरसबंद असून अगदी स्वच्छ असे. इंग्रज लोकांची स्वच्छता व सचोटी लक्षात ठेवण्यासारखी दिसून आली. एकदा तो लोणी काढीत असता त्याच्या मलईच्या भाड्यांपैकी एक भाड उलटून फरशीवर सर्व मलई साडली. त्याने ती साडलेली मलई एका बादलीत भरून वासरांना व डुकरांना पाजली. आपल्याकडे अशी गोष्ट सहसा घडली नसती. जमीनीवर साडलेली मलई भरून घेऊन त्याचें लोणी काढून तें आमच्याकडील माणसानी गिऱ्हाइकाच्या पदरात बाधलें असतें.

ता० २२ मे रोजीं लिचेटहून वइलगट व तेथून बाथला गेलों बाथ हें शहर दक्षिण इंग्लंडमध्ये पश्चिम किनाऱ्याजवळ समरसेट काउंटीमध्ये आहे. तेथील शेतकी प्रदर्शन पाहिलें. प्रदर्शनात शेतीचीं अवजारें, जातिवत गाई, डुकरें व कोंबड्या ठेवलीं होतीं. बाथ शहर रोमन लोकानी प्राचीन काळीं वसविलें होतें. त्यानी त्या वेळीं बाधलेलीं स्नानगृहें आजवर जतन करून ठेवलीं आहेत त्यावरूनच या शहरास बाथ (स्नानगृहाचें गाव) असें नाव पडलें आहे. तेथील शेतीचा धदा व रीतिरिवाज पाहिले. नतर परत लिचेट गावीं मि० पेपरकडे थोडे दिवस मुक्काम करून, इंग्लंडच्या आग्नेय किनाऱ्यावर रीडिंग व स्विडन या गावातील शेतीभाती पाहून परत तारीख २८ ते ३० मेच्या दरम्यान लंडनला पुराचें मोठें प्रदर्शन भरलें होतें तें पाहण्यास

गले. शेकडों जातींचे गुलाब व इतर फुलझाडें माडण्याची पद्धत छान दिसली. पुन्हा एकदा मि० पेपरकडे रिचेट गावीं जाऊन तारीख १३ ते १८ जूनपर्यंत त्याच्याकडे राहिलों व ज्वळपासच्या शेतीचें निरीक्षण करून परत लंडनला आलों.

ब्रिटिशानी नागरिकांच्या सोयासाठी अचाट व आश्चर्यकारक गोष्टी करून ठेवल्या आहेत. या देशाची राजधानी लंडन शहर हे ज्या टेम्स नदीवर आहे त्या टेम्स नदींतून मोठमोठीं जहाजें काही मैलपर्यंत जातात-येतात. ही नदी फार रुंद असून तिच्यावर रहदारीसाठी जागोजाग मोठाले पूल बांधले आहेत. जहाजांना जाण्यायेण्याच्या वेळीं या पुलाचा अडथळा होऊं नये म्हणून हे प्रचंड पूल आपोआप उघडण्याची यांत्रिक तजवीज केली आहे. इतकेंच केवळ नाही तर गर्दीच्या रहदारीची सोय लागावी व लोकांचा प्रवास जलद व्हावा म्हणून या मोठ्या रुंद नदीखालून आगगाडीचे भुयारी मार्ग बांधले आहेत. शहरात अंडरग्राउंड रेल्वेचें जाळें पसरलें आहे. हे भूगर्भातील लोहमार्ग घरें, रस्ते व नगले वगैरेंच्या खालून खोदलेले असतात. ट्यूब वा अंडरग्राउंड रेल्वेची स्टेशनें वर जमिनीवर असतात. स्टेशनवर चढण्याउतरण्याकरता मात्र लिफ्टची (विजेच्या पाळण्याची) सोय केलेली असते. त्यातून शेकडा माणस एकदम खालीवर नेता-आणता येतात. आपल्याकडे पूर्वी काही किल्ल्यांतून शहरातील राजवाड्यात गुप्तपणें जाण्यायेण्यास जमिनीखालून भुयारातून वाट असत अशी आख्यायिका आहे. पण ही स्वप्नवत् गोष्ट विलायतेत प्रत्यक्ष पाहण्यास मिळते. इंग्लंडमध्ये वेस्टहॅंपस्टेडकडे व ॲल्सिबरीजवळ त्या वेळीं सुद्धा विमानाच्या शर्यती व प्रात्यक्षिक चालत. विमानाच्या बाबतींत त्या वेळीं जर्मनीने इंग्लंडच्या पुढे आघाडी मारली होती.

विलायतेंतील लोक दुपारचें जेवण बहुतेक बाहेरच, क्षुधाशांतिगृहात घेत. तिकडचीं क्षुधाशांतिगृहें आपल्याकडील खानावळींसारखीं नव्हतीं खाऊनपिऊन सुखी असलेल्या कुटुंबातील माणसं आपल्याइकडच्याप्रमाणे घरीं स्वयंपाक करीत नसत. ज्याला शक्य असेल तोच फार तर स्वयंपाकी ठेवी एरवी नवराबायको क्षुधाशांतिगृहात जात. तेथे केवळ जेवणच असत असें नव्हे, तर फराळाचे पदार्थ, निरनिराळीं पेयं वगैरेहि मिळत तसेंच तेथ गायनवादनादि करमणुकीच्या गोष्टीहि असत. युरोपांतील सर्व देशात खाण्यापिण्यासंबंधी योग्य काळजी घेतली जात असे. विशेषत इंग्लंडमध्ये तर चांगले मिष्टान्न पदार्थ खाण्याकडे लोकांचे फार लक्ष दिसलें.

एका लहान गावीं फिरत असता, मीं तेथल्या शेतकऱ्याच्या राहणीबद्दल विचारपूस केली. त्याने सांगितलें की, आपणास दिवसातून तीन जेवणें लागतात. जेवणात रोट, लोणी, अंडीं, मांस असल्याशिवाय आपलें भागतच नाही. शिवाय दोन वेळा चहाहि पाहिजे. आमच्याकडील शेतकरी बहुतेक दिवसातून दोन वेळा जेवतो. जेवणात बाजरी, ज्वारी अगर नाचणीची भाकरी व त्याबरोबर

झाळीची आमटी किंवा पिठलें असत. दुधत बहुतेक नसतें. कधी कधी वादा चटणीवरच त्याला भागवावें लागतं. हे सांगितल्यावर तो शेतकरी आश्चर्यचकित झाला, व म्हणाला, "काय? एवढ्या अन्नावर माणसाचा निर्वाह होतो म्हणता? काय, त्यांना रोज एकदा तरी मांस, अंडीं, लोणीं व फळें मिळत नाहींत? मग ते जगणार कसे?" नंतर त्यानें बाक्षा वर सारून म्हटलं, "हा देह तेवढ्या अन्नावर कसा जगावा? त्यास रोज निदान अर्धा शेर तरी मांस नको का?"

मी गेलों त्यावेळीं तिकडे शिक्षण सक्तीचें झालें होतं. चौदा वर्षांचें मूल होईपर्यंत त्याने शाळेत गेलेंच पाहिजे अशी सक्ती होती. याचा परिणाम असा झाला होता कीं, शेकडा ९७ माणसास तेथे लिहिता-वाचता येत होतं. मजूर, गाडीवाले, बूटपॉलिश करणारे या सर्वांना लिहिता वाचता येत असे. तुम्ही बुटास पॉलिश करण्यास उभे राहिलांत तर तो पॉलिश करणारा आपल्या हातांतील वर्तमानपत्र तुमच्या हातीं देईल, व आपण तुमच्या बुटास पॉलिश करीत राहील. तेथ स्त्रीशिक्षण हें पुरुषशिक्षणाइतकंच जरुरीचं गणलें जातं.

माझ्या या नऊ महिन्यांच्या गडबडीच्या प्रवासांतसुद्धा त्या देशांतील दहा-पांच कुटुंबांत मला राहण्याचा योग आला होता. त्या वेळीं मला तिकडील स्त्रीवर्गांत वावरण्याचे, बोलण्याचे, फिरण्याचे प्रसंग आले होते. त्यावरून असें दिसलें कीं लहानपणापासून मुलें मुली एकत्र वागतात व पुढेहि ते नेहमीच्या एकमेकांशीं वागण्यांत भेदभाव ठेवीत नाहींत. या त्यांच्या रूढीमुळें परस्त्रियांबरोबर बोलण्यांत, बसण्यांत पुरुषवर्गाला विशेष काही वाटत नाही. परमेश्वरा योजना म्हणा अगर मनुष्यस्वभाव म्हणा, पुरुषांना स्त्रिया व स्त्रियांना पुरुष आवडतात. आणि जर या दोन वर्गांचें शिक्षण योग्य प्रकारें झालें असेल तर त्यांच्या सलगीतून काही वाईट परिणाम न होता दोन्ही वर्गांना एकमेकांत मिळूनमिसळून वावरण्याचें खरें सुख लाभतं. स्त्रियांना अडचणींच्या प्रसंगीं मदत करणें, त्यांना संकटांतून सोडविणें, त्यांना बरें वाटण्यासाठीं पण निर्मळ मनानें उपयुक्त धाडसी काम करणं, वगैरे स्त्रीदाक्षिण्याचीं लक्षणें पुरुषांत दिसतात. एखाद्या बाईच्या हातून काही जिन्नस खालीं पडला तर जाणारायेणारा माणूस चटदिशी उचलून देतो. आगगाडींत बसलें असतां कोणी बाई आंत आली तर लागलीच पुरुष उठून तिला जागा देतो वागतसुद्धा पुरुष बाकावर बसला असला व तेथे बाई जागा पाहू लागली तर तो पुरुष बाक खाली करील.

स्त्रियांच्या बाबतींत मला तिकडील एक गोष्ट मात्र आवडली नाही. ती अशी कीं साधारणपणे मध्यम स्थितींतल व गरीब कुटुंबांत मुलीचें शिक्षण संपताच तिनें लग्न करावें अगर आपला चरितार्थ आपणच चालवावा अशी वहिवाट आहे. अशा मुलींना साहजिकच दुकानांत माल विक्री करण्याची नोकरी पत्करावी लागते, अगर दुसऱ्याच्या घरीं मोलकरीण वा स्वयंपाकीण म्हणून राहावें लागतं. मला असं वाटतं कीं लग्न होईपर्यंत असलं काम मुलींनी आपल्याच घरीं करणें बरें. कारण काही

गिन्हाइकाच्या मस्करीस व मूल्यापास मळी पडण्याचे अगर थट्टा व अपमान सहन करण्याचे प्रसंग त्यांच्यावर येतात, ते टळतील. एकंदरीत मला प्रामाणिकपणे वाटते की युरोपातील स्त्रिया आपल्याकडील स्त्रियांपेक्षा नीतिमत्ता कमी नसाव्यात. त्या सरळसरळ वृत्तीच्या दिसतात. गाव तेथे महारवाडा असणार या न्यायाने तेथे काही अनीतीचे प्रकार घडतात ही गोष्ट खरी पण त्याच्याशीं आपल्याला काही कर्तव्य नाही.

या देशातील लोकांच्या प्रामाणिकपणाबद्दल मला जो अनुभव आला तो मी थोडक्यात सांगतो. कोणत्याहि दुकानात आपण माल घ्यावा, त्याचे पैसे चुकते करावे व तो त्यास घरीं पाठविण्यास सांगावे. तोच माल अगदी काळजीपूर्वक बंद करून ते लोक तुमच्याकडे पाठवितात. याचा अनुभव तेथ घरकोपर्यंतीं येतो. माझ्या रिरतीच्या कामामुळे मला स्टेशनवरून त्यांच्याकडे जावयाचे असे त्यास तारा कराव्या लागत. गाडी निघाली असली म्हणजे मी दहा पाच वेळा तारेचे फॉर्म भरून पोर्टरजवळ (हमालाजवळ) दिले आहेत. ह्या तारा अपेक्षेप्रमाणे पोचल्या होत्या रिवाजाप्रमाणे चारदोन आणे जास्त देणं बरं असत.

भट्टीस धावयाचे कपडे लोक मोजून ठराविक दिवशी सकाळीं आपल्या घराच्या व्हराड्यात ठेवीत. धोबी घरच्या मालकास न पुसता, कपड्यांचे गाठोडें घेऊन जात. कोणी लफंगे कपड्यांचे गाठोडें घेऊन गेल्याच्या तक्रारी एकू येत नसत. त्याचप्रमाणे रतीनाच्या दूधवाल्याचा हातगाडी सकाळीं पाचसहाच्या दरम्यान दारावर उभी राहा. दूध वाटणारा दुधाची भरलेली बाटली अगर बाटल्या नेऊन व्हराड्यातील कोनाड्यात ठेवी व तेथील रिकामी बाटली अगर बाटल्या घेऊन पुढे जाई. घरातील बाटल्या गेल्याची तक्रार ऐकू येत नसे.

रस्त्याच्या तिकऱ्यावर वर्तमानपत्राचे स्टँड (आपल्या स्टेशनरी ठेवण्याच्या रॅकप्रमाणे) असत. त्यात वर्तमानपत्र ठेविलेलं असत. स्टँडला एक ल्हानशी पेटी बसवलेली असे. पेटीस कुलूप असून, तिच्या वरच्या झाकणास आत नाणीं टाकण्या साठी भोक ठेविलेले असे ग्राहक लोक वर्तमानपत्र रॅकमधून घेत व त्याची किंमत पेटींत टाकीत. बहुतेक त्यात लबाडी होत नसे स्टँडचा मालक फिरतून एकदा दोनदा येऊन रॅकमध्ये काही नवीन वृत्तपत्रं ठेवी व परत जाताना पेटीच कुलूप काढून त्यातले पैसे घेऊन जाई. तो ती पेटी उघडीत असतांना माझी एकदा गाठ पडली, तेव्हा त्यास मीं विचारिले, "तुमचीं वर्तमानपत्र पैसे पेटींत न टाकता कोणी नेत नाही का?" तो म्हणाला, "चारदोन पेनीसाठी कोणी लबाडी करात नाहीत. शिवाय आम्हाला वृत्तपत्राच्या विक्रीसाठी माणूस ठेवणें परवडत नाही. कोणी हलकें मन करून, एखादुसरें पत्र उचललेंच, तर त्याची किंमत माणसाच्या मजुरीइतकी होत नाही."

विलायतेत आमच्याइकडच्याप्रमाणे मजुरावर देखरेख करणारा मुकादम नसतो. तरी पण मजूर कामात चुकारपणा करीत नाहीत. दुकानात जिनसांच्या किंमती ठराविक असतात. मालात भेसळ करीत नाहीत. तेथे अशीं काही मोठालीं

दुकान होतीं की त्यात किंमती ठरलेल्या असत. विक्र्या मुली ग्राहकास माल देत व किंमत घेत. पावतीची गरज अगर मालकाची किंवा क्याशरची देखरेख नसे.

मोठमोठ्या थिएटरात नटनटींना न्याहाळून पाहण्यासाठी प्रत्येक खुर्चीच्या माग पेटींत एक दुर्बिण ठेविलेली असते. पेटीच्या भोकातून एक ठराविक नाणें टाकलें म्हणजे कुलूप आपोआप उघडतें. दुर्बिण बांधून ठेवलेली नसते, तरी ती नाहीशी होत नाही. रस्त्यावरच्या नळावर पाणी पिण्यास सुदर पेले बारीक साखळीने बांधून ठेवलेले असतात. साखळी फार बळकट असते असे नाही. पण हे पेले नाहीसे होत नाहीत. बहुतेक शहरातून कामाठी लोकांसाठी शहराच्या बाहेर भाजीपाला करण्यास जमीन राखून ठेवलेली असते. यांपैकी प्रत्येक कामगारास दहा ते वीस गुंठे जमीन देण्यात येते. त्यात हरेक प्रकारचें माळवें व भाजीपाला करतात. शेताभोंवती कुपण नसतें. पण शेतातील जिनस गल्याची ओरड ऐकू येत नाही.

मी अलीकडे ऐकिलें की, चाळीस वर्षांमागचा विलायतंतील प्रामाणिकपणा आताच्या तरुणात राहिलेला नाही. मी या मुद्द्यावर साशक होतो. पण हें पुस्तक छापण्यास देण्याच्या पूर्वी माहे डिसेंबर १९६३च्या रीडर्स डायजेस्टमध्ये इंग्लंड मधील दुकानातून विक्रेत्याचा डोळा चुकवून माल उचलण्यावर एक संशोधनात्मक लेख वाचला. यावरून इंग्लंड अमेरिका देशात अलीकडच्या पिढींतील तरुण मुलामुलात व काही प्रौढ स्त्रियात ही लबाडी शिरल्याचें दिसतें. लेखक म्हणतो, "गल्या वर्षी एका कंपनीच्या निरनिराळ्या ठिकाणच्या दुकानामधून सुमार तेहतीस लक्ष रुपयाचा माल उचलला गेला. लंडनमधील बॉंडस्ट्रीटवरील दुकानातून एका वर्षात सत्तयाहत्तर हजार रुपयाचे कपडे लांबविले गेले. एका पुस्तकाच्या दुकानातून एका वर्षात सत्तावीस हजार रुपयांचीं पुस्तकें नाहीशीं झालीं. फराळाच्या दुकानातून सुद्धा खाद्यपदार्थ उचलले जातात. लंडनमधील एका ल्हानशा भागात ५३२ बायानी पदार्थ उचलले असे दिसून आलें. त्यात फक्त शेकडा १७ जणी धंदेवाईक उनाड मुली होत्या. या छचोर उचल्या पोरींबरोबर बऱ्याच विवाहित स्त्रिया होत्या." हे वाचून माझा इंग्लंड व अमेरिकतील प्रामाणिकपणाचा भ्रम बराच कमी झाला.

आपल्या देशातहि गल्या पाऊणशे वर्षात लबाडी वाढली असून पापपुण्या बद्दलची कल्पना पुसट झालेली नजरेस येते. माझ्या ल्हानपणीं माझ्या गावाजवळ खरडाश हरि पाटील व येरगावास भाऊ पाटील असे सावकार होते. हरि पाटील हे निरक्षर असून त्याच्याकडे जमाखर्च नव्हते, किंवा त्यानी कर्जरोखे घेतले नव्हते. भाऊ पाटील हिशेब ठेवीत, पण त्यानासुद्धा देणेकऱ्यावर फिर्याद करण्याचा प्रसंग आला नव्हता. सध्याच्या काळात काय चालतें हें वाचक जाणतात. लाचलुचपत फारच वाढली आहे. ती खाली पोलिस ठाण्यात वा कोर्टातील शिपाईकारकुनातच आहे असे नव्हे, तर त्यात मोठाल्या अधिकाऱ्याचा हात असल्याचें वृत्तपत्रावरून दिसून येतें

अवघ्या पन्नास वर्षांत लोकांची नीतिमत्ता, आपल्या देशात व युरोप अमेरिकेत मुद्धा, या सालावरची ही कळत नाही. कदाचित् लोकांची देवाधर्मावरची व न्यायनीतीवरची श्रद्धा कमी झाली काय? अशा परिस्थितीत वाटतें, की पूर्वीची अंधश्रद्धा व दगडधोंड्याचा देवच बरा होता, नाही का?

इंग्लंड व युरोपातील उत्तरेकडचे देश हे भूमध्य रेषेपासून उत्तर ध्रुवाकडे बरेच लांब असल्याने दिवस व रात्र याच्या वेळात फार फरक पडतो, हें मागे सांगितलेच आहे. परंतु आमच्याइकडच्याप्रमाणे सूर्य मावळल्यावर तिकडे लवकर अंधार पडत नाही. कारण तिकडे संधिप्रकाश फार वेळ टिकतो. सूर्योदयापूर्वी व सूर्यास्तानंतर सुमारें तास दीड-तास चांगला उजेड असतो. यामुळे घडीच्या लहान दिवसांतहि बराच वेळ उजेड मिळतो. पण उन्हाळ्यात रात्र सात आठ तासांची असल्याने माणसे उजाडल्यावरहि झोपलेली दिसतात.

आमच्याकडे हंगाम तीन : उन्हाळा, पावसाळा व हिवाळा. पण आपण वर्षाचे सहा ऋतु करतों. अगदी काटेकोर नसले तरी उन्हाळ्यात वसंतऋतु (मार्च एप्रिल) व ग्रीष्मऋतु (मे-जून), पावसाळ्यात वर्षाऋतु (जुलै-ऑगस्ट), आणि शरदृऋतु (सप्टेंबर ऑक्टोबर) व हिवाळ्यांत हेमंतऋतु (नव्हेंबर डिसेंबर) आणि शिशिरऋतु (जानेवारी फेब्रुवारी) असे जवळजवळ असतात. विलायतेत चारच हंगाम असतात. स्प्रिंग, समर, ऑटम व विंटर. म्हणजे तिकडील स्प्रिंग मार्च, एप्रिल व मेमध्ये असतो, समर (उन्हाळ्याचे दिवस) जून, जुलै व ऑगस्टमध्ये असतो, ऑटम सप्टेंबर, ऑक्टोबर व नव्हेंबरमध्ये येतो व विंटर डिसेंबर जानेवारी व फेब्रुवारीत असतो. स्प्रिंगमध्ये आपल्याकडील वसंतऋतूप्रमाणे वाटते.

आपल्याकडे जूनमध्ये पाऊस पडल्यावर खरीपाची (भात, बाजरी) पेरणी होते त्याप्रमाणे विलायतेत हिवाळा संपल्यावर स्प्रिंगमध्ये, सुमारे एप्रिल महिन्यात, पर्णरहित झालेल्या झाडास पालवी फुटते आणि मुख्य पिकाची (गहू, ओट याची) पेरणी होते. हिवाळ्यात गवताची वाढ खुंटलेली असते. पण स्प्रिंग निघताच हवेंत थोडी उष्णता येते (तरी पण सकाळीं नऊ वाजेपर्यंत थंडी असतेच) व त्या वेळीं झिमझिम पाऊसहि पडतो. त्यामुळे गवत वाढीस लागतें. साधारण स्प्रिंग संपून समर लागण्याच्या सुमारास जून महिन्यात गवताची कापणी सुरू होते. ऑगस्ट महिन्यात गहू व ओट ह्यांची मळणी होते. बटाटेहि याच वेळीं निघतात. स्प्रिंग सुरू झाल्यापासून समर संपेपर्यंत म्हणजे एप्रिल ते सप्टेंबर तिकडचे लोक हलके कपडे वापरतात. पावसाच्या वेळीं हलका ओव्हरकोटहि बरोबर असतो. ऑटम सुरू झाल्यानंतर हिवाळ्यात जाड लोकरी कपडे वापरावे लागतात व गरम हातमोजे व पायमोजे घालावे लागतात. बर्फ (स्नो) पडू लागल्यावर चामड्याच्या बुटावर रबरी बूटहि वापरतात. अशीच स्थिति युनायटेड स्टेट्स ऑफ अमेरिकेत मीं पुढे (सन १९२१–२२ सालीं) पाहिली. कदाचित् अमेरिकेंतील ज्या भागात (विस्कॉनसिन स्टेटमध्ये) मी राहत होतों

तेथे बर्फ जास्त व बरेच दिवस पडत असावें. मी विलायतेच्या प्रवासात बर्फ पड़ू लागण्यापूर्वीच परत स्वदेशीं निघालो होतों.

दुसरी महत्त्वाची गोष्ट ध्यानात ठेवली पाहिजे ती ही की, आपला देश (आपण पुणे मुंबईचाच विचार करू) भूमध्य रेषेजवळ असल्याने आपल्याकडे उन्हाळा जास्त व रात्र आणि दिवस याच्या वेळात फरक कमी. आपल्याकडे हिवाळ्यात दिवस सुमारें अकरा तास व रात्र सुमारें तेरा तास असते. पण इंग्लंड व त्याच्या जवळचे देश भूमध्यरेषेपासून दूर उत्तर ध्रुवाकडे असल्याने, तिकडे थंडी जास्त असते, शिवाय स्प्रिंगमध्ये दिवस फार मोठा असतो. सूर्य पहाटे तीन साडेतीन वाजता उगवतो व सध्याकाळीं आठ सव्वाआठला मावळतो. म्हणजे दिवस सोळा सतरा तासाचा व रात्र फक्त सात आठ तासाची असते. याच्या उलट (विंटर) थंडीच्या हंगामात दिवस फक्त सात आठ तासाचा तर रात्र सोळा सतरा तासाची असते. पण प्रकाशात वा उजेडात इतका फरक दिसून येत नाही. सूर्य उगवण्यापूर्वी व सूर्यास्तानंतर दोनतीन तास उत्तम संधिप्रकाश असतो. असल्या संधिप्रकाशात माणसे बत्तीशिवाय लिहू वाचूसुद्धा शकतात.

मी एकदा डेन्मार्कमध्ये फिरत असता एका शहरी पहाटे तीन साडेतीनला गलो. अर्थात् सूर्यप्रकाश चांगला होता. हाटेलकडे जाताना माणसाची ये जा नव्हती. मला वाटलं, हें काय? पुढे हॉटेलमध्ये गलो, तेथील नोकराने मला माझी खोली दाखविली व अथरूणपांघरूण दाखविलं. मला खुळ्यासारखं वाटून मी अंथरुणावर झोपलोंहि. कारण झोप पुरी झाली नव्हती. इतर प्रवाशांबरोबर परत सहा वाजता उठून प्रातर्विधि उरकून चहा वगैरे घेतला.

डेन्मार्कचा प्रवास संपल्यानंतर मी परत लंडनला येऊन आयर्लंडला गलों. आयर्लंड हें बेट इंग्लंडच्या पश्चिमेस आहे. मी इंग्लंडच्या पश्चिम किनाऱ्यावरील लिव्हरपूल बंदरांतून आयर्लंडच मुख्य शहर डब्लिन येथे गलो डब्लिन हें आयर्लंडच्या पूर्व किनाऱ्यावर आहे. लिव्हरपूलपासून बोटीने एकशेवीस मैल दूर असलेल्या डब्लिन शहरीं तारीख ७ जुलै १९१२ रोजीं पोचलों तेथ गल्यावर प्रथम मी मिस्टर मॅक्नील आय० सी० एस्० ह्यांच्याकडे गलों मॅक्नील हे बुद्धिमान आयरिश गृहस्थ असून महाराष्ट्रात कलेक्टर होते. ह रिचिंगसाहेबांचे स्नेही असून ते अहमदनगरला कलेक्टर असताना त्यांची व माझी दाट ओळख झाली होती. रेव्हेन्यूच्या कामाखेरीज ते शेतीसुधारणा व सहकारी चळवळ यामध्येहि लक्ष घालीत ते अहमदनगरला असताना माझ्या देखरेखीखालीं त्यांनी अहमदनगर व संगमनेर येथ मोठालीं शेतकीप्रदर्शनं भरविलीं होतीं.

इंग्लिश लोक, त्याचप्रमाणे आयरिश लोक, राज्यकर्ते या नात्याने हिंदुस्थानसंबंधी फार जबाबदारीने वागत व सावधगिरीने बोलत. याचं उदाहरण मला मॅक्नीलमध्ये दिसलं. मी त्यांच्या घरीं दोन दिवस होतों. मॅक्नील हे अविवाहित होते. बोलतां बोलतां

मीं त्याना विचारलें, "आपण इतक्या लवकर सेवानिवृत्त का झालात?" ते हसून म्हणाले, "मिस्टर पाटील, माझा तुमच्यावर विश्वास आहे. ज्या गोष्टी हिंदुस्थानात मी तुमच्याशींसुद्धा बोलणार नसतो त्या मी तुम्हाला सागतो. कारण तुम्ही आमच्या युनायटेड किंग्डम (सयुक्त राज्य) यातील लोकाचा अभ्यास करण्यास आलो आहात. मी हिंदुस्थानात कलेक्टरच्या जागेपर्यंत इतर आय० सी० एस्० प्रमाणे गेलों, पण मी आयरिश असल्याने कमिशनरच्या जागेवर जाण्याचे लक्षण दिसेना. अशा मोठ्या जागा राज्यकर्त्या इंग्लिश लोकाच खास कुरण असत. मी हिंदुस्थानात असताना त्यानी माझ्याकडून महत्त्वाचीं काम करून घतलीं, इतकेच नव्हे तर मी सेवानिवृत्त होऊन येथ आल्यानतरहि महत्त्वाचीं व सरकारी धोरणाचीं काम मुनइसरकार मजकडे पाठवीत असतं. हीं पाहा किती तरी प्रकरण येथ येऊन पडली आहेत असलं काम मी मनापासून करताहि. मी सयुक्त राज्याचा नागरिक असून हिंदुस्थान सरकारचा पेन्शनर आहे याची मला जाणीव ठेवावी लागते."

मि. मक्नील याच्या साहाय्याने मीं आयर्लंड देशातील माझ्या दौऱ्याचा कार्यक्रम आखला व त्या देशात बराच फिरलो. त्या वेळीं मला असे दिसले कीं इंग्लंडच्या मानाने आयर्लंड फार गरीब असाव हा देश इंग्लंड किंवा डेन्मार्कसारखा समृद्ध नव्हता. तथापि उद्योगाच्या जोरावर आयरिश लोक पुढे पाऊल टाकीत होते. प्रथम त्यानी सक्तीचें शिक्षण सुरू केल. आपल्या देशातील चागले शेतकरी व शेतकी खात्यातील कळकळीचे अधिकारी बल्जम, हॉलंड, डेन्मार्क या देशात पाठवून तेथील सहकाराची व शेतीची माहिती मिळवून, आपल्या देशातील शेतकऱ्याच्या मुलाना शिकविण्यासाठी शेतकी शाळा काढल्या, त्या उत्तम रीतीने चालत होत्या. सर्व शेतकरी बहुतेक लिहिणारे वाचणारे असल्यामुळे, सदर शाळाचा ते योग्य उपयोग करून घेत असत शेतकी खात्यात बहुतेक शेतकाम करणाऱ्या लोकातूनच अधिकारी निवडले होते. परस्पर सहकारी सस्थाहि पुष्कळ निघाल्या होत्या येथील शेतकी खातेंहि चागल कार्यक्षम होतं.

प्राथमिक शाळा गावोगाव होत्या. इकडील गावें आपल्याकडील गावाप्रमाणे जवळ जवळ असलेल्या घराच्या समूहाने बनलेलीं नसतात. गावात पन्नास घरें असलीं तर तीं सव शिवारभर इतस्तत आपापल्या शेतावर बाधलेलीं असतात ज्याला गाव म्हणावयाचे तें म्हणजे जवळजवळ असलेल्या साध्या इमारती, ज्यात एक प्रार्थना मदिर (चर्च), एक शाळा, एक पोस्ट-आफिस, चारदोन दुकानें व गाव मोठा असल्यास एखादी बँक आणि एक परस्पर सहकारी सस्था असावयाची. शिक्षण सक्तीच असल्याने सव मुलामुलींना शाळेत जाण भाग पडे. काही मोठ्या गावातील शाळेंत नित्याच्या शिक्षणाशिवाय, शेतकऱ्याच्या मुलामुलींना ससारात उपयोगी पडणाऱ्या बाबी—शिवणकाम, कपडे वतण, रफू करणें, तुणणें, वेमालूम ठिगळ देणें, धुणे व भट्टी लावण, कपड्याच्या घड्या करणें, घर स्वच्छ ठेवणें, स्वयपाक करण,

दूधदुभत्याची निगा करणें, वासराची जोपासना, कोंबड्याची व डुकराची व्यवस्था ठेवणें, आजाऱ्याची शुश्रूषा करणे, मुलाचें संगोपन इत्यादि विषय शिकवीत असत.

आपल्याकडील कोंकण व देश या भागाप्रमाणेच या देशातील पश्चिम व पूर्व भागाच्या शेतीभातीत व राहणींत फरक दिसत होता. जसा देशाच्या मानानें कोंकण भाग मागासलेला आहे तसाच आयर्लंडचा पश्चिमभाग मागासलेला असून त्यातील लोक गरीब होते. घरें हलक्या दर्जाचीं दिसत. कोठेकोठे माणसें अनवाणी व अंगावर जीर्ण कपडे असलेली दिसत. क्वचित् जागीं भिकारीहि उभे असलेले दिसत, पण हिंदुस्थानाइतके नव्हते; त्याचें प्रमाण फारच कमी. आयर्लंडचा पूर्वभाग मात्र बरा दिसला. पण सरकारचे दीर्घ प्रयत्न व लोकाची शिकण्याची उमेद या जोड प्रयत्नाने हा पश्चिम भाग भराभर सुधारत चालला होता. शेतकी खात्यातील जबाबदार अधिकारी उत्तम प्रकारचें पीक काढणाऱ्या शेतकऱ्यास, घराजवळच्या जागेत फळफळावळ करणारास व घरें स्वच्छ ठेवणारास बक्षिसे देऊन उत्तेजन देत. तसेच चांगल्या अवलादीचे वळू ठेऊन गाईं बैलाची व घोड्याची निपज करणाऱ्या शेतकऱ्यास काही रकमेचीं बक्षिसें देत सहकारी तत्त्वाने कोणतेंहि काम अंगावर घेऊन येथील लोक तें पार पाडीत. लोक उद्योगी व कष्टाळू होते.

हा देश डोंगराळ असल्यामुळे लोकवस्तीच्या मानाने पुरेसे धान्य पिकत नसे. म्हणून त्याना खाण्याच्या बाबतींत बटाटे व मासावर बहुतांशीं अवलबून राहावें लागे. या कारणाने कोंबडीं, डुकरें, मधमाश्या, गायी वगैरे पाळण्यावर लोकाची भिस्त असे. इथल्या शेतकऱ्यास रोज निदान दोन अंडीं व मास हें जेवणात अवश्य लागे. त्यामुळे कोंबड्या पाळणें व डुकरे ठेवणें हा काही शेतकऱ्याचा चरितार्थाचा धदा झाला होता. प्रत्येक शेतकरी २० ते २०० पर्यंत कोंबड्या ठेवी व सरकारने पसत केलेल्या जातीच्या कोंबड्याचीं आठशे अंडीं पिलें काढण्यासाठी विकत देणारास पैशाच्या रूपाने बक्षीस देऊन सरकार उत्तेजन देत होतें. देशात पीक कमी, त्याचप्रमाणे वैरणीचाहि तुटवडा पडे; म्हणून कदमुळें व ओट वगैरेचीं पिके काढून तो तुटवडा भरून काढण्याचा शेतकरी प्रयत्न करीत

इग्रज लोकाचा या बेटावर ताबा होता. आयरिश लोक हाडापेराने व वर्णाने इग्रजाप्रमाणेच आहेत या बेटावर इग्रजाचे राज्य फार दिवस असल्याने आयरिश लोकाची भाषा इग्रजीच झाली आहे. खाणें इग्रजाप्रमाणेच आहे. लोक इग्रजापेक्षा जास्त आदरशील व सुस्वभावी आहेत. शभरसवाशे वर्षांपूर्वी, आयर्लंडमधील बहुतेक जमिनी इग्लडमधील जमीनदाराच्या मालकीच्या होत्या. कुळाना काढून टाकण्याचा अगर जमिनीचा खड वाढविण्याचा जमीनदारास हक्क असे, त्यामुळे आयर्लंडमधील लोक इग्रज राज्यकर्त्यावर नाखुप असत. लोकस्थिति सुधारावी म्हणून इग्रज सरकारने सर्व जमिनी विकत घेतल्या व स्थानिक कुळास विकल्या. जमिनीची किंमत साठ हप्त्यानी वसूल करून जमिनी स्थानिक कुळाच्या मालकीच्या केल्या. आता कुळाना

खडमाग कोणाला द्यावा लागत नाही. फक्त ठराविक कर सरकारात भरावा लागतो. आयर्लंड पाहून मी लंडनला परत गलो.

तारीख १९ जून १९१२ रोजीं डेन्मार्कला जाण्यासाठी लंडन सोडलें. डेन्मार्क देश कर्पेक्षाहि ल्हान आहे. बाल्टिक समुद्रातील जटलंड व इतर ल्हान बेटें मिळून डेन्मार्क बनला आहे. डेन्मार्कचा प्रवास मी पाच इंग्रज विद्यार्थ्यांबरोबर केला आम्हीं एक डेन्मार्कचा इंग्रजी भाषा जाणणारा गृहस्थ मि० स्टॉक्फ्लेथ बरोबर घेतला होता. जेटलंडच्या किनाऱ्यावर पोचल्यानंतर पुढे आगगाडीने प्रवास करावा लागला. परत जहाजाने फिन्लंड बेटात गेलो. या बेटात चार दिवस फिरून ओन्ग्ज शहरा जवळचीं काही खेडी व शेती पाहिली. नंतर परत आगगाडीने व नंतर जहाजाने तिसऱ्या बेटात, ज्यांत डेन्मार्कची राजधानी कोपनहगन आहे तेथ, गेलो. डेन्मार्कमधील लोक साधारणत: इंग्रज लोकाप्रमाणेच दिसतात. त्याची भाषा डॅनिश आहे इंग्रजी जाणणाराना ती थोडी थोडी समजते. शिवाय आमच्याजवळ दुभाष्या होताच. येथील लोक सज्जन असून त्याच्यात आदरातिथ्य ओतप्रोत भरलेलें दिसलें. वास्तविक मी हिंदुस्थानी म्हणा अगर माझ्याबरोबरचे इंग्रज विद्यार्थी म्हणा त्याना काय होत? पण जेथे जेथ आम्ही गलों तेथे तेथ त्यानी आम्हास अगत्याने व आदराने वागवून पाहिजे असलेली माहिती दिली. तेथील एक सद्गृहस्थ मि० स्टीफन्सन, ज्याने ल्हकेंत व हिंदुस्थानात प्रवास केला होता, त्याने आम्हास आपल्या घरीं नेऊन आपली पत्नी, कॉलेजमध्ये शिकत असलेलीं आपलीं दोन्ही मुलं (मुलगा व मुलगी) या सर्वांची ओळख करून दिली, आपणाकडे जेवणास ठेवून घेतलें व जवळच्या दुसऱ्या एका बेटावर सहलीसाठी नेलें. शिवाय मोकळ्या मनाने व उल्हासाने हे डॅनिश गृहस्थ व त्याचा तरुण मुलगा व मुलगी माझ्याशीं वागत होतीं! मला स्त्रियाशीं सलगीने वागण्याची सवय नसल्याने मी जरा संकोचलेला पाहून त्या वात्रट तरुणाने म्हटलें, "पाटील, तुम्ही मोकळ्या मनाने का वावरत नाही? माझी किंवा माझ्या वडिलांची सोबत पसंत नसल्यास ही पाहा माझी सुंदर तरुण बहीण ज्वळ आहे. हिच्याशीं तरी मोकळेपणाने वागा." माझी काय तिरपीट उडाली त मात्र मलाच माहीत!

डेन्मार्क देशात शेतीचं क्षेत्र कमी असल्याने स्वत मालकच जमीन कसतो. जमिनीची वाटणी भावाभावांतच नव्हे तर सर्व मुलामुलींत होते. पण ती वाटणी हिशेबी व शहाणपणाची असते. मुली आपली शेती भावासच विकतात. जर शेत (फार्म) ल्हान असेल तर एक, किंवा शेती मोठी असल्यास दोन भाऊ ती विकत घेतात. बाकीच्या भावाबहिणींस त्याच्या वाटणीची किंमत मिळते. हें काम समजूतदारपणाने होतें. शेती मोठी असून वाटणी व्हावयाची असली तर वसले पाडून वाटण्या करतात. आमच्याप्रमाणे प्रत्येक शेताचे तुकडे करून वाटून घेत नाहीत. आपल्या देशातहि गोव्यात जमिनीची वाटणी बहीणभावात होते व ती पद्धत तेथील लोकाच्या अंगवळणीं पडली आहे त्याचप्रमाणे केरळ भागात जमीनजुमला मुलीकडे

दूधदुभत्याची निगा करणें, वासराची जोपासना, कोंबड्यांची व डुकराची व्यवस्था ठेवणें, आजाऱ्यांची शुश्रूषा करणें, मुलाचें संगोपन इत्यादि विषय शिकवीत असत.

आपल्याकडील कोकण व देश या भागाप्रमाणेच या देशातील पश्चिम व पूर्व भागाच्या शेतीभातींत व राहणींत फरक दिसत होता. जसा देशाच्या मानाने कोकण भाग मागासलेला आहे तसाच आयर्लंडचा पश्चिमभाग मागासलेला असून त्यातील लोक गरीब होते. घरें हलक्या दर्जाचीं दिसत. कोठेकोठे माणसें अनवाणी व अंगावर जीर्ण कपडे असलेलीं दिसत. क्वचित् जागीं भिकारीहि उभे असलेले दिसत, पण हिंदुस्थानाइतके नव्हते; त्यांचें प्रमाण फारच कमी. आयर्लंडचा पूर्वभाग मात्र बरा दिसला. पण सरकारचे दीर्घ प्रयत्न व लोकांची शिकण्याची उमेद या जोड प्रयत्नाने हा पश्चिम भाग भराभर सुधारत चालला होता. शेतकी खात्यातील जबाबदार अधिकारी उत्तम प्रकारचें पीक काढणाऱ्या शेतकऱ्यास, घराजवळच्या जागेत फळफळावळ करणारास व घरें स्वच्छ ठेवणारास बक्षिसे देऊन उत्तेजन देत. तसेच चांगल्या अवलादीचे वळू ठेऊन गाई बैलाची व घोड्याची निपज करणाऱ्या शेतकऱ्यास काही रकमेचीं बक्षिसें देत. सहकारी तत्त्वाने कोणतेहि काम अंगावर घेऊन येथील लोक तें पार पाडीत. लोक उद्योगी व कष्टाळू होते.

हा देश डोंगराळ असल्यामुळे लोकवस्तीच्या मानाने पुरेसें धान्य पिकत नसे. म्हणून त्याना खाण्याच्या बाबतींत बटाटे व मांसावर बहुतांशीं अवलंबून राहावें लागे. या कारणाने कोंबडीं, डुकरें, मधमाशा, गायी वगैरे पाळण्यावर लोकांची भिस्त असे. इथल्या शेतकऱ्यास रोज निदान दोन अडीं व मांस हे जेवणात अवश्य लागे. त्यामुळे कोंबड्या पाळणे व डुकरें ठेवणें हा काही शेतकऱ्यांचा चरितार्थाचा धंदा झाला होता. प्रत्येक शेतकरी २० ते २०० पर्यंत कोंबड्या ठेवी व सरकारनें पसंत केलेल्या जातीच्या कोंबड्यांचीं आठरो अडीं पिलें काढण्यासाठी विकत देणारास पैशाच्या रुपाने बक्षीस देऊन सरकार उत्तेजन देत होतें. देशात पीक कमी, त्याचप्रमाणे वैरणीचाहि तुटवडा पडे; म्हणून कंदमुळें व ओट वगैरेचीं पिकें काढून तो तुटवडा भरून काढण्याचा शेतकरी प्रयत्न करीत.

इंग्रज लोकांचा या बेटावर ताबा होता. आयरिश लोक हाडापेराने व वर्णाने इंग्रजांप्रमाणेच आहेत. या बेटावर इंग्रजांचें राज्य फार दिवस असल्याने आयरिश लोकांची भाषा इंग्रजीच झाली आहे. खाणें इंग्रजांप्रमाणेच आहे. लोक इंग्रजांपेक्षा जास्त आदरशील व सुस्वभावी आहेत. शंभरसवाशे वर्षांपूर्वी, आयर्लंडमधील बहुतेक जमिनी इंग्लंडमधील जमीनदारांच्या मालकीच्या होत्या. कुळांना काढून टाकण्याचा अगर जमिनींचा खंड वाढविण्याचा जमीनदारास हक्क असे, त्यामुळे आयर्लंडमधील लोक इंग्रज राज्यकर्त्यांवर नाखुष असत. लोकस्थिति सुधारावी म्हणून इंग्रज सरकारनें सर्व जमिनी विकत घेतल्या व स्थानिक कुळांस विकल्या. जमिनींची किंमत साठ हप्त्यानी वसूल करून जमिनी स्थानिक कुळांच्या मालकीच्या केल्या. आता कुळांना

एडभाग फेणाला द्यावा लागत नाही. फक्त ठराविक कर सरकारात भरावा लागतो. आयर्लंड पाहून मी लंडनला परत गेलो.

तारीख १९ जून १९१२ रोजी डेन्मार्कला जाण्याकरिता लंडन सोडलें. डेन्मार्क देश लंकेपेक्षाहि लहान आहे. बाल्टिक समुद्रातील जटलंड व इतर लहान बेटें मिळून डेन्मार्क बनला आहे. डेन्मार्कचा प्रवास मी पाच इंग्रज विद्यार्थ्यांबरोबर केला. आम्ही एक डेन्मार्कचा इंग्रजी भाषा जाणणारा गृहस्थ मि० स्टॉकफ्लेथ बरोबर घेतला होता. जेटलंडच्या किनाऱ्यावर पोचल्यानंतर पुढे आगगाडीने प्रवास करावा लागला. परत जहाजाने फिन्लंड बेटात गेलो. या बेटात चार दिवस फिरून ओडेन्स शहरा जवळची काही खेडीं व शेती पाहिली. नंतर परत आगगाडीने व नंतर जहाजाने तिसऱ्या बेटात, ज्यांत डेन्मार्कची राजधानी कोपनहेगन आहे तेथे, गेलो. डेन्मार्कमधील लोक साधारणतः इंग्रज लोकांप्रमाणेच दिसतात. त्याची भाषा डॅनिश आहे. इंग्रजी जाणणारांना ती थोडी थोडी समजते. शिवाय आमच्याजवळ दुभाष्या होताच. येथील लोक सज्जन असून त्यांच्यात आदरातिथ्य ओतप्रोत भरलेले दिसलें. वास्तविक मी हिंदुस्थानी म्हणा अगर माझ्याबरोबरचे इंग्रज विद्यार्थी म्हणा त्यांना काय होत ? पण जेथे जेथे आम्ही गेलो तेथे तेथे त्यांनी आम्हास अगत्याने व आदराने वागवून पाहिजे असलेली माहिती दिली. तेथील एक सद्‌गृहस्थ मि० स्टीफन्सन, ज्याने ल्कॅंत व हिंदुस्थानात प्रवास केला होता, त्याने आम्हास आपल्या घरीं नेऊन आपली पत्नी, कॉलेजमध्ये शिकत असलेलीं आपलीं दोन्ही मुलं (मुलगा व मुलगी) या सर्वांची ओळख करून दिली, आपणाकडे जेवणास ठेवून घेतलं व जवळच्या दुसऱ्या एका बेटावर सहलीसाठी नेलं. स्त्रीं मोकळ्या मनाने व उल्हासाने हे डॅनिश गृहस्थ व त्याचा तरुण मुलगा व मुलगी माझ्याशीं वागत होतीं ! मला स्त्रियांशीं सलगीने वागण्याची सवय नसल्याने मी जरा संकोचलेला पाहून त्या वात्रट तरुणाने म्हटलं, "पाटील, तुम्ही मोकळ्या मनाने का वावरत नाही ? माझी किंवा माझ्या वडिलांची सोबत पसंत नसल्यास ही पाहा माझी सुंदर तरुण बहीण जवळ आहे. हिच्याशीं तरी मोकळेपणाने वागा." माझी काय तिरपीट उडाली त माझें मलाच माहीत !

डेन्मार्क देशात शेतीचं क्षेत्र कमी असल्याने स्वत मालकच जमीन कसतो. जमिनीची वाटणी भावाभावांतच नव्हे तर सर्व मुलामुलींत होते. पण ती वाटणी हिशोबी व शहाणपणाची असते. मुलें आपली शेती भावाभावंच विकतात. जर शेत (फार्म) लहान असेल तर एक, किंवा शेती मोठी असल्यास दोन भाऊ ती विकत घेतात. बाकीच्या भावाबहिणींस त्यांच्या वाटणीची किंमत मिळते. हें काम समजूत दारपणाने होत. शेती मोठी असून वाटणी व्हावयाची असली तर वसलेले पाहून वाटण्या करतात. आमच्याप्रमाणे प्रत्येक शेताचे तुकडे करून वाटून घेत नाहीत. आपल्या देशातहि गोव्यात जमिनीची वाटणी बहीणभावांत होते व ती पद्धत तेथील लोकांच्या अंगवळणीं पडली आहे. त्याचप्रमाणे केरळ भागात जमीनजुमला मुलीकडे

जातो. ही वहिवाट पडून गल्यामुळे तेथील लोकाना त्यात काही अडचण भासत नाही. पण आमच्याकडे जमिनीची वाटणी भावाभावात तरी वसले पाडून का न व्हावी? जमीनविषयक कायदे व कुळकायदे सोयीस्कर रीतीने करणें अशक्य नाही. पण आमच्या कडील अनुभव असा दिसतो की मंत्री किंवा सेक्रेटरी आपणास सर्व काही कळत असें गृहीत धरून कोणाचाहि सल्ला न घेता कायदे करतात. इतकेंच नव्हे, तर ते आपल्या राज्यातील शेतकी व सहकारी खात्याचासुद्धा सल्ला घेत नाहीत. या दोन्ही खात्याच्या मुख्य अधिकाऱ्याना मीं विचारलें; पण त्यानी सांगितलें की सरकार आमचा सल्ला मागत नाही.

मी डेन्मार्कमध्ये अकरा दिवस फिरलों. मला तेथील लोक उद्योगी व बुद्धिमान दिसले. पाऊस बराच असून सर्व ऋतूंत पडतो. नागराला घोडे जुपीत. गायी चांगल्या पुष्ट असून दुधाळ दिसल्या. दिवसातून तीन वेळा, वासरू न सोडता, हातावरच दूध काढीत. गायीला पाडा असल्यास त्यास चार ते आठ दिवसाच्या आंत व्हील्साठी (कोवळ्या मांसासाठी) खाटकास विकीत व कालवड असल्यास ती घरीं ठेवीत. येथें आपल्याकडील गुजरातची आठवण होते. गुजरातमध्ये अहिंसेचें वड मोठ आहे. नडियाद पेटलाद भागात प्रत्येकाच्या घरीं चांगल्या भरपूर दूध देणाऱ्या म्हशी असतात. म्हशीला रेडकी झाली तर दुधाची सोय होईल म्हणून तिची जतन होते; पण रेडका झाला तर शेतकऱ्यास तो जड होतो. कारण महाराष्ट्रात व कोंकणात आहे त्याप्रमाणे रेड औताला जुपीत नाहीत. म्हणून रेडक्याचा नाहीसा करण्याची त्यानी युक्ति काढली आहे. एका भाड्यात दूध घेऊन त्यात रेडक्याचें तोंड नाकपुड्या बुडेपर्यंत दाबून धरायचें. रेडका गुदमरुन मरतो, पण शेतकरा समजूत करून घेतो की तो दूध पिताना मेला त्याच पाप आपल्याला नाही. असो! मे ते सप्टेंबरच्या दरम्यान जनावरें चरणीवर असत. चरणी म्हणजे जनावरें मोकळीं सोडणें नव्हे, किंवा त्यास माणसानें उभे राहून चारणें नव्हे, तर सारख्या अंतरावर मेखा मारून प्रत्येक जनावरास ठराविक लांबीच्या दोराने बांधणं. त्यामुळे गवत एका बाजूने सारख चारल जाई. दुसऱ्या दिवशीं मेखा ठराविक अंतरावर पुढे सरकवीत. जनावराना पाण्याकरिता मात्र बाहेर नेत, एरवी तीं रात्रंदिवस चरीव रानावच असत. त्यामुळे आयतेंच शेणमुताचें खत जमिनीस मिळे. गायींचें दूधसुद्धा बांधल्याजागींच काढीत. थंडीच्या दिवसात मात्र जनावरें घरीं नेत. डेन्मार्कमध्ये फारशी मेंढर ठेवीत नाहीत; कारण तेथे रान (जमीन)च कमी आहे. डुकर व कोंबडीं मात्र पुष्कळ ठेवतात. त्यापासून शेतकऱ्याना बरकत बरीच होते. आपल्याकडच्याप्रमाणे डुकरें व कोंबडीं मोकळीं सोडीत नाहीत. त्याच्यासाठी ल्हान ल्हान स्वतंत्र गोठे व खुराडीं असतात. डुकरास मलई काढलेले दूध, भाजीपाल्याची ऊर व उष्टें-खरकटे हें सव घमेल्यात घालून देतात.

या देशातील लोकसंख्या त्या वेळीं सुमारे छत्तीस लाख होती व माणसाइतकीच गायींची संख्या होती. डुकर व कोंबड्याची पैदास मोठ्या प्रमाणात होत होती.

लोणी, चीज, डुकराचे मास, कोंबड्याचीं अंडीं हीं मोठ्या प्रमाणावर लंडनला रवाना होत असत. सातूपासून बिअर दारू व बीटरूटपासून साखर तयार करण्याचे कारखाने बरेच होते. एकदरीत येथील लोक सुखी दिसले.

दुसरी एक विशेष गोष्ट येथ दृष्टीस पडली ती ही की, लोकाचा झोपमोड होऊ नये म्हणून आगगाडीचे डबे जहाजात चढवून एका बेटावरून दुसऱ्या बेटावर आणतात. कारण हा देश पुष्कळ बेटाचा मिळून झालेला आहे व प्रवास करावयाचा तर एका बेटावरून दुसऱ्या बेटात जावयाचे झाल्यास मध्येमध्ये अर्धापाऊण तास समुद्र ओलाडावा लागतो. वराल प्रकारच्या व्यवस्थने प्रवाशाची झोपमोड न होता त्याचे डबेच जहाजावर चढवून पलीकडे नेत. तथ गल्यावर तयार असलेल्या गाडीस हे डबे जोडून गाडी सुरू होई. हे पाहून मला आश्चर्य वाटल.

मी तारीख १ जुलैला डेन्मार्क सोडला व लंडनला परत आलो. तेथे सात आठ दिवस राहिलो. त्या वेळीं कोल्हापूरच्या राजपुत्राच्या व त्याच्याबरोबर आलेल्या त्याच्या सोबत्याच्या गाठी घेतल्या. आणि पुन्हा तारीख २६ ऑगस्ट १९१२ रोजीं इंग्लंडहून निघून बेल्जम देशातील ऑस्टेंड नावाच्या बंदरात उतरलों. आठ दिवस फिरून हा देश पाहिला. हा देश डेन्मार्क सवा हॉलंडपेक्षाहि लहान आहे. देशाचा दक्षिणेकडील भाग खडकाळ आहे. तेथील जगलात पाइन जातीचे वृक्षच फार दिसले, व गवतहि बरच निरस असावें. देशाच्या मधल्या भागातील पूर्व पश्चिम पट्टा सुपीक दिसला. या भागात उद्योगधद्याचे कारखानेहि बरेच आहेत. देशाच्या उत्तर भागातील जमीन उथळ असून तेथे आपल्याकडच्या कोंकणाप्रमाणे हलकी पिक निघतात. देशात राय, ओट, गहू, बटाटे, बीटरूट, जवस वगैरे पिक होतात. औतास घोडे जुपीत. भाजीपाला छोट्या गाड्यातून बाजारास नेत. असल्या गाड्यास जाडजूड बळकट कुत्रीं जुपीत. शहरात दुधाचे रतीब असल्याच गाड्यातून घालीत. शेतीपेक्षा हा देश कारखानदारीवर अवलबून असलेला दिसला. या देशाची राजधानी ब्रुसेल्स. घट शहरात जवसाच्या वाकाचे कारखाने फार आहेत. या देशातील अँटवर्प व कोट्राई शहरें पाहिली. जागतिक युद्धामध्ये पुढे प्रसिद्धीस आलेला येप्रे गाव व नामूर येथील सुदृढकोट किल्ला पाहिला. या देशात रेल्वेप्रवासात आठवड्याचीं, महिन्याचीं वा वर्षाचीं तिकिटें देत. त्यामुळे वरचेवर तिकीट काढण्याचा त्रास वाचे.

मी ब्रुसेल्स(बेल्जम)हून तारीख ४-९-१९१२ रोजीं निघून हॉलंड देशातील हेग या शहरीं आलों. हेग येथे राजवाडा व सरकारी कचेऱ्या होत्या. देशाची राजधानी ॲमस्टडम पाहिली. हिऱ्यास पैलू पाडण्याबद्दल हें शहर फार प्रसिद्ध आहे. हा देश लकेच्या अर्ध्या प्रदेशाएवढा आहे पण लोकवस्ती अतिशय दाट असून तिचें प्रमाण दर चौरस मैलास सातशे पडतें. हा देश ऱ्हाइन व म्यूझ नद्याच्या खोऱ्यात वसलेला असून सपाट आहे. आग्नेय दिशेकडील भाग मात्र समुद्रसपाटीपासून तीनशें फूट अगर जरा जास्त उचावर आहे. बाकी सर्व भागातील

जमीन समुद्रसपाटीच्या खालीच आहे. समुद्राचें पाणी जमिनीवर येऊ नये म्हणून फार खर्च करून लांबच लांब मोठाले बधारे घातलेले दिसले. असले तीन मोठे धक्के मीं पाहिले. एक एक धक्का पुरा झाला म्हणजे दुसरा बांधू लागतात. दरम्यान ह्या दोन धक्क्याच्या मध्ये पाणी येतच असतें. पण दिवसेंदिवस त्यात गाळ साठत जातो. बराच गाळ साठल्यावर नव्या धक्क्याचे ताड बद करतात व मधली जमीन लागवडीस आणतात. अशा रीतीने शेतकीसाठी अधिक जमीन मिळविण्याचा लोक सारखा प्रयत्न करीत. अशा तऱ्हेने सुधारून तयार केलेल्या दोन धक्क्याच्या मधील जमिनीस 'पोल्डर' म्हणतात.

आपल्याकडील इरिगेशन खातें नद्यास धरणे बांधून, कालवे व पाट काढून शेतातील पिकास पाणी पुरवितें. याच्या उलट हॉलड देशात ड्रेनेज खातें जमिनींत साठविलेलें निचऱ्याचे पाणी पवनचक्कीने उचलून नेऊन समुद्रात टाकण्याचे काम करतें. या पवनचक्क्या लाकडी असून त्या वाऱ्यावर चालत. पवनचक्क्यावर पिठाच्या गिरण्या व लाकूड कापण्याचे लहानलहान कारखानेहि चालत. देशात जावें तिकडे चक्क्याच चक्क्या दिसत. या चक्क्यानी उपसलेलें पाणी लहान लहान ड्रेन(गटार)-मधून नेऊन तें मोठ्या ड्रेनमध्ये सोडीत. या मोठ्या ड्रेनमधील पाणी तेलाच्या अगर वाफेच्या इंजिनच्या साहाय्याने उचलून समुद्रात टाकतात. हा क्रम अहोरात्र सारखा चालू असतो.

हॉलड देश शेतकीबद्दल फार प्रसिद्ध आहे. ह्या देशातील गाई फार दुधाळ आहेत. त्याना चरण्यास कुरणेंहि आहेत. शेतकरी बटाटे व गहू हीं पिकें काढतात. भाजीपाला, फळफळावळ व फुलझाडेंहि विपुल प्रमाणात दिसलीं. हार्लेम शहर, ट्युलिप व इतर कद व फुलझाडाबद्दल फार प्रसिद्ध आहे आपल्याकडे खेड मचर भागात जशीं अलीकडे ॲस्टरच्या रंगीबेरंगी फुलानी भरलेलीं शेतेंच्या शेतें हिवाळ्यात दिसतात, तसे ट्युलिपच्या सुदर व रंगीत फुल्यानी फुललेले ताटवेच्या ताटवे शेतात उभे असलेले पाहून मनास फार आल्हाद वाटला.

या देशातील 'गोज' शहराजवळची शेती पाहिली. बेल्जमप्रमाणेच हॉलडमधून लोणी, अडीं, डुकरें व बेकन वगैरे इंग्लडास पाठवीत. तसेच निरनिराळ्या जातींचीं उत्तम रंगदार फुलेंहि इंग्लडास रवाना होत.

वास्तविक इंग्लड, आयर्लंड, बेल्जम, डेन्मार्क व हॉलड हे देश पाहिल्यावर माझा मुक्रर केलेला विलायतचा प्रवास सपला. स्वदेशीं परत येताना जर्मनी व इटली-मधून इजिप्तला गलो. हे देश वाटेवर होते म्हणून पाहत पाहत गेला इतकेच.

विलायतच्या पाहणींत सर्वसाधारणपणें मला वाटल की इंग्लडमध्ये लोकसंख्या फार मोठी पण शेतीचें क्षेत्र कमी. तथापि या देशात उद्योगधंद्यांची फार मोठी वाढ झाली होती व त्या काळीं हिंदुस्थान व इजिप्तवर इंग्रजाचें साम्राज्य असल्याने त्याना तेथील धंद्यात फार कमाई होई. लोक कारखानदारींत व व्यापारात गुतले असल्याने, व्यापार

देशात शेतीचें क्षेत्र कमी असूनहि प्रत्येक शेतकऱ्यास भरपूर शेती असे. बेल्जम, डेन्मार्क व हॉलंड हे देश ल्हान व शेतीचें क्षेत्रहि कमी, पण लोक फार उद्योगी. शिवाय त्या काळीं हॉलंडचें साम्राज्य इंडोनेशियात होत. तेथील साखरेचे व रबराचे कारखाने डचाच्या मालकीचे होते व इंडोनेशियाचा व्यापार डचाच्या हातीं होता. बेल्जमने आफ्रिकेत मोठाले प्रदेश बळकावले होते. या कारणाने ह्या तीनहि ल्हान देशात थोडी शेती असून लोक सुखी होते. डेन्मार्कचें लोणी, चीज, व्हील (वासराचें मास), बेकन (डुकराचें मास) मोठ्या प्रमाणात लंडनला जाई. हे तीनहि देश कंद, मुळें, फुलेंहि लंडनला पाठवीत. आयर्लंड देश झपाट्याने सुधारत होता. सहकारी तत्त्वावर मोठाले खरेदीविक्री संघ चालत. मला वाटतं, शेतकी सहकाराच्या बाबतात आपण सन १९१२ च्या आयर्लंडइतकी सुद्धा सुधारणा आतापर्यंत केलेली नाही. पण आपण त्या मार्गावर आहोंत.

इंग्लंडहून परत हॉलंडमधूनच मी जर्मनीची राजधानी बर्लिन या शहरीं तारीख ९-१० १९१२ रोजीं गेलों. तेथील बादशहाचा राजवाडा पाहिला. असला राजवाडा मीं पूर्वी कोठेहि पाहिला नव्हता. तो फारच भव्य व सुंदर आहे. जर्मनी देश मोठा असून तेथील लोक हुशार, मेहनती व कलाकौशल्यात निपुण दिसले. नवीन नवीन शोध लावून, यांत्रिक सामर्थ्याने काम करून घेण्यात त्याचा हातखंडा आहे. जर्मनीत मीं कृत्रिम खताची एक खाण पाहिली. ती जमिनीच्या सपाटीपासून सुमार एक मैल खोल होती. या पोटॅश खताच्या खाणीचें काम खरोखरच अचाट दिसलें. खाणीचे मॅनेजर 'अपघात झाल्यास कोणतीहि तक्रार करणार नाहीं अगर दावा लावणार नाहीं' असें लिहून घेतल्याशिवाय कोणास खाणींत सोडीत नसत. या कंपनीचे एक नोकर फ्रेड्रिक्सन महाराष्ट्रात तंबाखूच्या पिकास पोटॅश देऊन पीक किंतपत जास्त येतें याचे प्रयोग करीत मी महाराष्ट्राचा शेतकी इन्स्पेक्टर असल्याने त्याना माझ्या मदतीची नेहमी जरूर पडे. या फ्रेड्रिक्सनच्या विनंतीवरूनच मी बर्लिनजवळची खाण पाहण्यास गेलो असल्याने व ते माझ्याबरोबर असल्याने माझ काम सोप झालें होत. फ्रेड्रिक्सन यास इंग्रजी भाषा चागली येत होती. दुभाष्या व वाटाड्या म्हणून मला त्याचा फार उपयोग झाला. माझ्याबरोबर फ्रेड्रिक्सन व त्या खाणीचे इंजिनिअर होते. मला त्यांच्याबरोबर खाणींतील मजुराचा पोषाख घालावा लागला व आम्ही विजेच्या पाळण्यात (लिफ्टमध्ये) बसून खाणींत जाऊ लागलों. मी नवखा असल्याने पाळणा हळूहळू खाली सोडला, तरी तासाला ३० मैलाच्या गतीने आम्ही खाली गलां. खाणीची खोली एक मैल तरी असावी. जसजसे खाली जाऊ लागलो तसतसें चागलें ऐकू येईनासें झाल. याचें कारण कॉलेजमधील पदार्थविज्ञानशास्त्रातील प्रयोगाच्या वेळेपेक्षा या वेळीं चागलें कळलें हवेस वजन असत याचा अनुभव हवेच्या दडपणा मुळे चागलाच आला. आवढा गिळला म्हणजे जरा ऐकू येई व कानातील पडदा पुटपुट वाजे. खाली खाणींत पोचल्यावर, जेव्हा पोटातली व बाहेरची हवा समधात

झाली, तेव्हा बरें वाटू लागलें. शेकडा स्त्रीपुरुष, खेचरें व काही इंजिनें खाणींत काम करताना पाहिला, तेव्हा पादचरींतील एतिहासिक युधाराची कीव वाटू लागली. ज्या खाणींत उतरलों होतों, त्या खाणीवरील रानात एक मोठा गाव वसलेला आहे. याचा अर्थ खाण गावाच्या खाली दोन मैल इकडे तिकडे पोखरलेली असली पाहिजे. खाणींतून वर येताना हलक्या हवेत येत असल्याचा भास होतो व कान उघडत आहेत असे वाटतें. खताच्या खाणी 'इले'जवळहि आहेत.

मी जर्मनात असताना तेथील बादशहा मोठा सत्ताधीश होता. त्याच्या हातीं राज्यकारभारात कमीजास्त करण्याची 'कर्तुमकर्तुम्' अशी सत्ता असे. इंग्लंडमध्ये पार्लमेंटच्या हातीं सत्ता असते, तसें जर्मनीत नव्हतें. बर्लिन शहराचा अवाढव्य विस्तार व तेथील शोभायमान भव्य इमारती पाहून मन थक्क झाल. वेळ फार कमी असल्यामुळे मला फारसे पाहता आल नाही. पधरा दिवस तरी हें शहर पाहण्यास पाहिजेत. तथील इमारती, मदिरें वगैरे पाहून असे वाटल की, ही मानवाची कृति नसून परमेश्वरनिमिति असावी. चादण्याच नाटक्गृह म्हणजे हुबेहूब आकाश, व त्यात प्रकाशणारे असख्य कृत्रिम तारे आकाशातील खरोखरीच्या ताऱ्याप्रमाणे दिसले. काचेच्या कृत्रिम तलावातील पाण्यात स्त्रीपुरुषानी केलेल्या करामती आश्चर्यकारक होत्या. मूर्तिमत जल्माणसे अगर जलदेवताच आपल्यापुढे अवतरून नृत्य करीत आहेत असा भास होइ. तरुण स्त्रियाचे प्रशस्त डान्सिंग रिंगवरच व बर्फावरील नृत्य पाहून असे वाटले की या भूलोकातील स्त्रिया नसून परा असलेल्या स्वर्गीय पऱ्याच नाचत बागडत आहेत. ह्या सर्व गोष्टींच वर्णन करणे शक्य नाही. बर्लिनमधे अनेक प्रचड राजवाडे आहेत त्यापैकी दोन राजवाडे पाहणें शक्य झाल. या राजवाड्याच्या मानाने आमच्या देशातील राजवाडे अगदी साधारण वाटतात.

बर्लिनहून 'हॅले' शहरीं गर्लो व तीन दिवस मुक्काम केला. तेथे फ्रीस्टाइल कुस्त्या पाहिल्या. या देशात कुस्त्या खेळण्याची पद्धत निराळी आहे. आपल्याकडे चारी मुड्या चीत करण्याची पद्धत आहे, तर युरोपात दोन पहिल्वानापैकी कोण जास्त बाउट (डाव) मारतो, यावर कुस्ती जिंकणें अगर हरणें अवलबून आहे.

जर्मनांतून इटलीस प्रवास करताना, आगगाडी स्वित्झर्लंड देशातील आल्प्स पर्वताच्या रागामधून व काही रागावरून इटलीकडे जाते. ज्या वेळीं माझी गाडी आल्प्स पर्वताच्या दऱ्याखोऱ्यांतून जात होती, त्या वेळीं ऑटम (हिवाळा) सपत आला होता. आल्प्स पवताच्या दऱ्याखोऱ्यात नाना प्रकारचीं झाडेंझुडपें आहेत. त्यातील बहुतेक डेसिड्युअस (दरवर्षी हिवाळ्यात पानें गळतात अशा) जातींचीं आहेत हिवाळा सुरू होण्याचे दिवस आल्यापासून पानाचा रग भर हिवाळ्यात पानें गळून पडेपर्यंत बदलत जातो हे रग निरनिराळ्या झाडाच्या पानाच्या निरनिराळ्या छटाचे असल्याने आल्प्स पर्वताचीं दरींखोरीं फारच शोभायमान दिसतात. ही वनश्रीची शोभा पाहून मी काही वेळ स्वत स विसरून गेलो होतों, व मला वाटलें होतें

की, या एका दृश्यानेच केवळ माझा प्रवासरचा भग्न झाला. आल्प्सच्या प्रवासानंतर आल्प्समधून खाली दक्षिणेकडे जाताना ज्या शूर व बुद्धिमान रोमन लोकांनी सुमारे दोन हजार वर्षांपूर्वी इंग्लंड, फ्रान्स, स्पेन, जर्मनी व दक्षिणेस इजिप्त, अरबस्थान, इस्राएलवर साम्राज्य स्थापिले, मोठाले प्रासाद व खेळाचीं मैदानें बांधली, त्यांच्या इतिहासाच्या आठवणी होऊन रोम शहर पाहण्याची उत्सुकता वाढली.

हिंदुस्थानातील दिल्ली (हस्तिनापूर), तशी युरोपखंडातील ही रोम नगरी तीन हजार वर्षांपासून जगप्रसिद्ध आहे. तेथल्या जुन्या रोमन सम्राटांची अशी महत्त्वाकांक्षा असे की, 'रोम' ही सर्व जगाची राजधानी व आपण जगाचे सम्राट्. या त्यांच्या महत्त्वाकांक्षेनुसार रोम शहर त्यांनी भव्य व सुंदर बनविलें. जवळच ख्रिस्ती लोकांचे धर्मगुरु पोप यांचा मोठा राजवाडा-व्हॅटिकन-आहे. पोप आपल्या राजवाड्यातून सर्व जगाला शांतीचा व सहकार्याचा संदेश देत असतात. असे सांगतात की पोपच्या राजवाड्यात अकरा हजार खोल्या आहेत. सेंट पीटर्स चर्च (प्रार्थनामंदिर) सर्व जगात मोठें मंदिर असून त्याची उंची ४४८ फूट व कॅथीड्रलची लांबी ६१३ फूट आहे. सभामंडप भव्य व पुतळे फार सुबक आहेत.

मला रोम शहर पाहण्यास चारच दिवस मिळाले, पण तेवढ्यातसुद्धा बरेंच पाहता आलें. 'पॅलेझो-फारनेस' राजवाडा, क्लोसियम ॲम्फिथिएटर (अर्धचंद्राकृति रंगशाळा, ज्यात एक लाख प्रेक्षकांचा समावेश होई), पँथिऑन व रोमन फोरम आणि व्याघ्र व सिंहासारख्या हिंस्र क्रूर पशूंसमोर प्राचीन तगडे बरखारबहादूर रोमन यांचा सामना करण्यासाठी रोमन राजांनी बांधलेले बळकट व प्रेक्षकास सुरक्षित आखाडे (यांचे काही भाग अजूनहि उभे आहेत) पाहून अचंबा वाटला

रोमच्या मुक्कामात नेपल्स व पॉंपे हीं शहरें पाहिलीं. हीं शहरेंहि रोमन लोकांच्या वैभवाची साक्ष देत आहेत. रोमन सरदारांनी व इतरेजनांनी राज्य बुडण्यापूर्वी कसे दिवस घालविले, हेंहि दग्ध झालेल्या पॉंपेच्या उत्खननातील अवशेषांवरून दिसून येतें. कोणतेंहि राष्ट्र भरभराटीस येताना त्यातील लोकांची नीतिमत्ता, बुद्धि व पराक्रम यांची वाढ होते, पण राज्य विलयास जाताना चैन, शौक, नाद व व्यसनें यांचा बुजबुजाट होऊनच नीतिमत्ता नाहीशी होते व मग सर्वस्वाचा ऱ्हास होतो. रोमन लोकांनी जगाचे डोळे दिपविणारीं अचाट कामें केलीं, सर्व युरोप जिंकला, अलौकिक कर्तबगारी करून अखंड दुनियेचें लक्ष वेधून घेतलें. पण पाहा! शेवटीं या विलासी राजांत, त्यांच्या सरदार लोकांत व तेथील प्रजाजनांतहि चैनीचा अतिरेक झाला. नाना तऱ्हेच्या विलासोपभोगांनी त्यांच्या डोळ्यावर धुंदी चढली, माणुसकी रसातळाला गेली, व्यसनांनी घेरून ते किंकर्तव्यमूढ बनले आणि अखेर ह्या वैभवशाली व पराक्रमी राष्ट्राचा नाश होऊन तें लोप पावलें. चोहोकडे हेच दिसून येत. मोंगल राज्य कोसळलें असेंच झालें. पेशव्यांनीहि पण हेंच केलें. पण रोमन लोकांच्या हातून अतिरेक झाला. बरोबरच आहे! पेशव्यांमध्ये व रोमच्या बादशहांमध्ये अंतरहि

तर्सच फार मोठं आहे. त्या मानाने रोमन लोकानी चैनहि फार केली. मराठ्याच्या इतिहासात व त्याच्या जुन्या किल्ल्यात व राजवाडयात इतकी हद्दीपलीकडे गेलेली विलासी चित्र व उत्तान शृंगारिक पुतळे नाहीत. 'नेपल्स' व 'पॉपे' येथे हीं जुनीं रगीत चित्र व पुतळे उत्खनन करुन, नीट जपून ठेवले आहेत. मला ते पाहावयाची सधि मिळाली. एक गोष्ट मात्र खरी की, या चित्रातून व पुतळ्यातून चित्रकार व शिल्पी याचे अप्रतिम कौशल्य व श्रेष्ठ कारागिरी डोळ्यात भरल्याशिवाय राहत नाही. प्राचीन 'पॉपे' व्हेसुव्हिअस ज्वालामुखी पर्वताच्या पायथ्याशीं वसलेले मोठें वैभवशाली शहर होतें. व्हेसुव्हिअसच्या मुखातून नेहमी धुराचे लोट वर येत असतात, आणि दर पाचसहा वर्षांनी त्यातून पातळ लाल लोखडाच्या रसाप्रमाणे खडकाचे रसहि उसळून बाहेर पडत असतात. या ज्वालामुखींतून सन ७९ साली एक भयकर स्फोट होऊन त्यातून लाव्हा (पातळ कढत धातूचे रस), दगडाचे तुकडे व उष्ण राख जोराने बाहेर पडून आसमतात् दहापधरा मैलाच्या परिसरात जोराने पसरली. त्या वेळीं त्या लाव्हा रसात हे सुदर शहर सगळेच्या सगळे गडप झाले व त्यावर राखेच्या ढिगाचे आवरण पडून त्याचा मागमूसहि नाहीसा झाला होता. काही वर्षांपूर्वी सशोधक शास्त्रज्ञानी महत्प्रयासाने 'पॉपेच' उत्खनन केलें आणि मोठ्या कुशलतेने त्यातील रस्ते, घरें, दुकानें, मदिरें व त्यातील सामानसुमान, पुतळे आणि घरातील चादीसोन्याचीं व इतर धातूचीं भाडी काढून जशींच्या तशींच व्यवस्थित ठेविलीं आहेत. त्यात वैद्यकीय शस्त्रक्रियेची उपकरणे, हत्यारें व इतर संसारोपयोगी वस्तूहि सापडल्या स्थितीत जशाच्या तशाच सुरक्षित ठेविल्या आहेत. त्यात धान्य, पाव, माणसातील अग्नीभूत हाडें सापडलीं; तींहि सुरक्षित राखून ठेविलीं आहेत. अशा तऱ्हेने या ज्वालामुखीने गाडलेलें पॉपे शहर व त्याचे राखून ठेवलेले अवशेष मला पाहावयास मिळाले. उत्खननात सापडलेल्या पुतळ्यात व रगीत चित्रात आसनीय सभोगाचेच नव्हे तर त्यानी जनावराशीं केलेल्या संभोगाचेसुद्धा चित्रण केले आहे. जेवणाखाण्याच तसच होते असे दिसतें. मसालेदार अन्न खूप खावयाचे व पोटात मावेनासे झाल्यावर तें ओकून टाकावयाचे व परत दुसरें अन्न खात बसायचे. याकरीता जशा तांडधुण्याच्या व स्नानाच्या खोल्या असतात, तशा ओकण्याच्या खोल्याहि उत्खननात मोकळ्या केलेल्या दिसतात. त्यावरून त्या शहराच्या वैभवाची व त्या वेळेच्या लोकानी केलेल्या सुधारणेची व चैनीच्या अतिरेकाची कल्पना प्रत्यक्ष दर्शनाने झाली.

हा उच भयकर ज्वालामुखी सुप्तावस्थेत असतानासुद्धा प्रवाशाना मोठ्या कष्टाने वर चढल्याशिवाय दिसत नाही. मी प्रथमत. घोडागाडीतून, मग रेल्वेचरावरून प्रवास केला. वाटेत एका टेकडीच्या बाजूस असलेल्या नागन द्राक्षाचा रस प्यालो. नतर माझ्या कमरेला बाधलेल्या दोराने मला एक जण पुढे ओढी व दुसरा मागून पुढे ढकली. अशा रीतीने मी एकदाचा त्या ज्वालामुखीच्या अजस्र भयानक

तोंडाजवळ गेलों. मी ज्गल शिकारी असलों तरी मलासुद्धा माणसानी ओढावें-ढकलावें लागलें. पायाव धूट असूनहि तळव्यास चटके बसत होते. इतके खाडे झाल्यावर या ज्वालामुखींचे दर्शन झालें. हा ज्वालामुखी आजवर सतत जिवत आहे म्हणून वर लिहिलेंच आहे. याप्रमाणे या 'व्हेसुव्हिअस' पर्वताच्या म्हणजे ज्वालामुखीच्या शिखरावर तोंडाजवळ आम्ही एकदाचे गेलों आणि त्याच्या प्रचड, विशाळ व तप्त तोंड्यातून सावधानपूर्वक डोकावून पाहिले तो, आत दूर खोलवर धूर मात्र दिसला. मला दोन माणसांनी मागे ओढून धरले तेव्हा मला व्हेसुव्हिअसच्या काठावर छाती ठेवून त्याच्या जबड्यांत डोकावता आलें.

तारीख ६ ऑक्टोबर रोजीं सकाळीं मी नेपल्सहून रेल्वेने निघालों व सध्याकाळीं इटलीच्या दक्षिण टोकास असलेल्या ब्रिंडीसी बदरास पोचलों. त्याच रात्रीं ब्रिंडीसी सोडून कैरोस (इजिप्त) निघालो. ब्रिंडीसीहून फार वेगाने जाणाऱ्या लॉचने (वाफेवर चालणाऱ्या नौकेने) निघालों होतो. समुद्र खवळला होता व तीरासारखी धावणारी लॉंच इतकी हलत होती की, जेवणाच्या टेबलावरील प्लेटी (ताटे) तारानी बाधून ठेवाव्या लागल्या होत्या.

वाटेत पोर्टसय्यद पाहिले व तारीख ९ रोजीं तेथून निघालों व कैरोस पोचलों. तारीख १० ऑक्टोबर रोजीं खग्रास सूर्यग्रहण होत. कैरोस आठवडाभर होतों. तेथे असताना स्थानिक शेतकी इन्स्पेक्टरबरोबर वेन्हा येथे तिकडील शेतकीची पद्धत व पिकें पाहिलीं. दुसरे दिवशीं नाइल नदीवरचा मोठा बधारा व जवळपासची कपाशीची व मक्याची शेती पाहिली.

कैरोस असताना, 'गीझा' येथील पिरॅमिड पाहिल. असे म्हणतात की पाच हजार वर्षांपूर्वी मेलेल्या, एका फार प्रख्यात राजाने आपल्या मरणापूर्वी चाळीस वर्षे स्वतःच्या प्रेताची पेटी ठेवण्यासाठी प्रचड मनोरा बाधला. त्या कामाचे दगड चढविण्यासाठी रस्ता करण्यास अकरा वर्षे, पिरॅमिडची तळघरे व भुयारें बाधण्यास दहा वर्षे व पिरॅमिड बाधण्यास वीस वर्षे लागलीं. इतकीं वर्षे हजारों माणसे या कामासाठी खपत होतीं. शेतकामाच्या वेळीं मात्र त्याना सुटी असे.

हा पिरॅमिड म्हणजे एक मानवनिर्मित चिरेबदी डोंगर आहे. ज्या चबुतऱ्यावर तो बाधिला आहे त्याची लाबी ७५० फूट व रुंदी ७५० फूट आहे; म्हणजे त्याचे क्षेत्र तेरा एकर भरतें. पिरॅमिड खालून वर निमुळता होत जाऊन ४८१ फूट उचीवर त्याचे कोपरे जुळून एक टोक बनतें. कल्पना येण्यासाठी असे म्हटले तरी चालेल की, त्याची तळापासून उची चाळीस मजली इमारतीइतकी भरेल. पिरॅमिडच्या तळाशीं फक्त एक हॉल (दालन) चौतीस फूट लाब, सतरा फूट रुंद व एकोणीस फूट उचीचा आहे. बाकी सर्व मनोरा भरीव आहे. हॉलमध्ये जाण्यास कोठेहि प्रवेशद्वार नाही. खालून वर बाधकाम चढत असताना या दालनातून उचवर तिरपा जिना ठेवला होता. हा जिना, शवपेटिका व इतर जिनसा खाली नेण्यास व कामाच्या माणसाना

गालवर जाण्यायेण्यास उपयोगी असावा. दालनात शवपेटिका व इतर सामान ठेवल्यावर जिना सालून वर चिरेबंदी दगडानी भरून काढला होता.

पेटिंत शव ठेवण्यापूर्वी त्यातील घाण काढून त्यात औषधी मसाला व सुगंधी द्रव्ये भरून, त्यास टिकाऊ द्रव्यें फासून व टिकाऊ कापडात गुंडाळून पेटींत ठेवीत. ही सर्व तयारी शव कुजू नये म्हणून करावी लाग. अशा रीतीने हा हॉल म्हणजे एक पर्वतप्राय चिरेबंदी बंद पेटी होई. उद्देश हा की, कोणालाहि हॉलमधे जाता येऊ नये. पिरॅमिड बांधताना पाचसहा चौरस फूट कठिण ग्रॅनाइट दगड एकावर एक चिरून रचीत नेले आहत. या ग्रॅनीट टिकाऊ दगडाच्या मनोऱ्यावर पांढऱ्या संगमरवरी दगडाचें अस्तरवजा बांधकाम केले होत.

काही शतकानी डाकू लोकानी जडजवाहिराच्या लालचीने अचाट धाडसी प्रयत्न करून, बाहेरून हॉलपर्यंत बोगदा बनविला. तो सरळ असणें शक्य नाही. निघतील तसे दगड काढीत गल्याने वाकडेतिकडें खालवर असे तें एक भोक आहे. त्यातून आत जाऊन डाकूनी सर्व जडजवाहिराचा अपहार केला. पुढे काही शतकानी मिसर देशावर अरबाच राज्य आले त्या वेळी खलीफा अल्मामून यानेहि खजिन्याच्या लालचीनें अरब कारागिराकडून डाकूनी पाडलेले भुयार मोठ केलें; पण खलीफास आत काही मिळाल नाही, डाकूनी आधीच किंमती जिनसा लांबविल्या होत्या. नंतर काही काळाने अरब राज्यकर्त्यांनी छतवजा बसविलेलें संगमरवरी अस्तर काढून त्याच्या मशिदा बांधल्या.

मला तर वाटत, मिसर देशातील प्राचीन डाकूनी आताच्या पिढीवर उपकार केले. त्यानी जर डाक्यासाठी भुयार खोदलें नसत, तर पिरॅमिडमधील मोठ दालन, आणि राजाच्या व सरदाराच्या शवपेटिका कोणासहि पाहावयास मिळाल्या नसत्या.

मी ह्या डाकूनी खोदलेल्या भुयारातूनच खालवर उतरत चढत वाकून चालत आत गेलो होतो. हे पिरॅमिड व स्फिंक्स हे अस्वान धरणाच्यापलीकडे असलेल्या अबूसिंबल देवालयाच्या वाटेवर आहत स्फिंक्स (सिंहाकृति पुतळेवजा भव्य लेणें) अबूसिंबल देवालयाची राखण करीत आहेत, असा दाखवण्याचा हा प्रयत्न आहे. हे सिंहाकृति एक मोठ दगडी टेकाड फोडून व काही ठिकाणी दगडी बांधकाम करून बनविले आहे. या आकृतीचे शरीर व पाय सिंहाचे, पायाच्या नख्या सिंहाच्या, पण डोके माणसासारखे दाखविले आहे. स्फिंक्स दुरून पाहिलें तर सिंहासारख बावेगळे दिसत. मला अबूसिंबलची माहिती नव्हती. दुसरें कारण, टांगवाले प्रवाशाची दिशाभूल करतात, त्यामुळे मला जगप्रसिद्ध अबूसिंबल पाहण्याची संधि मिळाली नाही. स्फिंक्स व पिरॅमिड मात्र पाहण्यास मिळाले. पिरॅमिड सुस्थितीत आहेत. पण स्फिंक्सचे तोंड पाऊस, ऊन व वारे यांमुळे रेखीव राहिलेलें नाही.

तारीख १२ रोजी शेतकी खात्याचे डायरेक्टरला भेटलो. दुसऱ्या दिवशी प्राचीन मशिदी आणि 'म्युझियम' पाहिलें. हिंदुस्थानात इजिप्तचा लांब धाग्याचा कापूस

आयात होतो. आमच्या शेती खात्याने इजिप्तमधील कापसाच्या वियाचा बराच प्रसार केला आहे; तथापि त्यास पाणी द्यावें लागत असल्याने, त्याचा जास्त प्रसार होत नाही. सिंध प्रांतात इजिप्शियन कापसाची पैदास बरीच होत असावी; तेथें सिंधु नदीच्या खोऱ्यात जमिनीची व पाण्याची परिस्थिति नाइलच्या खोऱ्याप्रमाणे आहे.

तारीख १५ रोजीं पोर्टसय्यदला श्रीमत खासेसाहेबमहाराज व त्याची पत्नी येणार असल्याचें आगाऊ समजल्यावरून त्याना त्याच्या बोटीवर भेटलों. दोघानाहि हिंदी जेवण पाहिजे होत. आम्ही फिरत फिरत शहरात गलों. त्याच्या ओळखीचे काही व्यापारी होते. त्याच्या दुकानात, गरज नसताना, त्यानी बरीच खरेदी केली. मलाहि त्यातून सुटता आल नाही. शंभरसव्वाशे रुपयाची खरेदी करावी लागली. परत निघताना त्या व्यापाऱ्याने आपल्या घरीं सध्याकाळच्या जेवणास बोलाविलें, खासेसाहेबाना तेंच पाहिजे होतें. सध्याकाळचें जेवण त्या हिंदी व्यापाऱ्याकडे झालें व दुसऱ्या दिवशीं दुपारी एकाच बोटीने आम्ही स्वदेशास निघाला. तारीख २० ऑक्टोबर १९१२ रोजीं एडनला व तारीख २५ रोजीं सकाळीं मुबइला पोचलों.

मुबई पुण्याचे बरेच स्नेही बोटीवर आले होते. बोरीबदर स्टेशनवरील वेटिंग रूममध्ये थाबून ता. २६ रोजीं सकाळीं पुण्यास पोचलों. डायरेक्टर ऑफिसात वर्दी देऊन सध्याकाळीं कोल्हापुरास जाणाऱ्या गाडीत बसून तारीख २७ रोजीं कोल्हापुरास पोचलों. स्टेशनवर बरेच स्नेही आले होते. त्या दिवशीं महाराज तेथे नव्हते. सध्याकाळीं गावीं गलों. देवदर्शन केल. घरीं जाऊन आईच्या चरणावर मस्तक ठेविलें. आईने माझ्या डोक्यावर हात ठेवून आशीर्वाद दिला. पत्नी व मुलें तेथेच होतीं. गावीं मुक्कामाळात चार दिवस आनदात घालविले व तारीख १ नव्हेंबर रोजीं कोल्हापुरास जाऊन, शाहूमहाराजास मुजरा करून, तार्टे झाल्यावर परत गावीं आलों. तारीख ७, ८ व ९ रोजीं दिवाळी होती. दिवाळीचा सण आनदात गला. तारीख १० रोजा वडगावाहून पुण्यास निघालों. माझें सदर स्टेशन पुण्याहून जळगावास बदलल्याची नोटिस मला मुबईसच मिळाली होती; म्हणून मी एकाच पुण्यास व तेथून जळगावास गलों. थोड्या दिवसानी वडिलानी माझ्या पत्नीस व मुलास स्वत जळगावास पोचतें केलें.

# माझी पृथ्वीप्रदक्षिणा



सन १९२०-२१च्या सुमारास ऑफिसकामाच्या दगदगीमुळे व वरचेवर लांबलांब फिरती करावी लागल्यामुळे मला बराच त्रास झाला होता. काही कौटुंबिक आघातामुळे मनहि उदास झालेलें होतें. शिवाय माझे व डॉ० मॅनचे वरच्यावर खटके उडूं लागले होते त्यामुळे मी बराच कंटाळलों होतों. प्रकृतीहि खालावली होती; म्हणून मला विश्रांतीची जरूर होती. शिवाय मला असेंहि वाटत होतें कीं, आपण लांब मुदतीची रजा घेऊन अमेरिकेस जावें, तेथील शेती पाहावी, शेतकी विषयक अर्थशास्त्राचा विशेष अभ्यास करावा. म्हणून मीं अध्ययन-रजा (स्टडी लीव्ह) मागण्याचा विचार केला.

त्याप्रमाणे मीं किटिंगसाहेबाकडे रजेची गोष्ट काढली आणि म्हणालों, "मला विश्रांतीची फार जरूरी आहे. तुम्ही तर लांब मुदतीच्या रजेवर जात आहात; तेव्हा मला रजा कशी मिळावी? शेतकीविषयक अर्थशास्त्राचा अभ्यास करावयाचें माझ्या मनांत फार आहे. तुम्ही रजेवर जाण्यापूर्वी मला अमेरिकेस पाठवूं शकाल काय? तुम्ही डायरेक्टर असताना जर मला रजा मिळाली नाही तर डॉ० मॅनच्या कारकिर्दीत मला लांब मुदतीची रजा मिळणे शक्य नाही. डॉ० मॅनचा स्वभाव असा आहे कीं, जो काम करील त्याच्याच पाठीमागे लागावयाचें. ते उघडउघड म्हणतातच कीं न करणाराच्या माग लागण्यात काय हशील?" थोडा वेळ विचार करून किटिंगसाहेब म्हणाले, "मलाहि तुमच्या प्रकृतीबद्दल काळजी वाटते. तुम्ही अमेरिकेंत शेतकी विषयक अर्थशास्त्राचा अभ्यास करण्याकरिता रजा मागा. मात्र त्यात कोणतीहि अट घालूं नका." त्याप्रमाणे मीं एक वर्षाची रजा मागितली. रजा मंजूर झाली व मी तारीख २ जुलै १९२१ रोजीं अमेरिकेस निघण्याचें ठरविलें.

सध्याच्या मानाने आमच्या वेळीं शेतकी खात्यात अधिकारी फारच थोडे असत. मला वाटतें, पूर्वीच्या मानाने आता लहानमोठ्या अधिकाऱ्यांची संख्या

चमरपट असेल. सन १९२०-२१ पर्यंत शेतकी खात्यातील निरनिराळ्या शाखा फार अलग अलग नव्हत्या, पण मुख्य शाखा शेतकीची असल्याने शेतकऱ्याचा व इतर खात्यातील अधिकाऱ्याचा संबंध डायरेक्टर वा डेप्युटी डायरेक्टर याच्याशी प्रथम येई व तेच शेतकऱ्याची संबधी शाखेतील अधिकाऱ्याशी गाठ घालून देत. शिवाय त्या वेळी एका कुटुंबातील माणसासारखे सर्व शाखाचे काम एका मेळाने चाले. डॉ० मॅन सन १९२० पर्यंत जरी ॲग्रिकल्चरल केमिस्ट व शेतकी कॉलेजचे प्रिन्सिपल असत, तरी आम्ही दुसऱ्या शाखेतील अधिकारी त्याना डायरेक्टरप्रमाणे मानीत असू. डायरेक्टरच्या हुकुमाप्रमाणे त्याचेहि हुकूम मानीत असू. हें डॉ० मॅनच्या बाबतीत तरी ठीक होतें. तेहि आम्हा दुसऱ्या शाखेतील अधिकाऱ्यास मार्गदर्शन करीत व आमच्या संशोधनकार्यात मदत करीत. बरेच वेळा आमचे लिखाण ते स्वतः दुरुस्त करून टाइपहि करून देत. अशा स्थितीत त्यानी सांगितलेली कामे आमच्यापैकी बरेच जण खुषीने करीत असू.

मी अमेरिकेस निघण्यापूर्वी जळगावास माझ्या हाताखालच्या अधिकाऱ्यानी व तेथील मराठा बोर्डिंगने सभा भरवून मला निरोप दिला. त्याचप्रमाणे पूर्वखानदेश जिल्हा ॲग्रिकल्चरल असोशिएशन, जळगाव, यानीहि मानपत्र दिलें. बारामतीला स्थानिक पुढारी व माझे मित्र यानी सभा भरवून निरोप दिला. पुण्यास रा० ब० काळभोर यानी मोठाच समारंभ घडवून आणला. त्या समारंभाला मुंबई सरकारचे शेतकी मंत्री सर चुनिलाल मेथा, रँग्लर परांजपे, नामदार कामत व लेजिस्लेटिव्ह कौन्सिलचे बरेचसे सभासद हजर होते. मुंबईस मराठा पुढाऱ्यानी मोठी सभा भरवून मला निरोप दिला.

मुंबईहून आमची बोट तारीख २ माहे जुलै सन १९२१ रोजीं दुपारीं दीड वाजता सुटली. माझी केबिन सेकंडक्लासमध्ये होती. पावसाळ्याचे दिवस असल्यामुळे अरबी समुद्र बराच क्षुब्ध झाला होता. बोट तारीख ८ रोजीं एडनला, तारीख १२ रोजीं सुएझला व तारीख १३ रोजीं पोर्टसय्यदला पोचली. पोर्टसय्यद येथे तासभर हिंडून तें शहर पाहिलें. पुढे मार्सेलिसला बोट तारीख १८ रोजीं पोचली. नंतर कॅले बंदरापर्यंत गाडीने व इंग्लिश खाडीतून बोटीने दोन तासाचा प्रवास करून डोव्हर-पर्यंत व पुढे आगगाडीने लंडनला तारीख १९ रोजीं सायंकाळीं चार वाजता पोचलों. तेथे नॉर्थब्रुक सोसायटी (२१ क्रॉम्वेल रोड) मध्ये उतरलो. त्या ठिकाणीं समजलें कीं, बडोद्याचे राजपौत्र प्रतापसिंह व त्याचे गार्डियन खासेराव भगवतराव जाधव हे समुद्र-किनाऱ्यावरील ईस्टबोर्न शहरीं राहत आहेत. तेव्हा मी तेथे त्याना भेटावयास गेलो. ईस्टबोर्न ह हवा खाण्याचे एक सुंदर ठिकाण आहे. हें शहर मोठे असून तेथ मुलींच्या दोनशे शाळा होत्या व मुलांच्या शाळा त्याहिपेक्षा जास्त असाव्यात. तेथील हवापाणी चांगलें असल्यामुळे सधन लोक आपल्या मुलामुलींना शिक्षणासाठी तेथे ठेवतात. मुलें व मुली निरनिराळ्या वसतिगृहात राहत. वसतिगृहात हर प्रकारच्या आधुनिक सोयी होत्या. शहरात मोटारगाड्यांची गर्दी असे. बंदरात शेकडो बोटी

दिसत व किनाऱ्यावरहि शेकडों खुर्च्या व बाकें लोकांना बसण्यासाठी ठेवलेलीं असत. समुद्रस्नानासाठी कितीतरी स्नानगृहें होतीं.

विशेष सांगण्यासारखी गोष्ट अशी की, तेथील विद्यार्थी मुलीमुले आळसावलेलीं दिसलीं नाहीत. तीं खेळत पळत व नाचत बागडत असलेलीं व सतेज आणि सुदृढ दिसत. त्यांचे चेहरे ताज्या गुलाबाच्या फुलाप्रमाणे टवटवीत दिसत. त्यांचे कपडे स्वच्छ व नीटनेटके व बूटसुद्धा चकचकीत पॉलिश केलेले असत. कपडे धुवून त्यांस इस्त्री करणें व बुटांना पॉलिश करणें हीं कामें विद्यार्थी स्वत:च करीत असत. तारीख २४ ला सकाळीं ईस्टबोर्नेहून मी लंडनला परत गेलों. तेथे तीन दिवस राहून किटिंगसाहेबांना भेटावयास त्यांच्या गावीं टेफ्ट (सॅलिसबरी) येथे गेलों आणि तेथे दोन दिवस राहिलों. किटिंगसाहेब माझ्याबरोबर लंडनला आले व मला घेऊन इंडिया ऑफिसमध्ये सेक्रेटरी ऑफ स्टेट यांना भेटले. त्यांच्या मध्यस्थीने माझ्या प्रवास खर्चाच्या बाबतींत मला चांगल्या सवलती मिळाल्या. मी इंग्लंडमध्ये असतांना रोजचा भत्ता रुपये दहा व अमेरिकेत असतांना रुपये चोवीस मिळावा असें ठरलें आणि आगगाडीने व आगबोटीने फर्स्टक्लासने प्रवास करण्याची सवलत मिळाली.

लंडनहून मी तारीख १ ऑगस्ट १९२१ रोजीं एडिंबरोला गेलों. तेथील विश्व विद्यालय व शेतकी कॉलेजातील निरनिराळ्या शाखा पाहिल्या आणि आसपासची शेती पाहून परत लंडनला गेलों. नंतर इप्स्विच येथे जाऊन 'रॅनसम्, सिम्स अँड जेफरीज' यांचा शेतकीचीं आउत व अवजारें तयार करण्याचा मोठा लोखंडी कारखाना पाहिला. मॅनेजरने स्वत: हिंडून कारखान्यांत चाललेलें काम दाखविलें. नंतर लंडनला परत येऊन तेथून अमेरिकेस जाण्यासाठी लिव्हरपूल बंदरावर जाण्यास निघालों. त्या बंदरास तारीख १२ रोजीं दुपारी दोन वाजतां पोचलों. मी ज्या बोटीने अमेरिकेस गेलों त्या बोटीचें नाव 'बॉल्टिक' असें होतें. या बोटींतून मी तारीख १३ ऑगस्ट १९२१ रोजीं सायंकाळीं लिव्हरपूल बंदर सोडलें. अमेरिकेस जाणाऱ्या बोटी त्यावेळीसुद्धा फार मोठ्या होत्या. त्यामुळे समुद्रप्रवास सुखाचा झाला. या 'बॉल्टिक' बोटीवर क्रिकेटसुद्धा खेळतां येई. बोटीवर कधीकधीं कॅनव्हसचे स्नानाचे व पोहण्याचे मोठे हौद बनवीत. अमेरिकेचें बंदर, न्यूयॉर्क, जसजसें जवळ येतें तसतसा लॉंग-आयलंड बेटावरचा स्वातंत्र्यदेवतेचा भव्य व प्रचंड पुतळा दृष्टिपथांत येऊं लागतो. न्यूयॉर्क बंदराजवळील लॉंग आयलंड बेटावर दिसणारा हा पुतळा सन १८८४ सालीं फ्रान्स देशानें, स्वातंत्र्य व सद्भाव यांचें स्मृतिचिन्ह म्हणून, देणगीदाखल अमेरिकेस दिला. हा पुतळा एखाद्या स्वाभिमानी राष्ट्रासारखा डौलदार दिसतो. या पुतळ्याच्या उचावलेल्या उजव्या हातांत असलेल्या हवेमध्ये दिसणारा प्रखर प्रकाशाचा विद्युद्दीप लावून बंदरांत येणाऱ्या जहाजांस एखाद्या दीपस्तंभाप्रमाणे वागतो.

या पुतळ्याला त्या वेळीं चार लाख पन्नास हजार डॉलर्स खर्च आला होता असें म्हणतात. ज्या चबुतऱ्यावर हा पुतळा उभा केला आहे त्या चबुतऱ्याची उंची

दीडशे फूट असून पुतळ्याची उंची एकशे एकावन फूट आहे व चबुतऱ्याच्या पायथ्या पासून दिव्यापर्यंतची उंची तीनशे पाच फूट आहे. पुतळ्याचें वजन चारशेपन्नास हजार पौंड आहे. जमिनीवरून चबुतऱ्यावर जाण्याला विजेचा पाळणा आहे. तेथून पुतळ्याच्या डोक्यापर्यंत जाण्यास आतून जिना आहे. तसेंच उचावलेल्या हातातून वर बत्तीपर्यंत जाण्यालाहि जिना आहे. बत्तीच्या आतील वाटोळ्या घरात बारा माणसें उभीं राहू शकतात. डोक्याच्या आतील घेरात पन्नास माणसें राहू शकतात. तोंडाची रुंदी दहा फूट आहे. बत्ती धरलेल्या बोटाची लांबी आठ फूट आहे डोळ्याच्या भोवऱ्यातून दोन पापण्यांच्या मधून माणसाला डोकावून बाहेर पाहता येत. असा हा अजस्र पुतळा पाहून आश्चर्य वाटत !

मी तारीख २२ ऑगस्टला न्यूयॉर्कला पोचलो. हा समुद्रप्रवास मला चांगला मानवला. न्यूयॉर्क शहर फार मोठ असून, त्यातील इमारतीहि फार भव्य, गगनचुंबी दिसल्या. एक इमारत तर सत्तावन मजल्याची होती. तेथ जमिनीखालून, जमिनीवरून व अंतरावरी उंच व मजम लोखंडी माडवावरून, अशा तीन मार्गांनी आगगाड्या धावताना दिसल्या. शिवाय मुंबईप्रमाणे बसेस तर होत्याच. तेथील मुक्कामात न्यूयॉर्क शहर पाहिलं. नतर वॉशिंग्टन, इथॅका, डिट्रॉइट, मॅडिसन, वगैरे शहरें पाहिलीं.

डिट्रॉइट येथे फोर्ड कपनीचा मोटारी बनविण्याचा फार मोठा कारखाना आहे, तोहि पाहून घेतला. या कारखान्यात हजारों कारागीर काम करीत; त्यात कोल्हापूरचेहि चार तरुण होते. कारखान्यातील कारागीर लोकास रोज सात डॉलर (सुमारें २८ रुपये) मजुरी मिळे; पण त्याना काम मात्र चेपून करावें लागे. फोर्ड कपनीच्या मालकीची एक लोखंडाची खाण व लोखंड तयार करण्याचा एक कारखानाहि होता. मोटारीचे निरनिराळे भाग जोडण्याची तऱ्हा अजब दिसली. हजारों कारागिराच्या पुढ्यातून एकात एक तोंड गुतविलेल्या सासळीचा पाळणा सरकत जाई. कारागिराजवळ कायम केलेले लाबच्या लाब टेबल असे, व त्यावर सुटे भाग व लहान हत्यारें असत. प्रत्येक कारागिराने ठराविक अतरात आपल्या वाट्याचा भाग जोडावयाचा असतो. तेवढ्या वेळात तो न जोडला गेला तर जोडण्यास घेतलेली मोटार पुढे जाते. असले दोष पाहून टिपण्यासाठी ठराविक अतरावर हुशार फोरमन असतो. या योजनेमुळे ठराविक वेळेंत काम सपविणें कारागिरास भाग पडतें.

मीं तेथे असें ऐकलें की जॉन फोर्ड एक साधी फोर्डमोटर वापरी. फिरावयास गेल्यावेळीं जर त्याला एखादी फोर्ड मोटार खोळंबलेली दिसली तर तो लागलीच खाली उतरून जी अडचण असेल ती दूर करून देई. दुसरें असें की फोर्डने स्वखर्चाने एक वर्कशॉप व शिल्पशाळा चालविली होती. या सस्थात शिक्षण फुकट देण्यात येई. मला दिलेल्या वाटाड्याने ती शाळा मला दाखविली. मी त्याला म्हणालों, "हें मोठ परोपकाराचें काम दिसतें." वाटाड्या म्हणाला, "यांत परोपकार नसतो. आम्ही आमच्या सोयीसाठी व फायद्यासाठी ही शाळा फुकट

चालविता. कारण या शाळेत कसबी कारागीर तयार झाले म्हणजे ते आमच्याच कारखान्यात कामावर येतात व आमचे काम सुकर होते." मीं विचारलें, "तुम्ही विद्यार्थ्यांकडून करारपत्र घेता काय?" तो म्हणाला, "नाही." "मग तो तुमचें काम सोडून दुसऱ्या कारखान्यात गेला तर?" "गेला तर गेला. पण आमची मजुरी जास्त असते व आमच्याकडे कारागिरांना सवलती व सोई फार असतात, म्हणून सहसा ते दुसरीकडे जात नाहीत."

या कारखान्यात त्या वेळीं एक हिंदी केमिस्ट (रसायनशास्त्रज्ञ) असे. तो फार हुशार होता हें पाहून कंपनीने त्यास मोठ्या पगाराची जागा दिली होती. त्याला पूर्ण स्वातंत्र्य असे. आठपधरा दिवस कोठे गेला, अगर चारआठ दिवस घरीं राहिला तर त्यास कोणीं विचारू नये, अशी फोर्डची ताकीद असे. फोर्ड त्यास म्हणे, "वक्तशीर पगार घे. वाटलें तर काम कर. पण दुसरीकडे जाऊ नको." याच्या उलट त्या कारखान्यात आमच्याकडचा एक गरजू कामगार कामावर होता. त्याने आर्जवून माझ्याकडून काही रकम उसनी घेतली. त्याची माझी पूर्वीची ओळख नव्हती. पण नडलेला देशबांधव कॉलेजमध्ये होता म्हणून मीं त्याची गरज भागविली. त्याने घेतलेली रकम परत केली नाहीच, पण मला भेटण्याचेहि टाळलं. त्याला पुढे मीं एका सरयत नोकरी लावून दिली; पण मूळ स्वभाव जाईना असेंच माझ्या अनुभवास आलें. तेथ तो टिकला नाही.

डिट्रॉइट येथे असताना एक आइस्क्रीम करण्याचा कारखाना पाहिला. त्यात रोज साडेतीन लाख पौंड दुधाचं आइस्क्रीम व लोणी करीत. या कारखान्यात दीड हजार माणसें कामावर होतीं. दूध बहुतेक बाहेरून विकत घेत. त्या वेळीं कारखान्यात दुधाची किंमत दर दहा पौंडास एक रुपया अशी होती. खास दुधासाठी त्यांनी पाचशे गाई ठेवल्या होत्या आणि त्या गाईंच्या चाऱ्यावैरणीसाठी दीड हजार एकराची शेती होती. आइस्क्रीम तयार झाल्यावर प्रथम तें शीतकोठारात साठवीत असत. यानतर एक धोबी-कारखाना पाहिला. त्या कारखान्यात सुमारे दीडशे बाया काम करीत होत्या. या कारखान्यातील सर्व कामें—कपडे धुणें, पिळणें, इस्त्री करणें व घड्या घालणें—यंत्राच्या साहाय्याने झटपट केलीं जात. डिट्रॉइटहून मॅडिसनला जाताना लॉरेन्स नदीवरचा जगप्रसिद्ध अजस्र नायगारा धबधबा पाहिला. लॉरेन्स नदींतून लहानलहान बोटी चालतात एवढी ती मोठी आहे धबधब्याच्या वरच्या बाजूस जवळच एक मोठा खडक असल्याने नदीचा प्रवाह दुभगून शेजारीं शेजारीं दोन धबधबे बनले आहेत. वरच्या काठावरून खाली खोल दरींत अमाप पाणी उडी घेताना पाहून निसर्गापुढे मान वाकते. आपल्याकडचा कारवार जिल्ह्यातील गिरसप्पाचा धबधबा मीं पाहिला आहे. तोसुद्धा काही कमी नाही. त्याचे पाणी फारच उंचावरून खोल दरींत पडत. पण नायगाऱ्याच्या अफाट फसाळलेला शुभ्र पाणी लांबच्या लांब कड्यावरून खाली पडते. याचा गंभीर आवाज दूर अंतरावरून ऐकू येतो.

मी तारीख २२ ऑगस्ट रोजी परत न्यूयॉर्कला पोचलों. तेथील कॉलेजें सुट्टीमुळे बंद होतीं व प्राध्यापकमंडळी आपापल्या गावीं विश्रांति घेण्यास गेली होती. विद्यार्थीहि बहुतेक आपल्या गावीं अगर कोठे तरी हंगामी मजुरी करण्यासाठी गेलेले होते. अमेरिकेंत शेतीचें क्षेत्र अफाट आणि त्या मानाने शेतीवर काम करणारे शेतकरी व मजूर फार कमी. जरी यंत्राने काम करण्याची घडी तिकडे बसली होती तरी माणसाची वाण फार भासे. *म्हणून अमेरिकेंतील विचारवंतांनी शेतीधंद्याच्या सोयीसाठी जून ते* सप्टेंबर चार महिने शेतांतील कापणीमोडणीच्या मोसमात दुय्यम व उच्च शिक्षणसंस्था (शाळा व कॉलेजें) यांना सुट्टी देण्याचें ठरवून टाकलें आहे. या उन्हाळ्याच्या सुट्टींत प्रौढ विद्यार्थी (बहुतेक सर्व पुरुष विद्यार्थी व सुमारे निम्म्या विद्यार्थिनी) आपल्या घरीं किंवा शिक्षणसंस्थेंत न राहतां लांब परप्रांतीं दुसऱ्याच्या शेतावर गवत, गहू व ओट यांची कापणी, फळेंतोडणी व वेचणी करण्यासाठी जातात. तेथे त्यांना *पगाराशिवाय चमचमीत जेवण व भुरक फळें खाण्यास मिळतात. त्यांचें जेवण* शेतकऱ्याच्या कुटुंबियांबरोबर एकाच टेबलावर होतें. त्यांचे कपडेहि ज्या शेतकऱ्याच्या शेतावर ते काम करतात त्याच्या बायका मुली धुवून इस्त्री करून देतात. उर्वरित कपडे मार्दी धुणें व पुसणें वगैरे काम यंत्राच्या साहाय्याने घरमालकीणच करते.

कॉलेजांतील विद्यार्थी दुसऱ्याच्या शेतावर शेतकाम कशीं करतात, कसे राहतात हें मला परत एकदा पाहावयाचें होतें, म्हणून मीं माझ्या एका तरुण वर्गबंधूस विचारलें की, *"तुम्ही हें दाखवूं शकाल काय?"* त्याने सांगितलें, *"जरूर दाखवीन.* पाहिजे तर सुट्टींत चार दिवस माझ्याच घरीं चला. त्या वेळीं तेथे माझ्या वडिलांच्या शेतीवर काही विद्यार्थी कामावर असतीलच." मीं म्हटलें, "शक्य तर तुमच्या वडिलांस आगाऊ न कळवितां जाऊन काय परिस्थिति असते तें पाहावें, असें मला वाटतें. मी येणार म्हणून जर तुम्हीं आगाऊ कळविलें तर त्यांच्या रोजच्या कार्यक्रमांत बदल होईल." तो म्हणाला, "तसें काही नाही. आम्हा लोकांना फरक करावेसे *वाटतच नाहीत, उलट तुम्हाला वाटेल की, पाहा मी लगेच आलों आणि हे लोक* आपल्या धादलींत आहेत."

माझ्या सांगण्यावरून माझ्या स्नेह्याने आपल्या वडिलांस लिहिलें की आपले एक हिंदी स्नेही एक-दोन दिवस आपल्याकडे शेती पाहण्यास व राहण्यास येऊ इच्छितात. ते मुद्दाम आगाऊ वेळ न ठरवितां येतील. मात्र निघतांना तार देतील. तरी त्यांच्या इच्छेप्रमाणे आपली शेती व राहणी त्यांना दाखवा.

ठरल्याप्रमाणे आदल्या दिवशीं तार करून मी त्या शेतकऱ्याच्या गावीं गेलों त्या दिवशीं त्यांच्या गव्हाची कापणी चालू होती. त्यांच्या शेतावर सहासात कॉलेज विद्यार्थी फार्महॅंड्स (कामकरी) म्हणून आले होते. साहजिकच तो शेतकरी व त्याची बायको कामाच्या गर्दीत होती. म्हणून त्याने आपली बहीण जी शेजारीं राहत असे तिला मला घरीं आणण्यासाठी स्टेशनवर पाठविलें होतें. ती आपली

मोटार घेऊन स्वत:च चालवीत स्टेशनवर आली होती. मला आपल्या भावाच्या घरीं पोचवून ती परत घरीं गेली. या शेतकऱ्याची बायको बी० ए० होती. ती म्हणाली, "शेतावर बरींच माणसें कामास आहेत. गव्हाची कापणी चालू आहे म्हणून मला वा माझ्या नवऱ्याला स्टेशनवर येता आलें नाही." असें म्हणून तिने माझ्याकरिता ठेवलेली गोळी मला दाखविली. नतर मला न्याहारी दिली आणि सांगितलें की नवऱ्याने मला शेतावर बोलाविलें आहे. तिने हाताने नवऱ्याचें काम चाललेली बाजू मला दाखविली. मी त्याप्रमाणे जेथे सेल्फबाइंडरचें (चार घोड्यानें चालविण्याचें यत्र, ज्याच्यायोगे गहू कापला जाऊन त्याच्या पेंढ्या बांधल्या जातात व त्या व्यवस्थित उभ्या केल्या जातात, त्याचें) काम चाललेले होतें तिकडे गेलों.

पुढची हकीकत सांगण्यापूर्वी या शेतकऱ्यासंबंधी थोडी माहिती देणें बरें. वास्तविक हा गृहस्थ बी० ए० असून तो काही वर्षांमागे पाद्री (धर्मोपदेशक) होता. आणि त्याच काम व आयुष्यहि चागलें चाललेलें होतें. पण एका आजारात त्याला ऐकू येईनासे झाले व पाद्र्याचें काम करण्यास त्यास अडचण पडू लागली, म्हणून त्याने ते काम सोडून शेती विकत घेतली व यशस्वी शेतकरी बनला. मी त्याच्या औता(यत्रा)जवळ जाताच त्याने गुडमॉर्निंग केलें व तो म्हणाला, "माफ करा, गहूकापणीचें व इतर कामें चालू आहेत. मीं घोडे थांबविले तर सर्वांच्या कामाचा खोळंबा होईल. आम्ही करतों तें काम पाहा. दुसरीकडेहि कामें चाललीं आहेत तीं पाहा व नतर घरीं जा, स्नान करा. तोंवर आमची सुट्टी होईल. नतर आपण सर्वजण दुपारचें जेवण घेऊ."

या कापणीच्या यत्राला चार दांडग घोडे जुपले होते व यत्र राक्षसाप्रमाणे सुमारें आठ-नऊ फूट रुंदीची गव्हाची पात अगदी सहज कापून त्याच्या पेंढ्या बांधून त्या उभ्या करीत चाललें होतें. एका मोठ्या गाडीतून या पेंढ्या खळ्यावर मळणीच्या जागीं नेल्या जात होत्या. तेथे दुसऱ्या यत्राच्या साहाय्याने गव्हाची मळणी (झाडणी म्हणणें जास्त बरें) चालली होती. त्यावेळीं या शेतकऱ्याकडे कामावर असलेले सहासात कॉलेज-विद्यार्थी मळणीचें व उपणणीचें काम यत्राच्या साहाय्याने करीत होते. त्यापैकी कांही जण गव्हाचीं पोतीं भरून तीं शिवीत होते. नतर जवळच्या दुसऱ्या एका शेतात एकाच यत्राने गव्हाची कापणी, झाडणी व उपणणी आणि शिवाय दाण्याचीं पोती भरणें हीं सर्व कामें एकदम चाललेली पाहिलीं.

दुपारीं सुमारें एक दीड वाजता कामास सुट्टी झाल्यावर शेतमालक घरीं आला. थोड्या वेळाने शेतावर काम करीत असलेले तरुण विद्यार्थीहि आले. घरमालकिणीने त्या तरुणाचे धुतलेले कपडे स्नानगृहाजवळ आधीच मांडून ठेवले होते. विद्यार्थ्यांनी आपापले कपडे घेऊन थड पाण्याने स्नानें उरकलीं. धूतवस्त्र पेहनून ते जेवण्याच्या टेबलाजवळ आले. घरमालकिणीने अगोदरच टेबलावर भांडी (प्लेटी, सुऱ्या, काटे, चमचे वगैरे) मांडून ठेवली होतीं. त्याचप्रमाणे जेवणाचे पदार्थ व पाण्याचे ग्लास

मधूनमधून ठेवले होते. स्नान होताच मडळी जेवणाच्या टेबलाजवळ आली. शेतकऱ्याने माझ्याशीं प्रत्येकाची ओळख करून दिली. या मडळींत काही जण पहिली व काही दुसरी डिग्री घेतलेले व एक जण डॉक्टरेट (पीएच्० डी०) पदवी घेतलेला असे होते. त्यानी भराभर आपल्या हातानी वाढून घेतलें. मींहि त्याचप्रमाणे वाढून घेतलें. यथासाग जेवण झाल्यावर ही मडळी बैठकीच्या दालनात वृत्तपत्रें व मासिकें चाळीत आणि धूम्रपान करीत बसली.

घरमालकीण मला म्हणाली, "मिस्टर पाटील, आम्हीं कसे वाढून घेतल व जेवलों हे तुम्हीं पाहिल. आता आम्ही सरकटी व उष्टीं भाडीं कशीं धुतों व साफ करतो तें पाहा." असें म्हणून तिने ज्या टेबलावर आम्ही जेवलों त्याचा एक भाग खुला केला. या भागात हीं निरनिराळीं व्हानमोठा भाडीं, कपबशा, काटेचमचे, सुऱ्या वगैरे ठेवण्याचे खण होते, त्यात तिने तीं सर्व भाडीं भराभर ज्याच्या त्याच्या जागीं बसवून टेबल बद केलें व मला म्हणाली, "पाहा, मी आता पाण्याच्या नळाची तोटी सोडते." भाडी गच बसविलेलें आतील चक्र जोराने फिरू लागलें. काही मिनिटानी तिने थड पाण्याची तोटी बद करून ऊन पाण्याची तोटी सोडली. ठराविक वेळ होताच ती म्हणाली, "आता भाडीं (कटलरी व क्रॉकरी) धुवून निघाला असतील, म्हणून पाणी बद करून उष्ण हवा आत सोडते." ठराविक वेळाने ती म्हणाली, "आता सर्व भाडींकुडीं स्वच्छ धुवून वाळून तयार झाला." पुढे ती बोलली, "मिस्टर पाटील, हें पाहा, आमच्याकडे मजूर मिळत नाहीत, म्हणून आमचे काम आम्हालाच करावें लागत. तें कमी कष्टाने कसें करावें हें आम्हाला गरजेने शिकविलें आहे. शिवाय असें पाहा, मला एकटीला या सव माणसाचा स्वयपाक करणें शक्य नाही. जसें आमचें तसेंच इतराचें. म्हणून आमच्या जेवणातील बहुतेक पदार्थ एक तर कारखान्यांत तयार झालेले अगर हवाबद डब्यात वा बाटल्यात भरून ठेवलेले आम्ही विकत घेतों. विकत घेण्यासाठी गावात अगर शहरात जाण्यास तरी आम्हास कोठे फुरसत मिळते? म्हणून टेलिफोनवरून ठराविक दुकानातून त्या त्या जिनसा मागवितों. असें आमचें ढग अमेरिकन जीवन चाललें आहे. तुम्ही आता विश्राति घ्या. नतर तुम्हाला आमच्या राहणीची जास्त माहिती देईन, व तुमच्या कडील राहणीची माहिती घ्यावीशी वाटते ती तुम्हाला विचारीन."

दुपारी मी परत शेतावर त्या तरुण विद्यार्थ्यांची उन्हाळ्याच्या सुट्टीमधील दिनचर्या पाहण्यास गेलों. ते विद्यार्थी व शेतकरी उत्साहाने काम करीत, एकत्र जेवत, त्याचे कपडे घरधनीण भट्टींत घाली व इस्त्री करी. सर्वांच्या जेवणाचे पदार्थ एकच असत. मीं असेंहि ऐकलें की, हे विद्यार्थी सुमारें तीन महिन्याच्या कामातून आपला कॉलेजचा वर्षभराचा सर्व खर्च काढीत. विशेष लक्षात ठेवण्यासारखी गोष्ट म्हणजे, गरजू विद्यार्थीच असलीं कामें करतात असें नाही, तर गरिबाचीं त्याचप्रमाणे श्रीमताचींहि मुलें अशीं कामें करून आपलें कॉलेजशिक्षण पुरें करीत. त्यात "मी

श्रीमंताचा मुलगा शेतकऱ्याच्या घरीं काम कसा करू, मजुरासारखे दिवस कसे काढू?" हे प्रश्न त्याच्या मनात सुद्धा येत नाहीत.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं मी एकटाच न्याहारी करून शेजारच्या शेतकऱ्याकडचीं कामे पाहण्यास गेलों. त्या शेतावर एक शेतकरी 'मोअर' (गहू किंवा गवत कापण्याचें यंत्र) गव्हाचे पिकात चालवीत होता. पण त्याने पेंढ्या बांधल्या जात नव्हत्या. पीक कापून एका बाजूस ढकलून व्यवस्थित पडत होत. त्या शेतात एक लहान गोजिरवाणा सुमारे आठ नऊ वर्षांचा मुलगा एक मोठा घोडा जोडलेले हल्के यंत्र चालवीत होता. असले यंत्र गव्हाची किंवा ओटची कापणी होऊन पीक उचलल्यावर सरवा (गव्हाचे व ओटाचे मागे पडलेलें काड व लोंब्या वगैरे) गोळा करण्यासाठी असतें. मुलगा लहान होता, तरी यंत्र हलकें असल्याने त्याची वरचेवर उचलावी लागणारी तरफ तो उचलू शके. पण मुलाच्या व यंत्राच्या मानाने घोडा फार मोठा व उमदा दिसे. तो मुलगा तं यंत्र चालवीत असताना मी त्याच्या जवळ गेलों. त्याने गुडमॉर्निंग म्हणून थोडा वेळ यंत्र थांबविलें. मी त्याला काही माहिती विचारू लागलो तेव्हा तो म्हणाला, "माफ करा, माझे काका फार पुढे गेले. माझें काम मागे राहिले." असे म्हणून कासऱ्याने इशारा देताच घोडा चालू लागला. एवढासा मुलगा पण त्याचें कामावर व आपल्या कर्तव्यावर किती लक्ष, याचें मला कौतुक वाटलें.

मी संध्याकाळीं घरीं आल्यावर त्या शेतकऱ्याला विचारलें, "काय हो, तुमचा मुलगा कोठे आहे?" तो म्हणाला, "येथून सुमारे चाळीस मैलावर तोहि एका शेतकऱ्याच्या घरीं असलेंच काम करीत आहे." मीं विचारलें, "मग स्वत:च्या शेतावर का काम करीत नाही?" शेतकरी म्हणाला, "मनुष्यस्वभाव आहे. घरचें काम म्हणून त्याच्याकडून आळस होण्याचा संभव आहे, म्हणून आमचीं मुलें दुसऱ्याकडे काम करतात तर दुसऱ्याचीं मुलें आमच्याकडे काम करतात. त्याशिवाय त्यांना स्वातंत्र्य मिळते व देश पाहावयास मिळतो. चार जणांची ओळखहि होते, नाही का?" मला तें पटलें. तिसऱ्या दिवशीं मी परत मॅडिसनला गेलो व तेथून त्या शेतकऱ्याच्या बायकोस एक पत्र व माझ्या वर्गबंधूस एक पत्र लिहून त्यांचे आभार मानले.

कॉलेज बंद असल्याने मला हीं कामे पाहण्यास चांगली संधि मिळाली. याच वेळीं मीं प्राध्यापकास भेटून माझा अभ्यासक्रम नक्की केला. कृषिविषयक अर्थशास्त्राचें अध्ययन करणें हे माझे ध्येय; पण हे ध्येय साध्य करण्यासाठी मला प्रथम मूलगामी अर्थशास्त्राचा अभ्यास करणे जरूर होतें. शिवाय विश्वविद्यालयाच्या नियमानुसार मला पूर्वावश्यक (प्रीरिक्विझिट) म्हणून तो विषय अभ्यासल्याचा दाखला मिळविणे जरूर होतें. तथापि माझी पूर्वतयारी व माझे हिंदुस्थानात झालेलें शिक्षण पाहून विस्कॉन्सिन विश्वविद्यालयाच्या अधिकाऱ्यांनी मला पदव्युत्तर शाखेत (पोस्टग्रॅज्युएट स्कूलमध्ये) दाखल करून घेतलें. पण याच वेळीं मला पूर्वावश्यक मूलगामी अर्थशास्त्राचा अभ्यास करून त्याचें सर्टिफिकेट मिळवावें लागलें.

मी विस्कॉन्सिन विश्वविद्यालयात दाखल झालो खरा, पण त्या वेळीं मी चाळिशीचें वर्ष उलटून गेलेला एक पोक्त गृहस्थ होतो. डोक्यावर मधूनमधून चारदोन पांढरे केस डोकावत होते. तिकडचे पोक्त लोकसुद्धा मिशा ठेवीत नव्हते. मला तर माझ्या ओठ मिशांना फाटा देण्याची इच्छा नव्हती. अशा स्थितीत मी तरुण मुलामुलींत कसा वावरूं शकेन याबद्दल मला शंका व धास्ती वाटे. मी वर्गांत धचकत धचकत गेलो. वर्गावरील प्राध्यापक डॉ० हिबर्ड माझ्याच वयाचे होते. वर्गांत तरुण विद्यार्थ्यांबरोबर थोडे पोक्त विद्यार्थीहि दिसले. तें पाहून मला हायसें वाटलें व माझी काळजी दूर झाली. विशेष म्हणजे एका पोक्त विद्यार्थ्याचा मुलगा त्याच्याच क्लासात होता. तिकडचे बहुतेक लोक ग्रॅज्युएट स्कूलमध्ये येण्यापूर्वी पाचदहा वर्षे कामाचा वा अध्यापनाचा अनुभव घेऊनच येतात. शिवाय ते लोक पदवी मिळविण्या पेक्षा ज्ञान संपादन करण्यासाठी येतात, असें म्हणणें बरें

आमच्या विश्वविद्यालयात साडेसात हजार विद्यार्थी होते. त्यांपैकी अर्धाच ते तीन हजार मुली असाव्यात. काही काही वर्गांत विद्यार्थ्यांची संख्या हजार दीड हजार पर्यंत असली तरी सर्व विद्यार्थ्यांस अगदी स्पष्ट ऐकूं जाईल अशा रीतीनें प्राध्यापकाच व्याख्यान चालू असे व तास पूर्ण शांतता असे. विद्यार्थी बिलकूल गडबड करीत नसत. पण तेथ वीस पंचवीस विद्यार्थ्यांचे गटास दुसरे दिवशीं एक एक ट्यूटर त्याच भागावरील प्रश्न विचारी व त्यांची फोड करून सांग. आगाऊ ठरविल्याप्रमाणे *मीं मूलगामी अर्थशास्त्र व कृषिविषयक अर्थशास्त्र हे विषय तर घेतलेच पण याशिवाय* जमिनीबाबतच अर्थशास्त्र, कूळकायदा, माडवलपुरवठा, देवघेवव्यवहार, खरेदी विक्री व कॉस्ट अकाउन्टिंग वगैरे विषय मी घेतले. अमेरिकेत या वेळीं नुकताच लॅंड इकॉनॉमिक्स (भूविषयक अर्थशास्त्र) हा अगदी नवीन विषय डॉ० ईली (Ely) यांनी *अभ्यासून कॉलेजच्या अभ्यासक्रमात आणला होता.* तो विषयहि मीं घेतला.

मॅडिसनमधील वास्तव्यात माझी दिनचर्या साधारण पुढीलप्रमाणे चाले. सकाळीं सहा ते सात वाजता उठून प्रातर्विधि, मुखमार्जन व प्रार्थना, नंतर न्याहारी (ब्रेकफास्ट) करून मी सकाळीं तीनचार तास कॉलेजांत जात असें. दुपारीं कॉलेजच्या रेस्टॉरंटमध्ये दुपारचें जेवण करून बिर्‍हाडीं येईं. नंतर थोडा वेळ वर्तमानपत्र चाळून व पत्रव्यवहार पाहून चार साडेचार ते सातपर्यंत अभ्यासास बसें. सहा सात वाजता थोडा वेळ तालमींत जाईं. साडेसात वाजता जेवण आटोपून तास-अर्धा-तास वाचनालयात काढून घरीं येईं. आल्यावर रात्रीं दहा वाजेपर्यंत अभ्यासास बसे. पुढे थोडेसें ईशस्तवन करून रात्रीं साडेदहा वाजल्यापासून ते सकाळीं सहा सात वाजेपर्यंत झोप घेईं. असा माझा रोजचा कार्यक्रम चाले व अभ्यासहि सुरळीत होत असे. विश्वविद्यालयात मी एक वर्ष राहून तेथील एम्० एस्सी०ची परीक्षा जून सन १९२२ सालीं पास झालो.

मॅडिसन हें विस्कॉन्सिन स्टेटची राजधानी. विश्वविद्यालयामुळे हें शहर प्रसिद्धीस आले आहे. येथील सचिवालय फार सुंदर आहे. रस्त्यांची आखणी फार चांगली

आहे. रस्ते व फूटपाथ रुंद व स्वच्छ असत. विश्वविद्यालय एका भव्य पण उथळ टेकाडावर व्यवस्थित वसलें आहे. जवळच एक सुंदर तलाव आहे. शहरातील रस्ते चांगले स्वच्छ दिसले. रस्त्यावर घोड्याची गाडी क्वचितच दिसे. औतास घोडे जुंपीत. सन १९२१-२२ सालीं या शहरात दर पाच माणसामागं एक, असे मोटारीचें प्रमाण पडे. याचा अर्थ असा की चाळीस वर्षांमागसुद्धा बहुतेक कुटुंबात मोटार असे. इंग्लंडपेक्षा अमेरिका सधन आहे, पण इंग्लंडची राहणी जास्त टापटिपीची दिसली. इंग्लंडपेक्षा अमेरिकेंत खाण्याजेवण्याचा खर्च फार येई. मला अमेरिकेंतील राहणी मानवली. मन उल्हसित असे. माझं वजनहि वाढलें. इकडे जून ते सप्टेंबर महिन्यात सुट्टी असते, त्या वेळीं विद्यार्थी शेतकाम करून आपला शिक्षणखर्च भागवीत, असें मीं लिहिलेंच आहे. इंग्लंडमधील विद्यार्थी असलीं कामें करीत असलेले माझ्या पाहण्यात आले नव्हते. मी राहत असलेल्या मॅडिसन शहरीं ऑक्टोबर नोव्हेंबर महिन्यात सूर्य पाच वाजता मावळतो व सूर्योदय सकाळीं सहाला होतो. पुढेपुढे रात्र मोठी होत जाते व ऑफिसचें व शाळाचें कामहि विजेच्या बत्त्यावर करावें लागतें.

ऑटमच्या हंगामात हिवाळ्याचा आरंभ होऊन झाडांची पानें पिंवळी लागतात व हिवाळ्यात पानें गळून वृक्ष वठल्यासारखे दिसतात. नोव्हेंबर डिसेंबर महिन्यात हिम पडण्यास सुरुवात होते. स्नो बर्फासारखं नसतें म्हणून यास बर्फ म्हणणें चुकीचें होईल. हिम पिंजलेल्या पाढऱ्याशुभ्र कापसाप्रमाणे विरविरीत असून तें फार हलकं असत. दगावून पावसाप्रमाणे खालीं येताना, तें वाऱ्यानें इकडेतिकडे उडत व कोणत्याहि सजीव व निर्जीव पदार्थावर पडून साचतं. रस्ते, घरें व झाडें या हिमामुळें पादरींशुभ्र दिसतात. कधीकधी जमिनीवर आठनऊ इंच जाडीचे हिमाचे थर बनतात बराच वेळ ऊन पडलं तर तो थर एकदोन दिवसात वितळून जातो. हिम पडत त्या वेळीं लोक अंगात जाड ओव्हरकोट (डगला) घालतात. पायात चामड्याच्या बुटावर रबरा बूट घालावे लागतात. कधीकधी हें हिम ओलें असतें व त्यामुळे कपडे ओल होतात, पण बहुतेक तें कापसासारखं पिंजलेलं असून बारीक पाढऱ्या वाळूप्रमाणे दिसत व वाऱ्यानें उडावलंहि जातें. थंडीमुळे तें रस्त्यावर गोठत व त्यामुळे निसरडं होत. वळचणीपाशीं फूट दोन-फूट त्याच्या पागोळ्या लोंबत राहतात. थंडीच्या दिवसांत रस्त्यावरील हिम व बर्फ काढून टाकणें मोठं कठिण काम असत. मोटारींचीं चाकं बर्फावरून निसरतात म्हणून त्यांना लोखंडी साखळ्या गुंडाळाव्या लागतात. आग गाड्यांना सुद्धा अडचण पडते. रुळावर पडलेलें हिम अगर बर्फ चाबूक टाकून जाऊन गाडीचा मार्ग मोकळा व्हावा म्हणून इंजिनाच्या लागून पुढें लोखंडी रुंद पात्याचा योजना करावी असते.

जुनाई फेब्रुवारी महिन्यात तलाव, तळीं, नद्या वगैरे गोठून पाण्यावर बर्फाचा जाड थर बनतो. उंच डोंगर व टेकड्यावरहि हिमाचा जाड थर बनून रान जिकडेतिकडे

पाढरे व तकतकीत दिसते. या बर्फाच्या गुळगुळीत भागावरून लहान मुले व तरुण-तरुणी स्केटिंग व स्कीइंगचा (बर्फावरून घसरगुंडीचा) खेळ खेळतात. पायात अडकविलेल्या चकाच्या लाकलाकू पट्ट्यावरून ते अल्प अवकाशात मैल-अर्धा मैल घसरत जातात. हा धोक्याचा खेळ खेळण्यात त्याना किंचितहि भीति वाटत नाही. कित्येक वेळा या खेळात अपघातहि होतात. तळ्यातील पाणी गोठल असल्याने वाऱ्याच्या जोराने त्यावरून शिडाच्या होडी तासास ४० ते ५० मैल वेगाने धावत जाताना दिसतात हा बर्फाचा थर बरेच दिवस साचून राहतो. तो लवकर वितळत नाही. त्यामुळे तिकडील माणसास पुष्कळ दिवस स्केटिंग करावयास सापडते. अमेरिकेत हा खेळ सर्वांचा आवडता आहे

मी मॅडिसनहून तारीख ५ जून १९२२ रोजी निघून पिट्सबर्ग या मोठ्या शहरी तारीख ६ जूनला गेलों. या शहरात लोखंड तयार करण्याचा व मोठीं अवजड यंत्रें बनविण्याचा एक कारखाना पाहिला. या कारखान्यात पधरा फूट लाब व दीड फूट जाड अशी मोठी लोखडी तुळई (गर्डर) भट्टीत कशी तापवितात व हजारो पौंड वजनाच्या यांत्रिक घणाने ती चारसहा मिनिटात कशी चौरस बनवितात हें पाहून अचबा वाटला. लोखडाच्या भल्या मोठ्या तुळईस भोक, तें जणू काय मेणाची असल्याप्रमाणे, सहज पाडतात.

खनिज तेलाच्या विहिरीसाठी खडकात भोक पाडताना वा खोदताना पाहिलें. सुमारें तेरा इंच जाडीची पहार रोज दोनशें फूट खडकात खोल जाऊ शकते. हेंहि काम यंत्राच्या साहाय्याने करीत. या विहिरी तीन हजार फूट व कधी कधी पाच हजार फुटापर्यंत खोल असतात. या विहिरी खोदण्याच्या कामावर फक्त दोनच माणसे पहार चालवीत होतीं.

नतर तारीख ७ जूनला वॉशिंग्टन या अमेरिकेच्या राजधानीच्या शहरीं गेलों. अमेरिकेचा पहिला अध्यक्ष जॉर्ज वॉशिंग्टन याचा भव्य पुतळा पाहिला हा पुतळा फारच मोठा असून त्याची उंची ५५५ फूट व घेर २५ चौरस फूट आहे. हा पुतळा ब्रॉझ (पंचरस धातूचा) धातूचा असून, तो उभारण्यास एक लक्ष वीस हजार डॉलर्स म्हणजे अजमासे पाच लक्ष वीस हजार रुपये त्या वेळीं खर्च आला, असे लोक सागत. तसेच अब्राहम लिंकन या अमेरिकेच्या दुसऱ्या प्रसिद्ध व कर्तृत्ववान् अध्यक्षाचे स्मारक 'कॅपिटल' रूपाने केल असून, राजधानींतील या उत्कृष्ट व सुंदर इमारतींत लोकसभा (कॉंग्रेस) भरते. सिनेट(कायदेमंडळा)चीहि बैठक तेथेच भरते. मी या शहरातील शेतकी खात्याची कचेरीहि पाहिली. त्यात हजारों माणस काम करताना दिसलीं. शेतकी खात्याच्या मुख्य अधिकाऱ्याची भेट घेतली. या भेटींत मला बरीच माहिती मिळाली व शेतकीविषयक प्रश्नावर त्याच्याशीं खल करता आला. तारीख ११ जून रोजीं वॉशिंग्टनहून निघून, फ्लारेन्स व न्यूऑर्लिन्स हीं शहरें तीनचार दिवसात पाहिलीं व तारीख १५ जूनच्या सुमारास मॅडिसनला परत आलों. तेथे दोन आठवडे राहून, स्वदेशीं परत जाण्याचें ठरविलें.

तारीख १ ऑगस्ट १९२२ रोजीं पहाटे मॅडिसन सोडलें. आगगाडीनें सॅनफ्रान्सिस्कोला जाण्यास निघालो. मॅडिसनहून सॅनफ्रान्सिस्को पश्चिमेस २२६० मैल आहे, तसेंच मॅडिसनहून पूर्वेला न्यूयॉर्क अजमासें ११२५ मैल आहे. अमेरिकेंतील पूर्वेकडचा सुमारें २००० मैल रुंदीचा पट्टा फार सुपीक आहे. या सुपीक पट्ट्याच्या पश्चिमेस निकस जमिनीचा पट्टा आहे. त्यानंतर खाऱ्या पाण्याचा तीस मैल लांबीचा भाग आहे. शिवाय मधूनमधून अरण्यें लागतात. सुपीक प्रदेश ओलांडल्यानंतर, तारीख ३ रोजीं सकाळीं निकस पट्ट्यामधून आमचा प्रवास सुमारें सहा तास चालला. पुढे तलाव, नंतर दाट अरण्य व त्याच्यापुढे सरोवर, असा प्रवास सुमारें दहा तास झाला. मधूनमधून कालव्याने भिजणारे भाग दिसले. हा अरण्याचा प्रवास केव्हा संपतो असें झालें. ही रेल्गाडी स्पेशल असल्याने तिच्यामध्ये निजण्याच्या, जेवणाखाण्याच्या व स्नानाच्या सोयी असून तीमध्ये दोन मोठमोठीं दालनें (हॉल) होतीं. या हॉल्मध्ये बसून बाहेरचें सृष्टिसौंदर्य पाहण्यास मजा वाटली. या गाडीचा वेग साधारणपणें सरसकट ताशीं ३४-३५ मैल पडे. मॅडिसन ते सॅनफ्रान्सिस्को पहिल्या वर्गाचें रेल्वेभाडें रुपये ४५० पडलें. गाडींत फक्त एकच (पहिला) वर्ग होता. रोजच्या तीन वेळच्या जेवणास व चहास सात ते अकरा रुपये पडत. या देशांतील लोक सुखी व सधन असल्यामुळे त्यांना या खर्चाची पर्वा नसे. त्याच गाडींतून दोन चिनी मुली बी० ए० होऊन परत आपल्या देशास जात होत्या. त्या मॅडिसन विश्वविद्यालयातच माझ्याबरोबर शिकत होत्या. त्या सॅनफ्रान्सिस्कोस उतरून बोटीनें पुढे आपल्या देशास जाणार होत्या. गाडींत पुष्कळ लहान मुलें होतीं. ती तरतरीत व धीट असून भारी चौकस दिसली. या 'ओव्हरलॅंड' गाडीला एक लांबलचक डबा असून त्यात बसण्यासाठी व बैठे खेळ खेळण्यासाठी मुबलक जागा होती. या डब्यास जोडून एक लहानसें वाचनालयहि होतें. डब्यात जागोजाग खुर्च्या, सोफे, टेबलें व स्टुलें होतीं. बाजूच्या भिंती जाड काचेच्या असल्या तरी त्यातून बाहेरची वनश्री, पाण्याचे प्रवाह, तलाव यांची शोभा स्पष्ट दिसत असे. म्हणून या डब्यास 'ऑब्झर्वेशन कार' म्हणत.

सॅनफ्रान्सिस्कोस सरळ न जाता, त्याच्या अलीकडे वीस मैलावर असलेलें बर्क्ले विश्वविद्यालय पाहण्यास ता. ४ ऑगस्ट रोजीं गेलो. तेथून एक दिवस 'टर्लॉक' येथील वसाहत पाहून सॅनफ्रान्सिस्कोचें नॅशनल पार्क (राष्ट्रीय उद्यान) व सॅनफ्रान्सिस्को बंदरहि पाहिलें.

सॅनफ्रान्सिस्को हें माझें अमेरिकेंतील शेवटचें ठिकाण. हें सोडण्यापूर्वी युनायटेड स्टेट्समधील लोकांसंबंधी मला काय वाटलें, यासंबंधी चार शब्द लिहिणें बरें. युनायटेड स्टेट्समधील रहिवासी सधन तर खरेच; त्यांचा प्रामाणिकपणा मला वरच्या पातळीचा दिसला. मी अमेरिकेस (सन १९२१ सालीं) गेल्या वेळीं हिंदुस्थानातून अमेरिकेस टपाल जहाजानें जाई. त्या वेळीं विमानानें टपाल जात नसे. मला वाटतें,

त्या काळीं अमेरिकेहून पुण्यास पत्रे येण्यास पाच आठवडे लागत. म्हणून मीं अमेरिकेंत पोचताच 'तार करीन' असे पत्नीस व मुलास सांगितलें होतें. न्यूयॉर्कला पोचताच मी तार (केबल) करण्यास तार-ऑफिसांत गेलों. पोस्टमास्तर एक तरुण मुलगी होती. तिच्याकडून फॉर्म घेतला, तार लिहिली व तिच्याकडे दिली आणि विचारलें कीं, काय हशील होईल. तिने सांगितलें, "आठ डॉलर्स." मीं खिशांतून पाकीट काढून पाहिलें, तों त्यांत एक शंभर डॉलर्सची नोट व सुटे चारपाच डॉलर्स होते. ते पाहिल्यावर मी त्या मुलीला म्हणालों, "तुम्ही ही शंभर डॉलर्सची नोट घेऊन बाकीचे पैसे द्याल काय?" ती म्हणाली, "इतके पैसे मजजवळ नाहींत. पण मी तुमची तार घेऊन तार केल्याची पावती देतें. तुम्ही माझे पैसे उद्या द्या." मी म्हणालों, "तुम्ही ही शंभर डॉलरची नोट तुमच्याजवळ ठेवा व तार करा. मी मिन्हार्टी जाऊन सुटे दहा डॉलर्स आणतों. मग शंभराची नोट परत द्या." ती म्हणाली, "एवढी भारी नोट मजजवळ नको. तुमच्यासारखे परदेशाहून आलेले गृहस्थ काय मजसारख्या गरीब मुलींचे पैसे बुडवितात?" तिने तार केली. मी हॉटेलमध्ये जाऊन, सुटे डॉलर्स आणून, त्या मुलीचें बिल भागविलें. केवढा विश्वास! न्यूयॉर्क-मध्ये मी आठवडाभर होतों. त्या वेळीं माझे दोन स्नेही पाध्ये व नाईक तेथे होते. त्यांच्याबरोबर मी राहिलों. तेथे पाध्यांनी परीक्षेत कॉपी करणाऱ्याबद्दलची झालेली हकीकत मला सांगितली. ती अशी: पाध्ये मुंबई युनिव्हर्सिटीचे पदवीधर आहेत; किंचित् ठेंगणे व रंगाने गोरे आहेत. तेव्हा ते दक्षिण युनायटेड स्टेट्समधील लॉसएंजेलास येथे शुगरटेक्नॉलॉजी शिकत होते. अमेरिकन युनिव्हर्सिटींत मासिक व त्रैमासिक परीक्षा असत. ते हुशार व देखणे असल्याने, स्थानिक विद्यार्थी आणि विद्यार्थिनी पाध्यांशीं मिळूनमिसळून वागत व त्यांच्याशीं थट्टामस्करीहि करीत. पाध्यांच्या बरोबर एक मद्रासी विद्यार्थी होता. त्याला म्हैसूर संस्थानाची स्कॉलरशिप होती. पाध्यांप्रमाणे त्याला पूर्वानुभव नव्हता, व परीक्षेत त्याचा नंबर फार खालीं असावयाचा; शिवाय तो काळ्या वर्णाचा होता. त्यामुळे अमेरिकन विद्यार्थी (विशेषकरून विद्यार्थिनी) त्याच्याशीं बोलण्याचें टाळीत व त्याच्याशीं सलगीने वागत नसत. या गोष्टीचा त्या विद्यार्थ्यांस विषाद वाटे. त्याने आपली समजूत करून घेतली होती कीं, पाध्यांचा नंबर परीक्षेत वरचा असतो म्हणून त्या अमेरिकन पोरी त्यांच्यावर खूश असून त्यांच्याशीं सलगीने वागतात. या मद्रासी विद्यार्थ्याने चांगला अभ्यास करून, परीक्षेत नंबर वर आणण्या-ऐवजी, परीक्षेत लबाडी (कॉपी) करून नंबर वर आणण्याचा क्रम सुरू केला. प्रथम कांही दिवस अमेरिकन विद्यार्थ्यांनी त्याच्या या वर्तनाकडे लक्ष दिलें नाहीं. पण जेव्हा त्या मद्राशाचा नंबर त्यांच्या वर येऊं लागला, तेव्हा त्यांनी आपल्या परीक्षका-कडे तक्रार केली. प्रथम तो प्रोफेसर त्या तक्रार करणाऱ्या विद्यार्थ्यांवरच रागावला. परीक्षक म्हणे, "तो बापडा सात समुद्र ओलांडून तुमच्या येथे शिकावयास आला आहे; तो काय कॉपी करील? तुम्ही त्याचा हेवा करतां. जा, चालते व्हा." ही

हकीकत त्या मद्रासी विद्यार्थ्याला कळली, तेव्हा तो शेफारला. त्याने परीक्षेत कॉपी करण्याचा क्रम पुढे चालू ठेविला. एकदा चारपाच विद्यार्थ्यांनी कट करून त्या हिंदी विद्यार्थ्यास कॉपी करताना पकडण्याचे ठरविले व त्याच्यावर लक्ष ठेवून, तो पुस्तकातून कॉपी करीत असताना, एका विद्यार्थ्याने प्रोफेसरास सांगितले. पण त्या मद्रासी विद्यार्थ्यास ही कुणकुण लागताच त्याने पुस्तक लपविले. प्रोफेसरने येऊन पाहिले, पण त्यास कॉपीचा मागमूस लागला नाही. तेव्हा तर त्याने त्या अमेरिकन विद्यार्थ्यास फार छाडले. मग त्या विद्यार्थ्यांनी निश्चय केला की, या मद्रासी विद्यार्थ्याला कॉपी करताना धरून ठेवून मग परीक्षकास वर्दी द्यावयाची. त्याप्रमाणे त्यांनी दुसऱ्या महिन्याच्या परीक्षेत तो मद्रासी कॉपी करीत असताना चौघांनी एकदम येऊन, त्याचे हातच धरले व पाचव्याने परीक्षकास बोलावून आणून "हा सूर्य व हा जयद्रथ" या न्यायाने परीक्षकाची खात्री करून दिली. झाले. प्रोफेसराच्या संमत त्या मद्रासी विद्यार्थ्यास युनिव्हर्सिटीतून काढून टाकण्याचा हुकूम झाला व म्हैसूर सरकारास तसे कळविण्याचे ठरले. तथापि पाळ्याच्या मध्यस्थीवरून म्हैसूर सरकारास कळविण्यात आले नाही व त्याचे जन्माचे नुकसान टळले. नंतर त्या मद्रासी विद्यार्थ्याने होनोलुलु येथील युनिव्हर्सिटीत प्रवेश मिळविला व तो पासहि झाला. कदाचित् तो आज हिंदुस्थानात जबाबदारीच्या जागेवर असण्याचा संभव आहे.

काही आडवळणी भागात रेल्वेस्टेशनें नाहीत. तथापि ठराविक ठिकाणी रेल्वेलाइनजवळ ल्हानसें छप्पर असतें व त्याच्याबाहेर "विनंती केल्यास प्रवाशास गाडीत घेतले जाईल" अशी पाटी लावलेली असते. असा प्रवासी गाडी दिसताच हात वर करतो. गाडी थांबते. प्रवासी आत जातो, त्यास कंडक्टर तिकिट देतो व आगगाडी चालू होते.

अमेरिकेत ल्हान ल्हान शहरात सुद्धा, या वेळी मोटार (बस सर्व्हिस) असे, पण अशा बसवर फक्त ड्रायव्हर असतो. कंडक्टर नसतो. प्रवासी मागच्या बाजूने आत शिरतो. आत जाताना, ल्हान फाटकातून (टर्नपाइकमधून) त्यास जावें लागतें. जवळच एक ल्हानशी पेटी बसविलेली असते. पेटीस एक भोक असतें. त्यात तो माणूस ठराविक चिल्लर टाकतो. मी असे पाहिले की कोणीहि पेटीत पैसे न टाकता बसमध्ये चढत नाही.

सॅनफ्रान्सिस्कोहून उत्तरेकडे कॅनडा देशातील व्हॅनकुव्हरला आगगाडीने निघालो. व्हॅनकुव्हरला पोहचण्यास दीड दिवसाचा प्रवास करावा लागला. व्हॅनकुव्हर हे कॅनडाचें फार नांव व महत्त्वाचे बंदर व ब्रिटिश कोलंबियाचें मुख्य शहर आहे. तेथे उन्हाळ्यात दिवसा व काही काळ रात्रीहि सूर्य दिसतो. हिवाळ्यात फारच गारठा असतो. जवळपासचे एस्किमो लोक सील-माशाची शिकार करतात. तच त्यांचे मुख्य अन्न. पाण्यावरच्या बर्फांत भोकें पाडून गळाने मासे पकडतात. खनिज पदार्थांचा मोठा व्यापार चालतो. लाकडाचे कारखाने पुष्कळ आहेत. येथ शीख लोकांची मोठी

वसाहत बनली आहे. ते लाकूडकारखान्यात काम करतात. व्हॅनकुव्हरहून सरळ जपानला जहाजें निघतात.

मी व्हॅनकुव्हरहून तारीख १० रोजीं, साडेअकरा वाजता एम्प्रेस ऑफ आशिया बोटीने निघालो. या बोटीवरील खलाशी चिनी होते; पण अधिकारी कॅनेडियन होते. जहाज फार मोठें असून ते रोज साडेचारशे मैल वेगाने जात होतें. माझा प्रवास सेकंडक्लासमधून झाला. केबिनमधील स्वच्छता व टापटीप बरी वाटली. जेवणाखाण्याचीहि व्यवस्था ठीक होती. बोटीवर कोणाचीहि ओळख नसल्याने वेळ जात नव्हता व बसून राहणे कंटाळवाणे होई. खावें प्यावें, जरा वाचन करावें, झोपावें अगर डेकवर कधीमधी फिरत राहावें, असा माझा या बोटीवर कार्यक्रम चाले. एका अर्थी मलाहि विश्रांति हवी होती, ती या कार्यक्रमाने मिळाली हें बरेंच झालें. व्हॅन्कुव्हरहून जपानला जाणारी बोट थंड कटिबंधातून जात असल्याने थंडी फार होती. बोटीवर गोविंदराम वाटुमल नावाचे एक सिंधी व्यापारी होते. पण प्रथम प्रथम त्यांच्याशी बोलणेंचालणें फारसे होत नव्हतें. पुढे त्यांची माझी जास्त दोस्ती झाली. त्यांचीं दुकानें अमेरिकेप्रमाणे फिलिपाइनमध्ये मॅनिलास व मुंबईसहि होतीं. आमची बोट शून्य अक्षांशावरून जाताना कालगणनेबाबत एक चमत्कार वाटतो तो असा : हिंदुस्थानचा पश्चिम किनारा सोडून जसजसे पश्चिमेकडे जावें, तसतसे आपले घड्याळ मागे पडत असतें; आणि जर घड्याळाचे काटे पुढे सारले नाहीत तर तें अमेरिकेत जाईपर्यंत बारा तास मागे पडतें. म्हणजे ज्या वेळीं पुण्यामुंबईत दुपार, त्या वेळीं अमेरिकेत मध्यरात्र असते. माझे जहाज सारखें पश्चिमेकडे जात होतें, पण पृथ्वी वाटोळी असल्याने जहाज जपानास व नंतर हिंदुस्थानास जाणार, हें नक्की. पण जर एखाद्या प्रवाशाने आपल्या घड्याळाचे काटे रोज अर्धा तास पुढे सरकविले नाहीत, तर त्यास मुंबईहून इंग्लंड, अमेरिका व जपानमार्गे परत हिंदुस्थानात येण्यास एक दिवसाचा म्हणजे चोवीस तासांचा फरक पडणार. हा फरक टाळण्याकरिता अमेरिकेहून जपानकडे जाणारीं जहाजें शून्य अक्षांशावरून जाताना एक दिवस गाळतात तर जपानहून अमेरिकेस जाणारीं जहाजें एकच दिवस दोन वेळ धरतात. हा चमत्कार भूगोल-खगोलविषयक शास्त्रातील एक अगदी साधी गोष्ट आहे. पण ती या प्रवासाने प्रत्यक्ष अनुभवास येते व मनास अचंबा वाटतो.

मला अमेरिकेंत फार चांगली वागणूक मिळाली. विशेषकरून ज्या विश्वविद्यालयांत (विस्कॉन्सिन युनिव्हर्सिटींत) मीं वर्ष सव्वा वर्ष अध्ययन केलें, तेथील अध्यापकांनी माझ्या शिक्षणात मदत केली व मला चांगल्या रीतीने वागविलें. त्याचप्रमाणे मी जेथे जेथे गेलों, तेथे तेथे मला तेथील लोकांनी सौजन्याने वागविलें. विश्वविद्यालयातील ज्ञानाचा व अमेरिकन लोकांच्या सहवासाचा मला फार फायदा झाला. माझे तेथील दिवस सुखाचे गेले. मी त्या देशाचा आभारी आहें.

मी जपानातील याकोहामा शहरास तारीख २१ रोजीं पोचलों. मी जपानला निघण्यापूर्वी लंडन येथील इंडिया ऑफिसकडून जपानमधील ब्रिटिश वकिलातीमार्फत

जपान सरकारला आगाऊ कळवून, मी तेथे असेपर्यंत माझ्याबरोबर एक शेतकी खात्यातील इंग्रजी भाषा जाणणारा अधिकारी देण्याची सोय केली होती. त्यामुळे माझे काम सोपें झालें होतें. त्या अधिकाऱ्यानें माझा जपानमधील कार्यक्रम आखला व त्याप्रमाणे मीं तारीख २२ ऑगस्टपासून पधरा दिवस जपान देशांत फिरून तेथील शेती, काही शेतकीशाळा, प्रयोगक्षेत्र व शेतकी कॉलेज पाहिलें. त्याचबरोबर, काही शहर व बरीच प्रेक्षणीय स्थळेंहि पाहिलीं.

जपानमधील शेतीची मशागत व पिकाची काढणी मोडणी, इंग्लंड किंवा अमेरिकेप्रमाणे घोड्याच्या साहाय्यानें अगर आपल्याइकडील बैलानें ओढल्या जाणाऱ्या औतानें होत नाही. लोकसख्येच्या मानानें जपानातील शेतीचें क्षेत्र फार कमी, देशाचा बराचसा भाग डोंगराळ असल्याने, शेतातील सर्व काम माणसांना हातानेंच करावीं लागतात. तेथे गाई, म्हशी व घोडेहि नाहीत. जमिनीचे क्षेत्र कमी असल्याने तेथ मेंढरेंहि पाळता येत नाहीत. गाई म्हशी नसल्याने तिकडे दूध, दही वा तूप होत नाही व लोक त्याचा उपयोगहि करीत नाहीत. त्याना तें किळसवाणें वाटतें.

जपानी लोक पीतवर्णी, बुटके, दणगट, पायाच्या पिंढऱ्या जाड असलेले व सशक्त असतात. मी तेथ गेल्यावेळीं शहरातील सुखवस्तु कुटुंबातील पुरुष युरोपिअन पद्धतीचा पोशाख करीत. स्त्रिया रंगीबेरंगी किमोनो (झगा) घालून, पाठीवर 'ओबी' (भारी किंमतीची रेशमी उशी) बाधीत. त्याच्या पायात सपाता व हातात छत्री असे. जपानी मुलाचे कपडे स्वच्छ व रंगीबेरंगी असून मुलें निमुळत्या डोळ्यांचीं, गुबगुबीत दिसत. स्त्रियाची वेशभूषा फार व्यवस्थित व शानदार असे. शहरातील मजुरीचीं कामें करणाऱ्या स्त्रीपुरुषाचे कपडे साधे होते. रिक्शावाले पातळ पादरा माडचोळणा घालून, पायात पायमोजे व त्यावर गवती चप्पल घालीत. तुम्ही त्याची रिक्शा घऊन शहरानाहर काही पाहण्यास वा एखाद्या माणसास भेटण्यास गल्यास ते विचारतील, आपण किती वेळ येथ थाबणार? वेळ असल्यास, लागलीच पायमोजे व कधी कधी गनिफ्रॉक काढून धुवून वाळत टाकतील व तुम्ही येताच कपडे घालून रिक्शा सडकेवर घेतील जपानी लोक स्वच्छतेकडे जास्त लक्ष देतात.

जपान्याच्या घरीं गेलात, तर ते चटदिशी केसावर फणवा फिरवून, किमोना व्यवस्थित करून, तुमच्यापुढे येऊन, पाठ व मान वाकवून "मोशी मोशी" म्हणज "या हो, या हो" असें काही म्हणतील व "चहा पाहिजे काय?" म्हणून विचारतील. माझ्याबरोबरचा सरकारी दुभाष्या, "मी हिंदुस्थानातून जपान पाहण्यास आलें आहें" असें सांग. ती चागली सोय होती. स्थानिक रीतिरिवाज माहीत ... त्याचा आदरसत्कार मी कधीकधी स्वीकारीं. त्याचा चहा हिरव्या पत्तीचा विना दूध वा साखरेचा असे. तो औषधासारखा कडू लागे. कधीकधी ते विचारीत, "साखर पाहिजे काय?" मीं ती घेई. श्रीमंत घरात दुधाचा प्रश्नच उद्भवत नसे. जपानात चहा वेळीअवेळीं घेतात.

मी शहरात युरोपिअन पद्धतीच्या हॉटेलमध्ये राहीं. तेथील नोकर मुली चहाव दूध किंवा साखर पाहिजे काय म्हणून विचारीत. याना मोडक्यातोडके इंग्रजी येत असे. त्या हसत हसत मधुर व हळू बोलत. त्यांचे कपडे, वेष व वेशभूषा ऐटदार असे व त्या मोकळेपणाने वागत. युरोपिअन हॉटेलमधील खाणें जेवणें युरोपिअन पद्धतीचे असे.

शहर सोडून बाहेर खेड्यात गल्यावर, मी कधीकधी एकदोन दिवस एखाद्या शेतकऱ्याच्या घरीं राहीं. हेतु हा की, ते कसे राहतात, कसे जेवतात, काय जेवतात, वगैरे समजावें. खेड्यात स्नानाची सोय चागली नसते. जवणात भात व मासे हच मुख्य पदार्थ असत. शिवाय कदमुळाची भाजी, कदाच वा कोबळ्या बाबूच लोणचे असे. भाजीपाला नसल्यास भुईमुगाच्या पडीच केलेले एक टिकाऊ खाद्य देत. भुईमुगाच्या पडात फोलपटें नसतात. हा पदार्थ लौकर बिघडत नाही.

जपानी लोक बाबूच्या दोन काड्यानी अन्न उचलून पटापट तोडात टाकतात. मला फार अडचण पडे. सध्याकाळीं पाहिजे असल्यास 'साकी' नावाची तादळा पासून केलेली दारू घेत. साकी आपल्याकडच्या गावठी दारूसारखी असत. आमच्याकडच्याप्रमाणे जपानात उडगी कुत्रीं, माजरे दिसलीं नाहीत.

शहरानील मोठ्या दुकानात माल विकणाऱ्या बायाच असत. टापटीप पोशाखात नटलेल्या असून त्या मोकळ्या मनाने, पण विनयाने वागणाऱ्या दिसल्या. तीच स्थिति शहरातील युरोपिअन पद्धतीच्या खाणावळींतील स्त्रीनोकराची दिसली. या पोरी हसतखेळत आपलीं काम झटपट करीत

चाळीस वर्षापूर्वी सुद्धा शिक्षण सार्वत्रिक होत. मला त्या वेळीं त्याची राहणी गरिबीची असावी असें वाटल. मुलामुलींचीं लग्नें उशिरा होत. तोपर्यंत खालच्या वर्गातील मुली शहरानील मोठ्या दुकानात मालविक्रेत्या म्हणून अगर दुसऱ्याच्या घरीं सैपाक करणे, लहान मुले साभाळणे असलीं कामे करात. लोक प्रामाणिक दिसल. लोकात सहिष्णुता भरपूर आहे. माणस काटक वृत्तीचीं व देशाभिमानी दिसली. प्रथम देश नतर आपण हे त्याच व्रत ब्रह्मदेशातील रणक्षेत्रात दिसून आल. स्वदेशापुढे जपानी लढवय्यानी देहाची पर्वा केली नाही. एरवी सज्जन दिसणाऱ्या जवानानी युद्धकाळीं चिनी स्त्रियाशी वागताना अनन्वित कृत्ये केला म्हणतात. शातंतेच्या काळीं जपानी माणस खरे जीवन जगतात, कसे तरा दिवस कठीत नाहीत. लोक राजाला देवासारखे मानीत.

मी 'ओकिट्सू'स एका शेतकऱ्याच्या घरा दोन दिवस होता. मी त्याच्याकडे गल्यावेळीं तो बाहेरगावीं गला होता. घरीं दोन बाया व दोन लहान मुलं होता मला समजले होतें कीं, तें कुटुब प्रवाशाच्या जेवणाची सोय करते. त्या बायानी दुभाष्यामार्फत सागितलें कीं, "तुम्ही येथे दोन दिवस राहण्यास हरकत नाही." माझा सरकारा मदतनीस दुभाष्या माझी सोय करून परत गेला. या बायाना इंग्रजी

येत नव्हतें, तरी खाणाखुणानी मला काय पाहिजे तें निनक्चरता आणून देत. त्याचें घर स्वच्छ होतें. घरातील दिवसा बसण्याउठण्याची जागा मोकळी करून, रात्रीं या जागीं सरकपडद्याने ल्हान ल्हान खोल्या बनवीत. असल्या खोल्यात कॉट वा पलंग नव्हते. एकावर एक दोन गाद्या टाकून निछाना करीत. पाघरावयास रजई होती व खोलीभर मच्छरदाणी होती. जेवण फार साधें होतें. भात, पाव रोटी, खारी मासळी व एकदोन प्रकारचीं लोणचीं असत. चहात दूध व साखर नसे, पण पाहिजे असल्यास मिळे.

जपान देशात फिरत असताना बरींच प्रेक्षणीय स्थळें पाहिलीं. त्यात टोकिओ, निक्को, नागोया, क्योटो, कोबे, चुझेंशी तलाव, नारा व ओकावे हीं प्रेक्षणीय वाटलीं.

परक्या देशातील लोक हिंदुस्थान पाहावयास आल्यास आग्र्याचा ताज्महाल व वेरूळ-अजिंठ्याचीं लेणीं पाहणारच, तसें जपानात गेल्यावर 'निक्को' पाहिलेच पाहिजे. निक्को येथील बुद्धमंदिर भव्य आहे. तें लाकडी असून त्यावर छत्र्यासारखीं शिखरें आहेत. हा शिखरें आपल्याकडील गोपुरासारखीं अथवा मोठाल्या घुमटासारखीं नसून, ताडाचीं मोठमोठालीं पानें एकावर एक जागोजाग पसरल्यासारखीं दिसतात. मंदिराबाहेर, आपल्याकडील लक्ष्मीनारायणाच्या देवाल्याच्या •दरवाजावरील जयविजयाच्या चित्रासारखे पण फार मोठे लाकडी द्वारपाल उभे आहेत. सर्व इमारतभर लाकडी कोरीव काम भरलें आहे. आपल्या काही देवस्थानात जशा तेहतीस कोटी देवताच्या मूर्ति अगर चित्र मांडून ठेवतात, तशा बुद्धाच्या शेकडों मूर्ति निक्कोच्या मंदिरात मांडल्या आहेत. या लाकडी कोरीव कामावर केलेलें रंगभरीत लाखकाम उठावदार व सुंदर दिसतें. निक्को येथील मंदिरासमोर एका भिंतीवर पुऱ्या आकाराचीं तीन लाकडी माकडें बसविलीं आहेत. एकाने दोन्ही हातानी आपले दोन्ही कान, दुसऱ्याने दोन्ही हातानी डोळे, व तिसऱ्याने आपले ओठ झाकले आहेत. याचा अर्थ, वाईट ऐकू नये, वाईट पाहू नये व वाईट बोलू नये, असा आहे. जवळच एक मोठी, रहाट असलेली विहीर आहे. देऊळ व भोवतीचा आवार नेहमी झाडून व नक्षीकामावरचं व मूर्तीवरचें लाखकाम कपड्याने पुसून स्वच्छ ठेवतात.

स्थानिक शेतकी अधिकाऱ्यांशीं चर्चा करता असे दिसून आलें की, जपानी शेतकी खात्याचें लक्ष कृषिविषयक अर्थशास्त्राकडे जास्त लागलें होतें. या फिरतीमध्ये मला असें आढळून आलें की, जपानी शेतकरी अतिशय मेहनती असून, दोनतीन एकराएवढ्या ल्हानशा क्षेत्रातून आपल्या कुटुंबास पुरेसें धान्य व मुलाच्या शिक्षणासाठी व लत्ताकपड्यासाठी लागणारे पैसेहि तो कमावू शकतो. घराजवळ किंवा बागत कोंबडीं, डुकरें व मधमाशाचीं पोळीं ठेवण्याची सोय केलेली असते. जपानमध्ये वनश्री भरपूर असल्याने मधमाश्या पाळणें सोपें असतें. मुलासाठी पऱ्याचीं खेळणीं व पिपाण्या करणें हीं काम घरच्या घरीं मोकळ्या वेळात करतात. माझ्या ल्हानपणीं असलीं जपानी खेळणीं आमच्याकडे येत. त्या काळीं तशीं हलक्या मोलात मिळणारीं खेळणीं येथे होत नसत. मोळासारख्या गवताच्या चपला करणें वगैरे ल्हानसहान

ते रांजणात साठवून ठेवतात. ज्या दिवशीं घरीं भाजीपाला वा कंदमुळें शिजविलीं जात नाहीत त्या दिवशीं भाकरी व भाताबरोबर असल्या गोळ्याचा तोंडी लावण्याकडे उपयोग करतात. हे टिकाऊ खाद्य असे तयार करावयाचें हें व्यवस्थित शिकून आपण जपानी लोकांचें अनुकरण करणें फार उपयुक्त ठरेल.

साधारण मानानें शेकडा ७३ टक्के शेतकऱ्याची जमीन एक 'चो' म्हणजे जवळजवळ दोन एकरापेक्षा जरा कमीच असे. अमेरिकेंत हें प्रमाण १५० एकर, इंग्लंडात ६० एकर व हिंदुस्थानात सुमारें १०-१२ एकर गणलें जातें. शेकडा २५ टक्के शेतकऱ्याची जमीन २ ते २० एकरापर्यंत असे व फक्त एक टक्का शेतकऱ्याची जमीन प्रत्येकी २० एकरापेक्षा जास्त असे. आता कदाचित् या क्षेत्रात फरक पडला असेल. जपानात सर्व हंगामात पुरेसा पाऊस पडत असल्यानें, तिकडचे ओढे-नाले बारमाही वाहतात व तेणेंकरून लहान लहान नवारे घालून आडव्या पाटानें पिकास पाणी देता येतें. हिंदुस्थानच्या मानानें जपानात पाण्याखालची शेती जास्त असल्यानें बागायत पिकें जास्त होतात.

आपल्याकडील शेतकऱ्याच्या मानानें जपानी शेतकरी पिकास खत पुरविण्याच्या बाबतीत फार दक्ष दिसले. जरी त्या देशात गाई बैल व मेंढरें नाहीत व त्यामुळे त्यांना शेणखताचा पुरवठा नसतो तरीसुद्धा आमच्याकडील शेतकऱ्यापेक्षा तिकडचे शेतकरी जास्त सेंद्रिय खत वापरतात. माणसाच्या विष्ठेचा पुरेपूर उपयोग केला जातो. खेड्यातील प्रत्येक शेतकऱ्याच्या घरीं एक शेतखाना व शेतात एक मोठी टाकी बांधलेली असते. शेतखान्यास दोन दारें असतात. एका दारातून आत गेल्यावर ते आपल्या वहाणा तेथे काढून ठेवून तेथे ठेवलेल्या दुसऱ्या वहाणा पायात घालतात व मग दुसऱ्या दारातून शेतखान्यात शिरतात. शेतखान्यातील कोनाड्यात फाटके तुटके कागद अगर तिकडचें मऊ गवत साठवून ठेवलेलें असतें. श्रीमंत लोक टॉयलेट पेपर वापरतात. कोनाड्याच्या खाली एका पाटींत बरीच बारीक माती ठेवलेली असते. आपल्याकडच्याप्रमाणे जपानात शौचानंतर पाणी वापरीत नाहीत. कागद किंवा गवत वापरतात. अशा रीतीनें कागद अगर गवत वापरल्यानंतर बादलींतील मैल्यावर पाटींत ठेवलेली थोडी माती टाकून, माणूस गेल्या दारानें परत बाहेर येतो. मैल्यात पाणी न पडल्यानें व देशहि थंड असल्यानें मैल्यास लौकर घाण सुटत नाही. शिवाय मैल्याच्या बादल्या रोजच्या रोज कावडीनें शहराबाहेर शेतात असलेल्या मैल्याच्या टाकींत ओततात. त्यामुळे घरात शेतखान्याची घाण येत नाही. शेतातील मैल्याच्या टाकींत पाणी टाकून मैला आठ दिवस पिकावा लागतो व मग पिकास फार काळजीपूर्वक घालतात. मैला खत बादलींत काढून घेऊन लाकडाच्या डावीनें, जवळ जवळ प्रत्येक रोपास, थोडें थोडें दिलें जातें. मोठ्या शहराशिवाय जपानात फ्लशिंगचे—आपोआप धुवून जाणारे—शेतखाने दिसले नाहीत. मोठ्या गावातील व लहान शहरातील लोकांच्या शेतखान्यात खेड्यातील शेतखान्याप्रमाणे

कागद मातीचा उपयोग करता यावो, घरवाल्याना शेतखाने साफ करावे लागत नाहीत. जवळपास शेती असलेले शेतकरी नियमाने रोजच्या रोज सकाळी मैल्याच्या बारड्या आपल्या शेतावर नेऊन मैला टाकीत साठवून बारड्या धुवूनपुसून परत आणून ठेवीत घरमालकास त थोडे पैसहि देत. याप्रमाणे मैल्यासारख्या अत्यंत मौल्यवान खताचा जपानी लोक शेतासाठी उपयोग करतात. मैल्याची किंमत *आम्हा भारतवासियास कळत नाही असे नव्हे, पण पिढ्यान्‌पिढ्या मैल्याची* ने आण करणारास आपण कमी दर्जाचा लेखतो शिवाय कोठेहि मलविसर्जन करण्यास आपणास दिक्कत वाटत नाही (वाटत नसे हे वरा खरें). यामुळे हे मौल्यवान खत फुकट जात, इतकेच नव्हे, तर लोकास स्वत मैल्याची वासलात लावण्याची *व त्याना पटेल अशी पद्धत आजवर न निघाल्याने मैला लोकाच्या आरोग्यास* अपायकारक ठरतो. आमच्या देशात जेथे जनतेस पुरेल इतके अन्नधान्य उत्पन्न होत नाही तेथे जर सव मैला शेतात जाईल तर आताच्यापेक्षा दुप्पट पीक निघेल असे माझे मत आहे. आमच्या देशात कोठे कोठे नव्या प्रकारचे, कमी खर्चात बाधता येतात असे, शेतखाने निघाले आहेत पण ते लोकास पटण्यासारखे नाहीत! जर कोणी सर्व मैला उपयोगात येइल अशी सोपी, लोकास पटण्यासारखी, योजना काढील तर त्याला मी फार मोठा लोककल्याण करणारा माणूस समजेन मीसुद्धा या कामीं बरेच प्रयोग केले आहेत विवक्षित परिस्थितींतील कुडुग्रात ते उपयोगी पडतात, पण सव खेड्यास सार्वजनिक अशी पद्धत मलाहि काढता आली नाही जपानी लोक घरादारात व दारापुढे पडलेले कागदाचे कपटे, करकचरा उचलून ते एका खड्डयात साठवितात व त्याचाहि उपयोग शेणखताप्रमाण करतात.

सुमारे सन १८५० पर्यंत जपानात आपल्याकडल्याप्रमाणेच जाती अस्तित्वांत होत्या. पण 'रेस्टोरेशन' नतर (समाजाच्या पुनर्घटनेनंतर) कायद्याने जातिभेद नष्ट करले गेले मी जपानास गल्यावेळींसुद्धा त्याच्यात उचनीचपणा राहिला नव्हता. फक्त 'ईटा' नावाच्या एका वर्गाला कमी लेखल जात असे पण उदारमतवादी माणसे त्यानासुद्धा बरोबराने वागवीत. इंटा जातीचे लोक बहुतेक खाटकाचा किंवा चाभाराचा धदा करीत. त्याचा इतर जातींबरोबर बेटीव्यवहार होत नसे

मुलामुलींचीं लग्न ती मोठी झाल्यावरच एकमेकाच्या आवडीने होत रेस्टोरेशन पूर्वी जपानात विधवाविवाहाची चाल नव्हती व घटस्फोट रूढ नव्हता. लग्नाच बधन कायम असे. रेस्टोरेशननतर विधवाविवाह रूढ झाला व स्त्रियाना बरच स्वातंत्र्य *मिळाल. तरुण अविवाहित मुली ऑफिसात किंवा दुसऱ्याच्या घरीं मुल सभाळण्यास* किंवा स्वयपाक करण्यास राहतात किंवा दुसऱ्याच्या दुकानात मालविक्रीचे काम करतात. त्याच्यामध्य नीतिमत्ता कमी असते असे नाही, तथापि काही तरुण मुलाच्या हातून चुका होऊन त्या गरोदर राहिल्या तर त्याचे आईबाप त्याना टाकून देत नाहीत. त्याना परत घरीं घेऊन त्याचीं लग्न करून देऊन त्याना मार्गास लावतात.

जपानी लोक प्रामाणिक दिसले. त्यांच्या घरात व शेतात चोरीमारी बहुतेक होत नसावी. घराला कुलूप घालण्याची वहिवाट नाही. फक्त दाराला कडीच लावतात. जपानी लोकांच्या प्रामाणिकपणाबद्दल मला एक छान अनुभव आला. मी एकदा दुभाष्याबरोबर मॅंडेरिनच्या बागा पाहण्यास गेलो होतो. मॅंडेरिन हे फळ संत्र्यासारखें असते. मी जी मॅंडेरिनची बाग पाहण्यास गेलों ती फळानी ओथंबलेली दिसली. बागेला कुंपण नव्हते अगर राखणीचा माळाहि नव्हता. बागेत कोणी रखवालदार नव्हता व तेथे शेताचा मालक नव्हता. बरोबरच्या दुभाष्यास उद्देशून मीं म्हटलें, "या शेताला कुंपण दिसत नाही, राखणीचा माळा नाही व रखवालदारहि नाही, हे काय?" तो म्हणाला, "पूर्वी देशात उपद्रवी रानजनावरे व हानिकारक पक्षी होते, पण त्यांचे आम्हीं मागेच निर्मूलन केलें. त्याना मारून टाकल्यामुळे आता कुंपणाचे कारण राहिलें नाही." मीं विचारलें, "दुसरीं कोणी माणसे फळे नेत नाहीत काय?" तो उत्तरला, "दुसरे का नेतील? हां! एखादे वेळीं असे होते की जर एखाद्या माणसाबरोबर त्याचे मूल असलें व त्या मुलाने फळ मागितले तर तो एखादें फळ तोडून त्याला देईल, पण गावात गेल्यावर त्या बागेच्या मालकास भेटून सांगेल की, मुलाने मागितल्यावरून मीं एक फळ तोडलें." तसेच मळणीच्या दिवसात शेतात भाताच्या राशी इतस्ततः पडलेल्या दिसल्या. जवळ राखणीस माणूस असेच, असे नाही. एखादी विजेची बत्ती पाण्याने भरलेल्या परातीमध्येच लावून ठेवत. परातींतील पाण्यात थोडे घासलेट तेल टाकल्याने बत्तीवर झेप घालणारे किडे पाण्यात पडून मरतात. यावरून जपानी लोकाचा परस्परावर विश्वास व तेथील सामाजिक नीतिमत्ता हीं दिसून येतात.

जपान देशात बौद्ध धर्माचे, कनफ्यूशियन धर्माचे, सिंतो धर्माचे व खिश्चन धर्माचे अनुयायी आहेत, पण बुद्धधर्मीयांची संख्या मोठी आहे. हिंदुस्थानातील बौद्ध लोकाप्रमाणे तिकडचे बौद्ध लोक निव्वळ शाकाहारी नाहीत. त्यांच्या खाण्यात मांसाहार असतो. सिंतो धर्म निसर्ग- व पूर्वज पूजक आहे. जपानात बौद्ध धर्म येण्यापूर्वी तेथे हाच धर्म होता. हिंदुस्थानातहि आर्यांनी निसर्गोपासना आणली. जपान देशात धर्माच्या बाबतीत व्यक्तिस्वातंत्र्य आहे. धर्म ही बाब व्यक्तिविषयक समजली जात असल्याने, निरनिराळ्या पंथातील लोकात लग्नसंबंध होतात. नवरा बुद्धधर्मीय असला तरी त्याची बायको खिश्चन असू शकते. पुढे असल्या दांपत्याच्या मुलानी त्याना वाटेल तो धर्म स्वीकारावा.

प्रत्येक गावात एक तरी देऊळ (बुद्धमंदिर) असतेंच. मंदिरें गावाजवळ उथळ टेकडीवरील बागेत असतात. असलीं टेकडीवरील बागेतील मंदिरें पाहून मला कोल्हापूरच्या पश्चिमभागात (मावळात) गावाबाहेर उंचवट्यावर असलेल्या राईतील देवळाची आठवण झाली. या राईतील झाड कोणी तोडावयाचें नसतें. तेणेकरून देवळाच्या परिसरांत उंच उंच गेलेल्या झाडाची दाटी असते व त्याचेखाली गर्द

मावली असते. जपानमधील लाकडी बुद्धमंदिरात बुद्धाच्या निरनिराळ्या अवस्थेच्या निदर्शक ल्हानमोठ्या मूर्ति असतात. बहुतेक मंदिराच्या आवारात विहीर असते. विहिरीवर रहाट उभारून त्यास दोर व पोऱ्या बांधतात. देवालयात ल्हानमोठ्या घंटा असतात. निरनिराळ्या मोठ्या देवळांत मोठाल्या घंटा असतात. त्यातील काहींकाहींचा व्यास व उंची चार ते सहा सात फूट असू शकते. असली घंटा मंडपात एखाद्या लाकडी तुळईस बांधून ठेवलेली असते. असली अजस्र घंटा वाजविण्यासाठी घंटेजवळ एक चार ते सहा सात फूट लांब व आठ-नऊ चौरस इंच जाडीची लाकडी तुळई घंटेप्रमाणेच दालनाच्या वरच्या तुळईस दोन जागीं दोरखंडाने वा साखळीने बांधून आडवी लोंबत ठेवलेली असते. तिला झोका दिला म्हणजे ती घंटेवर आपटते व तिच्यांतून मोठा गंभीरसा आवाज निघतो. देवळांत घंटांबरोबर मोठाले नगारे, ढोल व झांजाहि असतात. प्रत्येक घरात देव्हारा असून त्यात बुद्धाच्या मूर्ति असतात. देव्हाऱ्यात जपानी बादशहाची प्रतिमा असते जपानी लोक बादशहाला देवासारखा मानतात. देव्हाऱ्यातील व देवळांतील मूर्तींना फुलें वाहतात, धूप दीपाने ओवाळतात व त्यास अन्नाचा व दारूचाहि नैवेद्य दाखवितात. मोठ्या देवळांतून रात्रंदिवस दिवा (नंदादीप) तेवत ठेवलेला असतो बहुतेक देवळांभोवती बागा दिसल्या.

जपान देशात विशेषकरून मोठ्या शहरात गैशा नावाचा एक ल्हानसा स्त्रीवर्ग आहे. गैशाची जात म्हणून नाही. काही तरुण मुली काही दिवस गैशाचा पेशा घेतात. गैशा म्हणजे वारांगना नव्हेत. गैशाचा धंदा करण्यापूर्वी, त्याचे बौद्धिक शिक्षण, कला कुसरीची माहिती, रसग्रहण करण्याइतकी साहित्याची माहिती, काव्यशास्त्रविनोद अवगत असावा लागतो. त्याचप्रमाणे वेशभूषा, केशभूषा करता यावी लागते. बसावें कसे, उठावें कसे, उत्थापन द्यावें कसें, नमस्कार करावा कसा, यात प्राचीण्य संपादन करावें लागतें. चार नामांकित गैशाच्या बैठकांस विद्वान् व उमराव येत व तेसुद्धा आपल्या कोटिबाज भाषणाने त्या गैशाच्या चर्येवर हास्याची लकेर आणण्याचा प्रयत्न करीत. गैशा काही वर्षें गैशाचे काम केल्यावर लग्न करू शकतात. गैशा होणे कमीपणाचे मानीत नाहीत. आपल्या देशात सुशिक्षित समाजात ज्याप्रमाणे संगीत अगर उत्तम गायकी करणे वा सिनेमानटी म्हणून काम करणे यासारखाच हा पेशा दिसतो जपानी भाषा व गैशाचें कलानैपुण्य याची माहिती नसल्याने आपला अरसिकपणा रसिक लोकांपुढे दाखवणें मला बरें वाटले नाही व मी असल्या बैठकींस गेलों नाहीं एखाद्या सधन गृहस्थाकडे कोणी देशी, परदेशी रसिक पाहुणा आला तर तो एक अगर दोन गैशास बोलावून, त्यांच्याकडून पाहुण्यास चहा देईल व एखादं गाणं ऐकवील.

घरें लाकडाच्या फळ्यांचीं दिसलीं. छपरावर कौलं नव्हतीं. कौलांऐवजी गवताच्या तट्या दिसल्या. घरातील दालनें मोठीं असत, त्यात कागदाच्या

पडद्यानें खोल्या बनविता येत. हे पडदे दिवसा सरकवून अगर काढून ठेवून ता दालनें बसण्याउठण्याच्या उपयोगीं येतात. घरातील जमिनी आपल्याकडच्याप्रमाणे शेणाने सारवीत नसत. मातीचा चिखल करून, जमीन ओलेपणीं चोपण्याने चांगली बडवून ती सुकत आल्यावर गुळगुळीतशा गोट्याने (दगडाने) अगर समुद्रातील गोल गुळगुळीत शंखाने घोटून तकतकीत करतात. घराभोवती ल्हानशी बाग असते. जपानमधील गरिबाच्या झोपडींत सुद्धा एखादे बाजूचें केलेले टेबल, खुर्च्या व स्टुलें ही असावयाचीं. घरात बैठकीस गवताच्या चटया होत्या. कोनाड्यात घड्याळ व कपाटात चिनीमातीचीं भांडीं, कपबशा, प्लेटी वगैरे व्यवस्थित मांडून ठेवलेल्या असत. खेड्यात बरेच ठिकाणीं हा लाकडीं घरें फूटदीडफुटी बांबूच्या टेंगण्याशा माळ्यावर उभारलेलीं दिसलं, पण त्यातसुद्धा थोडेंफार फर्निचर असेच. तेथील माणसे घरात गवताच्या चपला वापरीत. शेतातील कामाच्या वेळीं लाकडी वहाणा वापरताना दिसल्या. मी गल्यावेळींसुद्धा तेथे विजेचे दिवे व टेलिफोन होते. खिवारात (वहितीच्या जमिनींत) सुद्धा लहान, अरुद रस्ते असत, त्यावरून सायकली व रिक्षा जात. घराला कडी कोयंडा असे, पण कुलूप घालीत नसत. बागत भाजीपाला व फळफळावळ करीत. घरात लोखंडी ट्रंका वा लाकडी अगर कातड्याच्या पेट्या दिसल्या नाहीत. त्याऐवजी ल्हानमोठे सन्दू (सदुका) असून त्याना दोरीने बाधून, हासडगाठ मारीत. प्रवासातसुद्धा मला ट्रंका किंवा चामडी पेट्या दिसल्या नाहीत. बरोबर असलेले थोडें सामान सदुकातूनच नेत. सदूक उचलण्यास हाताळी असे.

जपानमध्ये चाळीस वर्षांपूर्वींसुद्धा सक्तीचें शिक्षण होते. मुलेंमुली वर्गात एकत्र बसत. शाळेंत गेल्यावर विद्यार्थी पायातल्या वहाणा काढून नेमून दिलेल्या फडताळाच्या कप्प्यात ठेवीत.

याप्रमाणे जपानमधील प्रवास मोठा उद्बोधक व स्फूर्तिदायक असा झाला. एकदरीत जपानी लोक अत्यत मेहनती, साध्य असलेल्या साधनसपत्तीचा पुरा उपयोग करून घेणारे, सादर्याची आवड असणारे, आदरशील व निसर्गाची मनोभावे उपासना करणारे दिसून आले.

जपानचें 'कोब' बदर ता० ५ सप्टेंबर रोजी सोडल. ता० ८ रोजी आमची बोट शाघायला थाबली. या बदरात चिनी मवाल्याच्या तावडींत सापडण्याचा प्रसग आला होता. ता असा आमचं जहाज शाघाय बदरात सातआठ तास थाबणार होतें, हें समजताच इतर काही प्रवाशाबरोबर मीहि कपनीच्या लॉचमधून शहर पाहण्यास गलो होतो. बदरातून बोटीकडे परत जाणारी लॉच मला गाठता आली नाही. दहापधरा मिनिटे उशीर झाला. या अडचणींत जहाज चुकू नये म्हणून मीं जास्त पैसे देण्याचे कबूल करून एक पडाव ठरविला व निघालो. आमचे जहाज बदरापासून समुद्रात मैल पाऊण मैलावर उभ होत. पडावात दोन वल्हें मारणारे व एक सुकाणू धरणारा व आणखी एक असे चार चिनी होते. अर्ध्या वाटेवर पोचल्यावर त्यांनी पैसे

मागितलें. मी त्याना ठरविलेले पैसे देऊ लागलो. मी एकटा व ते चौघे असल्याने भीति घालून त्यानी माझ्या पैशाचे पाकीट माझ्या हातातून काढून घेतले व ते माझ्या कोटाचे खिसे चाचपू लागले. मी त्याना इंग्रजीतून सांगितलं की या पाकिटा-शिवाय माझ्याजवळ पैसे नाहीत. जहाजाजवळ चला, मी माझ्या केबिनमधून पैसे आणून देतो. वास्तविक माझ्या शर्टच्या आतल्या खिशात सुमारे चारशे रुपयाच्या नोटाचे पुडकं होतं; पण त्याच्या चाचपण्यात ते त्याच्या हाताला लागलं नाही. जहाजाजवळ गेल्यावर त्याना "थांबा, मी केबिनमधून पैसे आणून देतों" असें सांगून शिडीवरून जहाजावर चढलो व निसटलो, आणि मला हायसे वाटले. त्याना जर माझ्या शर्टच्या खिशातील पुडकं मिळालें असतं, तर त्या निर्दय चिन्यानी मला खास समुद्रार्पण केलें असतं. असो; प्राणावर आलेलें संकट खिशातील पाकिटावर गेलं, असें मानून काही वेळ बसून परमेश्वराचे आभार मानले.

शांघायहून आमची बोट फिलिपाइन्स बेटातील मॅनिलास तारीख ११ रोजीं गेली. मॅनिला शहर पाहिलं. मला वाटतं, तेथे बोट एक दिवस थांबली होती. तेथून बोट हाँगकाँगला (चीन) गेली.

हाँगकाँगला मी १६ सप्टेंबर रोजीं पोचलो. हाँगकाँग बंदर चीनच्या आग्नेय किनाऱ्यावरील एका लहानशा द्वीपकल्पावर आहे. ते ब्रिटिशांच्या ताब्यात असून त्याचं महत्त्वाचें लष्करी ठाणं व बंदर आहे. हाँगकाँग पाहण्यास मला बरीच फुरसत मिळाली. शहर एका जवळजवळ उभ्या डोंगराच्या बाजूस, सुमारें तेराशे ते पधराशे फूट उंचीवर, जसं कोंकणात डोंगरावर एकाच्यावर एक शेतं असतात तसं खालून वर पसरत गेलं आहे. शहर मोठं असून त्यातील इमारती सुंदर आहेत. शहराचा देखावा चित्रकाराने कागदावर रेखाटल्यासारखा दिसतो. वऱ्याच उंच भागापर्यंत ट्रॅमने जाता येतं. पुष्कळ लोक दोन माणसानी खांद्यावर घेतलेल्या खुर्चीत बसून जातात.

ह्या शहरावर इंग्रजाचा ताबा असल्याने तेथील पोलिसात पंजाबी शिपायाचा मोठा भरणा होता. तेथे चिनी लोक तर बहुसंख्य होतेच, पण मलायनहि पुष्कळ दिसले. शांघाय व हाँगकाँग किनारे जपानप्रमाणे वृक्षराजींने भरलेले दिसले नाहीत. चिनी लोकांचा वसाहत फार गलिच्छ दिसली. चिन्यांचे, मग ते गरीब असोत, श्रीमंत असोत, कपडे, अन्न व राहणी घाणेरडी दिसली. जपान फार श्रीमंत होता असं जरी वाटलं नव्हतं तरी तेथील लोक जिवापाड श्रम करून अन्न व अंगभर कपडा घातलेले दिसले. ते प्रामाणिक असावेत असं मला वाटलं. चिनी लोक त्या मानाने कंगाल, लबाड व विश्वासघातकी असे दिसले. हाँगकाँगहून आमची बोट सिंगापुरास (मलायास) गेली. तेथून मी दुसऱ्या बोटीने जावास गेलों.

सिंगापुराहून तारीख २१ रोजीं मी जावास जाण्यास निघालों व तारीख २२ रोजीं बटेव्हियास पोचलों. तारीख २४ सप्टेंबर ते १५ ऑक्टोबरपर्यंत मी तो देश फिरून पाहिला. लंडनमधील इंडिया ऑफिसच्या विनंतीवरून जावातील (जावास

ईस्ट इंडिया म्हणत) डच सरकारने मला शेतकी खात्यातील तद्देशीय इग्रजी भाषा जाणणारा अधिकारी दिला होता. तो धर्माने मुसलमान होता व त्याचें उच्च शिक्षण हॉलंडमध्ये झालें होतें. या अधिकाऱ्याचा मला फार उपयोग झाला. जसा हिंदुस्थान इग्रजी अमलाखाली, तसाच जावा डचाच्या अमलाखाली होता. आमच्याकडे निदान मामलेदार व मुन्सफ हिंदी असत; पण जावात भागकारकुनाच्या वरच्या सर्व जागा डच लोकाकडे असत. माझा मदतनीस अधिकारी व मी समदु:खी असल्याने त्याने मला सहानुभूतीने माहिती दिली व तेथील उद्योगधंदे दाखविले. चालीरीति, राज्यकारभार, जमीनधारा-पद्धत समजावून सागितली. डच लोकाचे मळे व साखर-कारखाने दाखविले. डच लोक इग्रजासारखे लोकाशीं तुटून राहात नव्हते. ते स्थानिक लोकात मोकळ्या मनाने मिसळत. इतकेंच काय, डच लोक दुपारचें जेवण जावाच्या पद्धतीचे घेत व रात्रीचें जेवण युरोपियन पद्धतीचें असे. बहुतेक डच लोक जावातील भाषा चागली जाणत. जरी साखरकारखाने, रबर व चहाचे मळे हे डच लोकाच्या मालकीचे होते, तरी सरकारने कायदे करून स्थानिक लोकाना तादूळ भरपूर कसा मिळेल याची सोय केली होती. याचा अर्थ त्याना जिवत ठेवण्यासाठी ताक ठेवून सर्व मलई आपण घेत.

मी सन १९१२त इजिप्तमधे थोडे दिवस होतों तेव्हा व सन १९२२त जावामधे फिरत होतो तेव्हा मला वाटे, आम्ही हिंदी लोकच राजकारणात बरे. या इजिप्त व जावामधील मुसलमान लोकाना काय समजणार? पण आता तेसुद्धा आमच्या मागे राहिलेले नाहीत. सधि मिळाली म्हणजे कोणताहि समाज पुढे येतोच. इजिप्तचा नासर किंवा जावाचा सुकार्नो, काय आमच्या पडित नेहरूपेक्षा कमी आहेत? कदाचित् ते काकणभर जास्तच राजकारणी पुरुष आहेत असे म्हणता येईल. असो.

जावाच्या इतिहासाकडे पाहता असें दिसून येतें की फार प्राचीन काळीं, सुमारें पचवीसशे वर्षांपूर्वी, हिंदुस्थानातून तामीळ लोकाची एक मोठी टोळी मलाया व जावाकडे गेली व तेथे त्यानी हिंदु साम्राज्य स्थापिलें. आजसुद्धा जावामध्यें त्याच्या भाषेत रामायण महाभारत ग्रथ आहेत. त्याना जरी पुढे सक्तीने मुसलमान करण्यात आलें, तरी जावातील राहणी व सस्कृति पुरेपूर हिंदु दिसते. मी जावास गेल्यावेळीं (सन १९२२ सालीं) सुद्धा आमच्या जुन्या रामावतारासारखीं 'अलक्कूर'चीं नाटकें मला तेथे पाहावयास मिळालीं. त्यात गणपति, रावण, कुभकर्ण दिसले. जशीं सन १९४७ पूर्वी आपल्या देशात ल्हानल्हान राज्यें होतीं, तशीं डचाच्या आधिपत्याखाली जावातहि ल्हानल्हान राज्यें होतीं. राजे आपल्या गावाहून रेल्वेने दुसऱ्या गावास निघाले म्हणजे स्टेशनपर्यंत ताशे, शिंग बरोबर घेऊन वाजतगाजत जात.

हिंदुस्थानात ज्या वेळीं, सुमारें आठशे-नऊशे वर्षांपूर्वी, मुसलमान लोकाची धाड आली तशीच धाड जावातहि गेली. फरक एवढाच की हिंदुस्थान एकजात

मुसल्मान झाला नाही; योड्या लोकांना सक्तीचें धर्मांतर करावें लागलें. पण जावात शिरलेल्या मुसल्मान टोळीनें फार अत्याचार केले व हिंदूंच्या धर्मभोळेपणाचा फायदा घेऊन पुरा जावा मुस्लीम बनविला. ह्या अत्याचारांच्या वेळीं जावाजवळचें बाली बेट सुटून वाचलें; तें आजहि हिंदुधर्मीय आहे.

इतिहाससंशोधकांच्या मतें इसवी सनाच्या तेराव्या शतकांत अरबस्तान व इराणमधील व्यापारी जावास जाऊं-येऊं लागले. जावांतील हिंदु राज्याचा ऱ्हास झाला आणि हिंदुधर्मीयांची केविलवाणी स्थिति झाली. शेवटचा हिंदु राजा मोजो-पाहित याला आपलें जीवन लज्जास्पद वाटूं लागलें व शेवटीं त्यानें आत्महत्या केली. नंतर त्याच्या मुलग्यानें जावांतील नामांकित शिल्पकार, चित्रकार, गवई, विद्वान व पक्षरी कलावंत यांस बरोबर घेऊन जावा सोडलें आणि बाली बेटावर तो स्थायिक झाला. जावांत मुसल्मान नव्हते राहिलेल्या लोकांनी हिंदु देवाळ्यांची फारशी मोडतोड केली नाही. मात्र देवळांच्या मशिदी व शाळा केल्या व देवळांतील मूर्ति त्या त्या मशिदीभोंवार उभ्या केल्या. घरांतील जुन्या हिंदु मूर्ति घराबाहेर अंगणा मोंवती कोठें कोठें दिसतात. जावा देश जरी मद्रास प्रांतातील, तामीळनाडपासून सुमारें हजार दीड हजार मैल दूर असला तरी मी तेथें गेलों त्या वेळीं जावांतील लोक धर्माची बाब सोडल्यास दक्षिण हिंदुस्थानातील तामीळ लोकांसारखे दिसले. त्यांच्या राहणींत व रीतिरिवाजांत फरक दिसला नाही. त्यांचें जेवणखाण, पानसुपारी, तसेंच प्रातःकाळीं लुंगी गुंडाळून, हातांत तांब्या घेऊन गावाबाहेर ओढ्यानाल्यांत प्रातर्विधि उरकणें, ढुंगण धुणें, विडे चघळून पाहिजे तेथें पिंका टाकणें, उघड्यावर आंघोळ करणें, भात रसम् तामीळनाडप्रमाणे 'बरनर' कालवून खाणें, हें सारखें दिसलें.

हिंदुस्थानांतील मुसल्मानांप्रमाणे जावांतील मुसल्मानांत दाढी राखण्याची प्रथा दिसली नाही. गोशाहि दिसला नाही. तेथील मौलवी कुराण फक्त वाचू शकत, पण फारच थोड्यांना कुराणाचा अर्थ समजे. एकंदरीत जावांतील मुसल्मान आमच्याकडच्या मुसल्मानांप्रमाणे कडवे दिसले नाहीत.

मी जावांत असतांना, तेथें मुख्य धर्म इस्लाम होता. काही खिश्चन व थोडे हिंदु होते. मुख्य भाषा जावानीज. डच लोकांनी लिपि मात्र रोमन केली.

आपल्या पुराणांतील मंदिरांचीं व देवतांचीं नांवें जावांत दिसून येतात. मी तेथें गेल्यावेळीं जसें हिंदुस्थानात इंग्रजांचें राज्य होतें, तसें जावांत डचांचें राज्य होतें. राजधानी 'जकार्ता' (हे जयकर्ता याचा अपभ्रंश असेल). इंडोनेशियाचें राजचिन्ह गरुड आहे. (गरुड हें विष्णूचें वाहन आपण समजतों.) आपण जसें सभेंत भाषणाच्या सुरुवातीस 'बंधु भगिनींनो' म्हणतों तसें जावांत 'सौदरा, सौदरा' म्हणजे सहोदर, सहोदरी म्हणत. एका पर्वताचें नांव 'तरुणगिरी' होतें. धर्म मुसल्मानी असला तरी माणसांचीं नांवें सुकाना (शिवकर्ण), सूर्यधर्मो, महाबाहो व मेघवती अशीं दिसून आलीं. तेथें प्रमानद हें हिंदूंचें व बरोबडोर (बडा बुद्ध) हें बुद्धाचें, अशीं देवालयें आहेत.

जावा देशाचा पश्चिम भाग डोंगराळ दिसला. तेथें सुदानी लोकांची वस्ती जास्त होती. या भागातील स्त्रियांचे कपडे रंगीबेरंगी दिसले. हें हॉलंडचें अनुकरण असावें. पूर्व जावा पश्चिम जावाच्या मानाने सपाट आहे. या भागातील स्त्रियांचे कपडे एकरंगी काळसर रंगाचे दिसले. जावातील माणसांचे चेहरे किंचित् नकटे दिसले. जावातील स्त्रिया कामाच्या वेळीं आपलीं मुलें एका कपड्याच्या झोळींत निजवून झोळी अशा रीतीने एका खांद्यावर बांधतात की मूल दुसऱ्या बगलेंत येतें. अगर झोळी पाठीवर बांधतात. इथल्या लहान लहान डोंगरांवर रबर, चहा, कॉफी, कोयनेल, कोको व गवती चहाच्या लागवडी दिसल्या. शिवाय कॅपॉक(सावर)चीं मोठालीं झाडें दिसलीं. त्याचप्रमाणे डोंगराच्या खालीं नारळ व सुपारीचे मळे आहेत. मुख्य पीक भाताचें. भाताच्या शेतात माशांची पैदास मोठ्या प्रमाणावर होते. जावातील शेतकीखातें माशांचें बी (लहान पिलें, पाहिजेत त्या वयाचीं म्हणा किंवा आकाराचीं म्हणा) शेतकऱ्यास थोड्या किंमतींत पुरवतें. ह्या लहानमोठ्या पिलांच्या निरनिराळ्या आकाराची प्रतवारी करण्याची पद्धत साधी पण मनोरंजक आहे. मीं माशांचें एक ब्रीडिंग (निपज) फार्म पाहिलें. पाण्याच्या प्रवाहाजवळ एक उथळ कृत्रिम पण मोठा हौद करतात. त्यात एका बाजूने पाणी येत असतें व दुसऱ्या बाजूने बाहेर जात असत. या हौदात मध्ये मध्ये निरनिराळ्या आकाराच्या जाळ्या (चाळणीदारच्या) पक्क्या उभ्या बसविलेल्या असतात. असे केल्याने मोठीं पिलें खालीं जाऊ शकत नाहीत. अशा पाचसहा चाळण्यांनी पाचसहा प्रतीचीं पिलें मिळू शकतात. आपण जसे भाताचें अगर जोंधळ्याचें बी निवडून घेतों तसेंच माशांचें बी (माशांची पिलें) पाहिजे त्या आकाराचें, पाहिजे तितकें मिळू शकतें. शेतकी खात्याशिवाय कांही शेतकरासुद्धा माशांचें बी पुरवितात.

शेतकरी लोक हें बी विकत घेऊन आपलें भाताचें पीक लहान असतांच त्यांतील पाण्यात सोडतात. भाताच्या वाफ्यात पाणी धरावेंच लागतें. दोनतीन महिन्यात चार पांच इंच लांबीचे मासे होतात. भात कापताना धरलेल्या पाण्यातील बरेच पाणी बाहेर सोडून, कापणी झाल्यावर बाकीचें पाणी सोडताना खोंडाने व चेपाने हे मासे धरता येतात. शिवाय मधूनमधून घरच्या खपासाठीहि हे शेतांतील मासे धरतात. माशांना चारीसाठी म्हणून शिजलेला भात व सरकट वाफ्यातील पाण्यात टाकतात.

माळरानाऊ रानात शेताजवळ, उंचवट्यावर शेतकऱ्यांचीं घरें वा झोपड्या असतात. या भागात नेहमी पाऊस असल्याने रानात चिखल असतो. म्हणून खुंटे पुरून त्यावर एकास एक लागून चिवाट्या (बांबू) घालून, बसण्या उठण्याची जागा व स्वयंपाकासाठी तट्ट्याचा जमीन बनवितात. जुन्या मातीची जमीन असते. या लोकांचे शेतांतले उंचवट्याच्या भाताच्या वाफ्याच्या फेऱ्यात घराप्रमाणेच सुंदर दिसत असत. मत्स्यसंवर्धन भातात धरलेल्या पाण्यातच होते. माशांत ही विशेष आवडते; शिवाय भाताच्या शिवाय पिकें ज्यास्त मिळतात. नाचणे मात्र

दिसळ नाहीत, ल्हानल्हान रेडे व म्हशी पुष्कळ* दिसल्या; ह्या म्हशी रेड्याचा उपयोग भातशेती नांगरून चिखल करण्यासाठी करतात

डच लोकांच्या चहा, कॉफी व कोकोच्या मळ्यात जावातील रहिवाश्यांना भरपूर काम मिळे. डच लोक भातशेती करीत नसत. पुढे मी कडेरी भागात गेलों व तसाच पुढे पूर्वभागात उसाचे मळे व साखरकारखाने पाहण्यास गेलों उसाच्या अनेक जाती डच मळेवाल्यानी पैदा केल्या होत्या त्याचे साखरकारखान शास्त्रीय पद्धतीने चालत.

डच मळेवाले उसाच पीक मोठ्या प्रमाणावर करीत जेथ कोरड रान असे, तेथे यांत्रिक शक्तीने रान नांगरीत व सऱ्या पाडीत, पण जेथ दलदल असे तेथ हाताने तीन साडेतीन फुटांवर खोल पाट काढून शेतांतील पाणी काढण्याची सोय करीत पाट खणताना माती निघते, ती दोन पाटाच्या मध्ये रचीत व त्यावर उसाचें बी (कांड्या) लावीत जावांत पाऊस भरपूर असल्याने उसास आमच्यासारखे आठदहा दिवसास पाणी द्यावें लागत नाही. जरूर पडली तर पाटातील निचऱ्याचें पाणी ल्हान बकेटांनी उसाच्या सऱ्यावर टाकतात जेथ कोरडें रान आहे तेथे ल्हानल्हान कनाल्च्या पाटाचें पाणी किंवा नाशिक जिल्ह्याप्रमाणे बंधाऱ्याच पाणी देत उसास कृत्रिम खत फार देत जावांत साखरेचे मोठाले कारखाने असल्याने, त्या वेळीं जावाची हजारो टन साखर हिंदुस्थानात आयात होई जावातील डोंगराळ भागात स्थानिक लोक आमच्याकडच्या डोंगराळ भागाप्रमाणे थोडाथोडा ऊस लावून त्याचा गूळ करीत. त्यांचे घाणे थेट आमच्याकडील लाकडी घाण्यासारखे होते. प्राचीन काळीं दक्षिण हिंदुस्थानातील तामीळ लोकांनी तिकडे जाऊन सुरू केलेल्या पद्धति मी जावास गेलों त्या वेळींहि पाहिल्या जावांत असताना मी दक्षिण हिंदुस्थानातील पश्चिम किनाऱ्यावर फिरतो आहें असे वाटे. जावातील जेवणसुद्धा तामीळ लोकांप्रमाणे असे. पानाचे विडेहि मिळत.

*जावातील शुगरकेन ब्रीडिंग (उसाच्या जाती निर्माण करण्याचें काम) त्या काळीं* सुद्धा शास्त्रशुद्ध होतें साखरकारखाने तर उत्तम होतेच होते मीं जावांतून उसाच्या काही जाती बरोबर आणल्या होत्या व दोनतीन जाती हवाईहून मागविल्या होत्या जावाच्या दोन व हवाईची एक जात चांगली निघाली होती. जावाच्या पूर्व भागातील समारांग पाहून पुढे 'सेरेनिया' बंदराहून ता० १५ ऑक्टोबर रोजीं जावा सोडलं. जावातील प्रवास सुखाचा व उपयुक्त झाला.

जावाहून परत सिंगापुरास येताना वाटेंत रात्रीं आमच्या बोटीस एस्० ओ० एस्० (एक बिनतारी धोक्याचा संदेश) दुसऱ्या बोटीवरून आला. त्यात ती बोट फार अडचणींत आहे, लौकर मदतीस धावा, असे होत त्या बोटीने आपली नक्की जागा, अक्षांश रेखांश देऊन कळवली असावी ती बोट कोठे व किती अंतरावर आहे हें आमच्या बोटीच्या कॅप्टनने अजमावून अमुक तासात येतो असा बिनतारी संदेश दिला.

त्याचप्रमाणे सिंगापुरास वेळेवर येता येणार नाही असा संदेशहि धाडला. लागलीच आमची बोट माग वळली. अडचणींत असलेली बोट (जहाज) सुमारे तीनशे मैलावर असावी. आमची बोट अगदी अचूक त्या बोटीनजळ सुमार १०० ते २०० फुटावर गली. अफाट सागरात नेमक्या ठिकाणीं ठराविक वेळेत जाणे याबद्दल मला अचंबा वाटला. अडचणींत पडलेल्या त्या बोटींत लहान पडावाने आमचा कॅप्टन गला ती बोट चालू शकत नव्हती, पण धोक्यात नव्हती. त्या बोटींत अन्न, पाणी व विजेचा पुरवठा भरपूर होता. मग अडचणींतील बोटीचा एक अधिकारी बरोबर घेऊन आमची बोट परत सिंगापुरास निघाली. तेथून या अडचणींतील बोटीसाठी मदत गली असावी.

मधल्या खोळंब्यामुळे आमची बोट सिंगापुरास उशिरा पोचली. मला वाटतं, बोट तेथ एक दिवस थांबली असावी. सिंगापुरातील प्रसिद्ध बुद्ध देवालय व बोटॅनिकल गार्डन पाहिली सिंगापुराहून लंका सहा दिवसाच्या टप्प्यावर आहे. कोलंबोस (लंका) पोचलो, तेथून थोड्याच अवधात आमची बोट माझ्या जन्मभूमींतील रामेश्वरास पोचली.

रामेश्वराचे दर्शन घेऊन पुण्यास निघालो. वाटेत गदग व धारवाड येथे मराठा समाजाने हारतुरे दिले. पुढे मिरजेस कोल्हापुरातील मराठा बोर्डिंगचे सुपरिंटेंडंट बाबासाहेब डफळे व काही मुलं हारतुरे घेऊन आलीं होतीं. मी पुण्यास गलो व माझा प्रवास संपला.

पुण्यास जाऊन कामावर रूजू झालो तेथे चार दिवसाची रजा घेऊन कोल्हापुरास गलो रावबहादूर शंकरराव इंदुलकर व काही मंडळी स्टेशनवर आली होती. शंकररावाच्याकडे सामान टाकून पंचगंगेवर, महाराजाच्या देवळाच्या आवारात जेथे राजर्षि श्रीशाहूछत्रपतींचे दहन थोड्या दिवसापूर्वी केलं होतें, त्या पवित्र भूमीवर फुलं वाहिली व विनम्रपणे त्या महात्म्याचे आत्म्यास नमस्कार केला. जड अंतःकरणाने रावबहादूर इंदुलकराच्या घरीं परत आलों व थोडा वेळ थांबून वडगावास गलो

प्रथम देवळात जाऊन देवाचें दर्शन घतल व घरा जाऊन आइचे चरणीं मस्तक ठेवल. मी दीड वर्षाने सुखरूप आलेला पाहून तिने आनंदाने माझ्या डोक्यावर दोन्ही हात ठेवून "औक्षवंत हो" असा आशीर्वाद दिला. गावातील आप्तेष्टांस भेटलों. वरळगावच्या गावचे नातलग आले होते. एकच दिवस राहून परत पुण्यास गलों मी तेथ पोचण्यापूर्वी मुंबईचे स्नेही कै० रावबहादूर रामचंद्रराव वंडेकर व रावसाहेब राणे वगैरे मंडळीचे पत्र येऊन पडल होतें. दुसऱ्याच रविवारी त्यानी पानसुपारीची तारीख ठरवून आमंत्रणेंहि पाठवलीं होतीं त्याप्रमाणे मुंबईस गलों. मुंबईकर मराठ्यानी पानसुपारीचा मोठा समारंभ केला होता. त्या काळीं मराठ्यामध्ये चालणी ए होती त्या वळच्या स्मृती आजहि सुखदायक वाटतात

# इंग्रज लोकांबद्दल माझे अनुभव



हिंदुस्थान देश हस्तगत केल्यावर धोरणी इग्रजानी ज्या योजना केल्या त्या त्याच्या हिताच्या दृष्टीने फार महत्त्वाच्या होत्या. सन १८५७ सालच्या हिंदी लष्करी उठावानतर इग्रज लोक एतद्देशीय लोकाच्या मताला मान देऊ लागले व त्याच्या हिताकडे पाहू लागले. हिंदुस्थानात जाती व धर्म अनेक असल्याचें ओळखून त्यानी मुत्सद्दीपणाने हिंदु मुसल्मानात व हिंदूतील जातीजातींत मतभेद होतील अस आपलें छुप वर्तन ठेविलें. "अल्पसंख्य समाजाला उत्तेजन देणें" या वरवर रास्त दिसणाऱ्या मताच्या पडद्याआड्न इग्रजानी अल्पसख्याक व बहुसख्याक समाजामध्ये तेढीचें बीज पेरलें. अगदी अलीकडे (सन १९०६ त) सुद्धा शेतीच्या परीक्षत तिसऱ्या क्लासमध्ये पास होणाऱ्या मुसल्मान व लिंगायत विद्यार्थ्यांना एकदम डेप्युटी कलेक्टरच्या जागा दिल्याचें मला माहीत आहे. अशाच पद्धतीने ब्राह्मण ब्राह्मणेतर वाद उत्पन्न झाला.

सगळे इग्रज सारखे होते असे नाही. काही उदारमतवादीहि असत. या देशातील काही प्रश्नावर ह्याच्यात मतभेद असले तरी ते आमच्या लक्षात येईल अशा रीतीने एकमेकाचे मतभेद बोलून दाखवीत नसत.

पण इग्रजाच्या योजनात मुख्य भाग त्याच्या साम्राज्याचा रक्षणाचा दिसे. दिल्ली-आग्रा ट्रकरोड व त्यावरील पूल बाधणे यात लष्कराच्या नेआणीचा मुख्य हेतु होता. रेल्वेत सुद्धा संडासात बदुकी उभ्या करुन ठेवण्याची तज्वीज होती. तिसऱ्या वर्गाचे काही डब्बे अँग्लोइडियनासाठी राखून ठेवलेले असत.

माझ्या नोकरीच्या सुरुवातील जे इग्रज हिंदुस्थानात अधिकारावर येत असत, ते चागल्या खानदानीचे असून बरेच दिलदार असत. त्याचे पगार जरी चागले असले तरी ते निव्वळ पैसे मिळविण्याकरताच येत असत असे मला वाटत नाही. ते

राज्य करण्याकरिता व आपल्या देशाचा व्यापार वाढवून त्याची सांपत्तिक स्थिति सुधारण्यासाठी येत असत. इंग्रज अधिकारी फारशी पैशाची बचत करून स्वदेशी पाठवीत असत असें मला वाटत नाही. अर्थात् ते विलायतेहून पैसे आणून येथ खर्च करीत, असें नव्हे; त्याचा पगार व भत्ता त्याच्या राहणीस पुरेसा होता. रेव्हेन्यू खात्यात असिस्टंट कलेक्टर म्हणून त्याना सुरुवातीस दरमहा तीनशे रुपये तनखा मिळे; पण त्याचा खर्चहि मोठा असे. त्याना स्वाराचे दोन घोडे ठेवावे लागत. एक स्वयपाकी, बटलर, छोकरा, घोड्यावरचे दोन सईस, एक मेहतर व एक धोबी, मुलेबाळें असल्यास एक आया, इतका लवाज्मा ठेवावा लागे. त्या वाळी आताच्याप्रमाणे मोटारींतून जाऊन लागलीच परत येण्याची सोय व परिपाठ नसल्याने लाब्च्या प्रवासाच्या वेळीं एक तबू, ऑफिसचे एकदोन कारकून व बटलर किंवा स्वयपाकी असा लवाज्मा सुमारें पधरा मैलावर साहेबाच्या मुक्कामावर आगाऊ एक दिवस पाठवावा लागे. मुक्कामाच्या जागीं रहदारीबगला नसल्यास ऑफिसचे लोक एखाद्या राईत तबू ठोकीत. स्वतः साहेब व त्याची मड्डम असल्यास ती घोड्यावरून सकाळीं पहिल्या मुक्कामाहून निघून, दुपारीं दहाचे आत दुसऱ्या मुक्कामाच्या ठिकाणीं पोचत. तथे कमींत कमी एक दिवस तरी मुक्काम करात. तेथ तपासणीचें काम चालू असताना दुसरा तबू पुढे सुमारें पधरा मैलावर जाऊन लागे. मुक्कामाच्या जागीं हे अधिकारी गावकऱ्याच्या बरोबर गावच्या शिवारात फिरत, पीकपाणी पाहत व रयतेच्या अडीनडी ऐकून घेत. एका मुक्कामाहून दुसऱ्या मुक्कामास जाताना सुद्धा जागोजाग थाबून लोकाशी बोलणेंचालणें करीत व लोकस्थितीचा अभ्यासहि करात.

खानदानीचे इंग्रज अधिकारी आपल्या जेवण्याखाण्याचा बोजा सहसा स्थानिक अधिकाऱ्यावर वा गावकऱ्यावर पडू देत नसत. त्याच्याकडे आलेल्या सामानाचे पैसे ते चुक्ते करीत. सगळेच अधिकारी तसे करात असें नाही. त्यामुळे कधीकधी स्थानिक अधिकाऱ्यावर व गावकामगारावर बोजा पडत असे. मुक्कामावर असताना हे अधिकारी लोकाना भेटण्यास व कामे तपासण्यास हयगय करीत नसत.

सन १९१० साला मी शेतकी इन्स्पेक्टर असताना, एकदा पुण्यापासून कोल्हापूरपर्यंत (सुमारें दीडशे मैल) रस्त्याने आमच्या खात्याचे डायरेक्टर मि० किटिंग याच्याबरोबर गेलो होतों. माझा पगार त्या वेळीं दरमहा शंभर रुपये असेल. मजजवळ घोडा असणं शक्य नव्हतं. मी बरोबर असावा असं साहेबाना वाटे. म्हणून त्यानीच करजखोपच्या आपल्या ओळखीच्या धुमाळाचा घोडा माझ्यासाठी आणून ठेवला होता. त्या ज्या ठिकाणीं आमचा मुक्काम होई, त्या त्या ठिकाणीं स्थानिक अधिकाऱ्यास सागून माझी सोय केली जात असे. सर्व मुक्कामाचीं नावें जरी मला आठवत नसलीं तरी दोनतीन नावें तरी आठवतात, तीं उडतारा, लिंबगावें, सातारा व कासेगाव, हीं होत. सातान्यात मी व साहेब टांग्यातून जात असताना वाटेत एक युरोपियन असिस्टंट सुपरिंटेंडंट ऑफ पोलिस व चार पोलिस शिपाई

एका गाडी अड्डयाजवळ उभे होते. त्याना दोन मोकळ्या गाड्या सामान नेण्यास पाहिजे असल्याने शिपाई गाडीवाल्यांशीं हुज्जत घालीत होते. गाडीवाल्याना परत घरा जावयाचे असल्याने ते म्हणत होते, "साहेब, तुमच्याकडे जाणाऱ्या गाड्या नथा. आम्हाला उलट दिशेने जावयाचें आहे." असिस्टंट सुपरिंटेंडेंटसाहेबानी आपल्या शिपायास नजाविले, "कुछ फिकीर नही. तुम गाडी ले चलो. गाडीवाला नहीं आवा वो मी फिकीर नहीं." गाडीवान सातारा जिल्ह्यातील असल्याने, तो गाडी परत् देईना. शिपायाने बैलास काठी मारताच बैल मागे फिरले व गाडीवानाच्या पायावरून गाडीचे चाक गेले, त्यामुळे त्याच्या पायातून रक्त वाहू लागलें. शिपायाने गाडी नेली. गाडीवाला तेथच बसला होता. असिस्टंट सुपरिंटेंडेंट निघून गेल्यावर स्टिरिंगसाहेबानी टांग्यातून खाली उतरून जवळच्या घरातून पाणी आणून त्या गाडीवाल्याचा चगरलेला पाय धुतला व आपल्याबरोबर जी नेहमी औषधाची पेटी असे त्यातील मलम काढून गाडीवानाची जखम बांधली.

पुढे आम्ही कासेगावास गेलो. तेथ माझ्या वडिलानी माझ्यासाठी घरचे तट्टू व माणूस पाठविला होता; म्हणून धुमाळाचा घोडा त्याच्या गावीं परत पाठविला आणि आमच्या घोड्यावरून मी साहेबाच्या बरोबर कोल्हापुरापर्यंत गेलो. तेथून साहेबास विचारून गावा (वडगावास) जाऊन वडिलाना भेटून परत रेल्वेने पुण्यास जाण्याचें ठरविले. स्टिरिंगसाहेब सरकारी डाकबंगल्यात उतरले. इंग्रज लोकांच्या पद्धतीप्रमाणे त्याना महाराजाना भेटायचें होतें. साहेब म्हणाले, "मी महाराजाना उद्या भेटेन. तुम्ही उद्यापर्यंत येथे राहा व परवा आपल्या गावीं वडिलाना भेटावयास जा. तुम्ही आता शहरात तुमच्या विन्हाडीं जाण्यास हरकत नाही." साहेब महाराजास भेटावयास जाणार हे महाराजाना आगाऊ समजणे इष्ट वाटल्यावरून, मीं महाराजांच्याकडे जाऊन त्याना सांगितले, "आमचे डायरेक्टरसाहेब डाकबंगल्यात उतरले आहेत, ते उद्या आपल्या भेटीस येणार आहेत." हा डाकबंगला संस्थानाचा नसून मुंबई सरकारचा होता. त्यामुळे साहेब येण्याची वर्दी महाराजाना पोचली नव्हती. माझ्या देखतच महाराजानी आपल्या ए० डी० सी० ला बोलावून घेऊन त्याला साहेबाकडे डाकबंगल्यावर पाठविलें व कळविले की, "साहेब गेस्टहाउसमध्ये राहिल्यास महाराजाना आनंद वाटेल. महाराज सध्या राधानगरास कॅपमध्ये राहतात. साहेबानी महाराजाकडे येण्याची तसदी घेऊ नये. महाराज सकाळीं नऊ वाजतां येऊन साहेबास भेटतील." साहेबानी ए० डी० सी० ला सांगितले, "मीं माझा कॅंप डाकबंगल्यात लावला आहे. आपण स्टेट गेस्टहाउसमध्ये काही तयारी करण्याचें कारण नाही. मी आपला आभारी आहें." नंतर ए० डी० सी०ने साहेबाच्या दिमतीस एक घोडागाडी पाठविली. दुसऱ्या दिवशीं महाराज डाकबंगल्यावर साहेबास भेटले त्या वेळीं मी तेथे होताच. माझ्याबद्दल साहेबानी महाराजाजवळ चांगले उद्गार काढिले साहेब व त्याची मडम याना घोड्याच्या रथात घेऊन महाराजानी शहरातून फेरफटका करून

त्याना परत डाकबंगल्यात आणून सोडलें. हुजूरच्या रथाबरोबर दुसऱ्या गाडींतून मी, साहेबाचा पर्सनल क्लार्क व महाराजाचा ए० डी० सी० असे होतों. परत जाताना महाराजानी मला सागितलें, "परत जाण्यापूर्वी मला भेटून जा." दुसऱ्या दिवशीं सकाळीं वाड्यावरील मोठ्या घोडागाडींतून साहेब, त्याची मड्डम व मी सुमारें तेवीस मैलावर माझ्या गावास गेलों. माझे वडील त्या वेळीं ह्यात होते. वडगावास थोडा वेळ थाबून आमचा उसाचा फड पाहिला, घरीं चहा घेतला, मला दोन दिवस घरीं राहून परत पुण्यास जा, असे सागितलें व साहेब परत कोल्हापुरास गेले. कोल्हापुराहून पुढे दक्षिण भागाचे शेतकी इन्स्पेक्टर रावसाहेब मल्हार लिंगो कुळकर्णी हे साहेबाबरोबर होते.

याच्या उलट दुसरी गोष्ट. किटिंगसाहेबाचे असिस्टंट टी० एफ्० मेन हे डेप्युटी डायरेक्टर असताना एकदा पुण्याहून धारवाड फार्म तपासण्यास जाणार होते. ही वर्दी दक्षिण भागाचे डिव्हिजनल इन्स्पेक्टर रावसाहेब मल्हार लिंगो कुळकर्णी याना मिळाली. नेहमीप्रमाणे साहेबासाठी फार्मावर तबू ठोकून रावसाहेब कुळकर्णी साहेबाना घेण्या करिता धारवाड स्टेशनावर गेले होते. पण ठरलेल्या गाडीला मेनसाहेब आले नाहीत म्हणून ते परत फार्मावर येऊन साहेबासाठी दिलेल्या तबूत झोपले. पहाटेच्या सुमारास मेनसाहेब दुसऱ्या गाडीने आले. स्टेशनावर त्याना घेण्यासाठी कोणी माणूस आलेला दिसला नाही म्हणून साहेब भाड्याचा टागा करून फार्मावर गेले. फार्मावरील रखवालदाराला त्यानी आपला तबू दाखविण्यास सागितलें. रखवालदाराने त्याना तबूकडे नेलें, तेथे त्यास रावसाहेब कुळकर्णी तबूत झोपले असल्याचें आढळून आलें. साहेब आल्याचे ऐकून रावसाहेब गडबडीने तबूबाहेर आले व आपण ठरल्या गाडीची वाट पाहून साहेब न आल्यामुळे परत आलों असे बोलून साहेबाची गैरसोय झाल्याबद्दल दिलगिरी व्यक्त केली व साहेबाना तबूत जाण्यास विनती केली. तबूत खुर्च्या व टेबलें होतीं. साहेबाची कॅपकॉट शिपाई तबूत नेत होता तें पाहून साहेब रागावून म्हणाले, "ज्या तबूत नेटिव्ह निजला होता त्यात मी कसा निजणार!" म्हणून तबूच्या बाहेर कॅपकॉट लावून ते झोपले. दुसऱ्या दिवशींसुद्धा ते त्या तबूत झोपले नाहीत.

मलाहि पुढे काही दिवसानी या साहेबाच्या अरेरावीपणाचा अनुभव आला. एकदा मी त्याना भेटावयास त्याच्या बगल्यावर गेलों होतों. नेहमीच्या पद्धतीप्रमाणे मीं माझ्या नावाचें कार्ड शिपायाबरोबर त्याच्याकडे पाठविलें. त्याच्याकडून 'या' किंवा 'आज सवड नाही' असे उत्तर येईना. मीं अर्धा तास वाट पाहिली व शिपायास सागितलें, "मी थाबू की परत जाऊ, असे साहेबास विचारा." तो म्हणाला, "आपण सागण्यापूर्वीच मीं साहेबाना विचारलें, पण ते काहीच बोलले नाहीत." शेवटीं कटाळून मी घरीं आलों. पुढे हेच टी० एफ्० मेन, डॉक्टर मॅनच्या जागीं डायरेक्टर झाले व मी डॉक्टर मॅनसाहेबाच्या जागीं शेतकी कॉलेजचा प्रिन्सिपाल झालों. त्या वेळीं

मी शेतकीविषयक अर्थशास्त्राचा प्रोफेसर असून त्या विषयावर चार पाच पुस्तिका लिहिल्या होत्या. यांत टी० एस्० मेनने त्या प्रसिद्ध केल्या होत्या. त्यांतील एका पुस्तिकेंत त्या वेळीं पुण्याच्या आसपास ऊस, बाजरा व इतर कांही पिकांत निव्वळ नफा होत नसतो असें प्रतिपादन केलें होतें. या संशोधनात दोन तीन वर्षें कांही विद्यार्थीत शिकणी, दरवर्षी अधिकाऱ्यामार्फत आठवड्याच्या आठवड्याला प्रत्यक्ष माहिती घेऊन त्यावरून उपरोक्त प्रतिपादन केलें होतें.

याच सुमारास गुजराथेतील बार्डोली व नाशिक जिल्ह्यातील बागलाण तालुक्यातील शेतकऱ्यांनी शेतसारा डोईजड आहे म्हणून सारा कमी व्हावा असे विनंतीअर्ज सरकारात केले होते. बार्डोलीच्या शेतकऱ्यांचे मागणे बरोबर आहे, असें महात्मा गांधी प्रतिपादन करीत होते. मात्र पुस्तिका त्यांच्या हातां गेली व त्यांनी असा दावा मांडला की तुमच्या खात्यातील शेतकीविषयक अर्थशास्त्राचे प्राध्यापक व शेतकीतज्ज्ञ अधिकारी (रावबहादूर पी० सी० पाटील) हे सुद्धा म्हणतात, "पुण्याच्या कांहीं शेतांत नफा होत नाही." हे लिखाण सुरत जिल्ह्याचे कलेक्टरकडून टी० एस्० मेनकडे आल्यावर त्यांनी मला ऑफिसात बोलावून घेऊन, "हे तुमचे प्रतिपादन बरोबर आहे का?" म्हणून विचारले. मी त्यांना सांगितलें, "अगदी बरोबर आहे. कारण आठवड्याच्या आठवड्यास शेतावर होणारे कामाचे दिवस, त्या वेळची मजुरी, औताच्या बैलाचा व खतामुताचा खर्च, शेतसारा व जमिनीच्या मालकीबद्दलचा खंड, या सर्व बाबी खर्चीं टाकल्या आहेत. येणाऱ्या उत्पन्नाची बाजारभावानें किंमत धरली आहे. संशोधनाच्या काळात धान्याचे व गुळाचे भाव फार कमी होते. त्यामुळे निव्वळ नफा शेतकऱ्यास राहत नाही, हे दिसून आलें." मला त्यांनी विचारलें, "मग शेतकरी जगतो कसा?" मी त्यांना सांगितलें, "त्याची स्वतःची व घरातील इतर माणसांची मजुरी व शेताचा हिशोबी खंड या बाबी, ज्या खर्चांत दाखविल्या आहेत, त्यावरच त्याचा जगणें भाग होतें. त्याला निव्वळ नफा होत नाही." हें माझे विधान त्यांना पटेना किंवा त्यांच्या डोक्यात शिरेना आणि त्यांनी स्वतःच्या जबाबदारीवर माझी पुस्तिका वाटण्याचें किंवा विकण्याचें बंद केलें व हुकुमाची एक प्रत मला पाठविली. मी त्यांना भेटून खुलासा केला की, "मी शास्त्रीय दृष्ट्या संशोधन केलें आहे. आकडेवार माहिती दिली आहे. *माहिती गोळा करणारी माणसें सरकारी अधिकारी होतीं. शिवाय पुस्तक छापण्यासाठी व मी तुमच्याकडे पाठविलें होतें व तुमच्या परवानगीने तें छापलें गेलें आहे.* अशा परिस्थितीत पुस्तक मागें घेणें हें योग्य होणार नाही." त्यांना माझे म्हणणें पटलें नाही. तेव्हा मी त्यांना सांगितलें की, "मला सरकारात याबद्दल दाद मागावी लागेल." त्यांनी सांगितलें, "वाटेल तर तक्रार करा, दाद मागा." इतकें बोलणें झाल्यावर मी या सर्व गोष्टी कागदावर घालून त्यास कळविल्या व कांही दिवस उत्तराची वाट पाहून मुंबई सरकारात तक्रार करून दाद मागितली.

त्या वेळचे शेतकी व मुलकी खात्याचे मंत्री कै० नामदार भास्करराव जाधव यानी आपले सेक्रेटरी मिस्टर बेल यास या प्रकरणाची चौकशी करून रिपोर्ट करण्यास सांगितले. बेलसाहेबानी ती पुस्तिका व माझ्या असिस्टटकडे असलेलें पच रेकॉर्ड, मजुरीचे दर, बाजारभाव, याची पूर्ण चौकशी करुन रिपोर्ट केला की, रावबहादूर पाटील याचेच म्हणणें बरोबर आहे. त्या वेळच्या परिस्थितीत शेतकऱ्यास निव्वळ नफा नसला तरी त्याने केलेल्या कामाचा मजुरी, त्याच्या बैल जनावराची मजुरी व हिशोबीं दाखविलेला खड यावर शेतकऱ्यास जगणें भाग होतें. त्यावर त्या दोघाचा विचारविनिमय होऊन त्यानी हुकूम दिला की, 'रावबहादूर पाटील याचे म्हणणें बरोबर आहे. त्याच्यासारख्या अनुभवी व जुन्या अधिकाऱ्याची प्रसिद्ध झालेली पुस्तिका मागे घेणें हें चुकीचे झाले आहे. म्हणून असे ठरविण्यात येते की टी० एफ० मेन, डायरेक्टर ऑफ ॲग्रिकल्चर, यानी रावबहादूर पाटील याची लेखी माफी मागावी व रावबहादूर यानी तीच पुस्तिका चालू ठेवण्याचा आग्रह धरू नये. त्यानी तीच माहिती व त्यानतर मिळविलेली अधिक माहिती घालून दुसरें पुस्तक तयार करावें. तें पुस्तक सरकार छापून प्रसिद्ध करील." टी० एफ० मेन यानी लेखी माफी मागितली व हें प्रकरण सपल.

त्यानतर मीं नवें पुस्तक लिहिलें व तें सरकारने प्रसिद्ध केले. तथापि माझ्या मनात माझे पुस्तक माग घेतले ही गोष्ट डाचत होती. म्हणून मीं लिहिलेलें नवें पुस्तक व माझीं दुसरीं दोन सशोधनात्मक पुस्तकें डी० एस्सी० (डॉक्टर ऑफ सायन्स) या पदवीसाठी मुंबई विश्वविद्यालयाकडे पाठविलीं. विश्वविद्यालयाने तीन तज्ज्ञ परीक्षक नेमले. त्यापैकी एक आयर्लंडचा, दुसरा स्वित्झर्लंडचा व तिसरा अमेरिकेंतील होता. सर्वानुमते मला डी० एस्सी० डिग्री द्यावी अशी शिफारस झाली. त्याप्रमाणे मला डॉक्टर ऑफ सायन्सची पदवी दिली व मूल मेडल (सुवर्णपदक) बहाल केलें गेलें. त्यापूर्वी मुंबई विश्वविद्यालयात कोणी डी० एस्सी० झाला नव्हता. मीच पहिला डी० एस्सी०. वर उल्लेखिलेली माफीची गोष्ट टी० एफ्० मेनच्या मनास फार लागली. त्यानी अशीच एक चूक आमच्या खात्यातील श्री० बर्कच्या प्रकरणात केली होती. पुढे टी० एफ्० मेन लवकरच पेन्शन घेऊन स्वदेशीं गेले.

मी व टी० एफ्० मेन याच्यामध्ये जरी इतकी ओढाताण झाली तरी इग्रज माणसाचा एक चागला गुण त्यानी मुंबई सोडताना मला जें एक पत्र लिहिलें त्यावरून दिसून येतो. त्या पत्रात त्याचे उद्गार असे होते : "मी कायमचा स्वदेशीं जात आहे. होऊन गेलेल्या गोष्टीबद्दल मला वाईट वाटतें. आपण झाल्या गोष्टी विसरून जाऊ या. खात्यातील तुमच्या कामगिरीबद्दल मी जास्त लिहू इच्छीत नाहीं. कारण माझ्यापेक्षा समर्थ व विद्वान् अधिकाऱ्यानी तुमच्या कामगिरीबद्दल वेळोवेळीं प्रशसोद्गार काढले आहेत."

व त्याना विचारलें, "मी कायम कधी होणार?" ते म्हणाले, "तुम्हास कायम करावें म्हणून मीं मागेच सरकारला लिहिलें आहे. त्याचें उत्तर आलेलें नाही." मीं त्यास विचारलें, "चीफ सेक्रेटरीस मी भेटू का?" ते म्हणाले, "भेटा पाहिज तर. पण मला वाटत, तुम्हाला इतकी घाई करण्याचें कारण नाही. तुम्ही लैकरच कायम व्हाल." पुढे काही दिवसानी मी चीफ सेक्रेटरीस (त्याचें नाव मला आठवत नाही) भेटलों व म्हणालों, "मी बरेच दिवस ॲक्टिंग आहें, कायम कधी होणार?" ते म्हणाले, "तुम्हाला युरोपियनाच्या जागेवर ॲक्टिंग नेमलें त्याबद्दल तुम्ही सरकारचे आभार मानावयाचे सोडून कायम होण्याची अपेक्षा का करता?" मी निराश होऊन घरीं आलो व रागारागाने राजीनामा लिहून आमच्या खात्याचे डायरेक्टर शिटिंग याच्याकडे पाठविला, व त्याच वेळीं किरकोळ रजा घेऊन घरीं राहिलों. शिटिंग साहेबानी किरकोळ रजेचा अर्ज व राजीनामा पाहून मला बोलावून घेतलें व म्हणाले, "मिस्टर पाटील, चीफ सेक्रेटरी हा दुष्ट माणूस नाही, पण जरा रागीट आहे इतकेंच तुम्ही नागा करूं नका. वेळेवर तुम्ही कायम व्हाल." तरीपण माझा राग गेला नाहीं, हे पाहून त्यानी दुसऱ्या दिवशीं मला आपल्याबरोबर गाडींतून लांब फिरावयास नेलें व माझी समजूत घातली व सांगितलं, "तुमचा राजीनामा मी पुढे पाठवीत नाहीं."

आणखी एक उदाहरण. सन १९१३-१४ सालीं मी पूर्वखानदेशांत जळगावास इन्स्पेक्टर होतों. जळगाव येथील मुन्सफाबरोबर रावेरास जाण्यास निघालों. रेल्वेमधे एक शिपायासाठी व एक पुरुषासाठी असे सेकंड क्लासचे डबे होते. आम्ही ज्या डब्यात शिरत होतों त्या डब्यात एक इंग्रज प्रवासी होता. तो आम्हास डब्यात शिरूं देईना. मीं स्टेशनमास्तराकडे तक्रार केली की डब्यात पाच सहा जागा रिकाम्या असून हा युरोपियन प्रवासी आम्हास आत येऊ देत नाही. या डब्यात आम्हास जागा करून द्या. स्टेशनमास्तराचें म्हणणे तो युरोपियन ऐकेना. माझ्या तरुण रक्तास हें पटेना. मीं स्टेशनमास्तरास सांगितलें, "मी या डब्यात बसणार." पण माझे स्नेही मुन्सफ म्हणाले, "पाटीलसाहेब, या उद्दटाशीं गाठ आहे." मी म्हणालों, "हरकत नाहीं." हें पाहून स्टेशनमास्तरांनी आम्हास विनवून सांगितलं की, "मी तुम्हास फर्स्टक्लासमध्ये जागा देतों, पण हा मारामारीचा प्रसग टाळा." मुन्सफानें हि स्टेशनमास्तराच्या विनवणीस दुजोरा दिला. त्यामुळे नाइलाजास्तव आम्हीं फर्स्टक्लासमधून प्रवास केला.

सर्वसाधारणपणें पाहता इंग्रज शीलाने वागले असें म्हणता येईल. इंग्रज अधिकाऱ्यानी हिंदुस्थानातील शिपायांशीं वाइट संबंध ठेवण्याचें कटाक्षाने टाळलें होतें. शेंजार व कांही अपवाद आपण सोडू, तरी त्याचीहि गडबड या देशांतील खालचे हलके समाज, ज्यात धार्मिक मनधात बंधन फारसें नसे, त्यातच चाले. इंग्रज अधिकारी हिंदी शिपायाशीं सौजन्याने वागत. मला कांहीं अपवाद माहीत आहेत. पण त्यातहि त्यांना वरदाराचा जाणीव दिसून येते. पुणे जिल्ह्यांतील बारामतीस सन १९१२च्या सुमारास एका असिस्टंट कलेक्टरचा एका मराठी स्त्रीशीं संबंध असल्याचें ऐकू येई.

पण त्यानेहि तिला चांगलें वागविलें, तिला लहानसें टुमदार घर बांधून दिलें होतें. माझे एक इंग्रज स्नेही धारवार जिल्ह्यात असिस्टंट कलेक्टर होते. तेथे त्याचा एका गोवेकर स्त्रीशीं संबंध होता. पण या ऑफिसरचें लग्न झाल्यावर मात्र आपण त्या गावचेच नव्हत, असे तो वागूं लागला. लक्षात ठेवण्यासारखी गोष्ट म्हणजे या अधिकाऱ्यापासून त्या स्त्रीलीस दोन मुली झाल्या होत्या, त्यांच्या शिक्षणाचा खर्च त्याने देण्याची सोय केली होती. शाळेत असताना त्या मुली आपल्या नावापुढे त्या इंग्रज अधिकाऱ्याचें आडनाव लावीत. बहुतेक इंग्रज अधिकारी दिलदार दिसत. सातारा जिल्ह्यातील करजखोपच्या धुमाळांची एका इंग्रज असिस्टंट कलेक्टराशीं चांगली दोस्ती असे. धुमाळांनीं त्याला वाघाची शिकार करून दिली होती. पुढे तो अधिकारी जेव्हा स्वदेशीं गेला किंवा त्याची बदली दूर जिल्ह्यात झाली, त्या वेळीं त्याने आपला उमदा घोडा व एक बंदूक धुमाळांना बक्षीस दिली होती. धुमाळांचा हा घोडा मीं दहा-बारा दिवस नेला होता.

दुसरा एक इंग्रज कलेक्टर किंवा असिस्टंट कलेक्टर—त्याचें नाव अडरसन असावें—खानदेशांतील जळगावास सुमारें १९१४ सालीं होता. मी त्यावेळीं जळगावास शेतकी खात्याचा इन्स्पेक्टर होतों. आम्ही तेथे असताना जळगावात एक सर्कस आली होती. एके दिवशीं अडरसनच्या पट्टेवाल्याने साहेबाच्या लहान मुलीस फिरावयास घेऊन जातेवेळीं तिला सर्कशींतील जनावरें दाखविण्यास नेलें. सर्कशीच्या कनाउडाजवळ गेल्यावर त्या मुलीने सहज वाघाच्या पिंजऱ्याच्या गजास धरलें. तें शिपायाच्या लक्षात आलें नाही. वाघाने मुलीचा हात ओरबाडून पिंजऱ्यात ओढला, तेव्हा मुलगी ओरडली व शिपायाने तिला मागे ओढली. पण तावर मुलीचा हात चावला व चेंगरला गेला. पुढे त्यातच ती मुलगी मेली. पोलिसानी सर्कसवाल्यावर खटला भरला. हें अडरसनला समजताच त्यानी पोलिसांना सांगितलें कीं खटला भरू नका. चूक माझ्या मुलीची व तिच्या बरोबरच्या शिपायाची होती. याच इंग्रज अधिकाऱ्याच्या दुसऱ्या मुलीच्या डोळ्यात फूल पडून तिचा एक डोळा गेला होता. माझे एक स्नेही कोल्हापूरचे गणपतराव चव्हाण त्या वेळीं खानदेशात सब-असिस्टंट सर्जन होते. त्यानी त्या मुलीच्या डोळ्याबद्दल फार मेहनत घेतली होती. पण तिला दृष्टि आली नव्हती. तथापि डॉ० चव्हाणाचा हात डोळ्याच्या शस्त्रक्रियेंत चांगला चालतो व त्याना गरीब लोकांबद्दल खरी तळमळ आहे अशी अडरसनची खात्री झाल्याने त्यानी स्वतः मदत देऊन व दुसऱ्या संस्थाकडून मदत मिळवून डॉक्टर चव्हाण यास युरोपांत जास्त अनुभव घेण्यासाठी पाठविलें. दरम्यान त्यानी खानदेशांतील गरीब लोकांच्या डोळ्यांच्या उपचारासाठी म्हणून एक लहानशी संस्था काढली. चव्हाण युरोपहून परत आल्यावर संस्थेचा डॉक्टर म्हणून त्यांची नेमणूक केली. डॉक्टर चव्हाण यानी त्या संस्थेत बरेच दिवस पुष्कळ चांगलें काम केलें. पुढे काही दिवसानी ते तिकडेच असताना वारले.

मी मध्यभागाचा डेप्युटी डायरेक्टर असताना, सन १९१६ साली, जळगावास रॉथफील्ड नावाचे कलेक्टर होते. मीं असें ऐकलें होतें की सध्याचे शिल्पकार करमरकर याना याच कलेक्टरने हात देऊन पुढे आणलें. रॉथफील्ड फिरतीवर असताना त्यानी एका गावातील देवालयाच्या पाठीमागील भिंतीवर शिवाजीमहाराजांचें खडूने काढलेलें चित्र पाहिलें. त्याना तें फार आवडलें व तें कोणीं काढलें म्हणून चौकशी केली. त्या वेळीं त्या गावच्या मराठी शाळेंत करमरकर शिकत होते व त्यानी तें चित्र सहज काढलें होतें, असें रॉथफील्ड याना समजलें. त्या काळीं कोणीं शिवाजीमहाराजांचें चित्र काढणें किंवा शिवजयंतींत भाग घेणें इंग्रज सरकारास आवडत नसे. म्हणून करमरकरास बोलावणें जाताच बाळ करमरकर भ्याले व गावाबाहेर पळाले. त्याचे वडील साहेबाकडे जाऊन म्हणाले, "अजाण मुलानें शिवाजीचें चित्र काढू नये, पण काढलें. आपलें बोलावणें येतांच तो गावाबाहेर पळून गेला आहे." कलेक्टरने त्याना सांगितलें की, "तुमच्या मुलाने चित्र फार चांगलें काढलें आहे. त्याला संधि मिळाल्यास तो पुढे चांगला चित्रकार होईल. तुम्ही त्याला मुंबईस चित्रशाळेंत पाठवा, तो नाव मिळवील." करमरकराच्या वृद्ध पित्यानें आपली तशी ऐपत नाही, असें सांगितलें. तेव्हा साहेबानी त्या मुलाच्या शिक्षणाचा खर्च अंगावर घेऊन त्यास मुंबईच्या चित्रशाळेंत पाठविलें होतें, असें मी ऐकलें होतें.

आणखी एक उदाहरण आमच्या शेतकीखात्यातील डॉक्टर मॅनसाहेबांचें देतों. ते शेतकी कॉलेजचे प्रिन्सिपॉल असताना कधी कधी काही विद्यार्थ्यांची फी न आल्यामुळे त्याना परीक्षेचे फॉर्म मिळण्यास अडचण होई. कधी कधी काहीं विद्यार्थ्यांना टर्मची फी न भरल्यामुळे कॉलेज सोडण्याचा प्रसंग येई. अशा वेळीं डॉक्टर मॅन गरजू विद्यार्थ्यांची फी आपणच भरून त्या विद्यार्थ्यांची अडचण दूर करीत. त्यास कोणीं विचारल्यास ते सांगत की, आपल्याकडे मुंबईच्या एका उदार स्वभावाच्या व्यापाऱ्याने काही रक्कम ठेविली आहे. त्यातून आपण अशल्या गरजू विद्यार्थ्यांस थोडीफार मदत करतो. डॉक्टर मॅन हिंदुस्थानांत असताना त्यानी पुष्कळ मुलांस व संस्थांस मदत केली होती. त्यानी पुण्याच्या डिप्रेस्ड क्लास मिशनमधील दोन शिक्षक मुलांचें लहानपणापासून संगोपन करून त्यांचें शिक्षणहि पुरें केलें होतें. डॉक्टर मॅन सेवानिवृत्त होऊन विलायतेस गेले तेव्हा त्यांच्याबरोबर हे तरुण तिकडे गेले. त्यातील एकानें तर मॅन हेंच उपनाव धारण केल्याचें मीं ऐकलें होतें. डॉक्टर मॅनसंबंधी आणखी एकदोन गोष्टी आठवतात. गुरुवर्य विठ्ठल रामजी शिंदे यांच्या अस्पृश्योद्धाराच्या कामांत त्यांना ते फार मदत करीत. सन १९१०-११ चे सुमारास पुण्यास लक्ष्मणराव ढोबळे व नाथुराव जगताप यांच्या प्रयत्नाने आम्ही मराठे तरुणानी एक मराठा भ्रातृमंडळ काढलें होतें. या मंडळाचे ते अध्यक्ष होते. लोकमान्य टिळक जेव्हा दारू पिण्याच्या विरुद्ध प्रचार करीत त्या वेळी डॉक्टर मॅन त्यांच्याबरोबर रस्त्यावर उभे राहून लोकांना दारूपासून परावृत्त करण्यात भाग घेत. अमच्या मिटिंगमध्ये सरकारी अधिकाऱ्यानी

भाग घेऊ नये म्हणून सरकारकडून त्याना समज मिळाली होती. मी असे ऐकले होतें की एकदा त्याची एक योजना चीफ सेक्रेटरीला पसंत पडली नाही. तथापि, डॉक्टर मॅनची सूचना डावलणें अडचणीचें होतें म्हणून गव्हर्नरसाहेबानी त्याना व चीफ सेक्रेटरीला त्या योजनेचा समक्ष विचार करावयास बोलाविले होते. गव्हर्नरसाहेब डॉक्टर मॅनशीं चर्चा करीत असताना चीफ सेक्रेटरीने मध्येच सांगितले की हें डॉक्टर मॅनचें म्हणणे बरोबर नाही. त्यावर डॉक्टर मॅन म्हणाले, "I am the Director of Agriculture and I know my business You are only a secretary" (मी शेतकीखात्याचा डायरेक्टर आहे व माझे काम मी जाणतो. आपण फक्त सेक्रेटरी आहात.) हे मॅनचें बोलणें त्या वेळच्या चीफ सेक्रेटरीला कसे रुचणार? त्याचा परिणाम असा झाला की डॉक्टर मॅन पेन्शन घेऊन स्वदेशीं जाईपर्यंत त्याना कायम डायरेक्टर केले गेलें नाही. ते शेवटपर्यंत ॲक्टिंगच राहिले होते. सन १९२२मध्ये अमेरिकेहून शेतकीविषयक अर्थशास्त्राचा अभ्यास करून आल्यावर, मुंबई विश्वविद्यालयात त्या विषयाचें संशोधन करण्यासाठी एक प्रोफेसर नेमावा असे मीं सुचविलें होतें. त्या वेळी मुंबई विश्वविद्यालयाने मुंबई सरकारास कळविले की स्वतंत्र प्रोफेसर नेमून संशोधन करण्याइतकी या विषयाची माहिती आपल्याकडे नाही, पण जर पुण्याचें शेतकी कॉलेज तो विषय शिकविण्याची तजवीज करील तर विश्वविद्यालय तो विषय शेतकीच्या परीक्षेस ठेवील. त्याप्रमाणे मुंबई सरकारने प्रोफेसरची जागा निर्माण केली व डॉक्टर मॅन यास कळविलें की तुम्ही त्या विषयाचा एक प्रोफेसर मिळवा. त्या वेळी डॉक्टर मॅनने मुंबई सरकारला स्पष्ट कळविलें होतें की, "आमच्या खात्यात मला पाहिजे तसा एक अधिकारी–पी० सी० पाटील–आहे. तोच प्रोफेसर आम्हाला पाहिजे. दुसरा कोणी अमेरिकन वा इंग्रज नको." म्हणजे इंग्रजात पुष्कळ माणसें चांगलीं प्रामाणिक, स्पष्टवक्तीं व दिल्दार होतीं हे खास. त्याच्यातील काही माणसें वृथा ताठा करीत नसत असे नाही. तरीहि इंग्रजाच्या सांनिध्याचा व त्याच्या शिकवणीचा आपल्या देशाला बराच फायदा झाला असे माझे मत आहे.

इंग्रजानी येऊन हिंदुस्थानचें राज्य घेतलें, आपल्या देशाचा व्यापार वाढविला. *ह्या धामधुमींत त्याच्या हातून बरींच अनन्वित कृत्यें घडलीं, हे सत्य आहे.* पण त्यानी लोकसेवा, लोकशिक्षण, रुग्णाची सेवा या कामीं देशाच्या बहुतेक भागात शाळा, कॉलेजें, दवाखाने काढून मानवसेवा केली व आजहि करिताव हे विसरून चालणार नाही. इंग्रजाचा हिंदुस्थानशीं व हिंदुस्थानवासियाशीं दीर्घकाल संबंध आल्याने, आपली इतर देशाशीं ओळख झाली व आपला देश जगातील प्रमुख देशाच्या मालिकेत आला. त्यानी आमच्या लोकाना वेळेची किंमत शिकविली व आपल्या समाजात बरीच शिस्त आणिली. त्यानी आपल्या सैन्यात जी लष्करी शिस्त आणिली, तिचें महत्त्व फार आहे.

# शाहूमहाराजांच्या आठवणी

मी कोल्हापुरास इंग्रजी तिसऱ्या इयत्तेत शिकत असताना (स० १८९६) पन्हाळ्यास शाहूमहाराजांनी कुस्तीचा फड केला होता. ते उन्हाळ्याचे दिवस होते. त्या वेळेस मी कुस्त्या पाहण्यास आमच्या गावचे गुड्डू हणमंत थोरात यांच्याबरोबर गेलो होतो. हे गुडोबा त्या वेळीं महाराजांचे बंदूकबारदार होते. महाराजांच्या ल्हानपणीं गुडोबांनी महाराजांस शिकार करण्यास शिकविल्यामुळे ते महाराजांचे आवडते बंदूकबारदार होते, व महाराज कोठेहि असले तरी त्यांच्याकडे जाण्यास गुडोबांस मना नसे. कुस्त्यांच्या दिवशीं सकाळीं गुडोबा मला म्हणाले, "चल. तुला महाराज दाखवितों." सुमारे दहा अकरा वाजतां आम्ही किल्ल्यावरून खालीं तबकाच्या बागेत गेलों. तेथें महाराज, त्यांचे बंधु बापूसाहेब, बाळासाहेब गायकवाड व आणखी कोणी तरी तबकांतील हौदांत डुंबत होते. हेंच मला जवळून झालेलें महाराजांचें पहिलें दर्शन. ते तेथें अंघोळीच्या तयारीनें गेले नसावेत. बराच वेळ हौदांत डुंबल्यानंतर हुजऱ्यानें त्यांची पाठ पाणी टाकून हातानें घासली व पाठीवर पाणी टाकून तो बाहेर निघाला. कांही वेळ ही मंडळी हौदांत डुंबत होती.

मीं महाराजांना पाहिल्यावेळीं ते भर जवानींत होते. पंचवीस वर्षांचे असावेत. ते चड्डी घालून अंघोळीस हौदांत उतरल्यानें मला त्यांना जवळून पाहतां आलें. कुस्ती व व्यायाम करीत असल्यानें, त्यांचे अवयव ग्रीक लोकांच्या जुन्या पुतळ्याप्रमाणें रेखीव व पिळदार दिसले. छाती रुंद व त्या काळच्या लकडी गाड्यांच्या चाकासारखी भरदार दिसली. महाराज सव्वासहा साडेसहा फूट उंच असावेत. पुढें उतारवयांत ते अगानें सुटले. शिकारींत रानावनांत भटकल्यानें त्यांचा वर्ण सांवळा झाला. पण मीं प्रथम पाहिल्यावेळीं ते सतेज गोरे दिसले. त्यांचे बंधु बापूसाहेब तर गौरवर्णीय देखणे तरुण होते. या दोघांच्या मानानें बाळासाहेब गायकवाड व अप्पासाहेब सुर्वे ठुटके वाटले

हौदाच्या काठावर उभा राहून मी व गुडोवा या मडळींची जळक्रीडा पाहात होतो. माझ्या पायात अर्धी इराप इजार होती व अगात पैरण, डोकीस गुलाबी रगाचा पटका असून मी अष्टीच्या धोतराची माल मारली होती. महाराज गुडोवास म्हणाले, "गुड्ड, हा मुलगा कोण?" गुडोवा म्हणाले, "आमच्या भाऊनदाचा मुलगा. कोल्हापुरास इग्रजी शिकण्यास आला आहे." महाराज मला उद्देशून म्हणाले, "मला तुझे धोतर देतोस का?" मीं लगलीच अगावरचे धोतर काढून महाराजांच्या हातीं दिलें. महाराज धोतराने अग पुशीत हौदाबाहर निघाले व हुजऱ्या कडून आपले कपडे घेऊन त्यानी ते अगाल घातले व हुजऱ्यास म्हणाले, "या मुलाचें धोतर धुवून त्याच त्यास दे." माझ धोतर मागून घेऊन महाराजानी आपले अग पुसल्याबद्दल मला अभिमान वाटला व त्याच्या साधेपणाची पहिली खूण पटली.

महाराजाची माझी दुसरी भेट मीं सन १८९९ अखेर मॅट्रिक झाल्यावर त्यानी मला बोलावून घेतले त्या वेळची. तात्पर्य कॉलेजमध्ये जाण्याचा विचार माझ्या मनात येणेंच शक्य नव्हत. एक तर मला भाऊ नसल्याने घरची शेती मलाच करावी लागणार ही ठाम समजूत; दुसरें, कॉलेजशिक्षणाचा खर्च वडिलाच्या आवाक्या बाहेरचा; व तिसरें, मार्गदर्शनाचा पूर्ण अभाव.

मी मॅट्रिक झाल्यानतर जर घरां शर्तीत शिरलों असतों तर त्याबद्दल मला निराशा व विषाद वाटला नसता, कारण त्या वेळीं माझी झेप तेवढीच होती. मॅट्रिक होण्यापूर्वी मला जे मार्गदर्शन मिळाले नव्हतें तें मॅट्रिक झाल्यावर योगायोगाने मिळालें. त्यामुळे माझ्या जीवनाचा प्रवाह बदलला. त्याचें असे झालें, मी मॅट्रिकची परीक्षा सन १८९९ अखेर पास झालों. त्या वेळीं छत्रपति श्रीशाहूमहाराज भर जवानींत होते. जरी त्याना मुखत्यारी मिळाली होती, तरी त्याच्या हातीं पूर्ण सत्ता आली नव्हती. सत्ताधारी पादरपेशा वर्ग सत्ता सोडण्यास तयार नव्हता. महाराज रान चाचपत होते. त्याना स्वत.ला वाचण्याचा फार नाद नसावा, तरी पण दुसऱ्यास वाचावयास लावून आपण त ऐकत. वृत्तपत्रें मात्र त्याच्या बरोबरच्या एका जैनाकडे असत. त्या माणसाचे नाव बुकटे असावें. त्याच्या राकत एक पोतडी असून त्यात रोजचीं मराठी व इग्रजी वर्तमानपत्र असावयाचीं. आताच्या स्टेशनवॅगनप्रमाणे दहा पधरा माणसास बसता येईल अशी महाराजाची प्रशस्त घोडागाडी (चार-चाकी रथ) असे. त्यात महाराजाच्या बरोबर ही चालतीबोलती लायब्ररी (बुकटे) असे. त्याचे तांड आजकालच्या क्रिकेट सामन्याच्या रेडिओवरील कॉमेंटरीप्रमाणे चालू असावयाचें. महाराज दुसऱ्याशीं बोलत असले तरी त्याचे ताड चालूच असावयाचे.

या बुकटेपुराणात स्थानिक वृत्तपत्रातील वाङ्मयात सागितलें गेलें की, राजाराम हायस्कूलमधून कोल्हापूर संस्थानांतील वडगावच्या पाटलाचा मुलगा (पी० सी० पाटील) हा मॅट्रिकची परीक्षा पास झाला. महाराजाना फार आनद वाटला. त्यानी

टाकोटाक बाजार वडगावास स्वार पाठवून त्या मुलास घेऊन ये असे हुजऱ्यास सांगितले. बाजार वडगावास त्याला तसा मुलगा मिळाला नाही म्हणून त्यांनी वारणाऱ्याच्या वडगावास बरोबर वट्टू देऊन दुसरा स्वार पाठविला. तेथेहि माझा पत्ता लागला नाही मग स्वार भिकार वडगावास गेला. तेथेहि माझा पत्ता लागला नाही. मग हायस्कूलच्या तालमींत त्यांना कळले की, मलकापूर जहागिरींतील वडगावात हा मुलगा असतो. एके दिवशीं सकाळीं एक स्वार आमच्या गावीं आला. शोध करिता त्याला समजले की, त्याच गावचा एक मुलगा नुकताच मुंबईची परीक्षा देऊन आला आहे. महाराजाचा स्वार अनपेक्षितपण आमच्या घरीं आला. महाराजाचा निरोप त्याने माझ्या वडिलास व मला सांगितला. मी व त्या स्वाराने न्याहारी केली व आम्ही पन्हाळ्यास निघालो.

इ० स० १८९९ साली कोल्हापुरात प्लेगने कहर केला होता. महाराजाचा कॅंप पन्हाळ्यास होता. पन्हाळगडाच्या तटाखाली क्वारंटाइन नसविले होते. किल्ल्यावर जर कोणास जावयाचे असेल तर त्याला दहा दिवस क्वारंटाइनमध्ये राहावें लागे. कोणी जरुरीच्या सरकारी कामासाठी परवानगी मिळविली असली तरी त्याला आपले कपडे फिनाइलच्या पाण्यात बुडवून मग वर जावें लागे. हें जाणून महाराजानी क्वारंटाइन ऑफिसरला हुकूम दिला होता की, जर सरकारी घोडेस्वाराबरोबर पी० सी० पाटील नावाचा मुलगा आला, तर त्याला थांबवून ठेवू नये, व त्याचे कपडे फिनाइलच्या पाण्यात भिजवू नयेत घोडेस्वार व तट्टावर बसलेला मी असे तेथे आलेले दिसताच क्वारंटाइन ऑफिसर पुढे आला. त्याने सांगितले, "तुम्हास वर जाण्याची परवानगी खुद्द महाराजानी दिली आहे."

नंतर आम्ही राजवाड्यावर गेलो, आल्याची रीतसर वर्दी दिली. महाराजानी मला बोलावून घेतले. त्या वेळीं त्याच्याबरोबर त्यांचे बंधु बापूसाहेब कागलकर, मेहुणे मामासाहेब खानविलकर, व आप्पासाहेब म्हैसाळकर वगैरे साथी मंडळी गप्पागोष्टी करीत उभी होती दरबार रिवाजाप्रमाणे मीं वाकून मुजरा केला. ही माझी मुलाखत अविस्मरणीय अशीच झाली. बापूसाहेब कागलकर यास उद्देशून महाराज म्हणाले, "बापूसाहेब, हा बघ पाटलाचा मुलगा, मॅट्रिक पास होऊन आला आहे फार बरं झालं, नाही ! आपण शहरांतील व खेड्यांतील बरींच मराठ्यांची मुलं वाट्यावर ठेवून त्यांना शिकवून पुढे आणण्याचा प्रयत्न केला, पण त्यांत आपणास विशेष यश आलं नाही काही मुलं शिकली, पण त्यांपैकी मॅट्रिक कोणीच झाला नाही. त्यामुळे त्यांना तलाठी कारकुनीच्या जागेवर घ्यावं लागलं." नंतर माझ्याकडे पाहून महाराजांनी मला विचारले, "काय पाटील, तुमच्या वडिलांची किती शिवारी आहे ? त्याच्यावर कर्ज किती आहे ?"

मी उत्तर दिले, "पधराशेच एकर शेती असावी. चार ठेल आहेत, त्यांच्या कडाव नांगर आहे. आमच्यावर कर्ज नाही."

"तुमची सावकारी असेल ना?" महाराजांनी विचारलें. यावर मीं "नाहीं" असें उत्तर दिलें. तेव्हां महाराज म्हणाले, "मग तुम्हीं आमच्याकडे स्कॉलरशिप कां मागितली नाहीं?"

"हुजुरापर्यंत दाद लागणें कठीण म्हणून काटकसरीनें वागून आतापर्यंत शिक्षण घेतलें."

मीं असें उत्तर दिल्यावर महाराजांनी, "कोणत्या खाणावळींत जेवीत होता व तेथें तुम्हांस काय द्यावें लागे?" असा प्रश्न विचारला.

मीं सांगितलें, "मराठ्यांच्या खाणावळी शहरांत नाहींत. फक्त ब्राह्मणाच्या आहेत. त्या खानावळींचा दरमहाचा दर पांच रुपये असतो. शिवाय मराठ्यांना आपल्या पत्रावळी आपणच उचलाव्या लागत. म्हणून मीं ब्राह्मणाच्या खाणावळीचा नाद सोडला आणि एका ओळखीच्या मराठ्याकडे महिना साडेतीन रुपये देऊन जेवणाची सोय केली होती."

"तेथें अभ्यास करण्यास जागा तरी होती का?"

महाराजांचा हा प्रश्न ऐकून मीं उत्तर दिलें, "त्याच्या घरांत जागा कमी होती म्हणून हायस्कूलजवळ सरकारी तालीम आहे, तेथें मामा जाधव, बळिबा पाटील, हरीबा पाटील, हिंदुराव घाटगे वगैरे पांचसहा जणांनी तालीममास्तराच्या परवानगीनें, रात्रीं अभ्यासाची व झोपण्याची व्यवस्था केली होती. त्यांच्याबरोबर मीहि होतों. मला पुण्यातील डेक्कन मराठा एज्युकेशन असोसिएशनकडून दरमहा तीन ते पांच रुपये स्कॉलरशिप मिळे. वडिलांच्याकडूनहि थोडेसे पैसे येत असत."

"मग आतां काय करणार?" असें महाराजांनी विचारलें. मीं सांगितलें कीं, "आमची शेती आहे. वडिलांच्याबरोबर शेती करीन."

"पण पुढें कॉलेजमध्यें कां शिकत नाहीं?"

मी म्हणालों, "मला भाऊ नसल्यानें, आज-ना-उद्यां मला आमची शेती करावीच लागेल. शिवाय कॉलेजचा खर्च आमच्या आवाक्याबाहेरचा आहे." हुजूर म्हणाले, "आम्हीं खर्च दिला तर पुढें शिकाल काय?"

मीं उत्तर दिलें, "शिकेन महाराज. पण मला माझ्या वडिलांना विचारलें पाहिजे."

हुजूर म्हणाले, "बरें, चार दिवस येथेंच थांबा. नंतर तुमच्या वडिलांस विचारून या."

दुसऱ्या दिवशीं महाराजांनी रावसाहेब दाजीराव विचारे, एक्झिक्युटिव्ह इंजिनिअर व रावसाहेब भास्करराव जाधव, असिस्टंट सरसुभे, यांना बोलावून घेऊन मराठा विद्यार्थ्यांसाठीं एक वसतिगृह काढण्याच्या बाबतींत विचारविनिमय केला.

मी पन्हाळ्यावर आल्यापासून महाराजांना मराठा वसतिगृहाचें वेड लागल्यासारखें झालें होतें. रोज याच विषयावर चर्चा होत असे. थोड्याच दिवसांत कॉलेज

सुरू झालें व महाराजानी मला कॉलेजमध्ये नाव घालण्यास सांगितलें. कर्मधर्मसंयोगानें पहिल्यानेंच त्या वर्षी तीन मराठा विद्यार्थी—साताऱ्याचे पी० के० शिंदे, एस० बी० जाधव आणि तासगावचे आर० आर० पवार कॉलेजमध्ये पी० ई० च्या वर्गात दाखल झाले होते. महाराजाना नानासाहेब सासणे याच्याकडून ही माहिती मिळताच त्यानी त्या विद्यार्थ्यानाहि पन्हाळ्यावर बोलावून घेतलें आणि लागलीच कचेरीजवळच्या दत्ताच्या देवाल्यात हुजूरखाजगी खर्चातून तात्पुरतें वसतिगृह सुरू झालें. लवकरच तें कोल्हापुरास नेण्यात आलें. मार्च १९०१ रोजीं स्वतंत्र मराठा वसतिगृहाची (व्हिक्टोरिया मराठा बोर्डिंगची) अधिकृतपणें स्थापना झाली. हें वसतिगृह स्थापन होण्यापूर्वी मुंबई इलाख्यात फक्त मोठमोठ्या कॉलेजास जोडून क्लब (हॉस्टेल्स) असत. पण एखाद्या जातीनें, जमातीनें अथवा धर्मपंथानें चालविलेलें वसतिगृह महाराष्ट्रात तरी अस्तित्वात नव्हतें. सध्या जीं पुण्यासारख्या शहरात एकदोन अनाथवसतिगृहें आहेत तींसुद्धा त्या वेळी नव्हतीं. या दृष्टीने शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यासाठी वसतिगृहाची, विशेषतः निरनिराळ्या जातींनी आपआपल्या जातीतील विद्यार्थ्यांची राहण्याजेवणाची जबाबदारी घेऊन त्यांच्यासाठी कमी खर्चात वसतिगृहें स्थापण्याची ही अभूतपूर्व कल्पना श्रीशाहू छत्रपतिमहाराजाची होती असे म्हटले पाहिजे.

थोड्याच दिवसानी महाराजानी निरनिराळ्या जातींच्या पुढाऱ्याना बोलावून घेऊन आपापल्या जातीकरिता वसतिगृहें बांधण्यास प्रोत्साहन दिलें, व त्याना सांगितलें की, असल्या वसतिगृहास आपण वर्षासनें देऊ. त्याचा परिणाम असा झाला की कोल्हापुरात मराठा, लिंगायत, जैन, सोनार, मुसलमान व महार वगैरे बहुतेक जातींचीं वसतिगृहें निघालां. असल्या तऱ्हेचीं व इतकीं वसतिगृहें महाराष्ट्रातील कोणत्याहि शहरात निघालेलीं नाहीत.

शाहू छत्रपतींच्या या अभूतपूर्व कल्पनेचा प्रचार त्यांच्या अनुयायानी पुणें, सातारा, अहमदनगर, खानदेश व नाशिक जिल्ह्यात केला. ज्या पश्चिम महाराष्ट्रात एकहि मराठा पदवीधर, वकील, मुन्सफ वा लष्करात कॅप्टन नव्हता, त्या भागात राज्यव्यवस्थेत अलीकडे बरेच मराठे मंत्री, सेक्रेटरी, कलेक्टर व निरनिराळ्या खात्याचे मुख्य दिसतात. इतकच काय, संयुक्त महाराष्ट्र अस्तित्वात आणण्यास जबाबदार असलेले श्री० यशवंतराव चव्हाण व बाळासाहेब देसाई याच शिक्षण करवीरातच झाल होतें. मध्यवर्ती सरकारातसुद्धा मराठे व इतर ब्राह्मणेतर अधिकारी व मंत्री बरेच आहेत. पोलीस व लष्करी अधिकारी आहेत. पश्चिम महाराष्ट्रातील मराठा अधिकारी व मंत्री शाहूमहाराजानी स्थापिलेल्या वा त्यांच्या प्रोत्साहनानें निघालेल्या संस्थातून तयार झालेले आहेत, असे म्हणण्यास महाराजाच्या अनुयायास अभिमान वाटतो.

व्हिक्टोरिया मराठा बोर्डिंग अस्तित्वात येण्यापूर्वीच महाराजानी आपल्या पन्हाळ्याच्या कॅंपात असतानाच अनौपचारिक दृष्ट्या आमचे बोर्डिंग पन्हाळ्यास

दत्ताच्या देवालयात सुरू केलें. पुढे तें कोल्हापुरास नेलें तरी पहिले तीन महिने बोर्डिंगाचा सर्व खर्च महाराजांनी आपल्या हुजूरखाजगींतून दिला. दरम्यान त्यांनी बोर्डिंगच्या कामासाठी एक कार्यकारी मंडळ नेमलें व त्यांना वसतिगृहाचे नियम करण्यास सांगितलें आणि सूचना केली की विद्यार्थ्यांचे दोन वर्ग करा. पहिला, ज्यांना आपल्या खाण्याजेवणाचा खर्च देता येईल असा, व दुसरा, ज्यांना सर्व खर्च झेपणार नाही व ज्यांना मदतीची जरूर आहे असा.

शाहूमहाराज जन्मास आले नसते तर मराठे कधीच पुढे आले नसते असें मी म्हणत नाहीं. तथापि मला असें म्हणावेंसे वाटतें की त्या महात्म्याच्या खटपटीमुळे मराठ्यांची व इतर ब्राह्मणेतरांची प्रगति निदान पन्नास वर्षें तरी लौकर व कमी कष्टाने झाली हें मात्र खास. महाराजांस आपल्या सुधारणांच्या कामीं सर रघुनाथराव सबनीस, श्रीमंत बापूसाहेब कागलकर, भास्करराव जाधव व दाजीराव विचारे यांची फार मदत झाली. पुढे काही दिवसांनी अण्णासाहेब लठ्ठेहि या गोटात आले.

तारीख १४ सन १९०२ रोजीं महाराज विलायतेस गेले. त्यांचें विलायतेस जाण्याचें ठरलें त्या वेळीं मी पुण्याहून मुद्दाम त्यांना भेटण्यासाठी कोल्हापुरास गेलों होतों. महाराजांची स्पेशल सलूनसह स्टेशनच्या प्लॅटफार्मवर येण्यापूर्वीच महाराजांची स्वारी सरदार-मानकऱ्यांसह प्लॅटफॉर्मवर आली. माणसांची गर्दी होऊ नये म्हणून, प्लॅटफॉर्मवर इतर माणसास जाण्यास बंदी होती. स्टेशनाच्या दुसऱ्या बाजूसहि तिकडून माणस स्टेशनात येऊ नयेत म्हणून एक लांबच्या लांब दोर बांधून त्याच्याजवळ जागोजाग पोलीस उभे होते. मी त्या दोरास लागूनच पुढच्या ओळींत उभा होतों. महाराजांचें लक्ष माझ्याकडे गेलें व त्यांनी जवळच्या हुजऱ्यास माझ्याकडे बोट दाखवून "पी० सी० पाटील उभे आहेत, त्यांना घेऊन ये", म्हणून सांगितलें. मी जवळ आल्यावर रावसाहेब दाजीराव विचारे यास महाराजांनी सांगितलें, "विचारे, माझ्या सांगण्यावरून हे पाटील पुण्याच्या कॉलेजमध्ये गेले आहेत. मी त्यांना स्कॉलरशिप देत होता, ती त्यांनी घेतली नाही, हें तुम्हांस ठाऊक आहे. पैशाची नड लागल्यास त्यांना लागतील ते पैसे द्या. मी तुमचे पैसे दुप्पट परत करीन. ते जरा मानी आहेत, हें लक्षात ठेवा." महाराज मला उद्देशून म्हणाले, "हें पाहा, केव्हा तरा पोंगशास भेट व त्याला सांग की माझी पार्थिव पूजा रोजच्या रोज करण्यास चुकू नकोस." परत माझ्याकडे पाहून ते म्हणाले, "बरें, आता तुम्ही जा. मी लवकरच परत येईन." महाराजांची देवावर श्रद्धा असे.

सन १९०२ पर्यंत मुंबईत हल्लीच सरदारगृह वा माधवाश्रम यासारखीं अद्यावत् राहण्याजेवणाची व चहापाण्याची व्यवस्था असलेलीं हिंदु हॉटेलें नव्हतीं. सन १९०२ साला शाहूमहाराज विलायतेस गले, त्या वेळीं त्यांना विलायतेंतील राहण्या जेवणाच्या हॉटेलची प्रथा फार आवडली व त्यांना वाटलं की, मुंबईस असलीं हॉटेलें निघाल्यास मध्यमवर्गीयांची व जहागिरदार इनामदार लोकांची गैरसोय दूर

होईल. त्या काळीं संस्थानिक व जहागिरदार याना मुंबईस जाण्यापूर्वी आपला कारभारी मुंबईस आगाऊ पाठवून तेथे तात्पुरती एखादी इमारत भाड्याने घ्यावी लागे व स्वत चीं गडी माणसें, भांडीकुंडीं न्यावीं लागत. हें काम फार खर्चाचें व यातायातीचें असे.

त्या काळीं ब्राह्मणानी चालविलेल्या साध्या खानावळी मुंबईपुण्यास होत्या. पण त्यात राहण्याची सोय नसे. गिरगावांत त्या वेळीं सध्याचे सरदारगृहाचे मालक विश्वनाथ केशव साळवे याची तसलीच खानावळ होती. शाहूमहाराजाचा मुंबईस बंगला होता. महाराजानी गाडी पाठवून विश्वनाथ केशव साळवे यास आपल्या बंगल्यावर बोलावून घेऊन, त्याना विलायतेंतील हॉटेलची पद्धत समजावून सांगितली. आणि विचारलें की, "तुम्ही तसले अद्यावत् सजविलेले आश्रम का काढीत नाही?" ते म्हणाले, "महाराज, आमच्या खानावळींत राजे व जहागिरदार कशाचे येतात? शिवाय पलग, टेबलें, व खुर्च्या असलेल्या स्वतत्र खोल्याच्या इमारती आमच्यासारख्याच्या आवाक्याबाहेर." महाराज म्हणाले, "राहणारे मिळतील, यांत मला शका नाही. मींच येऊन राहत जाईन. मग इतर सस्थानिकास व जहागिरदारास सकोच वाटणार नाही. मी थोडेंफार भाडवलहि तुम्हास पुरवीन." श्रीयुत साळवे धाडसी धदेवाले असल्याने त्याना महाराजाची कल्पना पटली व त्यानी प्रथम बोरीबदरकडे जाणाऱ्या रस्त्यावराल सीताराम बिल्डिंगमध्ये सरदारगृह नावाचें हॉटेल काढलें.

जरी महाराजाचा मुंबईस बगला होता, तरी ते सरदारगृहाची घडी बसेपर्यंत सरदारगृहात उतरत. श्रीशाहूछत्रपति या सरदारगृहात उतरू लागल्यापासून दक्षिणेंतील मराठे व पटवर्धन सस्थानिकच काय, वऱ्हाड-नागपूर व मराठवाड्यातील सुखवस्तु लोकाचा सरदारगृहात पायडा पडला व नतर माधवाश्रम व तसलीच विश्रातिगृहें मुंबईस व इतर शहरात निघालीं आहेत.

सन १९०५ सालीं मी शेतकी कॉलेजच्या शेवटच्या परीक्षेस बसण्याकरिता मुंबईस गलों, त्या वेळीं मी सरदारगृहात उतरलें होतों. मी परीक्षेस गेलीं त्या वेळीं महाराज व त्याची काही मडळी तेथेच राहत होती. त्या काळीं मोटारगाड्या फारशा नव्हत्या माझी परीक्षा सपल्यानतर महाराजानी हुजूर चिटणीस शकरराव इदुलकर यास सागून मला बोलावून घेतलं व विचारलें, "पाटील, पेपर कसे काय गले आहेत?" मी म्हणालों, "चागले गले आहेत, महाराज." महाराज म्हणाले, "दोन दिवस मुक्काम आहे ना?" मी उत्तरलों, "होय." महाराज नतर इदुलकरास उद्देशून म्हणाले, "शकरराव, आज गाण्यास जायचें आहे. (त्या बाईचें नाव मला आठवत नाही.) सध्याकाळीं पाटलाना गाण्यास घेऊन ये, बर का. विसरू नकोस." मी म्हणालो, "महाराज, मी पाचसहा दिवस परीक्षेसाठी जागत आहें. शिवाय मला सगीताचें ज्ञान नाही. मला माफ करा." महाराजानी ऐकून घेतलें न घेतलं असें दाखवून ते

बाहेर पडले. सध्याकाळीं जेवण झाल्यावर मी व शकरराव गचीवर बोलत उभे असताना महाराज शकररावास म्हणाले, "चल शकरराव, पाटलाना घेऊन खाली ये." आणि आपण जिन्यावरुन खाली उतरले व घोड्याच्या गाडींत बसले तेथूनच मला हाक मारली, "पाटील, खाली लवकर या." मा अडचणींत पडलो. मला महाराजाच्याबरोबर गाण्यास जाण्याची इच्छा नव्हती. माझ्या डोक्यास टर्किश टोपी होती. तीहि मुद्दाम काढून ठेवून मी खाली गेलो. महाराज म्हणाले, "हें काय? पटका नाही, टोपी नाही. असेच येणार?" मी म्हणालो, "हुजूरानी लवकर या म्हणून म्हटल्यावरून तसाच आलो." महाराजानी इदुलकर यास हाक मारून सागितलें, "मी पुढे जातो. तू पाटलाना घऊन अध्यापाऊण तासात ये." मी इदुलकराकडे वर गेलों व म्हणालो, "आता काय करावें? ह्या तुमच्या गाण्याच्या मैफलीच्या वेळीं बऱ्याच चेष्टा होतात असं मीं ऐकिलें आहे. आजपर्यंत मी असल्या अडचणींत पडलो नव्हतो. आता कस करावें?" इदुलकर म्हणाले, "आज तुम्हाला येणे भाग आहे. गाण्यास जाऊन थोड्या वेळाने पाहिजे तर महाराजाना सागा की, मला झोप येत आहे, मी परत जातो." नतर मी व शकरराव गाण्यास गेलों. आम्ही जाण्यापूर्वी महाराजानी त्या गाणारणीस सागून ठेवलं होतें की, "आज एका पाहुण्यास येथ बोलावलें आहे." त्या दिवशी गाण्याच्या बैठकींत कोणत्याहि प्रकारचे अचकटविचकट प्रकार झाले नाहीत. मी व शकरराव विद्यार्थ्यासारखे दिसत असल्यामुळे गाणारणास आम्ही महाराजाचे पाहुणे असू असें वाटलें नाही. बराच वेळ गाणें चालल्यावर विश्रांतीच्या वेळीं त्या गाणाऱ्या बाईने महाराजास विचारलें, "का हो महाराज, तुमचे पाहुणे कधी येणार?" महाराज म्हणाले, "झालें, माझ भाडें फोडलेंस." माझ्याकडे बोट करून महाराज म्हणाले, "अग, हेच ते माझे पाहुणे."

असेच एकदा त्याच्या पुण्यातील जुन्या बगल्यावर (पन्हाळा लॉजवर) महाराज, बापूसाहेब कागलकर वगैरे मडळी सध्याकाळीं बसली होती. त्या दिवशीं गाण्याचा कार्यक्रम होता हें मला माहीत नव्हतं. महाराजाच्या चेहऱ्यावर काही गडबड किंवा घाई दिसली नाही. तथापि बापूसाहेबमहाराज आतबाहेर करीत होते. एकदा तबल्यावर थापहि पडली, पण माझ्या लक्षात काही आलें नाही. मी महाराजाशीं बोलतच होतों. परत जव्हा तबल्याचा व तबोऱ्याचा आवाज ऐकू आला तेव्हा मला वाटलें की, बगल्यात गाण्याचा कार्यक्रम असावा. मग "मी जातों" असे म्हणून मी मुजरा करून निघालो. बगल्याच्या कपौंडाच्या बाहेर पडण्यापूर्वीच गाण्याचा कार्यक्रम सुरू झाला. असल्या गोष्टीवरुन कळून येतें की, महाराज माणसाचा स्वभाव ओळखून त्याच्याशीं वागत.

वर लिहिल्याप्रमाणे मी एल्० एजी० च्या परीक्षस डिसबर सन १९०५ मध्ये बसलों, जानेवारी १९०६ त परीक्षेचा निकाल लागून मी पहिल्या वर्गात पास झालों. पहिल्या वर्गात फक्त मी एकटाच होतो, ही आनदाची बातमी महाराजास

सागण्यासाठी मी कोल्हापुरास त्याच्याकडे गेलों. मला पाहताच महाराज उद्गारले, "काय पाटील, रिझल्ट लागला का?"

मीं वाकून मुजरा केला व सागितले, "होय, लागला महाराज व मी पहिल्या वर्गांत पास झालों."

महाराजाना फार आनंद वाटला व ते म्हणाले, "आता पुढे काय करणार?"

मी म्हणालों, "नोकरी."

महाराजानी विचारलें, "कोठे? व कसली?"

मी उत्तरलों, "आपल्या संस्थानात, आपण द्याल ती."

त्यावर महाराज म्हणाले, "हे पाहा पाटील, तुम्ही आहात सार्वेतुर्वे, झापड लावलेल्या टाग्याच्या घोड्यासारखे; नीट पुढे पाहत चालणारे. संस्थानातल्या अधिकाऱ्याना तसें वागून भागत नाही. संस्थानातील अधिकाऱ्याना घोड्यावर तर बसावयाचें, पण ते शेपटीकडे तोंड करून. तुम्ही म्हणाल, तसे का? त्याचें उत्तर, त्या घोड्यावरील माणसाला सारखें वाटत असतें की आपल्याला कोणी खाली तर ओढीत नाही! तुम्ही पहिल्या वर्गात पास झाला आहांत. मुंबईच्या शेतकीखात्याने गेल्याच सालीं नवें शेतकी कॉलेज बाधले व दोन शेतकीतज्ज्ञ विलायतेहून आणल्याचे ऐकतों. तुम्ही विचारताच ते तुम्हाला घेतील. तुम्ही कोल्हापुरचे स्कॉलर असल्याने, ते बहुतेक आम्हास विचारतील. तसें झाल्यास बरेंच. मी तुमची शिफारस करीन. साताऱ्चे शेतकरी काय आणि कोल्हापूरचे काय एकच. तुमच्या ज्ञानाचा व सहानुभूतीचा त्याना उपयोग होईल. कोल्हापूर तर तुमचेंच आहे. केव्हाहि तुम्ही हक्काने इकडे याल. पण माझी इच्छा आहे की, तुम्ही खालसात नाव मिळवून पेन्शन घेऊन मग आमच्याकडे यावें व तुमच्या ज्ञानाचा व अनुभवाचा फायदा आमच्या शेतकरी प्रजेस द्यावा."

मीं नम्रपणाने सागितलें, "आपली आज्ञा." मी शेतकी खात्यात बराच पुढे आलों व सन १९३२ सालीं पेन्शन घेऊन कोल्हापुरास परतलों. दुर्दैव की माझे राजगुरु यापूर्वीच निवर्तले होते. तथापि महाराजाची भविष्यवाणी काही अंशीं खरी ठरली. मला सन १९४१ सालीं हिंदुस्थान सरकारने कोल्हापूरच्या रीजन्सी कौन्सिलमध्ये आग्रह करून शिक्षण व शेतकी मंत्री म्हणून नेमलें. मला त्या अल्पकाळात बरेंच उपयुक्त काम करता आलें व संस्थानच्या शेतकी व उद्योगधद्यावर दोन उपयुक्त पुस्तके लिहिता आलीं.

महाराजाना कुत्र्याकडून ससाची व खोकडाची शिकार करण्याचा शोक असे, व असल्या शिकारीसाठी त्याच्याकडे 'ग्रेहाउंड' जातीचीं शिकारीचीं कुत्रीं असत. आपल्या संस्थानात कोण कोण शिकारी आहेत, याबद्दल त्याना माहिती असे व एखाद्याकडे चागलें कुत्रें असल्यास महाराज तें मागवून घेत. त्यानी एकदा असे ऐकिलें की, वडगावास भाऊ पाटील याच्याकडे दोन चागलीं शिकारी कुत्रीं आहेत.

महाराजांनीं आमच्या गावीं माणूस पाठवून तीं कुत्रीं आणवलीं. त्या कुत्र्यानी चांगली शिकार केली पण त्याच वेळीं त्याना असें समजलें कीं, भाऊ पाटील, हे पी० सी० पाटलाचे चुलते आहेत. त्याना वाटलें, आपण हीं कुत्रीं आणावयास नको होता. महाराजाचें प्रसंगावधान फार दांडगें. त्यानी लागलीच स्वार पाठवून भाऊ पाटील याना बोलावून घेतलें, व त्याना ते म्हणाले, "तुमचीं कुत्रीं फार चांगलीं आहेत. तुम्हाला आणखी एक जातिवंत पिलूं देतों. तुम्ही त्यास शिकारींत तयार करा." असें म्हणून त्यास एक बंदूक व एक जरीचा फेटा देऊन त्याची रवानगी केली. काही दिवसानी महाराजांची व माझी गाठ पडली तेव्हा त्यानी मला सांगितलें, "तुमच्याकडे पुण्यास दोन शिकारी कुत्रीं आहेत हें मला माहित होतें, पण भाऊ पाटील कुत्र्याचे शौकीन आहेत व ते तुमचे चुलते लागतात, हें मला ठाऊक नव्हतें." झाल्या चुकीचासुद्धा कसा उपयोग करून घ्यावा हें महाराज चांगलें जाणत.

महाराजांच्या सांनिध्यातील एका माणसानें मला पुढें काही दिवसानी सांगितलें कीं, जर भाऊ पाटील तुमचे चुलते असें महाराजास माहीत असतें तर महाराजानी तीं कुत्रीं आणलींच नसतीं, कारण ते म्हणत होते, "लेकाच्यानो, मला आधी का नाही सांगितलें? आता काही तरी बतावणी करून ह्या चुकीस निराळेंच स्वरूप दिलें पाहिजे." असें म्हणून त्यानीं बक्षिसाची युक्ति काढली.

श्रीशिवाजी सोसायटीच्या कार्यासंबंधी लिहिताना मीं म्हटलं आहे कीं, शाहू-महाराजानी पुणें हें आपल्या कार्याचें स्थळ म्हणून निवडलें. तेथेच पुढें श्रीशिवाजी सोसायटी स्थापिली गेली. श्रीशिवाजी सोसायटीच्या कामानिमित्तानें व पुणेकर मराठ्यात मराठेपणाची जागृति करण्याकरिता ते वरचेवर पुण्यास भेटी देत व पुण्यास पन्हाळा लॉजवर वेळोवेळीं काही काही मराठा पुढाऱ्याना भोजनास बोलावीत. महाराजाच्या जेवणाचा बेत अगदी साधा असायचा. पाटाऐवजी शुभ्र चादरीच्या घड्या असायच्या व वाढप पत्रावळीवरच व्हायचें. महाराजासाठी स्वतंत्र अशी जागा राखलेली नसे. इतरास जें अन्न वाढावयाचें तेंच अन्न महाराजाच्या ताटात असे. जर जेवण चांगलें झालें नाही अगर भाजींत मीठ कमी पडलें असलें अगर जास्त झालें असलें तरी ते सोवळेकऱ्यावर कधीहि रागावत नसत किंवा खारट अगर तिखट असें म्हणत नसत. कोणी तसें काही बोललें तर त्याना खपत नसे. ते म्हणत, "अन्नास कधीहि नावें ठेवूं नयेत." जेवण झाल्यावर पानसुपारी खात असता शिवाजी सोसायटी बद्दल अगर मराठ्याच्या इतर चळवळीबद्दल विचारविनिमय होई. महाराज कधीहि दारू प्याले नाहीत. ते सिगरेटसुद्धा ओढीत नसत.

एकदा महाराजानी मला सांगितलें कीं, "पाटील, यंदा वडिलाचें श्राद्ध पुण्यास करावें असें माझ्या मनात आहे. तुम्ही व श्रीपतराव शिंदे यानी बाबुराव जेध्याच्या मदतीनें पुण्यातील सुमारें शंभरएक माणसें श्राद्धास बोलावण्यासाठी यादी करावी."

मी म्हणालों, "मला पुण्यातील फार थोड्या मराठ्यांची माहिती आहे. येथे आता

फारसे खानदानीचे मराठे राहत नाहीत. काही बडोद्यास, काही ग्वाल्हेरास, देवासेस व धारेस गले आहेत. तेव्हा आपले पितर म्हणून कोणास बोलवावें हें मला समजणार नाहीं. तर आपण खाजगीतील एखाद्या अनुभविक मराठा गृहस्थास आगाऊ पुण्यास पाठविल्यास सोईचे होईल."

महाराज मोठ्याने हसून म्हणाले, "अहो, माझे पितर श्रीपतराव शिंदे, विठ्ठलराव शिंदे व डी० आर० भोसले येथे आहेतच; पण तुम्ही ढेरे, भिसे, जेधे, झडे, टोसर यासारखीं कार्यकर्ती माणसे हींच पितर म्हणून बोलवा. मला जर पचकुळी, सप्तकुळी बघायची असती तर कोल्हापुरास पितर म्हणून कोणाकोणास बोलवावयाचें हे तर ठरलेलच आहे. मग मी पुण्याची आठवण कशाला केली असती?"

"समजलें महाराज!" मी म्हटलें. पन्हाळा लॉज्वर श्राद्धाचा कार्यक्रम ठरला. ठरल्या दिवशीं पुण्यास पन्हाळा लॉज्वर सुमारें अकरा वाजता पुण्यातील मडळी जमा होऊ लागली. महाराज मडळींना भेटून परत मुदपाकात गेले व पाट मांडून ताटें तयार करण्यास सांगितले. या रीपेचा थाट राजेशाही होता. पाटपाणी मांडून झाल्यानवर जेवणास उठा म्हणून सांगण्यास खुद्द महाराज आले. एका मोठ्या चौरंगावर महाराजांचे ताट, एक चांदीचा तांब्या व एक पुलपात्र ठेवलें गेलें. मडळीसह महाराज पत्तीस आले व त्याना आपल्या ताटासाठी चौरंग ठेवलेला दिसला. त्यांनी बोटाच्या खुणेने चौरंग उचलून नेण्यास एका हुजऱ्यास आज्ञा केली व मडळींना पाटावर बसण्यास सांगितलें. त्या दिवशीं कोणकोण पितर होते हें मला आता आठवत नाही. बहुतेक त्यात विठ्ठलराव शिंदे व बाबुराव जेधे असावेत असे वाटतें. सर्व मडळी जेवणास बसल्यानवर मध्ये त्याच्याकरिता ठेवलेल्या जागवर महाराज बसून बसले. थोडयाच वेळात खासगीतील दोनतीन माणसे पितराकरिता रेशमी धोतरे व एकेक तांब्यापचपात्र घेऊन आली. हुजऱ्यानी पितराच्या पुढे तावे व पचपात्र ठेवलीं. नतर महाराजांनी एकेक धोतर पितराच्या अगावर स्वहस्तें घातले व दोन्ही हात जोडून त्याना वाकून नमस्कार करात गेले. नंतर एका सोवळेकऱ्याने पितराच्या ताटातील थोडा थोडा भात एका ताटात गोळा करून त्यातील पेंढी व थोडा भात प्रसाद म्हणून महाराजाच्या ताटात वाढला. परत महाराजानी उठून प्रत्येक पितरास वाकून नमस्कार करून नतर सर्व पक्तीस नमस्कार करून "भोजनास सुरवात करा" असे सांगितलें. महाराजाच्या अशा प्रेमळ व विनयशील वागणुकीचा पुणेकर मराठा समाजावर फार मोठा परिणाम झाला. पुढे बरेच दिवस ब्राह्मण पुढाऱ्यां कडून आम्हा ऐकत होतो की, "तुमचे महाराज किती श्रद्धाळू व विनयशील आहेत हो!"

शाहूमहाराजांनी पुणेकर मराठा समाजात फार मोठी जागृति केली. ते पुढे पुढे पुण्यास वरचेवर येत असत. येण्याच्या पूर्वी त्याच्या येण्याची वर्दी आम्हांस आगाऊ असेच. तथापि पुष्कळ वेळा आम्ही त्याच्या आल्यावर जाण्यापूर्वीच

महाराज न सांगता घोडागाडींतून बाबुराव जेथे, श्रीपतराव शिंदे अगर मजकडे येत. गाडी दारात उभी करून श्रीपतरावाकडे त्यांच्या माडीवर गले, म्हणजे श्रीपतरावाने भाजलेल्या भुईमुगाच्या शेंगा त्वरा ओटी भटार आणावी. ती खालीत महाराज थोडा वेळ बसत. नंतर आम्ही सर्व जण बाबुराव जेध्यांकडे जव मॅन्शनवरहि जात असू. जेथे मॅन्शनच्या पायऱ्या फार सख्या असल्याने महाराज गाडीतून बाबुरावांना हाक मारीत. त्या कालखंडात, जध्यांच्याकडे येणाऱ्याजाणाऱ्या पाहुण्यांचा व स्थानिक मंडळींची फार ये जा असे. महाराजांची गाडी दारात उभी असताना बराच पाहुणे मंडळी गाडीजवळ येत. एखादे वेळीं बाबुराव बाहेरून दोनतीन भाजीचे हारे हमालाच्या डोक्यावर देऊन येत. घरचाच त्या वेळीं त्यांची पन्नाससाठ मंडळी असावयाची. एकदा असेच बाबुराव व येणाराजाणारा मंडळी पाहून महाराज मला म्हणाले, "पाटील, या बाबुरावाचे काळीज मुपाएवढे असल नाही? कित्येक माणस येवात, जातात, खावात—आनंद आहे नाही!" असले महाराजांचे स्तुतिपर उद्गार ऐकून कोणा मराठ्यास धन्यता वाटली नसती व त्याची छाती फुगली नसती!

शिवाजी सोसायटीच्या कार्यकारी मंडळाच्या सभा व वार्षिक सभा दरसाल भरत असत. पण सन १९१९ची वार्षिक सभा फार मोठ्या प्रमाणावर बहुजनसमाजाच्या वस्तींत, भवानी पेठेतील धर्मशाळेपुढील पटांगणात छत्रपति श्रीशाहूमहाराजांच्या अध्यक्षतेखाली भरविण्याचे ठरले. श्रीशाहूमहाराजांना ब्राह्मणेतर समाज फार मानीत असे. कायदेकौन्सिलच्या निवडणुकीतहि महाराज लक्ष घालीत. जुलै १९२० साली कर्नाटकातील ब्राह्मणेतरांनी हुबळीस एक राजकीय सभा भरविली होती. त्या सभेस शाहूमहाराज एक हितचिंतक म्हणूनच हजर होते. तरी पण तेथील लोकांनी मोठ्या उत्साहाने महाराजांचे भव्य स्वागत करून त्यांची फार मोठी मिरवणूक काढली होती. [पुण्यातील कट्टर सनातनी ब्राह्मणास महाराजांची ही लोकप्रियता व सरकारदरबारातील वाढतें वजन पाहून वैषम्य व हेवा वाटू लागला आणि त्यांच्या मनात महाराजांविषयी मत्सर उत्पन्न झाला होता.] अशा स्थितींत पुण्यास भरणाऱ्या शिवाजी सोसायटीचे महाराजांनी अध्यक्ष होणें ही गोष्ट ब्राह्मण समाजातील काही लोकांना व त्यांच्या आहारीं गलेल्या पुण्यातील नारायणराव गुंजाळ, काशिनाथ ठकूजी जाधव, मुंबईचे गोविंदराव बोत्रे, अर्जुनराव गोळे वगैरे मराठा गृहस्थांना रुचली नाही. त्यांनी महाराजांचा अपमान करण्याचा घाट घातला. भवानी पेठेंत तारीख ३ ऑक्टोबर १९२० रोजीं सोसायटीची सभा भरली. त्या सभेत प्रचंड समुदाय जमला होता. महाराजांच्या अध्यक्षतेखाली सभेस सुरुवात झाल्यानंतर अर्जुनराव गोळे उठून उभे राहिले व त्यांनी बोलण्यास परवानगी मागितली. गोळे काही तरी बोलून जातील, मग आमच्या पैकी कोणास तरी त्यांना उत्तर देणें भाग पडेल व त्यामुळे सभेत दंगल माजेल, म्हणून गोळे यास बोलण्याची परवानगी देऊ नये असें आमच्यापैकी काहींनी महाराजांस सुचविले आणि सांगितलें की, ही सभा निव्वळ शिक्षणविषयक गोष्टींची चर्चा करणार,

तिच्यात राजकीय विषय आणावयास नकोत. तथापि महाराजानी गोळ्याना बोलण्याची परवानगी दिली. गोळे यानी आपल्या भाषणात, "महाराज सत्यशोधक समाजास उत्तेजन देतात" असे म्हणून "महाराजाना आमच्या धार्मिक बाबतींत बोलण्याचा अधिकार नाही व तो अधिकार शिवाजीमहाराजानाहि नव्हता, धार्मिक बाबतींत आम्ही शिवाजीलाहि जाणत नाही." असे शब्द उच्चारले. हे शब्द जमलेल्या श्रोत्यास न आवडल्यामुळे त्यानी "खाली बसा, खाली बसा" असा ओरडा केला. ही संधि साधून वर उल्लेखिलेल्या टिळक पार्टीच्या लोकानी गल्का करण्यास सुरुवात केली व काही जणानी जवळच असलेल्या बुरुडाच्या वेळूच्या ढिगातून काठ्या घेऊन दगलीस व मारामारीस सुरुवात केली. या मारामारींत बऱ्याच जणास जखमा झाल्या. रावबहादूर गगाजी मुकुदराव काळभोर याचा हात मोडला व बाबुराव जेधे याच्या डोक्यास मार बसला. महाराज ही दगल शातपणें पाहत होते. मी व बडोद्याचे खासेराव जाधव महाराजाजवळ उभे होतो. मी महाराजाना म्हटलें, "आपण मागच्या बाजूने बाहेर जाऊ या. आपला अपमान करण्याचा विरोधी गटाचा सकल्प दिसतो." इतकें सागितल तरी महाराज हलेनात. जसा एखाद्या मोठ्या सरोवरात उच्च खडक उभा असतो तसें महाराज प्रेक्षकाच्या समुदायात उच्च उभे असलेले दिसत होते. महाराज सव्वासहा फूट उंच, धिप्पाड, भरदार छातीचे व त्यातून त्याच्या डोक्यावर केलेला मोठा फेटा असल्याने ते समाजात उठून दिसत. जवळच्या लोकाचीं डोकीं याच्या छाती इतकीं दिसावयाची. दर्याच्या वेळीं पाण्याच्या लाटा खडकास थडकून परत जाव्यात, त्याप्रमाणे प्रेक्षकाचा व विरोधी गटाचा समूहसागर मागेपुढे हेलावत होता. महाराज माझ्या सागण्याकडे लक्ष देत नाहीत असे पाहून मी खासेराव जाधव यास म्हणालो, "तुम्ही तरी महाराजाना सागा आणि त्याच्यावर येणारा हा अपमानाचा प्रसग टाळू या." माझे हें सागणें ऐकून खासेराव जाधव महाराजाचा हात धरून त्यास त्याच्या मोटारीकडे नेऊ लागले. तेव्हा मी म्हटलें, "तसे करू नका. महाराजाची मोटार मुख्य प्रवेशद्वाराजवळ आहे, तेव्हा विरोधकाचे विशेष लक्ष तिकडे असणार. तरी आपण मागच्या बाजूने जाऊ या. तेथ माझी फोर्ड मोटार आहे. त्यात बसून महाराजाच्या बगल्याकडे जाऊ फोर्डसारख्या साध्या मोटारीकडे कुणाचें लक्ष जाणार नाही." असे म्हणून मीहि महाराजाच्या दुसऱ्या हातास धरलें, आणि मी, खासेराव जाधव व महाराज माझ्या फोर्ड मोटारीजवळ आलो. महाराजास गाडींत बसण्याची मीं विनती केली. ते गाडीत बसताच त्याना कोणीं ओळखू नये म्हणून त्याच्या सुरक्षिततेसाठी आम्ही दोघेहि अवळजवळ त्याच्या अगावर रेलून बसलों व जवळच्या रस्त्यान महाराजाच्या पन्हाळा लाज बगल्यावर सुरक्षित पोचलो. मागे सभेंत बराच दगा झाला

विरोधी पक्षाने महाराज, भास्करराव जाधव व मी अशा तिघावर मारामारीची फिर्याद केली. हे खटल्याचें काम चालू असताना महाराज मला एकदा म्हणाले, "पाटील, तुम्हाला या फिर्यादीबद्दल भीति वाटत नाही का!"

मी उत्तर दिलं, "आपणासारखे उत्पति माझ्याबरोबर आरोपी असताना मला भीति कसली?"

पुढे बरेच दिवस या फिर्यादीचे कागदी घोडे नाचले. पण कोर्टाच्या अधिकार कक्षेत हिंदी संस्थानिक येऊ शकत नाहीत या मुद्द्यावर व ही फिर्याद खोडसाळपणाने केली असल्याचें दिसून आल्याने ती कोर्टाने फटाळून लावली.

महाराजांनी पुण्यातील संस्थास मदत कलीच केली, पण कार्यकर्त्यांच्या पाठीवर थाप टाकून त्यांच्याकडून जास्त काम करून घेण्याची त्यांची शैली और असे. अलीकडे पुण्यातील मराठे लोकांनी पुष्कळ काम केलें आहे, हे खरें आहे, पण कधीकधी त्यांतील काही लोकांच्या तोंडून उद्गार निघतात की, "महाराजांनी आम्हांस किती पैसे दिले होते? आम्हींच जास्त पैसे जमा केले." पण ते विसरतात की, आताप्रमाणे त्या काळांत सरकारकडून मदत मिळत नसे. म्हणून महाराजांच्या त्या वेळच्या देणग्यांना फार महत्त्व असे. शिवाय त्यांनी पुणेकरासच मोठेपणा देऊन त्यांच्याचकडून सामाजिक कामें करून घेणं हे त्यांच्या सामाजिक सुधारणेच्या पुढारीपणाचं कौशल्य असे.

मला निदान सन १९०२ पासून पुण्यातील ब्राह्मण ब्राह्मणेतरांची चांगली माहिती आहे. मी सन १९०२ च्या आरंभास पुण्यास आलो. मुंबईस जसं कोंकणातून आलेल्या कोणत्याहि जातीच्या माणसास 'बाळू' म्हणतात, तसेंच जवळजवळ पुण्यास जो ब्राह्मण नाही व जे अस्पृश्य नाही अशा सर्व जातींतील माणसास 'मराठे' म्हणत. यांत माळी, न्हावी, सुतार, लोहार, हमाल, टांगवाले, वगैरे सर्व लोक येत. मात्र त्यांत ब्राह्मण, प्रभू येत नसत. शिवाय ब्राह्मण लोक इतर लोकांना "अरे, तुरे" या भाषेत बोलत. हें फार अस्वाभाविक न हतें. कारण त्या वेळी शामराव एकसुद्धा मराठा कारकून नसे. मग अधिकाऱ्यांची गोष्ट सोडा. पोलिसखात्यांत मात्र खालून वर चढत गेलेले चारदोन मराठे फौजदार व एखादा इन्स्पेक्टर असे. पण त्या बापड्यांनासुद्धा रूढीमुळे एकेरी नावाने बोलत. विठू रामा शिंदे, रामा पाडू अशा तऱ्हेने संबोधीत पेशवाईच्या पूर्वीची मराठ्यांची सुस्थिति राहिली नव्हती. जीं थोडीं मराठ्यांचीं घराणीं पुण्यात राहिलीं होतीं त्यांतील कर्तबगार लोक पेशवाईच्या उत्तर काळात बडोदे, ग्वाल्हेर, इंदूर, धार, देवास इत्यादि ठिकाणीं मराठा संस्थानांत गेले होते. पुण्यात त्यांना आधार नव्हता. शिवाय मराठा समाजांत शिक्षण नव्हतं. या बाबतींत मी एक अनुभवाचं उदाहरण सांगतो.

मी सन १९०६ साली शेतकी कॉलेजवर फार्म सुपरिटेंडेंट म्हणून लागलो. या वेळीं शेतकीकामाच्या देखरेखीसाठी लहान अधिकारी व फील्डमेन नेमले होते. त्यांत काही जण इंग्रजी शिकलेले तरुण मराठे सातारा, कोल्हापूर, इस्लामपूरकडून आलेले होते. हे तरुण माझ्या हाताखाली होते व मी जरी सुपरिटेंडेंट होतों तरी आम्ही सर्व प्रोफेसर ऑफ ॲग्रिकल्चर यांच्या हाताखाली होतो. रावसाहेब केळकर हे असिस्टंट प्रोफेसर होते. या दृष्टीने ते आमच्या वरचे अधिकारी होते. त्यांना

मराठा अधिकारी पाहण्याची सवय नव्हती. एकदा या नवीन वळणातील गृहस्थ (गणपतराव शिंदे) मजजवळच उभे होते. रावसाहेब पेठकराना सुपारी फोडून घ्यावयाची होती. जवळच्या माणसात वर उल्लेखिलेले श्रीयुत शिंदे होते. त्यांच्याजवळ फार्मवरील एक मुकादम ब्राह्मण अगर प्रभु उभा होता. रावसाहेब पेठकर यांनी ब्राह्मण मुकादमास सुपारी फोडावयास न सांगता, मराठा जातीच्या मॅट्रिक झालेल्या श्रीयुत शिंदे यास उद्देशून म्हणाले, "एवढी सुपारी फोडून आणा पाहू." श्रीयुत शिंदे हे सातारचे. त्यांना ही अडचण वाटली व ते तसेच गोंधळून उभे राहिले. तेव्हा मीच त्या मुकादमास म्हटले, "ती तेवढी सुपारी बाहेरून फोडून आणून दे." असे प्रसंग वेळोवेळी येत.

ब्राह्मण लोकांकडून सर्वसाधारण मिळत असलेली हलक्या तऱ्हेची वागणूक पुण्यातील तरुण मराठ्यास जाचक वाटू लागली व यावर ते प्रतिकारात्मक उपायहि शोधू लागले. ब्राह्मणाने मराठ्यास अरेतुरे म्हटले, तर मराठ्यानी ब्राह्मणास तसे म्हणावे म्हणजे एक भांडणाची कुरापत काढल्यासारखे होई. म्हणून बाबुराव जेध्यांनी एक नवी कृति काढली ती अशी :

पुण्यात ब्राह्मण जहागिरदार व इनामदार लोकांची वस्ती मोठी असे; आजहि आहे. या सरदार लोकांकडे एक तरी घोडागाडी असायची. गाडीवरचा कोचमन गरीब मराठाच असणार. त्याला ब्राह्मण मालक त्यास 'लिव्हरी' पोषाख देई. त्यातील पगडी जुन्या काळच्या मराठे इनामदारासारखी, मराठेशाही पिळदार असावयाची. ती त्याने फक्त मालक गाडीत असेल तरच घालायची, असा परिपाठ असे. हे दृश्य आम्हा तरुण मराठ्यास बोचू लागले. कारण चुकून ब्राह्मणजातीचा कोचमन असला तरी त्याच्या डोक्यावर पगडी मात्र मराठेशाही असावयाची. तेच कोल्हापूरचा कोणी इनामदार किंवा महाराज घोडागाडी घेऊन पुण्यास आले तर त्यांच्या कोचमनच्या डोक्यास पटका असावयाचा. एकदा आम्ही मराठा ब्रदरहुडमध्ये गप्पागोष्टी करीत असता हा विषय निघाला होता. पुण्याचे बाबुराव जेधे एक स्वाभिमानी सधन मराठा कारखानदार असून ते मराठ्यांच्या उन्नतीसाठी मनोभावे झटत व आजहि झटतात. आमच्या गप्पा चालल्या असताना ते म्हणाले, "आपण एक गमत करू या. आपलीहि एक घोडागाडी आहेच. मी आजच एक पुणेरी, लाल, ब्राह्मणी कोरीची, जराच्या झिरमिळ्याची पगडी विकत घेतो. ती माझ्या मराठा कोचमनच्या डोकीवर चढवून आपण गाडीतून शुक्रवार पेठेतून निघून बाहुलीच्या हौदावरून सदाशिव पेठत, तेथून नारायण पेठेत व शनिवारवाड्याहून परत बुधवारात येऊन नतर स्टेशनकडे जाऊ." त्याप्रमाणे आम्ही निघालो. आमची गाडी जाताना आमच्या कोचमनची ब्राह्मणी कोरीची पगडी पाहून जिकडेतिकडे हशा पिकत असे. आमच्या या थट्टेचा इष्ट परिणाम झाला व काही दिवसानी ब्राह्मण कोचमनच्या डोक्यावरील मराठा पगडी जाऊन तेथे साधा पटका अगर पागोटे आले.

मीं कार्यकारी मंडळांतून माझें नांव मागें घेतलें. तथापि वार्षिक सभेस दरसाल मी हजर राहतों. आतां या संस्थेचा व्याप फार वाढला आहे.

शाहूमहाराजांच्या सांनिध्यांत आलेल्या माणसाचा स्वाभिमान जरूर जागा होई. याबद्दलचीं एकदोन उदाहरणें उपयुक्त होतील. माझ्या वडिलांच्या वयाचेच एक आमचे भाऊबंद गुरु हणमंत थोरात, मी लहान असतांना, कोल्हापुरास तरुण शाहूछत्रपतींच्या तैनातींत होते. हे वाणेदार गृहस्थ महाराजांचे हुजरे असत. नंतर ते त्यांचे बंदूकबारदार झाले व त्यांनी महाराजांना शिकारीचे पहिले पहिले धडे दिले होते. त्यांच्या सांगण्यांत येई की, महाराज म्हणतात, "दरबारचे अधिकारी (त्या वेळीं एक दोन अपवाद सोडून सर्व अधिकारी ब्राह्मणच असत) खेड्यांतील प्रजेला व तेथील पुढाऱ्यानांसुद्धा फार उद्धटपणानें वागवितात, हें बरें नव्हे. लोकांना बखळ बसवून घेऊन गांवच्या देखभालीची अधिकाऱ्यांनी चौकशी केल्यास, लोकास त्यांच्याबद्दल आदर वाटून ते आपली शेतीवाडी चांगली करतील व सरकारचीं कामंहि तत्परतेनें होतील. पण या अधिकाऱ्यांना ब्राह्मण्यानें ग्रासलें आहे व म्हणून ते लोकांच्या स्वाभिमानास धक्का पोंचण्यासारखें वर्तन करतात."

मी कोल्हापुरांत इंग्रजी चौथ्या-पांचव्या इयत्तेत शिकत असतांना सुट्टीमध्यें गांवीं गेलों होतों त्या वेळीं आमच्या गावाजवळच असलेल्या मौजे शिपे या गांवास गेलों होतों. लक्ष्मणराव माने नाईक, माझ्या पत्नीचे वडील, तेथीलच राहणारे. मी त्यांच्याकडे गेलों त्याच दिवशीं कोल्हापूरचे ब्राह्मण जिल्हाधिकारी देसाई हे या गांवीं दप्तरतपासणीस आले होते. ते तेथील जुगाईच्या देवळांत उतरले होते. देऊळ मोठं असून त्यास सभोंवार प्रशस्त सोपे होते. पुढच्या सोप्याखालीं एक पडवी होती. पुढच्या सोप्यांत एक मोठं लाल रंगाचें जाजम अंथरलें होतें. त्यावर भिंतीस लागून गादी व वर तक्क्यास टेकून रावसाहेब बसले होते. सोप्याच्या खालीं पडवींत गांवची मंडळी अदबीनें उभी होती. लक्ष्मणराव माने एक सुखवस्तु शिकारी शेतकरी होते. त्या वेळीं खेड्यांतील लोकांस इंग्रजी शिकण्याची गोडी लागली नव्हती. इंग्रजी शिकण्यासाठीं शहरांत जाणारा त्या भागांतील मीच पहिला विद्यार्थी होतों म्हणून माझे सासरे लक्ष्मणराव यांना अभिमान वाटे. ते मला म्हणाले, "चला, देवळांत रावसाहेब आले आहेत त्यांच्याकडे जाऊं." आम्ही देवळांत गेलों व रावसाहेबांना वाकून 'रामराम' केला. लक्ष्मणरावांनी रावसाहेबांस सांगितलें, "हे माझे जावई. कोल्हापुरास इंग्रजी शिकत आहेत." रावसाहेबांनी मान हलविली, पण काहीं विचारपूस केली नाहीं. मी सोप्यांत जाजमाच्या अलीकडच्या कडेवर बसलों. माझे सासरे इतर गांवकऱ्यांबरोबर खालीं पडवींत बसले. मी बसले होतों तेथें जवळच रावसाहेबांचा नाईक, उगले व पट्टा घालून, उभा होता. त्यानें हळूच आपल्या पायाच्या बोटांनीं जाजम ओढून माझं लक्ष आपल्याकडे वेधलें. मीं त्याच्याकडे पाहतांच, त्यानें मला जाजमावरून मागें जाण्यास डोळ्यानें खूण केली. अर्थात् तें माझ्या मनास लागलें व मी उठून

रावसाहेबास न विचारता घरी गेला. मला वाटतें, पुढें सात आठ वर्षांनी हे रावसाहेब प्लेगनें वारले. त्या वेळची सगळीच हकीकत मीं एकली ती अशी. रावसाहेबांचें शव स्मशानभूमींत गेलें, त्या वेळीं स्मशानात दहनासाठी बरींच प्रेतें थांबून राहिलीं होतीं, कारण शहरात प्लेग असल्याने स्मशानभूमींत प्रेत जाळण्यास लवकर जागा मिळत नसे. तथापि रावसाहेबांच्या प्रेतास अग्रक्रम देण्यासाठी आधी आलेल्या प्रेतास मार्ग द्या असें त्यांच्या शिपायाने सांगितलें. त्या वेळीं तेथील एक गृहस्थ म्हणाला, "रावसाहेब गेले तरी त्यांचें प्रेतसुद्धा त्रास देतच, नाही!"

दुसरी आठवण निवेदन करण्यापूर्वी सांगितलें पाहिजे की, शाहूमहाराज कोणावर फारसे रागावत नसत. ते सामान्य लोकांशीं व शिपाईप्यद्यांशींसुद्धा प्रेमाने वागत. या त्यांच्या उदाहरणावरून महाराजांचीं मुलेसुद्धा हुजऱ्यांना वा बंदूकबारदारांना 'काका, मामा' म्हणून संबोधीत.

एकदा मी व आमच्या गावचे गुरु हणमंत थोरात गावाहून कोल्हापुरास जात होतों. त्या वेळीं बसेस नव्हत्या. आम्ही पायी निघालों होतों. आमच्या गावापासून चार मैलांवर बावड्यास आम्ही आलों. बावड्यात गावास लागून एक सुंदर आणि प्रशस्त धर्मशाळा आहे. तिचें रूपांतर अलीकडे जनावरांच्या दवाखान्यात झालें आहे. पण त्यांत जनावरें मात्र बांधीत नाहीत, एवढें खरें. फक्त डॉक्टर तेथे राहतात व औषधें आणि शस्त्रक्रियेचीं हत्यारें तेथ ठेवितात. ही व्यवस्था मीं राजसी कौन्सिलांत मंत्री असताना केली होती. धर्मशाळा टेकडीच्या कंगाटात उंचावर असून तिला एकाखाली एक असे दोन प्रशस्त सोपे आहेत. खालच्या सोप्याला अडीच-तीन फुटाचा कठडा आहे. आम्ही बावड्यास गल्यावेळीं आम्हास धर्मशाळेत बरेच शिपाई व त्या गावचीं माणसं दिसलीं, म्हणून आम्ही धर्मशाळेकडे वळलों. तेथ त्या दिवशीं मामलेदार उतरले होते. धर्मशाळा उतरणीवर असल्याने सोप्यात चढून जाण्यास सातआठ पायऱ्या आहेत. त्या लांब व रुंद असून एकाच वेळीं त्यांवरून पाचसहा माणसं खाली-वर जाऊ शकतात. आम्ही तेथ गल्यावर आमचे गुडोबा बंदूकबारदार खालच्या पायरीवर बसले व त्यांनी आपली बंदूक कठड्यास टेकून ठेविली. इतक्यात रावसाहेबांची बायको जवळ असलेल्या आवीऱ्याचे ओढ्यातून पाण्याची घागर कडेवर घेऊन वर आली व पायऱ्यांजवळ येताच ती खेकसली, "चल रे, दूर हो, वाटेवर का बसलास! शिवाशिव होईल की." गुडोबा हे शाहूमहाराजांचे सांनिध्यात असलेले बंदूकबारदार. त्यांना रोज वाड्यातील माणसांनीसुद्धा अहोजाहो संबोधलेलें. त्यांना साहजिकपणें त्या बाईचं उद्धट वर्तन आवडलें नाही. बसल्या जागेवरूनच त्यांनी तिच्याकडे रोखून पाहिलें व ते म्हणाले, "अरेतुरे काय म्हणतेस? तुझी जीभ आडवी पडली की काय? मी काय तुझ्या गाठ्यात उपजलों आहे? तोंड आवर, नाही तर जीभ मुळापासून ओढून काढीन" हें देखाच भाटण रावसाहेबांनी एकून ते सोप्यातून खाली पायऱ्यावर

आले व गुडोनाचा लष्करा बाणा पाहून म्हणाले, "अहो, तिला काय माहिती की तुम्ही महाराजाचे नदूकबारदार आहात म्हणून? माफ करा." मग आम्हा कोल्हा पूरचा रस्ता धरला.

कोल्हापुरात आमच्या गुरुकुलात (मराठा बोर्डिंगात) वाढलेल्या छात्रानी पुण्यास व बाहेरहि जेथे जेथे ते गेले, तेथे आपला स्वाभिमान राखून पुढारलेल्या वर्गातील माणसास सौजन्याचे धडे शिकविले आहेत. पण ते काम फार अवघड असे. तथापि त काम महाराज मोठ्या चातुर्याने करीत. महाराजाच्या मदतीने काही ब्राह्मण व ब्राह्मणेतर शिकून कोल्हापुरास आले होते. पण गमत अशी की जर त्यातील एखादा ब्राह्मण महाराजास भेटावयास गला तर शिपाई लोक (ते ब्राह्मणेतरच असणार) "अमुक अमुक पत हुजूरकडे आले आहेत" अशी वर्दी देत. पण तो भेटावयास येणारा माणूस मराठा अगर दुसरा कोणी ब्राह्मणेतर असला तर "रामा पवार आला आहे" अशा तऱ्हेची भाषा वापरीत. असे करणे त्याच्या अगवळणी पडले होते. ही प्रथा महाराजाच्या नजरेतून सुटली नव्हती. मी एकदा महाराजाच्या जवळ असताना, माझे बालपणचे स्नेही डॉक्टर बळवतराव चव्हाण महाराजास भेटण्यास आले. शिपायाने वर्दी दिली की, "बाळू चव्हाण हुजूरकडे आला आहे." महाराजानी कोण आला हें जाणलें; तरी पण त्यानी शिपायास विचारले, "कोण बाळू चव्हाण?" तो म्हणाला, "ज्याला सरकारने पुण्यास शिकविण्यासाठी पाठविला होता तो राघू सुभेदाराचा मुलगा." महाराज म्हणाले, "त्याना आत घेऊन ये." हुजऱ्या डॉ० चव्हाणास घेऊन आत आला. मी तेथे होतोंच. महाराजानी शिपायास चागलेच सुनावलें. ते म्हणाले, "ऐकानो, कोणी भट ब्राह्मण आला तर कृष्णार्जीपत आले, फडके आले, असे म्हणता. तेच जर कोणी शिकलासवरलेलाहि मराठा आला तर त्यास असे 'बाळू चव्हाण', 'विठू शिंदा' म्हणता, तुम्हाला लाज नाही वाटत? तुम्ही मराठे, ते मराठे, याच्याबद्दल तुम्हाला अभिमान असला पाहिजे. दर आजपासून तुम्ही 'बाळू चव्हाण', 'विठू थोरात' असे म्हणाल तर खबरदार! माझ्याशी गाठ आहे." असल्या चुका दुरुस्त करण्यास महाराजाना पुष्कळ अडचणी पडत असाव्यात. कारण ते एरव्ही आपल्या मधूशीं, मेव्हण्याशी, व जवळच्या तरुण नातलगाशी अरेतुरे करत. उदाहरणार्थ, "बापसाव, उगा त्या माम्याला घेऊन ये" असे म्हणणार. वास्तविक माम्या म्हणजे महाराजांचे मेहुणे मामासाहेब खानविल्कर हे होत. पण जर कोणा मराठा अगर ब्राह्मण कारकुनाशी ते बोलत असले तर बहुवचनाने सबोधीत. वास्तविक या मराठा शिपायास व हुजऱ्यास मराठा अधिकाऱ्याबद्दल आदर असे; पण मवमीच्या प्रभावाने ते त्यास एकेरी नावाने सबोधत. त्याचे उलट ब्राह्मण, भिक्षुक जरी असला तरी त्याला अहोजाहो म्हणत. ही एक सदर हिंदुधर्माचा प्रभाव असावा. हा जमाना आता बदलला आहे. सांप्रत बाळी ब्राह्मणाबरोबर मराठे मिनिस्टर, सेक्रेटरी, न्यायाधीश, पोलिस

सुपरिटेंडेंट व जिल्हाधिकारीहि आहेत, त्यामुळे वर्दी देणारे शिपाई मराठे असले तरी ते त्यांच्या त्यांच्या दर्जाप्रमाणे त्याना संबोधितात.

शाहूमहाराजांनी अस्पृश्योद्धाराचे बाबतीत मोठी कामगिरी केली आहे. त्यानी अस्पृश्य मानल्या गेलेल्या जातींच्या विद्यार्थ्यांसाठी मिस् क्लार्क बोर्डिंग बांधले व त्याना पुढे आणण्याचे निरनिराळे प्रयोग केले. ज्या काळीं ब्राह्मणेतरात एकहि वकील नव्हता त्या काळीं काही नॉनमॅट्रिक मराठ्यांबरोबर काही महार तरुणासहि सनदी वकील बनविले होते. महाराजानी डॉक्टर आंबेडकरास विलायतेस जाण्यास मदत केली होती.

पूर्वी कोल्हापूर रिसाल्यात फक्त मराठे व मुसलमान लोकांचीच स्वार म्हणून भरती होई. स्वाराचा युनिफॉर्म (गणवेश) तांबड्या बनातीचा असून त्याच्या कमरेस तरवार व हातात भाला असे. स्वारास "भले लोक" म्हणून संबोधण्यात येई. एकदा महाराजानी स्वारात भरती करण्यासाठी सातआठ महार तरुणास रिसाल्यात पाठविलें. रिसालदारास अडचण पडली. त्यानी आपल्या हाताखालच्या डफेदारास व स्वारास बोलावून त्याना महाराजांचा हुकूम दाखविला. या कमिटींत ठरले की, भले लोक हा रिसाल्याचा अपमान समजतील व त्यांच्यात असंतोष माजेल. त्याप्रमाणे रिसालदारांनी महाराजास भेटून सांगितले. महाराज म्हणाले, "काही हरकत नाही. भले लोकांच्या भावना मी तरी कशाला दुखवू?" नंतर त्यांनी दुसरी तोड काढली. महाराजांच्या गाडीखान्यात घोड्याच्या गाड्यांबरोबर इनफन्ट्रीचे सामानसुमान ओढण्याचे काही खेचराचे टांग होते. महाराजानी गाडी कामगारास सांगून पंचवीस चांगल्या, बसण्यायोग्य, नवीं खेचरें खरेदी करविलीं व नव्या राजवाड्याजवळच्या हत्ती महालाच्या एका खोप्यात त्या खेचरांचें ठाण बनविलें. त्या काळीं महाराजांचें खाजगी ऑफिस हत्ती महालाच्या माडीवर असे. ज्या महार तरुणास त्यानी रिसाल्यात भरतीसाठी पाठविले होते, त्यासच खेचरावर बसण्यास शिका म्हणून सांगितले. त्याना खाकी कोट, पाटलोण, पायात वहाणा, कमरेस तरवार व पाठीस कातडी बॅग (पिशवी), असा गणवेश दिला त्यापूर्वी हुजूरटपाल मुल्की शिपायाबरोबर अगर जरुरीचें काम असल्यास घोडेस्वाराबरोबर जाई. खेचर स्वाराचा दाहिजा (दहा स्वाराचा गट) तयार होताच आपल्याकडे असलेले टपाली घोडेस्वार बंद केले व टपाल खेचर स्वाराबरोबर पाठवू लागले. टपाली खेचर स्वाराच्या नेमणुकीची गुणगुण दिवाण, खासगी कारभारी, चीफ पोलिस याना मिळालीच होती. ही घडी बरेच चालली तरी हे स्वार टपाल घेऊन ऑफिसाबाहेरच उभे राहत. हे समजल्यावर महाराजानी पहाऱ्यावरील शिपायास ताकीद दिली की, टपाली स्वार येताच त्याने मुद्दाम ठेविलेल्या खुंट्यास खेचर बांधून स्वतः लखोटे घेऊन हुजूर ऑफिसात खुद्द हुजुराच्याकडे द्यावे. तरी पण हे महार स्वार ऑफिसात कचरत कचरत येऊन, तेथ उभा असलेल्या हुजऱ्याच्या हातावर टपाल टाकीत. हें पाहून कधीकधी महाराज त्या स्वारांना म्हणत, "आण इकडे." व तो वरून टपाल

टाकू लागला, तर आपणच त्याच्या हातातील टपाल ओढून घेत. अशा त्याच्या अस्पृश्यतानिवारणाच्या कल्पना असत.

सन १९१८ साली माझी पत्नी फार आजारी होती म्हणून मी तिला मिरजेस अमेरिकन मिशन हॉस्पिटलात घेऊन राहिलो होतो. त्या वेळीं छत्रपति शाहूमहाराज मिरजेस आपल्या बंगल्यात राहत होते. एके दिवशीं कोणीं तरी त्याना सांगितलें की, पी० सी० पाटील हॉस्पिटलमध्ये आहेत. महाराज तातडीने डॉ० व्हेलकडे गेले व माझ्याविषयी विचारपूस केली. तेव्हा त्याना समजलें की, मी आजारी नसून माझ्या बायकोचें ऑपरेशन झाल्यामुळे मी व माझी बायको हॉस्पिटलमधील दोन खोल्यात राहत होतों. महाराज माझ्या खोलीकडे आले आणि बायकोच्या आजाराबद्दल चौकशी करून मला डॉ० व्हेलसाहेबाकडे घेऊन गेले, व त्याना सांगितलें की, "पी० सी० पाटील हे माझ्या संस्थानातील एका गावचे पाटील आहेत. सध्या ते डेप्युटी डायरेक्टर ऑफ ॲग्रिकल्चर असून ऑल इंडिया सर्व्हिसमध्ये आहेत. आपल्याला सांगायला नकोच, तथापि ह्या केसची काळजी घ्या, अशी माझी आपल्याला विनंती आहे." डॉ० व्हेल प्रत्येक केसची काळजी घेत यात शंका नाही. तथापि महाराजांच्या सांगण्याचा परिणाम मात्र माझी मिळकत मोठी आहे असा झाल्याने आमचें दिल फुललें.

आम्ही हॉस्पिटलमध्ये असताना एके दिवशीं महाराज मला आपल्या बंगल्यावर जेवावयास घेऊन गेले. त्या वेळीं ते म्हणाले की, "माझा मुक्काम दरसाल ह्या दिवसात मिरजेस असतो व चित्त्याकडून शिकार करण्यासाठी आम्ही रानात जातों." नंतर मी त्याची परवानगी घेऊन परत हॉस्पिटलमध्ये गेलों. त्या दिवसापासून मी मिरजेंत असेंपर्यंत महाराजांच्याकडून माझ्यासाठी जेवणाचें ताट व माझ्या पत्नीसाठी कोंबड्याचा सुरवा नियमितपणे येत असे. मी वरचेवर महाराजांच्या भेटीस जाई. एकदा ते म्हणाले, "चित्त्याची शिकार बघावयास येता का?" मी म्हणालों, "होय, चित्त्याची शिकार मीं आजवर पाहिलेली नाही. मी कधी येऊ?" महाराज म्हणाले, "आमचा हा उन्हाळ्यात रोजचा कार्यक्रम असतो. केव्हाहि या. आम्हास सकाळीं लवकर निघावें लागतें. ज्या दिवशीं येणार असाल त्या दिवशीं मी तुमच्याकडे गाडी पाठवीन." मीं म्हटलें, "गाडीचें कारण नाही. मजजवळ मोटार आहे. मी उद्या सकाळीं बंगल्यावर येतों."

त्याप्रमाणे दुसऱ्या दिवशीं मी महाराजांच्या बंगल्यावर गेलों. शिकारीचा कार्यक्रम आगाऊ आखला जात असल्याने, पहाटे तीन वाजताच चित्त्यांच्या गाड्या व दोनतीन शिलकी बैलांच्या हलक्या गाड्या, शिकारीच्या जागेच्या जरा अलीकडे, ठरलेल्या जागीं रवाना झाल्या होत्या. कित्येक वर्षे महाराज दरसाल चित्त्याची शिकार मिरजेच्या आसपास करीत असल्याने त्याना त्या भागाची पुरी माहिती झाली होती व कोणत्या गावच्या कोणकोणा शिकाऱ्यास बोलावयाचें हे त्याचें ठरलेलें असे. मी बंगल्यावर गेल्यावर तेथे चहा घेतला व हुजूरबरोबर नेहमीच्या

गाडींतून निघालो. महाराज स्वतःच गाडी हाकीत होते. लौकरच आम्ही चित्त्याच्या गाड्याजवळ पोंचलो. तेथ महाराज खेचरांची गाडी सोडून खिलारी बैलांच्या गाडींत बसले. मलाहि बरोबर घेतलें. आणि माळामुरडातून ओढेनाले टाळीत त्यांनी गाडी हाकली. थोडा वेळ रस्ता बरा होता तोंपर्यंत बरें वाटलें. पुढे खडकाळ भागात गाडी धावल्यावर गाडी धाडधाड आदळू लागली. दगडधोंड्यातून गाडी जरा जोरात पळत होती तरी मोठे दगड चुकवून महाराज गाडी हाकत. मध्ये आलेल्या ओढा-नाल्यातून पलीकडे जाण्याचे गौंड नेमके ओळखून गाडी पलीकडे नेत, त्याचें मला आश्चर्य वाटे. पुढे हरणाच्या रानात गेल्यावर तर महाराजांच्याबरोबर गाडीतून जाणं मला धोक्याचें वाटू लागलें. पण महाराज आपला एवढा मोठा भोग सभाळून बेधडक गाडी चौखूर हाकीत व पुढे तर ते स्वतःच चित्त्याच्या गाडींत चढले. मी म्हणालों, "माफ करा, आपली चित्त्याची शिकार मी दुरूनच पाहतों." कळपातील कोणत्या नरावर चित्ता सोडावयाचा, कोठून व कसा सोडावयाचा, हें काम मोठ्या कसबाचें व अनुभवाचें असावें, असें त्या दिवशींच्या शिकारीवरून मला दिसून आलें. मी एका लहानशा टेकाडावरून शिकारीची गंमत पाहत होतों. दोन हरणांची शिकार झाल्यावर महाराज गाडींतून हळूहळू माझ्याकडे येत असलेले पाहून मी त्यांच्याकडे जाऊ लागलो. महाराज गाडीतून उतरतात इतक्यात न्याहारीची गाडी आम्ही उभे होतों तेथ आली. एका दगडावर महाराज बसले व गाडीवानास सांगितलें, "अरे, खाली काही अथर व त्यावर पाटीलसाहेबांना टिफिन दे." आपण उठून एक सँडविच घेऊन उभ्याउभ्या खाऊ लागले व पाणी पिऊन बैलगाडींत बसले व मला म्हणाले, "चला गाडींत. कशी शिकार करावयाची ती तुम्हांला दाखवितों." जवळच्या रानात हरणें दिसत नसल्याने आम्हांस लांब जावें लागलें. या वेळींसुद्धा मला जीव मुठींत घेऊनच, बावकाडास घट्ट धरून बसावें लागलं. थोड्या वेळाने हरणें दिसल्यावर एका कोवळ्या नराकडे बोट दाखवून म्हणाले, "पाटील, त्या सामण्यावर चित्ता सोडतों.' बऱ्याच हरणांपैकी विवक्षित हरणावर चित्त्याने कसें जावें हें मला समजलें नव्हतें; तथापि महाराजांनी खाली उतरून चित्त्याच्या गाडीबरोबर जाऊन नेमक्या ठिकाणीं चित्ता सोडला. प्रथम हरण भेदरून उभेच राहतं, पण चित्ता अंगावर येताना पाहताच तें पळून जाण्याचा प्रयत्न करतें. कधीकधी त्याचा प्रयत्न सफल होतो. चित्त्याने पहिल्याच सुमारे दीडशे याडींत हरण गाठलें तर बरें, नाही तर तो रागावून रेपूट आपटीत उभा राहतो. चित्तेवान त्यास चुचकारून व दादापुता करून कसा तरी धरतात व परत गाडीवर चढवतात. तिसरा हरीण महाराजांनी मारला तेव्हा बारा साडेबारा वाजून गेले होते. मीं महाराजांना म्हटलें, "महाराज, जेवणाची वेळ नाही का झाली?" महाराज हसून म्हणाले, "का? भूक फार लागली वाटतें? आता जेवणाचें ठिकाण जवळच आलं आहे. आपण तिकडेच निघालों आहोंत जाता जाता आणखी एखादें हरीण मिळालें तर पाहू."

आम्ही ठरल्या ठिकाणीं एका ओढ्यावर पोचलो. तेथे तीसचाळीस शेतकरी आधीच येऊन बसले होते. महाराजाचें दुपारचें जेवण कोठे व्हावयाचें हें आगाऊ ठरलेलें असावयाचें व त्या ठिकाणीं आसपासचे शेतकरी आपापल्या शिदोऱ्या बांधून यायचेच असा नित्यक्रम असे. आम्ही उतरल्यावर हातपाय धुतले. महाराज एका दगडावर जाऊन बसले, व हुजऱ्यास सांगून माझ्या जेवणाची तयारी केली. महाराज बसले त्या दगडाच्या आसपास शेतकरी जरा दूर उभे होते. शिकारींतील जेवण पाहण्यासारखें असे. एका स्वतंत्र गाडींत एक पुलाव्याचा हंडा, एक मोठी चपात्याची भरलेली परात, एक रश्श्याचा ल्हानसा हंडा व एक द्रोणपत्रावळींची गाडी असा थाट असावयाचा. शिकारी नोकर जमलेल्या माणसांस "ह्या पत्रावळी घ्या व बसा" म्हणत. महाराजाच्या सभोंवार शेतकऱ्यांचें मोठें कडें बने. कांही माणसांजवळ त्यांच्या भाकऱ्या, डांगर अगर कांदे, ताकाचे मोगे असत. महाराजानी परेडची पाहणी करावी त्याप्रमाणे "हें तू काय आणलेंस?" असें विचारात फिरावें, एखाद्याच्या भाकरीवरील लोणचें उचलावें, दुसऱ्याच्या भाकरीवरील कांदा उचलावा, तिसऱ्याच्या मोग्यांतील ताक ओतून घेण्यास सोवळेकऱ्यास सांगावें. आणि ती जमलेली शिदोरी घेऊन परत आपल्या दगडावर बसावें. महाराजानी "हं, करा सुरुवात" म्हटल्यानंतर लोक आपापल्या जागेवर बसत. त्याना एक सरकारी नोकर भराभर चपात्या वाढी, तर दुसरा पुलावा वाढी, तिसरा रस्सा वाढी. हे गरीब शेतकरी जेवत असताना महाराजांना समाधान वाटे. आणि स्वतःचें जेवण शेतकऱ्याकडून गोळा केलेल्या शिदोरीवरच होई. जेवण झाल्यावर लोक एकमेकांशीं बोलत असताना मीहि त्यांच्यात मिसळलों होतो. कोण म्हणे, "एवढा राजा, पण त्याने माझ्या भाकरीवरील डांगर घेतलें." कोण म्हणे, "माझ्या भाकरीवरील कांदा घेतला." तर तिसरा म्हणे, "माझ्या मोग्यांतील आंबट ताकसुद्धा महाराज प्याले; दुसऱ्या शिकारींत मी दह्याचे मुरवणच आणणार." अशा रीतीने आमच्या शिकारींतील जेवणाचा सोहळा पुरा झाल्यावर शिकारी पार्टी परत फिरली. मी महाराजाच्याबरोबर खेचराच्या गाडींत बसलों. महाराजानी मला हॉस्पिटलमध्ये सोडलें व ते आपल्या बंगल्यावर गेले. याप्रमाणे ह्या उमद्या राजपुरुषाचा पाहुणचार मिरजच्या आसपासच्या शेतकऱ्याना दरसाल एक महिना मिळे.

याप्रमाणे चित्त्याची शिकार मला पाहावयास मिळाली. तसेंच, आपल्या प्रजाजनांतील सर्व थराच्या बहुजनांशीं, अगदीं गरीबांतल्या गरीब शेतकरी बांधवांशीं, महाराज किती प्रेमळपणानें वागून त्यांच्याशीं समरस होत असत, याचा अनुभव मला आला. शिवाय चित्त्याचे शिकारींत व महाराजाचे प्रेमळ सहवासांत माझा वेळ आनंदांत गेला आणि तिकडे हॉस्पिटलमध्ये डॉ० व्हेलने केलेल्या शस्त्रक्रियेने व औषधोपचाराने माझ्या पत्नीची प्रकृतीहि सुधारली व आम्ही कांही दिवस हॉस्पिटलमध्येच विश्रांति घेऊन गांवीं गेलों. पत्नीचें ऑपरेशन यशस्वी झालें, तथापि त्या वेळेपासून तिला दम्याचा विकार जडला व तो तिला कायमचा सोबती झाला.

कोल्हापुरास दि० ब० लठ्ठ याच्या प्रेरणेने एक जैन बोर्डिंग स्थापन झाल होत. त्याच्या उद्घाटनाच्या वेळीं एक शेतकी प्रदर्शन भरविण्याच शाहूमहाराजानी ठरविल. त्या प्रदर्शनाचा आखणी करण्यासाठी मला त्यानी आगाऊ काही दिवस बोलावून घेतलं होतं व मी सरकारा पाहुणा म्हणून त्या वेळी माझा मुक्काम स्टेशनाजवळील गेस्टहाउसमध्ये होता. या मुदतींत माझ्याकडे वाड्यावराल एक घोड्याची गाडीहि दिली होती. या प्रदर्शनाच उद्घाटन मुबइ सरकारचे सेक्रेटरी मि० रावरसन याच्या हस्त झाल. हें प्रदर्शन तारीख ८ त १६ माहे एप्रिल, सन १९१४ अस दहा दिवस चालल होतें व तें यशस्वी रीतीने पार पडल.

उद्घाटनाच्या भाषणात मि रॉबर्टसन यानी प्रदर्शनाच्या माडणीची स्तुति केली व महाराजानी पी० सी० पाटीलसारखा तज्ञ व कुशल अधिकारी मुबईसरकारास दिल्याबद्दल त्याचे आभार मानले महाराजाचा मुक्काम त्या वेळेस राधानगरास तलावाच काम चालल होत तेथे होता राधानगरी कँपास परत निघताना महाराजानी शकरराव इटुलकरास बोलावून घतल व त्यास सागितलें की, "उद्या सकाळी पी० सी० पाटलाना घऊन राधानगरीस दुपारच्या जेवणास ये " आम्ही त्याप्रमाण दुसऱ्या दिवशीं महाराजाच्या कँपवर गेलो. तेथ आमच्या नास्त्याची व्यवस्था केल्यावर महाराजानी थारल्या दत्ताजीराव इगळयाना बरोबर देऊन त्यानी नवीन तयार केलेली चहाची लागवड पाहून येण्यास मला सागितल. आम्ही परत आल्यावर मला तलावाच चालू काम पाहण्यास नेलें. त्या दिवशीं मी व शकरराव इटुलकर परत कोल्हापुरास जाणार होतो. त्यापूर्वी महाराजानी मला देण्यासाठी एक रायफल व एक बारा नबरी डबल बॅरल बदूक काढून ठेवली होती. मला पाहतात्र महाराज म्हणाले, "पाटील, तुम्हाला शिकारीचा नाद आहे. ही रायफल व बारा नबरी बदूक घऊन जा." मी म्हणालो, "महाराज, माझ्याकडे एक चागली रायफल व बदूकहि आहे मला दोनच हत्याराचा परवाना आहे. शिवाय युरोपियन अधिकाऱ्याना हाताखालच्या हिंदी अधिकाऱ्यानी शिकारीत वेळ घालवण आवडत नाही. माफ करा, सध्या तरी मी जास्त हत्यार ठेवण बरें नाही." महाराज हसले व म्हणाले, "बर तर." नतर त्याची रजा घेऊन मी माझ स्नेही इटुलकर याच्याबरोबर कोल्हापुरास परतलो एक दिवस गावीं घरच्या माणसास भेटण्यास गलों व परत पुण्याची वाट धरली. आपला म्हटलेल्या माणसाबद्दल महाराजाना आपुलकी व अभिमान वाटे.

सन १९१५ १६ सालच्या सुमारास मी एकदा रजेवर गावीं असताना, माझ मामेभाऊ साळशीचे बाळाजी नारायण पाटील यानी सागितल की, "लौकरच आमच्या गावच्या सितारामभटाची जमीन बरेच दिवस नद्दाशात आह व जिचा दरसाल लगणी लिलाव होतो ती जमीन मालकी लिलावाने विकावयाची आहे, असा मिशाळ महालकरी म्हणत होते तुम्हीं लिलाव घेतल्यास आमच्यासारख्याला ती खडाभागाने करण्याची सोय होईल. आपल्याला माहीत आह का, आम्हाला

जमिनीचा तुटवडा भासतो." मीं त्यांच्या सूचनेप्रमाणे मिसाळ महालकरी यास पत्र लिहून कळविलें कीं, "जर साळशींतील मराठ्यांची नष्टांशांत गेलेली जमीन कायम लिलावानें विकावयाची असेल तर मेहरबानी करून लिलावाची तारीख मला आगाऊ कळवा. मीं आजोळीं असतांना ती जमीन पाहिली आहे. जमीन डोंगराळ असून तिचें क्षेत्र फक्त आठ एकर असावें. साळशींत माझे पांच-सहा भागेभाऊ आहेत व त्यांना जमिनीचा तुटवडा भासतो. लिलावाची तारीख आगाऊ कळविल्यास मला किरकोळ रजा घेऊन लिलावाचे वेळीं हजर राहतां येईल." मिसाळ महालकरी यांना, माझा व सरसुभे भास्करराव जाधव यांचा चांगला स्नेह आहे हें माहीत होतें. म्हणून त्यांनी आपल्यावर जबाबदारी न घेतां माझें पत्र सरसुभ्याच्याकडे पाठविलें व या बाबतींत काय करावें म्हणून विचारणा केली. जाधवरावांनीहि माझें पत्र व जमिनीसंबंधीचें प्रकरण महाराजांकडे पाठविलें. कारण त्यांना माहीत होतें कीं, मला महाराज चांगले जाणतात. नंतर मला असें कळलें कीं, महाराजांनी आपले पर्सनल क्लार्क श्रीपतराव मंडलीक यांस बोलावून घेऊन सांगितलें कीं, "साळशी पिशवीची मिरास जमीन पी० सी० पाटलांना देण्यासारखी नाहीं. पन्हाळा पेट्यांतील अगर चनवाड महालांतील निदान तीसचाळीस एकर नष्टांशाची अगर सरकार हक्कांतील एकवळी जमीन पाहून मला कळव. म्हणजे त्या प्रकरणाचा आपण विचार करूं." हें प्रकरण पुष्कळ दिवस तसेंच पडून राहिलें. अशीं कित्येक प्रकरणें पडून राहावयाचीं. पुढें एकदां महाराजांची भेट झाली असतां त्यांनी मला विचारलें, "पाटील, साळशीच्या जमिनीबद्दल मला कां बोलला नाहीं, अगर लिहिलें नाहीं?" मी म्हणालों, "ही महालकऱ्यांच्या अधिकारांतली जमिनीच्या लिलावाची साधी गोष्ट होती म्हणून त्यांस लिहिलें. आपणास बोलण्याइतकी ही महत्त्वाची बाब नव्हती." यानंतर पुढें मी लवकरच अभ्यासार्थ रजा घेऊन अमेरिकेस गेलों.

मध्यंतरीं कै० फत्तेसिंगराव गायकवाड, बडोदें, यांची द्वितीय कन्या लक्ष्मीदेवी व सावंतवाडीचे महाराज बापूसाहेब भोसले यांचें लग्न बडोद्यास सन १९२२च्या एप्रिल महिन्याच्या अखेरीस व्हावयाचें ठरलें होतें. त्या लग्नाला छत्रपति शाहू महाराज बडोद्यास गेले होते. त्या वेळीं त्यांची प्रकृति जरी बरी नव्हती तरी त्यांनी तसें बाहेर दिसूं दिलें नाहीं. तथापि त्यांना आपला अंतकाळ समीप आला आहे असें वाटून त्यांनी लग्नसमारंभ आटोपतांच कोल्हापुरास परत जाण्याचें ठरविलें व आपले दिवाण सर रघुनाथराव सबनीस यांस "माझी प्रकृति बरी नाहीं. आपल्याशीं संस्थानासंबंधीच्या कांहीं गोष्टींबाबत विचारविनिमय करावयाचा आहे, म्हणून आपण तातडीनें मुंबईस मला भेटावयास या. मी तेथें डॉक्टरांचा सल्ला घेण्याकरितां दोन दिवस थांबणार आहें," असें कळविलें. दरम्यान महाराजांनी आपल्या संस्थानासंबंधीं व घरगुती कामासंबंधीं टाचणें पर्सनल क्लार्कङून करविलीं. महाराज मुंबईस आले. त्यांचा आजार बराच वाढला होता. डॉक्टरी उपायास दाद न देतां त्यांचा आजार

विकोपास गेला व सर रघुनाथराव येण्यापूर्वीच तारीख ६ माहे मे सन १९२२ रोजी महाराजांचें देहावसान झालें. गरिबांचा कनवाळू व धीराचा समाजसुधारक अकालीं नाहीसा झाला. महाराजांचा पार्थिव देह मोटारींतून तावडतोब कोल्हापुरास रवाना झाला. कोल्हापुरात श्रीशाहूमहाराजांचा पार्थिव देह स्मशानात नेण्यापूर्वी, छत्रपतींच्या गादीवर युवराज राजाराम बसल्याच जाहीर करण्यात आलें व शाहूमहाराजांच्या शवास सन्मानपूर्वक व राजघराण्यातील रिवाजाप्रमाणे अग्नि दिला. मी त्या वेळीं अमेरिकेंत होतो.

मी नोव्हेंबर १९२२ च्या सुरुवातीस जपान-कोलंबो मार्गे हिंदुस्थानात परतलो. तेथून पुण्यास निघालो. मी माझ्या कामावर रूजू झालो व दोन दिवसाची रजा घेऊन कोल्हापुरास एक दिवस थांबून महाराजांच्या दहनभूमीवर फुलें वाहून मनातल्या मनात त्यांच्या पूज्य मूर्तीस वंदन करून गावीं गेलो. उभयतां आईस भेटून परत पुण्यास गेलो.

नंतर थोडे दिवसांनी किरकोळ रजा घेऊन कोल्हापुरास आलो व शंकरराव इंदुलकर यांच्याकडे उतरलो. त्या वेळीं ते नवीन छत्रपति राजाराममहाराजांचे हुजूर चिटणीस होते. निधनापूर्वी शाहूमहाराजांनी केलेला टाचण ओघानेच इंदुलकरांकडे हुजूरचिटणीस या नात्याने आलीं होतीं. इंदुलकरांनी त्या टाचणातील माझ्या संबंध असलेली माहिती मला सांगितली. शाहूमहाराजांनी राजाराममहाराजांस उद्देशून लिहिले होते की, माझे "स्नेहीसोबती बरेच आहेत. त्यात पी० सी० पाटील हे एक साधेसुधे प्रामाणिक गृहस्थ आहेत. तुम्हास गरज भासल्यास त्यांना बोलावून घ्या. त्यांच्या हातून होण्यासारखें काम ते सचोटीने करतील. माझ्या मनातून त्यांना काही तरी द्यावें असे होतें, पण त्यांनी काहीच घेतलं नाही. एकदा मात्र त्यांनी चनवाड महालातील मौजे साळशी येथील नदाशाची सरकार हकात आलेली जमीन लिलावात मालकी हकानें घेण्याच्या विचारानें चनवाडच्या महालकरी यांना लिहिलं होतं. तें प्रकरण सरसुभे यांनी मजकडे पाठविलं. त्या वेळीं ही थोडीशी डागराळ जमीन देण्यापेक्षा त्यांना एकवटी कोठे तरी तीस चाळीस एकर जमीन द्यावी असें वाटून त्याप्रमाणें मीं माझ्या पर्सनल क्लार्कला सांगितलं होतें. पण तसा योग जुळून आला नाही. तरी आपण पी० सी० पाटील यांनी जी सात आठ एकर जमीन लिलावात खरेदी घेण्याची इच्छा प्रदर्शित केली होती ती जमीन त्यांना इनाम करून द्या. ते घेण्यास काकू करू लागले तर त्यांना सांगा की, त्यांनी ती जमीन घ्यावी अशी माझी इच्छा आहे." तेव्हा मी इंदुलकरसाहेबांस म्हणालो, "त्या उदार व प्रेमळ आत्म्याच्या इच्छेविरुद्ध मी जाणार नाहीं. राजाराममहाराजांनी मला विचारलें तर शाहूमहाराजांची देणगी मी आभारपूर्वक स्वीकारीन." थोड्या दिवसांनी इंदुलकरसाहेबांनी या जमिनीच्या प्रकरणाची सुनावणी राजाराममहाराजांपुढे केली व महाराजांच्या सहीची त्या जमिनीची सनद त्यांनी माझ्याकडे रवाना केली.

पुढे काही दिवसांनी खरे रघुनाथराव सबनीस यांनी आपल्या दिवाणगिरीच्या कामातून सेवानिवृत्त होण्याचे निश्चित केले त्या वेळीं राजाराममहाराजांस आपल्या वडिलांनी माझ्याबद्दल केलेल्या टाचणांची आठवण झाली व त्यांनी श्रीपतराव शिंदे ('विजयी मराठा' पत्राचे संपादक) व दिवाणबहादूर बी० पी० जगताप, इंजिनीअर, या दोघांना माझ्याकडे पाठवून निरोप दिला की, "आबासाहेबांचा (श्रीशाहूछत्रपति) तुमच्यावर फार विश्वास असे व तसाच माझाहि आहे. सबनीस दिवाण हे सेवानिवृत्त होत आहेत. तुम्ही त्या जागेवर आल्यास मला आनंद होईल." मीं महाराजांचे आभार मानले व सांगितले, "श्रीशाहूछत्रपतींचे माझ्यावर अनंत उपकार आहेत. त्यांच्याच प्रोत्साहनाने मी शिकलों व सध्याचे स्थितीस पोचलो हें खरें आहे. आपणहि मोठ्या मनाने आपल्या राज्यातील सर्वात मोठी जागा मला देऊ करता याबद्दल मी आपला फार आभारी आहें. पण महाराज, मी साधासीधा, सरळमार्गी माणूस, शिवाय मीं कायद्याचा व राजकारणाचा अभ्यास केलेला नाही. राज्यातील किचकट प्रश्न व राजवाड्यातील राजकारण मला जमणार नाही. महाराजांच्या कृपेने मी हिंदुस्थान सरकारात चांगल्या हुद्द्यावर आहें. तरी आपण मला आग्रह न करणें बरें. तथापि आपणास जेव्हा माझ्या सेवेची गरज लागेल त्या वेळीं मी हजर राहीन." त्यानंतर महाराजांनी श्रीपतराव शिंदे व बी० पी० जगताप यांस दि० ब० ल्हें यांच्याकडे पाठवून त्यांना बोलावून घेतले व थोड्याच दिवसात त्यांना दिवाणगिरीवर नेमलें.

मी जेव्हा सन १९३२ सालीं पेन्शन घेऊन गावीं आलो त्या वेळी मनाला वाटले की शाहूमहाराज हयात असते तर त्यांना आनंद होऊन त्यांनी मला आपल्या राज्यात थोडे दिवस तरी प्रजेची सेवा करा असे आग्रहाने सांगितले असते. मला नोकरीची गरज नव्हती, पण त्यांच्या इच्छेसाठी काही काळ तरी ऑनररी (विनावेतन) काम केले असतें याची जाणीव झाली. पण त्याचा काही उपयोग नव्हता! म्हणून मी माझ्या गावीं गेलो. मला आईजवळ राहण्याची इच्छा होती. तिलाहि वाटे की आपल्या एकुलत्या एका मुलाने आपल्याकडे आपल्या वतनगावीं राहावें, आपण त्यास आपल्या हाताने गोडधोड करून घालावें. मुले पुण्यास शिकत असल्याने पत्नी व आमचे बिऱ्हाड पुण्यातच मुलांच्या परीक्षा होईपर्यंत राहिले होतें.

मी मोटारीसह गावीं गेलों. जरी वडिलांनी सन १९१० सालीं बांधलेले घर खेड्यातील राहणीस ठीक होते, तरी पचवीस वर्षे अधिकाऱ्याचे काम केलेल्या मला तें सोईचे नाही असे वाटणें अस्वाभाविक नव्हतें. पेन्शन घेताच मी माझ्या अर्ध्या पगाराचें कॉम्युटेशन (विकीच म्हणा ना) केलें. त्याचे मला त्रेचाळीस हजार रुपये व प्रॉव्हिडंट फंडाची बरीच रकम आली होती. मी लागलीच गावीं एक बंगली बांधली व कोल्हापुरास रेल्वेस्टेशनाजवळ एक जुना बंगला खरेदी केला आणि तेथे सन १९४०पर्यंत सहकुटुंब राहत होतो.

छत्रपति शाहूमहाराज हे खरेखुरे शेतकऱ्यांचे व गोरगरिबांचे राजे होते. त्यांच्या प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष शिकवणुकीचा माझ्यावर बराच परिणाम झाला, असे मला म्हणता येईल. त्यांनी गोरगरिबांस व शेतकरी समाजास पुढे आणण्याचा मनापासून प्रयत्न केला. त्यांनी ज्याप्रमाणे मराठा समाजाचा स्वाभिमान जागृत केला त्याप्रमाणे अस्पृश्य वर्गांच्या हाडींमाशी खिळलेला न्यूनगंड नाहीसा करण्याचे मनःपूर्वक प्रयत्न केले, ही त्यांची थोर कामगिरी होय. त्यांना सामाजिक कार्य करण्यास पुरेसे आयुष्य लाभले नाही हे समाजाचें कमनशीब होय.

# भास्करराव जाधव यांच्या आठवणी

महाराष्ट्रात विसाव्या शतकाच्या प्रारंभी ब्राह्मणेतरामध्ये जीं थोडीं विद्वान् माणसें उदयास आलीं, त्यांत भास्करराव जाधव, एम्० ए०, एल्.एल्० बी० याचं नाव प्रामुख्यानें घेतलें पाहिजे. विश्वविद्यालयीन परीक्षांत ते प्रथमपासून पहिल्या वर्गांत पास होत. अर्थात् असा विद्वान् ब्राह्मणेतर तरुण श्रीशाहूमहाराजांच्या चाणाक्ष नजरेतून कसा सुटणार ?

आपल्या संस्थानांत ज्या ज्या सुधारणा करण्याची महाराजांना स्वप्न पडत, त्या अमलात आणण्याला या तरुणाचा आपल्याला चांगला उपयोग होईल असे जाणून त्यांनीं सन् १८९७च्या सुमारास जाधवरावांना आपल्याकडे बोलावून आणलें आणि त्यांचें मन वळवून त्यांच्या ताब्यांत महसूल खातें दिलें. पुढे जाधवरावांनी नगरपालिकेंत लक्ष घालून अनेक सुधारणा घडवून आणल्या. समाजसुधारणेकडे तर त्यांचा पहिल्यापासूनच फार ओढा. स्वत ते अत्यंत बुद्धिवादी असल्यामुळे धार्मिक बाबतींत असलेल्या अंधश्रद्धेची त्यांना चीड येई. तेव्हा त्यांतहि योग्य तो बदल घडवून आणण्यासाठी ते झटू लागले अशा प्रकारें ज्या ज्या कामाला ते हात घालीत तें तें काम आपल्या अपेक्षेप्रमाणे यशस्वी करीत. त्यामुळे सामाजिक बाबतींत, राजकारणांत आणि शैक्षणिक क्षेत्रांत त्यांनी आपल्या बुद्धिकौशल्याची चमक चांगलीच दाखविली. प्रत्येक बाबतींत ते प्रामुख्यानें भाग घेऊ लागले.

आतां त्यांचा व माझा संबंध कसा आला हें सांगणे जरूर आहे. मी सन १८९९ अखेर कोल्हापुरांतील राजाराम हायस्कूलमधून मॅट्रिक पास झालों. पास होतांच मला शाहूमहाराजांनी पन्हाळ्यास बोलावून घेतल्याची व मराठा बोर्डिंग स्थापन केल्याची हकीकत दुसऱ्या ठिकाणीं आली आहे. त्या वेळी कोल्हापूर शहरांत प्लेग होता. जाधवराव पंचगंगा नदीवरील, शिवाजीमहाराजांच्या देवाल्याजवळील एका इमारतींत,

पत्नी मानीसाहेब व सुमारे दोन वर्षे वयाचा मुलगा बापूसाहेब यांच्यासह राहत होते. महाराजानी मला पन्हाळ्यास बोलावून घेतले त्या वेळीं जाधवराव तेथे हजर होते, त्यामुळे त्यांच्याशीं माझी तोंडओळख झालीच होती. त्याचा फायदा घेऊन मी जाधवरावांच्या बिन्हाडी जानेवारीच्या (१९००) पहिल्या आठवड्यात गेलों, व त्याना विचारलें, "मला कॉलेजमधे फी माफ होईल का?" त्यानी सांगितलें, "मी चौकशी करतो. चारआठ दिवसानी येऊन भेटा."

महाराजाना मराठा बोर्डिंग काढण्याचे वेड्च लागल होतं. वेळोवेळीं महाराज जाधवराव, दाजीराव विचारे, बापूसाहेब कागलकर यांच्याशीं बोर्डिंगच्या बाबतीत गलफ करीत असत. अशाच एका वेळीं जाधवरावानी माझ्या फी माफीचा प्रश्न काढला. ते म्हणाले, "पी० सी० पाटील हे एकटेच या वर्षी आपल्या संस्थानातील मराठा समाजातून मॅट्रिक पास झाले आहेत. त्याना फ्रीशिप मिळणे योग्य होईल." महाराजानी हुजूरचिटणिसास बोलावून घेऊन त्यांच्याकडून राजाराम कॉलेजचे प्रिन्सिपाल यास लिहून कळविलें की, "पी० सी० पाटील नावाचा मराठा विद्यार्थी राजाराम हायस्कूलमधून नुकताच पास झाला असून, तो संस्थानातील वतनदार पाटलाचा मुलगा आहे. शिवाय त्याच्या वडिलाचे उत्पन्न कमी आहे. तरी त्यास कॉलेजमध्ये फी माफ करण्याचा विचार व्हावा." सदर पत्र कॉलेजच्या कॉमनरूम मीटिंगमध्ये निर्णयासाठी ठेवण्यात आले, तेव्हा प्रो० विजापूरकर यानी आपले मत दिलें की, "तसे करता येत नाही. ज्याना परीक्षेत जास्त गुण मिळाले आहेत व जे गरीब आहेत अशानाच फीमाफीची सवलत मिळत असते. पी० सी० पाटील याना तशी मदत व्हावी, अशी महाराजाची इच्छा असल्यास त्यानी आपल्या खासगींतून मदत करावी." अशा आशयाचें प्रिन्सिपालकडून हुजूरचिटणिसाना आलेलें हें पत्र त्यानी महाराजाना दाखविलें. अर्थात् मला फीमाफीची सवलत मिळाली नाही.

कोल्हापुरास मराठा बोर्डिंग सुरू होताच महाराजाच्या प्रोत्साहनाने भास्करराव जाधव व दाजीराव विचारे हे आम्हास अनुक्रमें इतिहास व गणित हे विषय शिकवीत असत. दोघानाहि शिकविण्याचा अनुभव होता. विचारे हे स्वतः पुण्यास सायन्स कॉलेजमध्ये विद्यार्थी असताना गणित विषयाच्या शिकवण्या करीत. जाधवराव तर एल्फिन्स्टन कॉलेजात फेलोच होते. अर्थात् त्याना वर्गात शिकवावेंच लागत असे. आमच्या वेळीं कॉलेजच्या पहिल्या वर्षात (पी० ई०) आल्ट्रनपाल्ट्रन ग्रीस व रोमचा इतिहास हा एक विषय असे. त्या वेळीं आमच्या कॉलेजमधील इतिहासाचे शिक्षक व्हाइस प्रिन्सिपाल दस्तूर हे होते, पण त्याना इतिहास शिकविण्याची असावी तशी माहिती नव्हती. ते फक्त हातात इतिहासाचें जाडजूड पुस्तक घेऊन क्लासात वाचीत व मध्ये मध्ये इंग्लडमधील आपल्या विद्यार्थिदशेतील गोष्टी सागत. याच्या उलट जाधवराव हे जुन्या काळची ग्रीस व रोम येथील लोकस्थिति, तेथील नैतिक व धार्मिक विचार, तसेच तिकडील सामाजिक व राजकीय परिस्थिति याची आमच्या

कडील आचारविचार, समाज आणि राजकारण याशीं तुलना करून माहिती सागत. हे त्याचे विवेचन अत्यत मनोवेधक असे. रोममधील पॅट्रिशियन व प्लेबियन आणि हिंदुस्थानातील सरजामदार किंवा खोत व शेती करणारे शेतकरी अगर कुळे याचेहि ते तुलनात्मक वर्णन करीत. तिकडील पोप व पाद्री याची आमच्याकडील शकराचार्य व ग्रामोपाध्याय जोशी, तसेच तिकडील धार्मिक चळवळींशीं इकडील आर्यसमाज, प्रार्थनासमाज व सत्यशोधक समाज या चळवळींची तुलना करीत. त्यामुळे आमच्या इतिहासाच्या ज्ञानात चागलीच भर पडे.

व्हिक्टोरिया मराठा बोर्डिंगशिवाय त्यानी मराठ्याचे शिक्षणविषयक कार्य पुष्कळ केले आहे. त्यानी या कामीं पुष्कळ लेख लिहिले व काही दिवस एक वृत्तपत्रहि चालविल. मराठा शिक्षण परिषद स्थापण्यात त्यानी पुढाकार घेतला. ते बरींच वर्षे या परिषदेचे चिटणीस होते.

जाधवरावाच्या कारकिर्दीच्या सुरवातीपासूनच त्याची कार्यक्षमता दिसून आली होती. त्या वेळीं कोल्हापूर नगरपालिकेंत फार अव्यवस्था माजली होती, हें पाहून महाराजानी नगरपालिका बरखास्त करून तिचे सर्व अधिकार जाधवराव यास दिले. हें स्थानिक ब्राह्मण लोकास आवडलें नाही व त्यानी सभा भरवून दरबारकडे अर्ज केले. पण जाधवरावाच्या कार्यक्षमतेमुळे जें स्पृहणीय उपयुक्त काम झाले, त्यामुळे सर्वांनाच वाटू लागले की चालू व्यवस्थाच आणखी काही वर्षे पुढे चालवावी. याप्रमाणे जाधवराव सन १९१८ पर्यंत नगरपालिकेचे सर्वाधिकारी होते. त्याच्याच कारकिर्दीत फेरीस मार्केट बाधले गेलें. कोल्हापुरास स्मशानभूमींत फार गैरसोयी होत्या. त्यानी तेथे छप्पर बाधून थारण्यानमण्याची सोय केली आणि तेथेच गोवऱ्या व लाकडें मिळण्याची तजवीज केली. शहरात अर्बन कोऑपरेटिव्ह सोसायटी स्थापिली व ती कार्यक्षम केली. त्यानी स्थापन केलेली ही सस्था आता प्रगत स्थितींत आहे. अशा रीतीने जाधवराव यानी कोल्हापूर दरबारची व प्रजाजनाची बहुमोल सेवा केली आहे.

नुकत्याच मॉंटेग्यू चेम्सफर्ड सुधारणा अमलात आल्या होत्या अशा वेळीं काही ब्राह्मणेतर विद्वानानी हिंदुस्थानच्या राजकारणात पडल पाहिजे, असे शाहूमहाराजाना वाटे. यासाठीच त्यानी भास्करराव जाधव याना आपल्या सस्थानी नोकरीतून सेवानिवृत्त करून खालसातील राजकारणात शिरण्यास प्रोत्साहन दिल.

सेवानिवृत्त झाल्यावर पेन्शन घेऊन भास्करराव साताऱ्यास राहावयास गेले. हिंदुस्थानातील राजकीय परिस्थितीचा अभ्यास करीत असता, तेथे काही दिवस त्यानी वकिलीहि केली. पुढे इ० स० १९२३ च्या कायदेकौन्सिलच्या निवडणुकीत ते उभे राहिले आणि सातारा जिल्ह्यातून निवडून आले. सन १९२६ च्या निवडणुकाना ते सातारा व पुणे या दोन्ही जिल्ह्यातर्फे उभे राहिले होते, त्याच वेळीं पुणे जिल्ह्यातर्फे त्याचे प्रतिस्पर्धी म्हणून देवासचे श्रीमत रासेसाहेब हे उभे राहिले असल्यामुळे फक्त सातारा जिल्ह्यातर्फे ते निवडले गेले व पुणे जिल्ह्याला श्रीमत

गासेसाहेब पवार निवडून आले. या निवडणुकीचे वेळी एक उल्लेखनीय गोष्ट घडली ती अशी :

श्रीमंत गासेसाहेब पवार याना पुण्यात चांगली मानमान्यता होती. त्यांनी पुण्याच्या श्रीशिवाजी सोसायटीत व श्रीशिवाजीस्मारकाच्या उभारणीत पुष्कळ मराठा काम केलें होतें. निवडणुकीच्या वेळीं श्रीमंत गासेसाहेबांनी पुण्यातील मराठा मंडळीस विनंती केली की, "तुम्हीं सर्वांनी मला पाठिंबा दिल्यास मी पुणे जिल्ह्याच्या जागेसाठी उभा राहतो." बाबूराव जेधे आदिकरून बहुतेक पुणेकर मंडळींनी त्यांना मदत करण्याचे वचन दिलें. बाबूराव जेधे यांनी भास्कररावांस माघार घेण्याची विनंती केली. पण ती जाधवरावांनी मानली नाही. हें बाबूरावांचे वडील बंधु दादासाहेब जेधे यांस आवडलें नाही. जेधेबंधूंनी मराठा समाजाची पुष्कळ सेवा केली होती; व त्यांचा शब्द मानला जाई. असे असतां जाधवराव पुणेकर मराठ्यांचें ऐकत नाहींत म्हणून दादासाहेब रागावून काही मंडळींसह जाधवरावांच्या गोटात गेले. तेथ ते इतके रागावले की, त्यांना काही भान राहिलें नाही व त्यांचा तोल सुटला. त्यांनी आपल्या लहानपणी खेड्यातील अशिक्षित लोकांच्या तोंडून एकलेल्या अस्सल व अभद्र शिव्या जाधवरावांस दिल्या. लोकांनी दादासाहेब जेध्यांना कसे तरी समजावून, हातास धरून परत नेलें. जाधवरावांनी सगळ्या शिव्या शांतपणें ऐकून घेतल्या. ते काही बोलले नाहीत. दुसऱ्या दिवशीं सकाळीं मी त्यांच्या बिन्हाडीं गेलों त्या वेळीं आदले दिवशीं जणू काही घडलेंच नाही असें त्यांच वदन दिसलें. थोड्या वेळाने ते मला म्हणाले, "चला, आपण बाबूराव जेध्यांच्याकडे जेधे मॅन्शनमध्ये जाऊ." मी हसलों व म्हणालों, "काल दादासाहेब जेध्यांनी वाहिलेली शिव्यांची लाखोली पुरी झाली नाही वाटत ! तुम्हाला त्यानद्दल काहीच वाटत नाही ?" ते म्हणाले, "ज्यात माझी चूक नव्हती त्याबद्दल मीं का वाईट वाटून घ्यावें व मनास विनाकारण त्रास का करून घ्यावा? ज्याची चूक असेल त्याला वाईट वाटेल. माझी काही चूक नव्हती."

असल्या प्रासंगिक व क्षुल्लक भांडणामुळे समाजकार्यांत काही अडचणी आल्या नाहीत. त्यामुळे जाधवराव आणि जेधेबंधु यांच सख्य कायम राहिलें.

जाधवरावांनी कायदेकौन्सिलमध्ये ब्राह्मणेतर पक्ष स्थापिला. सर्व ब्राह्मणेतर सभासदांनी व जनतेने त्यांना पाठिंबा दिला व ते ब्राह्मणेतर पक्षाचे पुढारी झाले. त्या पक्षाने स्तुत्य कामगिरी केली आहे हें सर्वश्रुत आहे.

पुन्हा जाधवराव सन १९२८ सालीं शेतकीमंत्रीपदावर आले. ते मंत्री असतांना त्यांच्याबद्दलची एक दुसरी आठवण सांगण्यासारखी आहे. ते मंत्री होण्यापूर्वी बॅरिस्टर सर रफिउद्दीन हे त्या जागीं शेतकी मंत्री होते. त्यांना सिमल्यास शेतकी मंत्र्यांच्या परिषदेस बोलाविलें होतें. त्या परिषदेत शेतकी, सहकार, व व्हेटर्नरी या खात्याबद्दल विचार व्हावयाचा होता. मी त्या वेळीं शेतकी कॉलेजचा प्रिन्सिपाल होता.

म्हणून रफिउद्दिनसाहेबांनी मला, शेतकी खात्याचे डायरेक्टर टी० एफ्० मेन याना व व्हेटर्नरी खात्याचे सुपरिंटेंडंट फारब्रदर, शिवाय आपले सेक्रेटरी जी० के० जोशी, आय्० सी० एस्० याना बरोबर घेण्याचे ठरविले होते; पण आयत्या वेळीं सर रफिउद्दीनच्या जागीं भास्करराव जाधव मिनिस्टर झाले व त्यांच्याबरोबर मी सिमल्यास निघालों. मीं त्यांच्याच डब्यांतून प्रवास केला. भास्करराव तैलबुद्धीचे विद्वान् असल्याने त्याना जी शेतकी व शेतकी शिक्षण याबद्दलची माहिती पाहिजे होती ती त्यानी सहजासहजी आमच्या संभाषणातून मिळविली. दुसऱ्या दिवशी मेन व फारब्रदर हे दोघे एका स्टेशनात गाडी उभी असताना आमच्या डब्याजवळ येऊन उभे राहिले. त्या वेळीं मी व जोशी जाधवरावांशीं बोलत होतों. मेनने विचारलें, "आम्ही आत येऊ का?" जाधवरावानी "या" म्हणून सांगितल्यावर ते आत आले. मिस्टर मेन माझे वरिष्ठ असल्यानें मीं जाधवरावाना विचारलें की, "मी दुसऱ्या डब्यांत जाऊं का?" ते म्हणाले, "नको जायला. बसा येथेंच." थोडा वेळ इकडचें तिकडचें बोलणें झाल्यावर फारब्रदर म्हणाले, "आता आपलें व्हेटर्नरी खातें फार मोठें झालें आहे. ह्या खात्याच्या मुख्याचा हुद्दा सुपरिटेंडेंटच्या ऐवजी डायरेक्टर असा करावा व त्याचे अधिकारहि वाढवावेत." वास्तविक त्यावेळेपर्यंत जरी व्हेटर्नरी खातें डायरेक्टर ऑफ ॲग्रिकल्चर मिस्टर मेन यांच्या हाताखालीं होतें तरी पण मेनसाहेब फारब्रदरच्या म्हणण्यासच पाठिंबा देत होते. जाधवरावानी 'हू हू' म्हणत फारब्रदर व मेन यांची सर्व हकीकत लक्ष देऊन ऐकली व ते फारब्रदर यास म्हणाले, "मीं तुमचें सर्व म्हणणें ऐकून घेतलें आहे. तुमच्या खात्याची पूर्वपीठिका मला माहीत आहे. मला वाटतें की, सध्या तरी व्हेटर्नरी खात्यावर स्वतंत्र डायरेक्टर नेमण्याची वेळ आलेली नाही. डायरेक्टर नेमला तर त्याच्या हाताखाली भागवार डेप्युटी डायरेक्टर आले व त्यांचीं ऑफिसें आलीं. तेव्हा माझें तर म्हणणें असें आहे कीं व्हेटर्नरी खात्यावर स्वतंत्र डायरेक्टर नेमण्याची जरुरी नाही. तथापि उद्या भरणाऱ्या मिनिस्टर व डायरेक्टर यांच्या सभेमध्ये तुमचें म्हणणें मांडण्यास मी तुम्हास मुभा देतों." असें सांगून त्यानी त्या दोघांची पुढच्या स्टेशनावर बोळवण केली. पुढे आम्ही सिमल्यास पोचलों. मी व जाधवराव एकाच हॉटेलमध्ये उतरलें होतों. मिस्टर जोशीहि याच हॉटेलमध्ये उतरले असावेत. मात्र फारब्रदर व मेन दुसऱ्या हॉटेलमध्ये उतरले होते. दुसऱ्या दिवशीं ते दोघे आमच्या हॉटेलमध्ये आले. जाधवराव एका कोचावर बसले होते. तेथेंच फारब्रदरला त्यानी बसवून घेतलें. मी व मेन समोरच्या कोचावर बसलों होतों. पलीकडे पडद्याआड जोशी बसले होते. फारब्रदर यानी आदल्या दिवशींचाच विषय काढला. जाधवराव नुसतें ऐकून घेत होते. मेन केव्हा तरी फारब्रदरच्या म्हणण्याला दुजोरा देत होते. जाधवराव म्हणाले, "मीं काल्च तुम्हाला माझें मत सांगितलें आहे व तुमचें म्हणणें सभेपुढे मांडण्यास परवानगीहि दिली आहे. तुमचा ठराव मी स्वतः सभेपुढे मांडणार नाहीं. तुमचा तुम्ही मांडा व तुमचें

मत सभेस पटवून द्या." इतकं झालं तरी फारब्रदर आग्रहच करात होते की, खात्याचे मंत्री म्हणून आपणच माझा ठराव मांडा. त्याचें हें चऱ्हाट संपेना, म्हणून जाधवरावांनीं जवळ असलेलें वर्तमानपत्र हातीं घेऊन तें वाचण्यास सुरुवात केली. तरी मधूनमधून फारब्रदरचें गाणें चालूच होतें. मग जाधवरावांनी आपले पाय वर घेतले व आपण कोचाच्या एका बाजूस टेकून फारब्रदरकडे तोंड करून हातांतील वर्तमानपत्राचें वाचन चालू ठेवलें. तरी पण फारब्रदरला कांही उमजेना कदाचित् त्याला आपल्या इंग्रजपणाची घमेंड असावी. जाधवरावांनी हळूहळू त्याच्याकडे पाय पसरण्यास सुरवात केली. शेवटीं जाधवराव कांहीच बोलत नाहींत असं पाहून, "आम्ही जातों" असें सांगून ते दोघेहि निघून गेले. मी जोशांकडे जाऊन त्यांना हलक्या आवाजांत म्हणालों, "काय हो जोशी, तुमचे साहेब फारब्रदरकडे पाय पसरून बसले होते हें बरं का? मला तर तसें करणें बरोबर वाटलें नाहीं." त्यावर जोशी म्हणाले, "फारब्रदरला जाधवरावांनी काय सांगायचें तें आधीच सांगितलं होतं व आजहि सांगितलें, तरी त्या मूर्खाचें चऱ्हाट संपेचना. म्हणून त्यांनी हातांत वर्तमानपत्र घेऊन त्याच्याकडे दुर्लक्ष केलें तरी तो गृहस्थ बोलतच राहिला बरें झालें, अशा उद्धट लोकांना असेंच वागविलं पाहिजे."

आमच्या सिमल्याच्या मुक्कामांत व्हाइसरायसाहेबांनीं सभेस आलेल्या अधिकाऱ्यांस चहापार्टी दिली होती. मीहि त्या पार्टीस हजर होतों. त्या वेळीं महत्त्वाचे विषय म्हणजे हिंदुस्थानवासियांच्या स्वराज्याबद्दलच्या आकांक्षा व त्यांच्यांतील असंतोष हे होते. युरोपियन पद्धतीप्रमाणें, *याला बोलाव, त्याच्याशीं चार शब्द बोल, नंतर दुसऱ्यास बोलाव*, असें व्हाइसरॉयचें चाललं होतं. व्हाइसरायांनी जाधवरावांस हिंदुस्थानवासियांचा असंतोष कमी करण्यास काय करावें असं विचारलें. त्यास जाधवरावांनी उत्तर दिलें की, "आम्ही सरकारी नोकर या नात्यानें विचार करीत आहोंत. मला वाटतें, सरकारनें मुल्की व अर्थ हीं खातीं सर्वस्वी हिंदी मंत्र्यांकडे सोपविल्याशिवाय असंतोष कमी होणार नाहीं." हें जाधवरावांचें म्हणणें बऱ्याच हिंदी मंत्र्यांना धाष्टर्याचें वाटलें. बहुतेकांचें म्हणणें पडलं कीं, ही न पचण्या रुचण्यासारखी सूचना करणें फार धिटाईचें होतं. जाधवराव ब्राह्मणेतर पक्षाचे धुरीण व ब्राह्मणेतर पक्ष इंग्रज अधिकाऱ्यांचे मताप्रमाणें चालणारा, असं कॉंग्रेसपक्षाचे लोक समजत व तसें ते बोलूनहि दाखवीत. अशा लोकांना जाधवरावांच्या स्पष्टोक्तीचा अनुभव आला.

त्या काळचे हिंदी मंत्री आपल्या इंग्रज सेक्रेटरींना वचकून वागत, हें मला चांगलं माहीत आहे. शेतकी कॉलेजचा प्रिन्सिपाल असतांना मी व आणखी एक ब्राह्मणेतर पुढारी आमच्या एका ब्राह्मणेतर स्नेही मंत्र्यास भेटावयास, आगाऊ वेळ ठरवून, गेलों होतों. आम्ही पांच दहा मिनिटें बसलो नाहीं तोंच त्या मंत्र्याच्या इंग्रज सेक्रेटरीनें शिपायाकडून "आपण आंत येऊं का?" म्हणून विचारलं. त्या ब्राह्मणेतर मंत्र्याला "थोड्या वेळानें या. माझ्याकडे दुसरीं माणसं बोलत आहेत." असें

सागण्याची छाती झाली नाही. आम्हासच त्याने, दहा मिनिटे बाहेर बसा व साहेब गेल्यावर आत या, असे सागितलें. आम्हास बाहेर जाणें भाग पडले. पण मी तेथे न थाबता व त्याना न सागताच त्याचे ऑफिस सोडले. जाधवराव त्या मन्त्र्यासारखे वागले नसते.

मी पुण्यास शेतकी कॉलेजचा प्रिन्सिपाल असताना जाधवराव रेव्हेन्यू मिनिस्टर होते. मी कधीकधी त्याच्याकडे जाई. एकदा मी त्याच्या बगल्यावर गेलों असताना त्याच्याकडे भेटीस आलेल्या एका पारशी बाईच्या नावाची चिठ्ठी शिपायाने त्यास आणून दिली. त्या वेळीं त्याच्या अगात एक कुडतें व एक पाढरा मांजरपाटी शॉर्ट (आखूड पाटलून) असून पायात चप्पल होती. चिठ्ठीवरचें नाव पाहून "त्या बाईला बोलाव" म्हणून जाधवरावानी शिपायास सागितलें. ती आत आल्यावर त्यानी तिला समोरच्या खुर्चीवर बसण्यास सागितले. ती बाई बहुतेक शाळाखात्यातील इन्स्पेक्ट्रेस असावी. त्या दोघाचे बोलणें सपल्यावर ती परत निघून गेली. नतर मी जाधवरावाना म्हटले, "कायहो जाधवराव, ती बाई तुमच्याकडे आली, तुम्ही तिचें कार्डहि वाचलें, मग तुम्ही व्यवस्थित कपडे घालून बसायला नको होते का?" ते म्हणाले, "होय, युरोपियन लोकामध्ये ही पद्धत आहे. पण ते लोक आगाऊ कळवूनच येतात. या बाईने मला आगाऊ कळविलें नव्हत. दुसरें, तिने आगाऊ कळविलें नसताहि मीं तिला भेट दिली, हा माझा चागुलपणा नव्हे का?" या प्रश्नास मला काहीच उत्तर देता आलें नाही.

जाधवरावानी मुबईस काही वर्षे रेव्हेन्यू मिनिस्टरचें काम केल्यानतर ते स्वगृहीं कोल्हापुरास आले. कोल्हापुरासहि ते रीजन्सी कौन्सिलमध्ये, माझ्यानतर, शिक्षणमत्री झाले. त्याची व सर रघुनाथराव सबनीस याची मैत्री फार जुनी होती. दोघेहि विद्वान् व विनोदी होते. दोघाचेहि सस्कृत भाषेवर चागले प्रभुत्व असे. जाधवराव व सर रघुनाथराव याची किंमत कोल्हापुरास झाली नाही असे नव्हे, पण ते ब्राह्मण व पुण्याचे रहिवासी असते तर पुणेकरानी त्याना डोक्यावर घेतलें असतें. कोल्हापुरास असताना जाधवराव रोज सध्याकाळीं सर रघुनाथराव सबनिसाच्या बगल्यावर गप्पागोष्टी करण्यास जात. कधी कधी मीहि अशा वेळीं त्याच्याकडे जात असे. त्या दोघाचें सभाषण व विनोद ऐकण्यासारखा असे.

जाधवरावाचें सस्कृत भाषेवर चागलें प्रभुत्व होतें. वेद, उपनिषद, वाल्मीकि रामायण व महाभारत इत्यादि ग्रथाचा त्यानी सखोल अभ्यास केला होता. त्यानी आपल्या माग फारसें लिखाण ठेवलेलें नाही; रामायणावर काही लेख मात्र लिहिले आहेत. हे बुद्धिवादी विद्वान् शेवटीं शेवटीं पक्के निरीश्वरवादी बनले होते. त्यानी मागासलेल्या समाजाची बहुत सेवा केली. मराठा शिक्षण परिषदेत व सत्यशोधक समाजातहि त्याचे काम उठून दिसल. ते बोलण्यात जसे स्पष्टवक्ते होत, तसे वागण्यातहि बेडर होते. आजचे महाराष्ट्रातील पुढारी तमाशाचा बराच उदो-उदो

करतात. पण त्याना माहीत नसेल की, चाळीसपंचेचाळीस वर्षांपूर्वी तमाशास महत्त्व देण्यात व समाजसुधारणेच्या कामीं तमाशाचा उपयोग करून घेण्यात जाधवरावांचा मोठा भाग आहे. त्या काळीं लग्नात कलावंतिणींचे नाच गाणें होई; पण ग्राम्य समजल्या गेलेल्या तमाशापासून पाटरपेशे चार पावले लांब सरत. जाधवरावांच्या मोठ्या मुलीच्या लग्नात एका भव्य लग्नमंडपात सत्यशोधक तमाशाचे दोन तरी ताफे आले होते. त्या वेळीं मी तेथें होतो.

जाधवरावांची राहणी साधी असे. त्यानी दारूला कधीहि स्पर्श केला नाही, किंवा सिगरेट ओढली नाही; इतकेच काय, ते चहासुद्धा पीत नसत. ते युरोपिअन पद्धतीचा पोषाखहि करीत नसत, पांढरीशुभ्र विजार, लांब कोट व डोक्यास मोठा गुलाबी फेटा ते घालीत. ते उंच असून भरदार दिसत. आपल्या कामात ते दक्ष असत. स्वतः वेळेवर ऑफिसात जात. ऑफिसातील लिखाण, ड्राफ्ट स्वतः करीत. ते कधीहि रागावलेले दिसत नसत, तरी पण हाताखालच्या लोकावर त्याचा वचक असे. चिडत तर नसतच. ते न्यायी होते. त्याच्या हातून विनाकारण दुसऱ्याचे नुकसान झालेले नाही. ते दुसऱ्याचे उपयोगीच पडत. आपण केलेल्या उपकाराची जाणीव त्याच्यावर उपकार केले त्यास ते देत नसत. मला हिंदुस्थान सरकारने ता० ३ ऑगस्ट १९२४ रोजी रावबहादूर ही पदवी दिली. त्याचा इतिहास असा. मला पदवी दिली गेली त्या वेळीं आमच्या खात्याचे डायरेक्टर मिरिंग व प्रिन्सिपाल डॉक्टर मॅन, ज्याना मामाची खरा कदर असे, ते सेवानिवृत्त होऊन स्वदेशीं गेले होते. मला ज्या वेळीं सरकारातून 'रावबहादूर' या पदवीचा खलिता आला, त्या वेळीं मला आश्चर्य वाटलें व माझें नाव कोणीं सुचविलें असावें, याचा मी विचार करूं लागलों. जाधवराव माझे निकटवर्ती स्नेही असल्याने, मी त्याना भेटावयास गेलों. मला पाहताच त्यानी पदवी मिळाल्याबद्दल माझे अभिनंदन केलें; पण पदवी देण्यात आपला हात आहे असे बिल्कूल दाखविलें नाही. वर्तमानपत्रात पदवीधरांचीं नावें आलीं. त्यात माझें नाव तर होतेच, पण जाधवरावांचे दुसरे स्नेही मुकुंदराव पाटील (हे माळी जातीचे गृहस्थ 'दीनबंधु' पत्राचे संपादक आहेत) यांचेहि नाव होतें. मुकुंदराव पाटलांचें नाव वाचून मी ताडलें की आमचीं नावें जाधवरावानीच सुचविलीं असावींत व तेंच सत्य होतें.

कोल्हापूर रीजन्सी कौन्सिलमधून सुटल्यानतर जाधवरावांची दृष्टि कमी झाली. पुढे पुढे तर त्याना काहींच दिसेनासें झालें व त्याना बाहेर जाता येईनासें झालें. शिवाय त्याचे परम स्नेही सर रघुनाथराव सबनीस, ज्यांच्याकडे ते रोज गप्पा मारण्यास जात, तेहि दिवंगत झाले होते. म्हणून मी जाधवरावांच्या घरीं वरचेवर जात असें. नेहमीच्या सरावाने बंगल्यातील हॉलमध्ये व हॉलच्या पुढच्या गच्चीवर ते हळूहळू चालू शकत व टेबलावरचा रेडियोहि लावू शकत. एकदा त्यांच्याकडे गेलों असताना मी म्हणालों, "आपल्याला वाचनाचा फार नाद होता, पण दृष्टि गेल्यामुळे

आपल्याला आता वाचता येत नाही व बाहेरचे काही दिसत नाही, ह्याबद्दल वाईट वाटत असेल नाही ?" ते म्हणाले, "पाटीलसाहेब, मीं माझ्या दीर्घायुष्यात पुष्कळ वाचलें आहे. आपला देश व बाहेरचें जगहि पाहिलें आहे. आता किती दिवस पाहावयाचें ? या डोळ्यांनी पुष्कळ पाहिलें आहे. मला आता काही वाईट वाटत नाही. माझे दिवस समाधानानें जातात. घरी मुलें-नातवंडे आहेत, तुमच्या-सारखे प्रेमळ स्नेहीसोबती येऊन भेटतात आणि माझा वेळ आनंदात जातो."

सन १९५० साली, शेवटच्या आजारात, त्यांचा एक हात दुखत असे; पुढे तो हात बधिर झाला होता. या स्थितींतसुद्धा त्यांचा विनोद सुटला नव्हता. मी जवळ असताना एकदा त्यांच्या पत्नी हातास चोळण्यास औषध घेऊन आल्या व म्हणाल्या, "औषध कोठें लावू ?" जाधवराव म्हणाले, "मला काय माहीत? जथे दुखत असेल तेथे लाव. तू माझी अर्धांगी असल्याने दुखण्याच्या जागेची जाणीव तुलाहि असली पाहिजे." श्रीमती मानीसाहेब फार प्रेमळ होत्या. त्यांना आपल्या पतीच्या आजाराची फार काळजी वाटत असे, व त्या कधीकधी म्हणत, "मी सवाष्णपणीं याच्या आधी गेलें असतें तर बरें झालें असतें." त्यावर जाधवराव हसून म्हणाले, "मग तर माझी तुला काळजी नाही असे दिसतें. तू असताना जी माझी उठाठेव व शुश्रूषा होते ती तुझ्या पश्चात् होईल का ? तुम्ही बायका जातीच्या सोशिक असता; तुम्हाला जशा अडचणी सोसवतात तशा पुरुषांना सोसवत नाहीत. तुझें माझ्यावर खरें प्रेम असेल तर तू माझ्यासाठी जगलीच पाहिजेस."

मरणाच्या आधले दिवशी जाधवरावांनी आपल्या पत्नीस व मुलांमाणसास जवळ बोलावून शांतपणे सांगितले, "माझा शेवट जवळ आला आहे. माझ्या मरणाबद्दल कोणी रडावयाचें नाही. रडण्यासारखें मी काही वाईट केलेलें नाही. माझ्या मरणानंतर माझ्या शवाच्या तिरडीपुढे शिंक्यावर मडक्यात अग्नि व तादूळ चालवू नका. स्मशानातील विधि करण्याचें काही कारण नाही. माझे शव घातलेल्या सरणास भडाग्नि द्या; भट आणून मंत्राग्नि देण्याच्या भरीस पडू नका. वाटल्यास खेड्यात राहणाऱ्या मराठ्याच्या वहिवाटीप्रमाणे महारास बोलावून त्याने साधी भोळी प्रार्थना करून सरणावर निगडीचीं पानें टाकल्यानंतर भडाग्नि द्या. त्या महारास नेहमीच्या वहिवाटीप्रमाणे त्याचा भाग द्या. माझे दिवस घालण्याचें कारण नाही. मला तुमचे पिंड पोचणार नाहीत व माझा पिंड देण्यावर विश्वासहि नाही. जन्मला प्राणी मरावयाचाच ! हा सृष्टिनियम आहे. प्रश्न फक्त वेळेचा आहे. माझ्याबद्दल कोणींहि शोक वा दु:ख करू नये." हे बोलणें चालले असताना मी जवळ होतो.

[१] या तत्त्वज्ञान्याचें देहावसान ता० २६ जून, सन १९५० रोजीं नऊ वाजून चाळीस मिनिटांनी स्वत:च्या बंगल्यात शाहूपुरींत, कोल्हापुरास झालें. त्यांच्या दहनविधीस कोल्हापूरची अलोट जनता लोटली होती. पुष्कळांनी त्यांच्या स्मृतीस श्रद्धांजलि वाहिली. माझा बोलण्याचा विचार नव्हता. अशा वेळीं मला गहिंवरून येतें व व्यवस्थित

घेल्या येत नाही. पण शेवटीं जेव्हा श्री० एस्० एल्० पाटील येनाडीकर (क्षात्र जगद्गुरु) आपल्या आत्मप्रौढीच्या निवेदनात म्हणाले, की माझ्या नेमणुकीच्या वेळीं जाधवराव या नेमणुकीच्या विरुद्ध होते. पुढे एकदा आपण एका समारंभास आलों असतांना शाहूमहाराजानी उठून उभ राहून उत्थापन दिले, पण जाधवरावानी दिले नाही. सरसुभे या नात्याने जेव्हा ते पाटगाव मौनी पीठाशी पत्रव्यवहार करीत त्या वेळीं 'श्री' शिवा 'क्षात्रजगद्गुरु' असा उल्लेख न करता श्रीयुत सदाशिवराव पाटील येनाडीकर असा करीत. जर अव्वल कारकुनाने जगद्गुरु असे लिहिलें असले तर ते आपल्या हिरव्या शाईच्या पेनने खोडीत व श्री० सदाशिवराव पाटील अशी दुरुस्ती करीत. एखाद्या खाजगी समत आपण गेलों तर सर्व लोक उठून उत्थापन देत. पण जाधवराव उठत नसत. ही हकीकत शाहूमहाराजाच्या कानावर गेली. (बहुतेक ती जगद्गुरूनीच महाराजाना सांगितली असावी.) ही तक्रार ऐकून महाराजानी जगद्गुरुस योग्य मान न दिल्याबद्दल जाधवरावास जाब विचारला व जगद्गुरूचा मान ठेवण्याबद्दल ताकीद दिली होती व माझी माफी मागण्यास सांगितलें होतें. असल्या प्रकारचें आत्मप्रौढीचें निवेदन आमच्या जगद्गुरूनी केलें तें मला रुपलें नाही व मला सांगणें भाग पडलें की, "वास्तविक क्षात्रजगद्गुरुपीठ शाहूमहाराजाना पाहिजे होतें असें नाही. महाराजाना सत्यशोधक समाजाचीं मतें मान्य होतीं. देवाच्या व माणसाच्या मध्ये मध्यस्थ असणें महाराजाना पसत नव्हतें; पण कोल्हापूरच्या वेदोक्त प्रकरणानतर क्षात्रजगद्गुरुपीठ स्थापणें हा एक तात्पुरता तोडगा होता. आणि तो आपद्धर्म म्हणून अमलात आणण्यास हिंदु समाजात पुष्कळ उदाहरणे होतीं. लिंगायत, जैन, इतकेच काय महार, माग यांचेसुद्धा स्वतत्र गुरु आहेत. शिवाय जाधवराव कट्टर सत्यशोधक असल्यानें त्याना देवाच्या व माणसाच्या मध्ये दलाल नकोच होता. पण जेव्हा महाराजानी जाधवरावाना विचारलें की, 'आपणास राजा या नात्याने नवीन जगद्गुरु नेमण्याचा हक्क आहे काय? व मराठा समाजाच्या या अडचणींच्या वेळीं इतर जातींप्रमाणे आपणासहि जातीचा जगद्गुरु असावा काय?' त्यावर जाधवरावानी असें उत्तर दिल्याचें ऐकलें होतें की राजाला जगद्गुरु नेमता येतो हें एतिहासिक सत्य आहे. आपणाला (जाधवरावाना) मात्र जगद्गुरु सस्था पसत नाही. थोड्याच दिवसानी क्षात्रजगद्गुरु म्हणून श्री० सदाशिवराव पाटील याची नेमणूक झाली. या परिस्थितीत श्री० सदाशिवराव पाटील क्षात्रजगद्गुरु यानी केलेल्या निवेदनास उत्तरादाखल मला एवढेंच म्हणावयाचें आहे की आजच्यासारख्या दु:खद प्रसगी आमच्या क्षात्रजगद्गुरूचें निवेदन अनाठायी आहे. एक तर ज्या व्यक्तीविषयी जगद्गुरु बोलले ती व्यक्ति थोड्याच वेळापूर्वी दिवगत झाली आहे. दुसरें जाधवरावानी राजाने नेमलेल्या व्यक्तीचा सरसुभे म्हणून मान ठेवण्याचें कबूल केलें, मात्र त्यानी भास्करराव जाधव म्हणून तुमचें जगद्गुरुत्व मान्य केलेलं नाही. रीतिरिवाज व धर्म सागण्याचें मत घेणाऱ्या माणसास एवढें समजावयास पाहिजे

होतें की, ज्या व्यक्तीसंबंधी आपण बोलतों त्या व्यक्ति दिवंगत झाल्यावर, त्यांना खाली ओढण्याचा वा त्याची टिंगल करण्याचा प्रयत्न करणें हें शिष्टाचाराश सोडून आहे. पर जाधवराव जिवंत असते तर त्यांनी मात्र शिष्टाचाराश धरून आपणास योग्य उत्तर दिलें असतें." असो. जाधवरावांच्या शवास अग्निसंस्कार झाल्यावर मी परत जात असतां, जगद्गुरूंनी आपली मोटार थांबविली व मला म्हणाले, "माझं जरा चुकलेंच. मीं जाधवरावांच्या त्या वेळच्या घटनेचा उल्लेख नको होता करायला." जाता जाता येथे हेंहि सांगणें उचित होईल की, शाहूमहाराजांनी इलाखापंचायतीत देवस्थान नावाचें खातें काढून त्यांत देवस्थानच्या इनाम जमिनींच्या व इतर मिळकतींच्या उत्पन्नांतून नित्यनैमित्तिक खर्च वजा जाता राहिलेली शिल्लक शिक्षण-प्रसारार्थ खर्च करण्याचा हुकूम दिला होता.

श्री० एस्० एल्० पाटलांना क्षात्रजगद्गुरु नेमिल्यावेळीं, मौनी पीठावर कोणी बुवा अगर स्वामी नसावेत असें वाटतें. तें कसें का असेना, शाहूमहाराजांची अशी अपेक्षा होती कीं, नवीन नेमलेल्या क्षात्रजगद्गुरूंने या पीठाचें मोठें उत्पन्न एखाद्या इनामदारासारखें स्वतःच्या चैनीखातर न उधळतां, स्वतःची राहणी साधी ठेवून पीठाच्या उत्पन्नाचा मोठा भाग लोकशिक्षणाच्या सचारावर व शिक्षणसंस्थांवर खर्च करावा. पण तसें होत नाही.

जर कोल्हापूर संस्थान भारतात विलीन झालें नसतें तर क्षात्रजगद्गुरूंचा व मौनी पीठाच्या उत्पन्नाची व्यवस्था छत्रपतींच्या गादीवर असलेल्या राजांनी कशी लावली असती हें सांगता येणार नाही. कदाचित् शहाजीमहाराजांस विचारल्यास या समस्येवर प्रकाश पडेल.

भाऊराव राजवाड्यावर राहण्यास जाण्यापूर्वी जैन बोर्डिंगात असताना, शिस्तीच्या नावाखाली त्याना बराच त्रास झाला होता जैन लोकांत जेवताना सोवळें नेसण्याची वहिवाट आहे. सोवळें म्हणजे रेशमी वस्त्र अगर लोकरीची धावळी. बोर्डिंगातील मुलें सोवळें नेसण्याचा कंटाळा करीत. या मुलांचा पुढारी होता भाऊराव. जेव्हा व्यवस्थापकाने मुलांना जाब विचारला, तेव्हा भाऊराव म्हणाले, "आमच्या धावळ्याचा उपयोग आमचा स्वयंपाकी रात्रीं अंथरूणपांघरूणासाठी करतो, शिवाय त्या क्वचितच धुतल्या जातात, पण आमचा धोतरें मात्र आम्ही रोज आंघोळीच्या वेळीं धुतों. मग कापसाचें स्वच्छ, धूतवस्त्र नेसण्यात काय बिघडत?" भाऊरावाच्या या सडेतोड व समर्पक उत्तराने उपव्यवस्थापकाचें समाधान झालें नाही, आणि त्याने आपली तक्रार मुख्य व्यवस्थापक प्रोफेसर अण्णासाहेब लठ्ठे यांच्यापुढे मांडली. या कामीं अण्णासाहेबानी शिस्त मोडणाऱ्या सर्व मुलांना दंड केला. जैन बोर्डिंगात दुसरा एक नियम असा होता कीं, हजामत किंवा दाढी करावयाची ती दुपारच्या जेवणापूर्वी करावी. एकदा जेवणानंतर दाढी करीत असताना भाऊराव सापडले नियम मोडल्याबद्दलचा जाब विचारता, त्यानी उत्तर दिलं, "जेवणानंतर दाढी केल्याने का धर्म बुडतो?" तथापि, शिस्तभंगाच्या नावाखाली अण्णासाहेब लठ्ठे यानी भाऊरावास दंड ठोठावला

याच सुमारास कोल्हापुरास अस्पृश्यासाठी बांधलेल्या मिस् क्लार्क बोर्डिंगाचें उद्घाटन झालं. त्या समारंभास भाऊराव हजर राहिले. ते संध्याकाळीं परत आल्यावर त्या वेळच्या रूढीप्रमाणे स्नान करतील अशी उपव्यवस्थापक व अण्णासाहेब लठ्ठे यांचीहि अपेक्षा होती, पण आमच्या ह्या बडखोर सुधारकाने स्नान केलं नाही. उपव्यवस्थापकाने भाऊरावाना बजाविलें, "तुम्ही महारमांगास शिवून आलात, तुम्हास स्नान केल्याशिवाय जेवण मिळणार नाही." भाऊरावानी अस्पृश्याच्या शिवाशिवीसाठी स्नान करण्याचें नाकारलें, तेव्हा उपव्यवस्थापकान जवळच्या खोलीचा दार व खिडक्या बंद करून घेतल्या. भाऊरावानी एका खिडकीच्या दाराची काच फोडून आतील कडी काढली व मुख्य दार उघडून आपल जेवण उरकल भाऊरावाचा हा वरचेवर होणारा आडदांडपणा व शिस्तभंग चाल देणें अण्णासाहेब लठ्ठे याना अडचणीचें झाल आणि त्यानी भाऊरावास बोर्डिंग सोडण्याचा हुकूम दिला. ही गोष्ट १९०७ ०८ सालच्या सुमारास घडली.

जैन बोर्डिंग सोडल्यानंतर भाऊराव एक वर्षभर नव्या राजवाड्यावर बाळासाहेब खानविलकर यांच्यासंगती राहत व त्यांच्याच बरोबर हायस्कुलात जात. पुढे त्यांनी हायस्कूलहि सोडल व ते इस्लामपुरास आपल्या वडिलांकडे राहण्यास गले.

इस्लामपुरास असताना ते एकदा एक शाळा पाहण्यास गले होते. तेथ त्यांना एक महाराचा मुलगा वर्गाच्या बाहेर, अस्वच्छ जागत बसविलेला दिसला. भाऊरावांनी त्याला त्याचें नाव, गाव व जात विचारली. तो मुलगा महाराचा आहे म्हणून त्याला

दूर बसविला आहे, असे वर्गशिक्षकाने सांगितलें. भाऊरावांनी त्या मुलास शाळेबाहेर दूर बसविल्याबद्दल मास्तराशीं झगडा केला आणि मुलास आपल्याबरोबर घेऊन घरीं गेले आणि त्यास सांगितलें की, "मी तुझ्या शिक्षणाची सोय कोल्हापुरास अस्पृश्यांसाठी महाराजांनी स्थापिलेल्या मिस् क्लार्क बोर्डिंगमध्ये करतो, चल." घरीं आल्यावर त्यास बरोबर घेऊन जेवले. जेवण झाल्यावर त्यास सांगितलें की, "तू आपलीं पुस्तकें व कपडे घेऊन परत ये." तो मुलगा गेल्यावर भाऊरावांच्या आईने विचारलें, "हा मुलगा कोणाचा व कोणत्या गावचा?" तेव्हा भाऊरावांना सगळें सांगणें भाग पडलें कीं, तो सरूडच्या महाराचा मुलगा. आईने त्या वेळीं भाऊरावांचा खरपूस समाचार घेतला व "माझ्यासमोरून निघून जा" असें सांगितलें. भाऊरावांना तेंच पाहिजे होतें, कारण त्यांना त्या मुलास घेऊन कोल्हापुरास जावयाचें होतें. लागलीच ते त्या मुलास घेऊन कोल्हापुरास गेले व त्यास मिस् क्लार्क बोर्डिंगमध्ये घातलें. तिथें राहणें जेवणें फुकट होतें; वरचा खर्च भाऊरावांनी देण्याचें वचन दिलें. पुढे तो मुलगा मॅट्रिक झाला व मुंबईच्या कौन्सिलातहि गेला. हा मुलगा म्हणजे सरूडचे ज्ञानदेव घोलप हे होत. सरुड हा गाव माझ्या गावाला लागूनच असल्याने मीं याच्याबद्दल ऐकलें होतें.

कोल्हापूरचें राजाराम हायस्कूल सोडल्यावर भाऊराव पाटील इकडेतिकडे फिरूनच होते. त्या काळीं त्यांनी दुधगावास भाऊरावदादा कुदळे यास प्रोत्साहन देऊन, त्यांच्या सहाय्यानें जोडून एक विद्यार्थी वसतिगृह स्थापिलें. नंतर काही दिवस ते मुंबईस गेले. तेथें त्यांचें जमलें नाही. ते परत सातान्यास आले व तेथें इंग्रजी तिसऱ्या इयत्तेपर्यंतचा क्लास काढला व मास्तर बनले.

सन १९१४ सालीं भाऊरावांवर एक मोठें गंडांतर आलें होतं; त्याची हकीकत अशी: सन १९१३ साला शाहूमहाराजांनी मरहूम बादशहा एडवर्ड व महाराणी अलेक्झांड्रा यांचे अर्धपुतळे भाऊसिंगजी रोड व स्टेशन रोड यांच्या तिकटीवर उभारले होते. त्या काळीं कोल्हापूरदरबारच्या पुढाऱ्यांत दोन तट पडले होते. त्यांपैकी एकांत अण्णासाहेब लट्ठे होते. शहरात काही ज्हाल देशभक्तहि होते. देशात इंग्रजांबद्दलचा आदर कमी झाला होता. ही परिस्थिति पाहून कोणी आततायी माणसानें बादशहाच्या पुतळ्यास डांबर फासलें. महाराज बेचैन झाले. त्यांनी लागलीच मुंबई सी० आय० डी०ची मदत मागितली. धावपळ सुरू झाली; जिकडेतिकडे पोलिसी चक्रें फिरू लागलीं व शहरांतील वातावरण तंग झालें. भाऊराव पाटील यांस जैन बोर्डिंगचे व्यवस्थापक अण्णासाहेब लट्ठे यांनी शिस्तभंगाबद्दल बोर्डिंगांतून काढून टाकलें होतें हें कारस्थानी लोकांस माहीत असणारच. या कारस्थानी लोकांनी आपला मतलब साधण्याची व हेवेदावे उगवून घेण्याची संधि गमावली नाही. अण्णासाहेब लट्ठे यांच्या हितशत्रूंनी भाऊरावांच्याविरुद्ध पोलिसांचे कान फुंकले. त्यांना वाटलें असावें की, ज्याअर्थी अण्णासाहेब लट्ठ्यांनी भाऊराव पाटलांस जैन बोर्डिंगांतून हाकलून दिलें

होत, त्याअर्थी भाऊराव पाटील अण्णासाहेब लट्ठयावर गुन्हा उगविण्यासाठी त्यांच्या विरुद्ध साक्ष देतील. लागलीच भाऊरावास पकडून अटकेत ठेवण्यात आले. भाऊरावाच्या काही हितचिंतकानीसुद्धा अण्णासाहेब लट्ठयाच्या विरुद्ध साक्ष देऊन मोकळे होण्याचा सल्ला दिला होता. पण भाऊरावानी "प्राण गेला तरी आपण खोटी साक्ष देणार नाही." असें त्याना निक्षून सांगितलें.

भाऊराव अशा स्थितींत तुरुंगात कुजत असताना त्यांची आई राजवाड्यासमोर महाराज बाहेर निघण्याच्या वेळेस आगाशीजवळ उभी राहायची. एकदा एका वृद्ध शिपायाने तिला महाराज वाड्यातून बाहेर येऊन गाडींत बसत त्या जागीं उभ केले. महाराज बाहेर येताच तिने गुडघे टेकून हात जोडले व ती म्हणाली, "आपल्या या धर्माच्या गरीब बहिणीवर दया करा." महाराज तिच्या डोक्यावर हात ठेवून "उभा राहून काय तें सांग" असे म्हणाले. तिने अश्रुपूर्ण नयनानी आपला मुलगा भाऊराव यास पोलिसानी पकडून विनाकारण तुरुंगात ठेवल्याची हकीकत सांगितली. महाराज म्हणाले, "बरं आहे. तुझ्या मुलग्यास सोडण्याची तजवीज करतो. तू आता वाड्यात जेव व घरी जा." पण इतक्यात त्याना जैन लोक मराठ्यानी शिजविलेलं अन्न खात नाहीत याची आठवण झाली आणि ते हुजऱ्यास म्हणाले, "कोठावळ्याकडून या बाईस शिधा दे व तिच्या मुलग्यावरचा खटला संपेपर्यंत तिच्या बिऱ्हाडीं रोज शिधा पोचता करण्यास सांग."

आठपंधरा दिवस वाट पाहून भाऊरावाची आई परत महाराजांच्या सोनतळी बंगल्याच्या पुढे उभी राहिली. गाडींतून येताना महाराजानी तिला चटकन ओळखलं व गाडी उभी केली. ती म्हणाली, "महाराज, आपण माझ्या मुलग्याला सोडतो म्हणाला, पण अजून तो तुरुंगातच कुजत आहे. गरिबावर दया करा." महाराज म्हणाले, "तू घाटगे वकिलाकडे जा आणि सांग की, मीं तुला पाठविले आहे. ते अपिलाचा अर्ज करून देतील. ते अपील पाठीव." तिने त्याप्रमाणे अपील गुदरलें, आणि भाऊराव त्या संकटातून सुटले.

नंतर, त्यानी काही दिवस आत्मारामपंत ओगले यानी पहिल्याने किर्लोस्कर वाडीस काढलेल्या काचकारखान्यातील करील व दुसरें काचसामान विकण्याचं काम केलें. त्यानंतर लक्ष्मणराव किर्लोस्कर यानी त्यास आपल्या कारखान्यातील मालाचे—विशेषकरून लोखंडी नांगराचे—विक्रेते म्हणून नेमिले.

भाऊराव किर्लोस्कराकडे काम करीत असताना त्याना महाराष्ट्रभर फिरावें लाग. सन १९१५ साली मी डेक्कन (सेंट्रल) डिव्हिजनचा डेप्युटी डायरेक्टर ऑफ ॲग्रिकल्चर होता व माझें सदर स्टेशन पुणेच होत. भाऊरावाची व माझी त्या वेळीं विशेष ओळख नव्हती. तथापि, वर्तमानपत्रातून वाचलेल्या त्यांच्यावरच्या खटल्याच्या हकीकतीवरून मी त्याना जाणत होतों. त्यानीहि माझ्याबद्दल कोल्हापुरास बरेंच ऐकलें होत. शिवाय शेतकी खात्यातील वजनदार, जाणकार माणसाची माहिती करून घेणें त्याना जरूरहि

होतें. शेतकी अधिकारी या नात्यानें सुधारलेलीं आउतें बनविणारे व पुरविणारे याची मलाहि गरज होती. म्हणून ते मजकडे आले. भाऊराव किर्लोस्कर कंपनीत येण्यापूर्वी (सन १९०८ ते १९१४ पर्यंत) मी प्रोफेसर नाइटच्या हाताखालीं डिव्हिजनल इन्स्पेक्टर ऑफ ॲग्रिकल्चर होतों त्या वेळेपासून लक्ष्मणराव किर्लोस्कर आमच्याकडे लोखंडी नांगरासबंधी सूचना घेण्यास येत. पुढे भाऊराव त्यांच्या कंपनींत आल्यावर तेहि येऊं लागले. आम्ही दोघे शेतकी व शेतकरी यांच्या सुधारणेबद्दल पुष्कळ बोलत असूं. नांगर सुधारून घेण्यात मला त्यांचा फार उपयोग झाला, तर माझ्या शिफारशी मुळें जास्त नांगर खपण्यांत किर्लोस्कर कंपनी व भाऊराव यांचा फायदा झाला. मी *ज्या ज्या वेळीं माझ्या भागांत प्रदर्शनें भरवीं, त्या त्या वेळीं किर्लोस्कर कंपनीतर्फे* भाऊराव लोखंडी नांगर व दुसरीं आउतें प्रदर्शनांत मांडीत.

किर्लोस्कर सुरुवातीस इंग्लंडमधील 'रॅन्समसिम्स' नांगराच्या नकलाच करीत. वास्तविक हे विलायती नांगर त्या देशांतील उंच दांडग्या घोड्यांनीं ओढण्यासाठीं बनविलेले असल्यामुळें, ते आमच्याकडील बैल-रेड्यांच्या ओढणास जुळत नसत. मला व प्रो० नाइटसाहेबांना बैलांच्या ओढीस जुळतील असे नांगर पाहिजे होते, म्हणून आम्ही लक्ष्मणराव किर्लोस्कर व भाऊराव पाटील यांस कांहीं बदल सुचवीत असूं. किर्लोस्कर कंपनीलाहि अशी मदत पाहिजेच होती. म्हणून ते आमच्या सूचनेप्रमाणे नांगराच्या घडणींत वेळोवेळीं फरक करीत व फरक केलेले नमुने पुण्यास आमच्याकडे पाठवीत. आम्ही त्यांचा अनुभव घेऊन त्यांना आमचें मत भाऊरावामार्फत कळवीत असूं.

भाऊरावांना वाटे, *शेतकऱ्यांना चांगले लोखंडी नांगर स्वस्त मिळावेत.* पण कंपनीस पाहिजे होता जास्त नफा. भाऊरावांनीं किर्लोस्कर कंपनीचें काम सातआठ वर्षें घरच्या कामाप्रमाणें मन लावून, प्रामाणिकपणानें केलें. त्यांना वाटे, आपण कंपनीच्या कामाबरोबर शेतकऱ्यांसाठींहि कांहीं काम करीत आहोंत, आणि तें खरं होतें. *त्यामुळें जेव्हां कंपनीनें नांगराच्या किंमती कमी करण्याचें नाकारलें* तेव्हां (सन १९२२ सालीं) भाऊरावांनीं किर्लोस्कर कंपनीचा संबंध सोडला, आणि साताऱ्याचे धनजीशहा कूपर यांस प्रोत्साहन देऊन त्यांच्याकरवीं सातारा रोड स्टेशनाजवळ लोखंडी नांगर व ऊस गाळण्याचे चरक तयार करण्याचा कारखाना काढविला धनजीशहास सामान तज्ज्ञ, कामगार व कारागीर लोकांत प्रिय आणि जनतेंत वजन असलेल्या मदतनीस अनायासें मिळाला. कूपर कंपनीस भाऊरावांचा फार उपयोग झाला. भाऊरावांनीं कूपरलासुद्धां आपल्या अपेक्षा कळविल्या होत्या कंपनी शेतकऱ्यांस माफक किंमतींत आउतें पुरवील व आपल्या नफ्याचा कांहीं भाग आपल्या ग्राहकांच्या (शेतकऱ्यांच्या) मुलांच्या शिक्षणासाठीं खर्च करील, अशी भाऊरावांची अपेक्षा होती. पण कूपर कंपनीहि आपल्या वचनास जागली नाहीं. भाऊराव नाराज झाले आणि त्यांनीं कूपर कंपनीहि सोडली.

भाऊराव जरी नाराज झाले होते, तरी निराश झाले नव्हते. धदेवाल्या कन्यामार्फत आपलें ध्येय साध्य होत नाही हें पाहून आपण स्वत:च कंबर बांधून, जातिनिरपेक्ष सार्वनिक शिक्षण व अस्पृश्योद्धाराचें ध्येय गाठण्याचे त्यानी मनात कायम केलें. हे काम कस करावयाचें याच्या निश्चित पद्धतीचा आराखडा ते आखू लागले.

कोल्हापुरास सन १९०१ पासून शाहूमहाराजानी लोकाना उत्तेजन देऊन लोकशिक्षणाचें काम त्यांच्याकडून करून घ्यावें, म्हणून कोल्हापूर शहरात निरनिराळ्या जाताना प्रोत्साहन देऊन, आपापल्या जातींसाठी स्वतंत्र विद्यार्थीवसतिगृहें बांधविलीं होतीं. महाराजाना ब्राह्मणेतरासाठी व अस्पृश्यासाठी सामायिक वसतिगृहें बांधण्यापेक्षा आपापल्या जातीसाठी वसतिगृह बांधण्यास लोक लवकर तयार होतील. असें वाटले, आणि तें त्या वेळच्या परिस्थितींत योग्य होतं. कोणती योजना त्या काळच्या परिस्थितींत शक्य व अल्प काळात साध्य होण्यासारखी आहे याचा विचार करूनच महाराजानी स्वावलंबी, जातिविशिष्ट वसतिगृहाच्या योजनेस प्राधान्य दिलें होतें. कोल्हापूर शहरातील निरनिराळ्या जातींनी चालविलेलीं वसतिगृहें भाऊरावानी बारकाईने पाहिला होता

त्याच काळीं अण्णासाहेब (धाडो केशव) कर्व्यांनी पुण्याजवळ अनाथबालिकाश्रम बांधून देशमर ब्राह्मण विधवांच्या शिक्षणास व पुनर्विवाहाच्या कार्यास मोठी चालना दिली होती. पण ही संस्थासुद्धा ब्राह्मण जातीसाठीच काम करी असें म्हटल्यास चुकीचें होणार नाही. कर्व्यांच्या आश्रमात ब्राह्मणेतर विधवा क्वचित्च घेतल्या जात. शिवाय क्वचित् त्याना घेतलें जाई, त्याना ब्राह्मणाचे मुलींबरोबर स्वयपाकपाण्यात भाग घेता येत नसे. हा दुजाभाव कर्व्यांना पसंत होता, असे नाही पण कार्यसिद्धीच्या दृष्टीने त्याना तस करणे भाग पडलें असावें.

• तिसरे ठळक समाजसुधारक विठ्ठल रामजी शिंदे (अण्णासाहेब शिंदे) होत. अस्पृश्यतानिवारणाच्या कामीं महाराष्ट्रात कर्मवीर अण्णासाहेब याना अग्रस्थान द्यावें लागल. पन्नाससाठ वर्षांपूर्वी त्यानीच प्रथम अस्पृश्यतानिवारणाचें काम धडाडीने अंगावर घेतलें होतें. वास्तविक त्याच्या वेळीं मराठे पदवीधराना फार किंमत होती अण्णासाहेब सरकारी नोकरींत जाते, तर त्याना मोठ्या मानाचें पद मिळविता आलें असत किंवा त्यानी जस आपणास अस्पृश्यासाठी वाहून घेतलें तसे मराठ्यासाठी वाहून घेतलं असतें, तर त्याना मराठा समाजात मोठा पाठिंबा मिळून बहुमान मिळाला असता. पण अण्णासाहेबांच्या या थोर अंत करणाने त्याना जास्त गरजू व दलित अशा अस्पृश्य समाजाकडे ओढल. अण्णासाहेबानी अस्पृश्यासाठी फार कष्ट सोसले व पैसा गमावला. स्वत अस्पृश्य वस्तींत जाऊन गरिबींत राहिले व त्यांच्याशीं एकजीव झाले.

मीं एकदा अण्णासाहेब शिंद्याना म्हटलें, "अण्णासाहेब, तुम्ही अस्पृश्यांसाठी स्वत झटता. सरकार व स्पृश्य समाजाहि अलीकडे त्याना वर आणण्याची मनापासून

खटपट करतो, पण अस्पृश्यांना त्याची कदर दिसत नाही " अण्णासाहेब हसून म्हणाले, "पाटीलसाहेब, अस्पृश्यतेचा तवा दोन हजार वर्षे तरासला आहे. (सेकड्यातील वाया फार वापरलेल्या तव्याला तवा तरासला म्हणतात.) स्पृश्यवर्गाच्या सहानुभूतीचे चार थेंब त्याला पोचतहि नाहीत. वरच्यावर उडून जातात. अस्पृश्यांच्या रागावण्याकडे किंबहुना त्यांच्या शिव्याशापाकडे लक्ष न देता आपण केल्या पापाचं क्षालन, त्यांच्या उपयोगी पडूनच, कलं पाहिजे." अस्पृश्योद्धारासाठी विठ्ठलरावानी मुंबईस सन १९१० साली 'डिप्रेस्ड क्लास मिशन' नावाची संस्था स्थापिली. ह्या संस्थेचे अध्यक्ष न्यायमूर्ति नारायणराव चंदावरकर होते, व स्वत अण्णासाहेब सेक्रेटरी होते. या कामी त्यांनी मुंबई व पुण्यातील विद्वान् सुधारकाची व धनिकाची मदत व सहानुभूति मिळविली होता. ह्या दलितोद्धाराच्या कामी चागल यश येऊ लागल, तेव्हा सन १९१२ साली डॉ० भांडारकर यांच्या अध्यक्षतेखाली त्यांना अस्पृश्यसमाज परिषद् भरविली. त्या कामी त्याना शेतकी कॉलेजचे प्रिन्सिपाल डॉ० मॅन यांची फार मदत झाली. पश्चिम हिंदुस्थानात त्यांनी २६ संस्था काढल्या. त्यापैकी पाच ठिकाणी वसतिगृहें होतीं व सर्व संस्थात दलितवर्गातील एक हजाराचे वर विद्यार्थी शिक्षण घेत होते. पन्नास वर्षांपूर्वी हे काम अपूर्व नव्हत, असे कोण म्हणेल?

अण्णासाहेबांच्या पुढच्या कामाचा टप्पा म्हणजे अस्पृश्य समाजासाठी मध्यवर्ती आश्रम काढण हा होता. या कामी त्यांना इंदूरचे महाराज सर तुकोजीराव होळकर यानी वीस हजार रुपयांची देणगी दिली. त्यातून अण्णासाहेबांनी पुण्यास मोक्षरवाडीत, अस्पृश्यवस्तीत, 'अहिल्याबाई होळकर आश्रम' बांधण्यास सुरुवात केली. या कामासाठी डॉ० रघुनाथराव परांजपे यांच्या सहानुभूतीने मुंबई सरकारने मोठी ग्रँट दिला.

भाऊराव पाटलांच्या सूक्ष्म नजरेतून विठ्ठलराव शिंद्याच अस्पृश्योद्धाराच काम चुकणे शक्य नव्हतं. जसा शाहूमहाराजांच्या शैक्षणिक कार्याबद्दल भाऊरावांना आदर असे तसाच अण्णासाहेब शिंद्यांच्या अस्पृश्योद्धाराच्या कामाबद्दलहि त्याना आदर असे.

पण मला वाटत, भाऊरावानी कोणाचीहि जशीच्या तशी नक्कल केली नाही. *त्यांनी शाहूमहाराज व विठ्ठलराव शिंदे या दोन समाजसुधारकाच्या कामाचा समन्वय* करुन अशक्य वाटणारी गोष्ट शक्य करुन दाखवली. शाहूमहाराजांच्या जातिविशिष्ट वसतिगृहाच्या योजनेस मोड घालून, सर्व ब्राह्मणेतर व अस्पृश्य विद्यार्थ्यांसाठी *सार्वजनिक वसतिगृह स्थापून त्यांना एकत्र आणण्याची योजना भाऊरावांनी केली.* त्याचप्रमाणे विठ्ठलराव शिंद्यानी जसा एकट्या अस्पृश्यांच्या सेवेत देह झिजविला, तसं न करता भाऊरावांनी सर्व मागासलेल्या समाजाच काम हातीं घेतल.

मागासलेल्या व अस्पृश्य जातींच्या मुलांच्या वसतिगृहाचा ते विचार करू लागले. प्रथम थोडीं मुलें होतीं, तोंपर्यंत तीं भाऊरावांच्या घरींच राहत. त्यांच्या जेवणाची सोय बाहेर केली होती; पण तें पुरेना. एकतर, मुलांना अन्न चागलें मिळत

नसे. दुसरें, त्याच्याकडे येणाऱ्या मुलात मराठे, महार, माग व चाभार असत आणि साणावळवाले अशा मुलाना साणावळींत घेत नसत.

भाऊरावाचा पहिल हेतु मुलानी हरएक काम करावें, व स्वत ची थोडी कमाई करावी, दुसरा हेतु स्पृश्य व अस्पृश्य समाजातील विद्यार्थ्यांनी एकत्र ग्हावें, राहावें असा होता. या योजनेसाठी त्यानी सन १९२७ सालीं, सातान्यास शहरालगत असलेली महाराजाची धनणीची बाग सडाने घेण्याचे टरविल. बागत चागली जमीन मुबलक होती, भरपूर पाणी असलेल्या विहिरी होत्या. या सोईमुळे जिराइत पिकाबरोबर केळीं, हळद व उसासारखीं बागाइत पिकेंहि घेणें शक्य होई. बागत एक लाबच्या लाब पडळ होती. पडळींत बऱ्याच बदिस्त खोल्या होत्या. त्या दाणागोटा ठेवण्यास उपयोगी होत्या. पडळींपुढील सोपा प्रशस्त व लाबच्या लाब होता. तो पन्नाससाठ मुलास झोपण्यास फार सोइचा होता. वसतिगृहातील मुलानी स्वत शेतकाम करावें व आपला स्वयपाकहि करावा, या भाऊरावाच्या कल्पना अमलात आणण्यासाठी ही बाग चागली सोयीची होती. म्हणूनच आपल्या पहिल्या वसतिगृहासाठी भाऊरावानी ही बाग पसत केली होती.

भाऊराव जातीने जरा जैन होते, तरा त्याच्या वसतिगृहात जैन विद्यार्थी फार थोडे असत. विशेष भरणा मराठे, कुणबी याचाच होता. त्याच्या खालोखाल महार, माग, चाभार असत. वसतिगृहातील स्वयपाकपाण्याची व्यवस्था जातिनिरपेक्षपण विद्यार्थी स्वत करात. त्यात मराठे, महार, चाभार, मुसलमान असा भेदभाव न करता स्वयपाकपाणी सर्व जण आळीपाळीने करीत, असे मीं त्याच्या वसतिगृहाच्या अहवालात बाचल होत, म्हणून मी एकदा भाऊरावाना म्हणालो, "भाऊराव, अहवालात लिहिलेली ही माहिती कितपत खरी आहे, हें सागाल काय?" ते म्हणाले, "पाटीलसाहेब, आपण स्वत च येऊन पाहा ना." मी म्हणालो, "जरूर येईन, पण माझी येण्याची तारास मी आगाऊ सागणार नाहीं" भाऊराव म्हणाले, "काही हरकत नाही, पण आपल्या भेटीच्या वेळीं मीं हजर असावें, अशी आपली इच्छा असल्यास तो भेटीचा आठवडा तरी सागितलात तर त्या आठवड्यात मी सातान्यात राहीन." पुढे थोड्याच दिवसानी मीं त्याना माझा सातान्यास जाण्याचा आठवडा पत्रद्वारें कळविला. पण त्याची माहिती मात्र दुसऱ्या कोणास लागू दिली नाही. ही माझी भेट खासगी स्वरूपाची होती. मीं विचार केला की, मुलाच्या सध्याकाळच्या जेवणाच्या वेळींच आपण सातान्यास पोचावें. त्याप्रमाणे मीं पुण्याहून सध्याकाळीं पाच वाजता निघून सातान्यास साडेसात वाजता पोचावें असे टरविलें व माझ्या नेहमीच्या पद्धतीप्रमाणे कॅप कॉट (घडीची खाट) व बिछाना मोटारींत टाकून सातान्यास जाण्याकरिता निघालो. वाटत थोडासा खोळबा झाल्याने मी धनणाचे बागत साडेआठ वाजता पोचलो. वसतिगृहातील विद्यार्थ्याचीं जेवणें होऊन आवराआवर चालली होती. काही जण ताट उचलीत होते, काही शिल्लक राहिलेले

अन्न सकाळच्या न्याहारीकरिता झाकून ठेवीत होते व काही जण स्वयपाकाची भाडी घासत होते. भाऊराव तेथे होतेच. मला पाहताच ते म्हणाले, "जेवणार ना?" मी सांगितले, "होय तर! पण माझी इच्छा तुमच्या विद्यार्थ्यांबरोबरच जेवण्याची होती. वाटेत थोडा खोळबा झाल्यामुळे ती हुकली. असो." भाऊराव म्हणाले, "पोरें आता सैपाक करतील. वेळ लागणार नाही." मी म्हणालों, "तुम्ही माझ्यासाठी काही तरी चागले कराल." त्यावर ते म्हणाले, "रात्रीच्या जेवणापैकी सकाळच्या न्याहारीसाठी मुलाना काही अन्न ठेविलें आहे, त घेता काय?" मी म्हणालो, "ठीक, तसेच करू." तोंपर्यंत मीं ज्या मुलानी स्वयपाक केला व जी मुलें ताटे उचलीत होतीं त्याना त्याचीं नावें व जाती विचारल्या. सर्व जातींचीं मुलें त्यात मला आढळलीं. नतर भाऊरावाशी बोलत बोलत, मुलाच्या न्याहारीसाठी ठेवलेल्या अन्नातून भात, आमटी व भाकरी घेऊन मी जेवलों. थोड्या वेळाने सोप्यात नेहमीप्रमाणे ती मुलें झोपलीं. भाऊरावहि एका टोकास झोपले. जवळच माझ्या ड्रायव्हरने माझी खाट टाकली होती. भाऊरावाच्या उशाशीं वात कमी करुन एक कदील ठेविला होता. मुलें झोपलीं. भाऊरावहि झोपले, पण मला झोप येईना. खाटेवर नेहमीप्रमाणे मच्छरदाणी होती. मी विचार करीत होतों की, तात्त्विक दृष्ट्या पटूनहि 'आम्ही व्यवहारात मात्र महारामागाशीं शिवाशिव करण्यास विचकतों आणि या भाऊरावासारख्या महात्म्याने मराठ्याचीं, महाराचीं व मुसल्मानाचीं मुलें एकत्र आणून भावा भावाप्रमाणे त्याना वागवयास लाविलें, हें केवढें मोठ अलौकिक कार्य! किती अपूर्व ही कामगिरी! मी गेलो ते दिवस थडीचे होते. सुमारें तीन वाजता भाऊराव उठले. त्याच्या अगावर एक मोटा कावळा होता. त्यानी हातात कदील घेतला व मुलें निजलेल्या सोप्याच्या एका टोकापासून दुसऱ्या टोकापर्यंत पाहणी केली. मीं मुद्दामच हालचाल केली नाही व गाढ झोपेंतच आहें असे त्याना भासविलें. पण मला माझ्या जाळीच्या मच्छरदाणींतून भाऊराव काय करतात हे स्पष्ट दिसत होतें. ते मुले पाहत येत असताना, त्याना एक सातआठ वर्षाचे मूल थडीने कुडकुडत असताना दिसलें. त्यानी ते त्याच्या तोकड्या पांघरुणासह उचलून घेतलें व त्याला जवळ घेऊन झोपले. सकाळीं मी लौकरच उठलों आणि भाऊरावास हाक मारली व विचारलें, "भाऊराव, कोणाचे हो पोर तुम्हीं रात्रीं उचलून आणिलें?" ते म्हणाले, "त्या वेळीं तुम्ही जागे होता वाटतें? ते एक मागाचे पोर आहे."

कोल्हापूर संस्थानात माझ्या गावास लागून असलेल्या सरूड गावा सन १९४४ साली श्रीयुत नाबू केशवराव सोमोसी यानी इग्रजी वर्ग सुरू केले होते पण मदतीच्या अभावीं ते बद पडले होते. १९५२ सालीं भाऊराव शाहूवाडी महाल्यात फिरतीवर आले असता ही गोष्ट त्याच्या नजरेस आली आणि लोकाच्या विनतीवरून त्यानी ते वर्ग आपल्या संस्थेच्या ताब्यात घेऊन, त्या वर्गांचे रूपातर मिडलस्कूलमध्ये केलें. त्या वेळीं त्यानी, या सरूडच्या शाळेकडे लक्ष ठेवावें म्हणून मला सांगितलें होते.

त्याप्रमाणे त्या शाळेस दरवर्षी मी शमर रुपये देत असतो. आज तें पुरें हायस्कूल झालें आहे व त्यातून दरसाल काही मुलं मॅट्रिक होत असतात. भाऊरावाच्या सातारा रयत शिक्षणसंस्थेने त्या हायस्कूलसाठी स्वतंत्र इमारत बांधण्याचें ठरविलें आहे. सरूड, वडगाव, शिर्पे वगैरे जवळपासची गावें इमारतफंडास मदत करणार आहेत.

सन १९४८ च्या सुरुवातीस भाऊरावाच्या विद्यार्थ्यांनी व चहात्यांनी त्यांना एक लाख रुपयांची थैली अर्पण करण्याचं ठरविलं. ही रकम जमली. थैली अर्पण करण्याचा समारंभ तारीख २७ नोव्हेंबर १९४८ रोजीं साताऱ्यास धनिणीच्या बागेंत मोठ्या प्रमाणावर साजरा केला गेला. समारंभास लाखलाखांचे लोक आले होते. पूज्य गाडगेबाबाहि हजर होते. हा समारंभ भाऊरावाचे साहाय्यकर्ते व चहाते श्री मुकादम (बंडोबा गोपाळ कदम) यांच्या अध्यक्षतेखाली झाला. भाषणाच्या सुरुवातीस अध्यक्ष म्हणाले, "मी मुनसिंत गोदीवर मुकादम असल्यामुळे मजूरलोकांत माझं चांगलं वजन होतं आणि मला पैसेहि बरेच मिळाले व मिळवित. एकदा मी माझ्या कुसूर (ता० कऱ्हाड) गावीं गेलों असता, माझ्या हातून घडलेल्या वाईटसाईट गोष्टींबद्दल व माझ्या दुर्वर्तनाबद्दल मला पश्चात्ताप होऊन उपरति झाली आणि माझ्याजवळ शिल्लक असलेल्या पैशाचा विनियोग एखादी धर्मशाळा बांधण्यात करावा असं माझ्या मनात आलं. सद्गुरु गाडगेबाबांच्या हस्तें ह्या इमारतीचा पाया घालावा, म्हणून मी त्यांच्याकडे विनंती करण्यास तातडीने गेलो. गाडगेमहाराज म्हणाले, धर्मशाळा बांधण्या पेक्षा तुम्ही भाऊराव पाटलांच्या शैक्षणिक कार्याला मदत करून त्यांच्यामार्फत एखाद्या हायस्कूलची इमारत बांधली, तर मी त्या इमारतीचा पाया घालण्यास तुमच्या इच्छे-प्रमाणे तुमच्या गावीं येईन. त्याप्रमाणे मी भाऊरावास भेटलों व त्यांना सर्व हकीकत सांगून, हायस्कूलच्या इमारतीचा सर्व खर्च करण्याचं अभिवचन दिलं. त्याप्रमाणे माझ्या गावीं हायस्कूलच्या इमारतीचा पाया गाडगेमहाराजांनी घातला व इमारत पूर्ण झाली. सध्या ह्या इमारतींत भाऊरावाच्या कृपेने हायस्कूल चालू आहे व त्याची व्यवस्था तेच पाहतात. वास्तविक मी खेडवळ, अडाणा व निनशिकलेला माणूस या समारंभाच्या अध्यक्षस्थानास मी बिलकुल लायक नाही. तुम्ही सर्वांनी मिळून मला या जागेवर बसवलं आणि मी बसलो, एवढंच. तरी या महात्म्याच्या गौरवनिधि समारंभाच्या कामास तुम्ही आरंभ करून आपलं काम सुरू करा," असं म्हणून श्रीयुत मुकादम यांनी आपलं भाषण संपविलं. समारंभ चांगल्या रीतीनें पार पडला. मी या समारंभास उपस्थित होतो व भाऊरावास अर्पण करण्यास येणाऱ्या थैलीसाठी एक हजार एक रुपयांची देणगी दिली आहे. ज्या कुसूर हायस्कूलचा श्रीयुत मुकादम कदम यांनी आपल्या भाषणांत उल्लेख केला व मी एकदा मुद्दाम जाऊन पाहिलं. श्री कुसूर गावाच्यी हायस्कूलविषयी एक ट्रेनिंग कॉलेजहि तथं चालू होतं.

भाऊराव आहे मार्च एप्रिल १९०९ मध्ये आजारी झाल्याने त्यांना पुण्यास डॉक्टरांकडे ठेवण्यात आले होते. त्या वेळीं त्यांच्या भेटीसाठी मी गेलो होतो

सरकार व डॉक्टर लोक यानी त्याची फार चागली व्यवस्था ठेविली होती. यापूर्वी थोडे दिवस पुणे विद्यापीठाने त्याना पीएच्० डी० ही बहुमानाची पदवी देण्याचे ठरविले होते, पण भाऊरावाना विश्वविद्यालयाच्या पदवीदानसमारभाला हजर राहता आलें नाही. म्हणून विश्वविद्यालयाचे त्या वळचे व्हाइस चॅन्सेलर डॉ० आर्० पी० पराजपे यानी स्वत हॉस्पिटलमध्ये जाऊन कर्मवीर भाऊरावाना समक्ष तारीख ५ माह एप्रिल सन १९५९ रोजीं ही पदवी अर्पण केली

लवकरच तारीख ९ माह मे रोजीं पुण्यासच भाऊरावानी इहलोकींची यात्रा सपविली. त्याचा दहनविधि सातारा मुक्कामीं झाला त्या वळीं महाराष्ट्रातील प्रमुख पुढारी व राजमत्री हजर होते. मीहि कर्मवीराच्या अत्यविधीस हजर होतो

समाजसुधारक महात्मा ज्योतीराव फुले यानी सन १८७३ साली सत्यशोधक समाज स्थापून, हिंदुसमाजातील जातपात नष्ट करण्याचे, समाजातील उचनीचपणास मूठमाती देण्याचें व अस्पृश्योद्धाराचें बीज महाराष्ट्राच्या कणखर भूमींत पेरलें त्याच्याच हयातींत ह्या रोपाने जीव धरला व मुळें रोवली या रोपाची अनेक समाजसुधारकानी जोपासना केली त्यास राजर्षि शाहू छत्रपति, गुरुवर्य विठ्ठलराव शिंदे व कर्मवीर भाऊराव पाटील यानी सतपाणी घातले व त्याची निगा राखली महाराष्ट्र राज्याच्या निधर्मी व सामाजिक राज्यधोरणाने महात्मा ज्योतीरावाच्या त्या वेळच्या स्वप्नसृष्टीस आज आकार येत चालल्लेला दिसतो

भाऊराव एक फार सदा माणूस, शरीराने धिप्पाड, मनाने उदार, कष्टाळू, दूरदर्शी, स्पष्टवक्ता, बोलण्यापेक्षा कृतीने करून दाखविणारा असा समाजसेवक होऊन गेला. त्याना माणसाची पारख फार मोठी होती होतकरू माणसाना निवडून त्यानी त्याना तयार केलें. भाऊरावाच्या पाठीमागे त्याच्या कामाचा गाडा त्याच्या अनुयायानी सुरळीत चालविला आहे



# रीजन्सी कौन्सिलांतील काम



कोल्हापूर रीजन्सी कौन्सिलचें मंत्रीपद माझ्याकडे कसें आलें त्याची हकीकत गमतीदार आहे. सन १९४० सालीं कर्नल गेस्फर्ड हे कोल्हापुरास रेसिडेंट म्हणून आल्यावेळीं, त्यांना कोल्हापूर संस्थानाकरितां रीजन्सी कौन्सिलसाठीं कांहीं नांवें सुचविण्यास हिंदुस्थान सरकारनें सांगितलें होतें. कर्नल गेस्फर्ड कोल्हापुरास आल्यापासून मला त्यांस भेटतां आलें नव्हतें. राजाराममहाराजांच्या झालेल्या अकालीं मृत्यूमुळे कोल्हापूर शहरांत त्या वेळीं दुःखाची छाया पसरली होती. तथापि, जुन्या रिवाजाप्रमाणे हिंदुस्थान सरकारचा पेन्शनर म्हणून मला रेसिडेंटला भेटणें जरूर होतें. मी त्यास प्रथमच औपचारिक भेट द्यावयास गेलों. इकडचें तिकडचें थोडें बोलणें झाल्यावर ते मला उद्देशून म्हणाले, "मला येथे येऊन बरेच दिवस झाले, पण तुम्ही मला भेटलां नाहीं." मी म्हणालों, "येथे आल्याबरोबर आपणास बरेंच काम असणार हें एक व दुसरें छत्रपति राजाराममहाराजांच्या मृत्यूमुळे शहरात दुःखाची छाया पसरली होती, म्हणून मी आपल्याकडे येण्याचें लांबणीवर टाकलें होतें; माफ करा." कर्नल गेस्फर्ड म्हणाले, "बरें, असो. तुम्ही मुंबईच्या शेतकी खात्यांत बरेच दिवस होतां, नाहीं ? मला वाटतें, तुम्ही कांहीं दिवस पुण्याच्या शेतकी कॉलेजचे प्रिन्सिपालहि होता." मी म्हणालों, "होय." त्यांनी परत विचारलें, "आता काय करतां व कोठें राहतां ?" मीं सांगितलें, "याच संस्थानांत माझी थोडी शेती आहे तिची व्यवस्था पाहतों; पण राहतों कोल्हापूर शहरातच." मग ते म्हणाले, "तर मग तुम्हाला येथील जहागिरदार, शाहूमहाराज व राजाराममहाराज यांची बरीच माहिती असली पाहिजे." मी म्हणालों, "शाहूमहाराज, त्यांचे बंधु बापूसाहेब घाटगे, कागलकर व आबासाहेब पंतप्रतिनिधि, विशाळगडकर, यांचा व माझा चांगला परिचय होता. पण राजाराममहाराजांशीं माझा तसा निकट

समय आला नाही, पण मला ते चांगले जाणत. एकदा त्यांच्या विनंतीवरून कोल्हापूर येथील शेतकीप्रदर्शनाच्या कामी मदत करण्यास मी आलो होतो. त्यांच्या विनंतीवरून कोल्हापुरास बी० ए०च्या परीक्षेचा सेंटर मिळवून देण्यास मी मदत केली होती. मी त्या वेळी मुंबई विश्वविद्यालयाच्या सिनेट व सिंडिकेटमध्ये असल्याने मला मदत करता आली. शिवाय कोल्हापुरास रजेवर आल्यावेळी मी त्यांना कधी कधी भेटत असे." नंतर रेसिडेंट म्हणाले, "तुम्हाला राजाराममहाराजांची कारकीर्द कशी काय वाटली?" मी म्हणालो, "त्यांच्या कारकिर्दीत मी बहुतेक पुण्यासच दैनिकी खात्यात नोकर होतो. त्या वेळी मी कोल्हापुरास घर बांधलें नव्हतं, म्हणून त्यांची कारकीर्द जवळून पाहण्याचा योग मला आला नाही पण मला वाटत, ते सुस्वभावी असून लोककल्याणाकडे व विशेषत आपल्या प्रजेच्या शिक्षणाकडे त्यांचं फार लक्ष असे. त्यांच्याच कारकिर्दीत कोल्हापूर राज्यात शिक्षणाचा बराच प्रसार झाला. त्यांच्याच कारकिर्दीत लॉ कॉलेज व सेकंडरी ट्रेनिंग कालेज अशीं दोन नवीं कॉलेजें निघालीं."

यावर गरफर्ड म्हणाले, "ठीक. शाहूमहाराजांबद्दल तुमचें काय मत आहे ते सांगाल काय?" मीं उत्तर दिलें, "त्यांना फार बिकट परिस्थितीस तोंड द्यावें लागलें होतें. त्यांनी लोककल्याणासाठी फार कष्ट घेतले त्यांची कारकीर्द विशेषत मागासलेल्या समाजांना फार हितावह ठरली." कर्नल गेरफर्ड म्हणाले, "मी तर असे ऐकलं की, शाहूमहाराज फार खोडसाळ व दुराचारी होते आणि त्यांच्या कारकिर्दीत पुष्कळ लोकांना, विशेषकरून ब्राह्मण लोकांना, फार त्रास झाला, खरें ना?" मी म्हणालों, "शाहूमहाराजांना मुखत्यारी मिळण्यापूर्वी या संस्थानातील सर्व सत्ता ब्राह्मणांच्या हातीं केंद्रित झाली होती, व ब्राह्मण करतील तीच पूर्वदिशा समजली जाई. शिपाई वगळून, वरच्या शेकडा ९९ जागा ब्राह्मणांकडे असत व त्यामुळे वशिलेबाजी माजली होती. मुखत्यारी मिळाली तरी संस्थानिकास फार भिउन पाऊल टाकावें लागे. तथापि, शाहूमहाराजांच्या हातीं सत्ता आल्यावर, त्यांनी आपल्या राज्यातील निरनिराळ्या खात्यांत ब्राह्मणेतरांस नोकऱ्यांत काही हिस्सा देण्याचें ठरविलें. हें महाराजांचं करणें त्या काळीं ब्राह्मण लोकांस न रुचल्याने, ते महाराजांच्या विचारसरणीस विरोध करू लागले. खेड्यापाड्यांत बहुसंख्य गावकामगार पाटील अशिक्षित असल्याने सर्व सत्ता ब्राह्मण कुळकर्ण्यांकडे असे. खेड्यातील लोकांच्या अज्ञानाचा कुळकर्णी, भट व जोशी भरपूर फायदा घेत व त्यांना नाडीतहि. शहरातसुद्धा हीच स्थिति होती. राजवाड्यातील पूजाअर्चा वास्तविक वेदोक्त पद्धतीने व्हावयाची; पण तीसुद्धा ब्राह्मणलोक, महाराजांस शूद्र मानून, पुराणोक्त पद्धतीने करीत अशा वेळीं महाराजांस राजकीय व धार्मिक सुधारणा करण्यासाठी काही नवे कायदे करावे लागले महाराजांस मुखत्यारी मिळण्याच्या सुमारास खालसा मुलखात सत्यशोधक समाजाची चळवळ जोरात होती. विरुद्ध दोन खटल्यांत न्यायाधिशाने असा निकाल

दिला होता की, आपला धार्मिक कृत्यें करण्याचा हक्क त्याचा त्यास आहे. शाहूमहाराजाचा सत्यशोधक समाजास पाठिंबा असे. त्यामुळे संस्थानात ब्राह्मणेतरास आपले धार्मिक विधि स्वत च्या मताप्रमाणे करता येऊ लागले. महाराजानी केलेल्या सुधारणामुळे, जुनी वतनी कुळकर्ण्यांची पद्धत बदलून तलाठी पद्धत सुरू झाली. या नव्या पद्धतीमुळे कोणत्याहि जातींतील माणसास तलाठ्याची परीक्षा देऊन गावचें कुळकर्णीपण करण्याची संधि मिळाली. ह्या सर्व गोष्टींमुळे ब्राह्मण लोकानी काहूर उठविलें की, हिंदुधर्म संकटात आला व ब्राह्मण लोकाचे हक्क महाराजानी जाणूनबुजून बुडविले. कोल्हापूरच्या या हाकाटीस पुण्याच्या वर्तमानपत्रानी जोराचा पाठिंबा दिला. वास्तविक, कुळकर्ण्यांचीं वतनें नष्ट झालीं तरी त्याच्याकडे कुळकर्णीपणाच्या असलेल्या जमिनी महाराजानी त्याच्याकडेच ठेविल्या होत्या. मात्र त्या जमिनींवर सरकारी सारा बसविला गेला, एवढेच. महाराजाच्या असल्या सुधारणामुळे, ब्राह्मण लोकाचा त्याच्यावर रोष होऊन त्यानी महाराजाच्या विरुद्ध मोठी हाकाटी केली. त्या काळीं सर्व वृत्तपत्र त्याच्या हातीं होती, हें लक्षात ठेवा."

रेसिडेंटसाहेब म्हणाले, "तुमच्या म्हणण्यात बरेंच तथ्य आहे पण महाराजाच्या वाईट वतनाचं तुम्ही समथन कस करणार?" मी उत्तरलों, "महाराज दारू पीत नव्हते, अफू खात नव्हत, वा गाजा ओढीत नव्हते, याबद्दल मी निर्वाळा देऊ शकेन. आता आपण त्याच्या बाहेरख्यालीपणाबद्दल बोलत असाल तर त्या बाबतींत मला अस म्हणता येईल की, तें मोठे संत होते, अस मी म्हणत नाही ते राजे होते. राजेलोकाकडे त्याच्या लग्नाच्या बायकाशिवाय एकदोन रखेल्या असतात जोंवर त्यानी कोणावर जुलूम केला नाही, तोंवर त्यानी चारदोन रखेल्या ठेविल्या तर तो गुन्हा मानण्याचें मला कारण दिसत नाही. राजेलोकाच्या बाबतींत काही गोष्टी क्षम्य असतात." रेसिडेंटसाहेबाच महाराजाना नावें ठेवण्याचें व त्याचे दोष काढण्याच काम चालूच होतें त्यावर मी म्हणालों, "साहेब, शाहूमहाराजाबद्दल मला फार आदर आहे. त्याच्या हातून काही चुका झाल्या असतीलहि. तथापि त्याच्या हातून पुष्कळच लोककल्याणाचीं चागला कामें झालीं आहत, ह मला माहित आह शिवाय त्याना मरून वीस वर्षे झालीं. मेलेल्या माणसाच्या पश्चात् त्याचे दोष काढीत बसणें बरें नाही. माफ करा. मी आता आपली रजा घेऊ का?" गस्फर्डसाहब म्हणाले, "बरे, जा. पण पुन्हा केव्हा तरी येऊन भेटा. केव्हा याल?" मी म्हणालों, "मी मोकळाच असतों. तुम्ही साागाल तेव्हा येइन." साहेब म्हणाले, "आज गुरुवार आहे. पुढच्या गुरुवारी येऊ शकाल?" मीं "होय" म्हणून त्याची रजा घेतली.

ठरल्याप्रमाणे मी दुसऱ्या गुरुवारीं त्याच्याकडे गेलों. पण त्यानी मागच्या भेटीप्रमाणेच शाहूमहाराजाची नालस्ती करण्याचे काम पुढे चालविलें, तेव्हा मीं त्याना म्हणालों, "साहेब, मीं आपल्याला सागितलच आहे की, शाहूमहाराजाबद्दल मला फार आदर आह. आपण तर त्याचे दोषच मला सागता आपण सार्वभौम राजे

प्रतिनिधि आहात. तेव्हा आपल्याकडे शेकडों माणसे भेटीस येतात, त्याच्याजवळ आपण महाराजांचे दोष काढा किंवा त्यांना नांवें ठेवा. मी आता आपली रजा घेतों." असें म्हणून मी परत घरीं गेलों. त्याच दिवशीं सध्याकाळीं मला रेसिडेंटसाहेबाकडून खलीता आला. त्यात असें लिहिलें होतें, "हिंदुस्थान सरकारने कोल्हापुरास रीजन्सी कौन्सिल बनविण्याच्या बाबतींत काही लायक व अनुभवी माणसांची नांवें सुचवावींत, असें मला सांगितलें आहे. मला तुमचें नाव सुचवावेंसे वाटतें. हें आमंत्रण तुम्ही स्वीकाराल काय? पत्राचें उत्तर लौकर पाठवावें. कारण मला शक्य तितक्या लौकर रीजन्सी कौन्सिलकरिता नांवें सुचवावयाचीं आहेत." हें पत्र पाहून मी बराच बुचकळ्यात पडलों, आणि ते पत्र घेऊन माझे स्नेही व शेजारी रावबहादूर शंकरराव इंदुलकर, सरसुभे, याच्याकडे गेलों. त्यांना साहेबाच्या भेटींत झालेली सर्व हकीकत सांगितली व तें पत्र त्यांना दाखविलें. ते म्हणाले, "लेखी उत्तर न देता तुम्ही त्यांना समक्ष भेटा, पण ही आलेली संधि तुम्हीं सोडू नये, असें मला वाटतें." दुसऱ्या दिवशीं मी परत रेसिडेन्सीवर जाऊन साहेबांस भेटलों. साहेबानीं विचारलें, "तुम्हीं काय ठरविलें? मी तुमचें नाव सुचवूं ना?" मी म्हणालों, "आपण गेल्या दोन भेटींत माझा स्वभाव ओळखला असेलच. माझा जरा स्पष्ट बोलण्याचा स्वभाव आहे, तेव्हा या कौन्सिलमध्ये माझें कसें जमेल? शिवाय आपलें व माझें कसें जमेल?" साहेब मला म्हणाले, "तुम्ही आपलें मन स्वतंत्रपणें बनविता व स्पष्ट बोलता, म्हणूनच तर मी तुमचें नाव सुचवावें म्हणतो. तुम्ही शेतीतज्ज्ञ आहात. आम्ही तुम्हाला शेतकीमंत्री करूं." मी उत्तरलों, "तुमची इच्छाच असेल, तर मी मंत्रिमंडळात येतों. मात्र माझ्याकडे येणाऱ्या खात्यात शिक्षणखातें असावें. शेतकीखातें असो वा नसो; तें मीं जन्मभर हाताळलें आहे." याप्रमाणे बोलणें होऊन आमची मुलाखत संपली. थोड्याच दिवसांनी हिंदुस्थान सरकारकडून रीजन्सी कौन्सिलमध्ये माझी नेमणूक झाल्याचें लिहून आलें व त्याप्रमाणे मी शिक्षणमंत्रीपदावर रुजू झालों.

कोल्हापूरच्या रीजन्सी कौन्सिलातील या अनपेक्षित नेमणुकीच्या वेळीं मला सन १९०६ सालीं छत्रपति शाहूमहाराजांशीं झालेल्या मुलाखतीची आठवण झाली. त्या वेळीं मी त्यांच्याकडे गेलों होतों आणि त्यांना सांगितलें होतें कीं, "मला मुंबई प्रांताच्या शेतकी खात्याकडून नोकरी आली आहे. पण माझी इच्छा आपल्या संस्थानातच नोकरी करावी, अशी आहे." त्यावर महाराज म्हणाले होते, "जर शेतकी खात्याकडून आपणहून मागणी आली आहे, तर तुम्हीं जरूर तिकडे जावें हे बरें. तिकडच्या नोकरींत काम करण्यास तुम्हाला जास्त वाव आहे. आमचे लोक खात्यात जवळजवळ नाहीतच. आपली माणसें प्रांतसरकारात असलीं पाहिजेत. तेथे आमचीं माणसें नसल्याने मराठ्यांची तेथे दाद लागत नाही. कोल्हापूर तर तुमचेंच आहे. तुम्ही कोल्हापुरास केव्हाहि हक्काने याल. तुम्ही मुंबई सरकारची मागणी स्वीकारा. तिकडून पेन्शन घेतल्यावर मात्र तुमचा अनुभव तुम्ही कोल्हापूर संस्थानास

दिलं पाहिजे, खरे ना!" या आशीर्वादाची आठवण माझ्या मनातून कशी जाणार?

रीजन्सी कौन्सिलात थोरल्या राणीसाहेब छत्रपति श्रीमत ताराबाईसाहेब या रीजट, ई० डब्ल्यू० पेरी, आय्० सी० एस्०, हे प्राइममिनिस्टर, मी शिक्षणमंत्री, बॅरिस्टर केळवकर, रावबहादूर शंकरराव इदुलकर व बॅरिस्टर बागवे, असे मंत्रिमंडळ होतें.

माझ्याकडे शिक्षण, शेती, व्हेटर्नरी (पशुपालन), सहकार, जंगल व स्थानिक स्वराज्य, अशी महत्त्वाची खाती होतीं. प्राथमिक व माध्यमिक शिक्षणासंबंधी माझ्या काही कल्पना व अपेक्षा होत्या. शेतकी खात्यांत लागल्यापासून पेन्शनवर जाईपर्यंत मी प्राथमिक शिक्षणास शेतकीचें वळण देण्याच्या कामात डॉक्टर मॅनला मदत करीत असे. पुढे मी मध्यभागातील डेप्युटी डायरेक्टर असताना दहाबारा ठळक प्राथमिक शाळांत शालेय विषयास शेतकीचें वळण देण्याचे व शिक्षकाकडून पिकाचे जमाखर्च ठेवण्याचे प्रयोग चालविले होते. पण आम्हाला शाळाखात्याकडून मिळावी तेवढी सहानुभूति मिळत नसे. तेव्हा आता आपल्या कल्पनांना कोल्हापूर संस्थानातच मूर्तस्वरूप देण्याची संधि मिळते आहे व त्यात कौन्सिलचा पाठिंबाहि भरपूर मिळतो आहे, हे पाहून मला आनंद झाला. महात्मा गांधी हे मूलोद्योग शिक्षणाचे चाहते होते. त्यांना वाटे, बहुतेक शालेय विषय शेतकीच्या धंद्यातून चांगले शिकविता येतील व तेणेंकरून सहजगत्या मुलांना शेतीचे धडे मिळतील. आमच्या प्रयत्नाला हा एक मोठा पाठिंबा होता.

अशा वेळीं महात्मा गांधींची योजना कशी अमलात आणावी याचा विचार करण्यासाठी मुंबई सरकारने रावबहादूर जोशी, पेन्शनर, इन्स्पेक्टर ऑफ एज्युकेशन, यांच्या अध्यक्षतेखाली 'बेसिक एज्युकेशन कमिटी' नेमली. त्यात काही तरी पंचवीसएक माणसें असावींत. बरेच शिक्षणतज्ज्ञ व काही शेतीतज्ज्ञ त्यात होते. त्या कमिटींत श्री० जे० पी० नाईकहि होते. यापूर्वी काही काळ ते भूमिगत होते; त्यामुळे महाराष्ट्र काँग्रेसचे काही पुढारी त्यांना जाणत असावेत. मीहि या कमिटींत होता. त्या वेळीं तरुण जे० पी० नाईक माझ्या डोळ्यात भरले होते. त्यांच्या बहुश्रुतपणाबद्दल आदर वाटला होता.

पुढे जेव्हा मी कोल्हापूरच्या रीजन्सी कौन्सिलात शिक्षणमंत्री झालो, त्या वेळी मला श्रीयुत जे० पी० नाइकांची आठवण झाली. त्यांची चौकशी करीत असताना त्यांच्यासंबंधी बरीच मनोरंजक माहिती मिळाली. राजाराम कॉलेजात असताना ते एक हुषार, विनोदी व खेळकर वृत्तीचे, विद्यार्थीवर्गांत लोकप्रिय तरुण असल्याचें कळलें. एखादे वेळीं कोणी प्रोफेसर वेळेवर न आले तर श्री० नाईक बिनदिक्कत त्या प्रोफेसराच्या जागीं उभे राहून त्यांची नक्कल करीत क्लास चालवीत. त्यांचें विषयप्रतिपादन विद्यार्थ्यांना फार आवडे. नाइकांची कोणत्याहि विषयावर बोलण्याची तयारी असावयाची, असे त्यांचे सहाध्यायी सांगत.

मीं श्रीयुत नाइकाना बोलावून घेतलें व त्यांच्याशीं प्राथमिक व माध्यमिक शिक्षणासंबंधीं चर्चा केली. त्यांचीं व माझीं मतें बरींच जुळलीं. तेव्हा मीं त्याना विचारलें, "तुम्ही शिक्षणमन्त्र्याच्या विभागात्याचे सेक्रेटरी म्हणून माझ्या हाताखाली याल काय?" त्यानाहि आपलें काम लोकांपुढे आणण्याची संधि मिळत असल्याने त्यानी एका अटीवर रुकार दिला. ते म्हणाले, "मला काही काल महिन्यातून तीन दिवस रजा मिळावी. माझी पगाराची अट नाही." मीं विचारलें, "कशासाठी ही नियमित रजा पाहिजे? व तुमची ही अट मान्य केल्यास तुम्ही दरमहा सुमार दीडशे रुपये पगारावर याल काय?" ते म्हणाले, "भूमिगत असताना मीं एक प्राथमिक शाळा धारवाडजवळ उघडली आहे. तिच्या व्यवस्थेसाठी मला काही दिवस कधी कधी जावें लागल. पगार मला दरमहा सतराअठरा रुपये बस होईल. मला माझी शाळा पाहून यावयास सतराअठरा रुपये पुरे आहेत." "अहो, पण तुम्हाला जेवावयास लागत नाही काय!" ते म्हणाले, "आताहि मी कोठे तरी जेवतोच की!" मला हे गृहस्थ विक्षिप्त वाटले. तथापि माझें त्यांच्याबद्दलचें आकर्षण वाढलें व मीं कसेतरी त्यांच्या गळ्यात महिना पन्नास रुपये बांधण्याचें ठरविलें. त्यापेक्षा जास्त पगार ते घेईनातच. मी स्पष्ट कारण विचारता ते म्हणाले की, "त्यात माझें एक तत्त्व आहे. गरजेपेक्षा जास्त पगार घ्यावयाचा नाही व हौसेने काम करावयाचें." झालें, श्रीयुत नाईक माझे सेक्रेटरी म्हणून कामावर हजर झाले. त्यांचा मुक्काम बरेच दिवस आमच्या ऑफिसातच असे. खाणावळींतून जेवून येत व नेहमी ऑफिसातच काम करीत राहत व तेथेच झोपतहि. माझें व त्यांचें फार जमलें. मला काय पाहिजे, हे त्यांच्या चट्दिशी लक्षात येई व ते उत्तम ड्राफ्ट करून घेऊन माझ्या बंगल्यावर सकाळीं येत. मीं जर त्यात काही सुधारणा केली, तर त्याना त्याबद्दल बिलकूल विषाद वाटत नसे. पुढे लौकरच माझ्याकडे स्थानिक स्वराज्य खातें आलें, तेव्हा नाइकांच्या शिफारशीवरून त्यांचेच एक अनुभवी शिक्षक मित्र आर्० व्ही० परुळेकर, एम्० ए०, एम्० एड्०, याना मीं शिक्षणखात्याचे चिटणीस म्हणून घेतलें व नाइकाना स्थानिक स्वराज्य व कोल्हापूर म्युनिसिपालिटीकडे काम करण्यास भरपूर संधि दिली. श्री० परुळेकराना नाईक ही व्यक्ति चांगली परिचित होती. दोघेहि सारस्वत समाजातील असल्याने नाइकानी आपलें चवूतवाळें परुळेकराकडेच आणलें.

श्रीयुत नाईक हे विद्वान् पण जरा विक्षिप्त असे मला वाटलें; ते तसें होते का त्यानी तऱ्हेवाईकपणाचें सोंग आणलें होतं, हें मला समजलें नव्हतें, व आजहि मला ह्याबद्दल काही सांगता येत नाही. निदान पहिले काही दिवस तरी त्यांचे कपडे फार थोडे, आणि तोकडे होते; त्यातून ते धुण्यास टाकण्याचा कंटाळा. परुळेकरांच्या बिऱ्हाडीं त्यांच्याबरोबर राहावयास नाईक गेले त्या वेळीं परुळेकराना त्यांच्या अंगावरचे कपडे काढून घेऊन दर आठवड्यास धोब्याकडे धुवावयास टाकावे लागत. रीजन्सी कौन्सिलच्या बैठकी नव्या राजवाड्यावर श्रीमंत छत्रपति ताराबाईसाहेबांच्या अध्यक्षते

गुंतून राहत नसत. तें काम अगर संस्था हाताआड झाली म्हणजे त्यांना त्याची फारशी आठवणसुद्धा होत नसावी. मला वाटतें, त्यांना भावना कमी असावी.

श्री० जे० पी० नाईक हे कोल्हापूर म्युनिसिपालिटी व इलाखापंचायतींचें काम पाहू लागल्यावर, त्यांच्या जागीं व्ही० आर्० परुळेकर यांना शिक्षणखात्याचे सेक्रेटरी केलें. रीजन्सी कौन्सिल येण्यापूर्वी विद्याखात्यावर स्वतंत्र शिक्षणाधिकारी नव्हता. माध्यमिक शिक्षणाची व्यवस्था राजाराम कॉलेजच्या प्रिन्सिपालकडे व प्राथमिक शिक्षणाची तपासणी राजाराम हायस्कूलच्या हेडमास्तराकडे असे. या कामासाठी त्यांच्याकडे सहा असिस्टंट एज्युकेशनल इन्स्पेक्टर्स हाताखाली काम करीत. ही व्यवस्था बदलून श्री० एम्० आर० देसाई यास स्वतंत्र शिक्षणाधिकारी नेमिलें. त्यांच्या नंतर पुण्याचे बाबूराव जगतापहि कांही दिवस शिक्षणाधिकारी होते. मी मंत्री असताना पूर्वीची सहा असिस्टंटांची संख्या चौदा केली, व शिक्षणमंडळात (स्कूल-बोर्डात) नऊ सभासद होते ती संख्या वाढवून तीहि चौदा केली. खेड्यापाड्यातील शिक्षणास उत्तेजन मिळावें, म्हणून तेथें शाळेत नवीन येणाऱ्या गरीब मुलांमुलींस पुस्तकें, पाट्या व कपडे वाटण्याची सोय केली. सुमारें अडीचशे मदतीच्या शाळा काढल्या. शंभर मुलींच्या शाळा काढल्या. विद्यार्थ्यांची संख्या मी आल्यावेळीं ४६,६७० होती; तीन वर्षांत ती ६८,२८१ वर गेली. शिवाय खासगी शाळांची ग्रँट (अनुदानें) वाढविली. शहरातील प्रायमरी ट्रेनिंग कॉलेज बंद पडलें होतें, तें परत सुरू करण्याचा निर्णय घेतला. त्या वेळीं असलेलें कॉलेज शहरी वातावरणातून ग्रामीण वातावरणात (रुकडीस) नेलें; तेथे त्याला एकतळी पचवीस एकर शेती व शेतीसाठी बैल व आउत दिली. वसतिगृहातील विद्यार्थ्यांच्या दुधासाठी कांही म्हशी दिल्या. इतकी चांगली व्यवस्था त्या वेळपर्यंत तरी दुसरीकडे कोठेहि नव्हती. जवळच एक प्रॅक्टिसिंग स्कूल काढिलें. शिवाय तेथच कोल्हापूर शहरातील जुन्या शिक्षकांसाठी दोन वर्षांचा स्वतंत्र क्लासहि काढला.

माझ्या मंत्रीपदाच्या मुदतींत शाळांसाठी अकरा इमारतींचें बांधकाम सुरू केलें. पैकी तीन इमारती पुऱ्या झाल्या होत्या. संस्थानात सुमारें चाळीस शाळांस शेती व बागेसाठी एकेक एकर जमीन दिली. शेतीस व बागेस लागणारीं हत्यारें दिलीं खताखाठी व बीबियाण्यासाठी दरसाल कांही रकम देण्याचें ठरविलें.

रीजन्सी होण्यापूर्वी शेतकी खातें म्हणून वेगळें खातें नव्हतें. एक शेतकी संस्था होती. याच संस्थेकडे राजाराममहाराजांनी, संस्थानच्या दोन भागांसाठी दोन शेतकी अधिकारी दिले होते. ही शेतकी संस्था या दोन अधिकाऱ्यांकडून थोडेंबहुत शेतकीप्रचाराचें काम करी. त्यांच्या कामावर दिवाणाचे पर्सनल सेक्रेटरी मिस्टर एस्० एस्० शिर्के देखरेख करीत. कोऑपरेटिव्ह (सहकारी) खात्यावरहि स्वतंत्र रजिस्ट्रार नव्हता. शेतकी खात्याप्रमाणे हेंहि खातें श्री० शिर्क्यांकडे होतें. माझ्याकडे हीं खातीं आल्यावर मी दोन्ही खात्यावर मिळून एक खालसातील अनुभवी अधिकारी

मिस्टर श्रीपतराव जाधव यास नेमिलें. जाधवास आणण्यापूर्वी सहकारी खात्यात फक्त दोन ऑडिटर व दोन ऑर्गनायझर होते. जाधव आल्यावर त्याच्याकडे आणखी दोन ऑडिटर, एक कोऑपरेटिव्ह ऑफिसर व सहा सुपरवायझर्स दिले. आज सहकारी खात्याची वाढ झाली आहे. ह शेतकरी सहकारी संघाच्या पुढे दिलेल्या कार्यविस्तारावरून कळून येईल सहकारी पतपेढीच्या कामाचें उदाहरण म्हणून माझ्या गावाजवळच्या पतपेढीच कार्यहि थोडक्यात दिलं आहे.

मी रीजन्सी कौन्सिलात मंत्री असल्यावेळीं संस्थानातील उसाच्या पडकऱ्यास सल्फेट ऑफ अमोनियाचा उसाच्या पिकास चांगला उपयोग होतो हें कळून चुकले होतें. दुसऱ्या जागतिक युद्धाच्याकाळीं देशात अन्नधान्याचा तुटवडा भासू लागल्याने, मुंबई प्रांताच्या शेतकी खात्याने भाताचें उत्पादन वाढविण्यासाठी शेतकऱ्यास सल्फेट खत पुरविण्याची सोय केली होती. आम्हींहि संस्थानात भाताच्या पिकास सल्फेट देण्याचीं प्रात्यक्षिक केलीं. त्यातहि दिसून आलें की, सल्फेट देणं फायदेशीर पडतें. शिवाय, त्या काळात गुळाला व भाताला बाजारात भाव चांगला असे, म्हणून शेतकऱ्याकडून सल्फेटची मागणी वाढली.

त्या वेळीं आपल्या देशात फारच थोड सल्फेट पैदा होत असे. मुख्य पुरवठा परदेशाहून येई. मुंबई प्रांतात इंपीरिअल केमिकल कंपनीच मोठ्या प्रमाणावर परदेशी सल्फेटची आयात करी. या कंपनीचे मोठ्या शहरात एजंट असत. कंपनीचे एजंट ठराविक व्यापाऱ्याकडेच सल्फेट ठेवीत. यामुळे ही मक्तेबाजी होऊन बसली होती. हे व्यापारी सल्फेटच्या वाढत्या मागणीचा फायदा घेऊन नफाबाजी करात. शिवाय सल्फेटमध्ये भेसळहि करीत. या भेसळीची मला फार चीड येइ. शेतीकी खात्यामार्फत भेसळ थांबविण्याचा आम्हीं बराच प्रयत्न केला पण सल्फेटची ठराविक व्यापाऱ्याकडे मक्तेदारी असल्यामुळे आम्हास भेसळ थांबविणें शक्य झालें नाही.

कर्मधर्मसंयोगाने या भेसळीस आळा घालण्याची व तसें करताना शेतकरी सहकारी संघास मदत करण्याची संधि चालून आली. त्याची हकीकत अशी सन १९३९-४० साली कै० तात्यासाहेब मोहिते या प्रागतिक व धाडसी शेतकऱ्याने कोल्हापूर पेठेतील गुळाच्या व्यापाऱ्याची कोंडी फोडण्यासाठी 'शेतकरी सहकारी संघ' सहकारी खात्यात नोंदविला होता. ज्याअर्थी शेतकी खात्याला सल्फेटमधील भेसळ थांबविता येईना, त्याअर्थी एकटे तात्यासाहेब तरी गुळाच्या या मोठ्या पेठेतील डावपेच खेळणाऱ्या व्यापाऱ्याचे संघाशीं कसा सामना देणार?

तात्यासाहेबांच्या सहकारी संघाची स्थिति खालावली होती. संघ तोट्यात आला होता. एकदा निराश होऊन तात्यासाहेब शेतीखात्याच्या डायरेक्टरास घेऊन मजकडे आले. मी तात्यासाहेबांना म्हणालों, "तुम्ही का नाही सल्फेटची एजन्सी घेत?" ते म्हणाले, "कोल्हापुरास इंपीरिअल केमिकल कंपनीच्या अधिकाऱ्याकडे आपण विचारून पाहिलं, पण ते गृहस्थ म्हणाले, आम्ही आता जास्त व्यापाऱ्याकडे

माल ठेवू इच्छीत नाही." तेव्हा मीं तात्यासाहेबाना सांगितलें, "मी गव्हर्नमेंट ऑफ इंडियाकडे लिहून कोल्हापूर संस्थानासाठी स्वतंत्र 'कोटा' मिळतो का तें पाहतों."

रीजन्सी कौन्सिलच्या सभेत मीं हा सल्फेटचा प्रश्न काढला. शेतकऱ्याच्या अडचणी व सल्फेटमध्ये होणारी भेसळ त्याना समजून सांगितली व ठरलें कीं कौन्सिलने गव्हर्नमेंट ऑफ इंडियाकडे संस्थानसाठी स्वतंत्र कोटा मागवावा. आम्हीं त्याप्रमाणे कोटा मागविला व तो परस्पर आमच्याकडे येण्याचें ठरलें. आता सल्फेटच्या मक्तेदाराच्या नाड्या आवळल्या. या कोट्यातील बराच मोठा भाग मीं शेतकरी सहकारी संघाकडे दिला. त्या कोट्याचा शेतकरी सहकारी संघास त्याच्या अडचणीच्या प्रसंगीं फार उपयोग झाला. थोड्याच दिवसात संघ तोट्यातून मुक्त झाला व तात्यासाहेबाना नवीन नवीन योजना हातीं घेण्यास हुरूप आला. शेतकऱ्यास निर्भेळ सल्फेट योग्य दराने मिळू लागलें.

कोऑपरेटिव्ह सोसायट्यामार्फत संघ संस्थानभर शेतकऱ्याना माफक दरात सल्फेट, पड व डिझेल तेल पुरवू लागला तसे संघाच्या अडतीच्या दुकानात कोऑपरेटिव्ह सोसायट्यामार्फत मोठया प्रमाणात गूळ येऊ लागला. सन १९५६ नंतर कै० तात्यासाहेबाच्या संघाने 'बॉम्बे स्टेट कन्झ्यूमर्स कोऑपरेटिव्ह सोसायटी'चें कोल्हापुरातील क्लॉथ अँड जनरल स्टोअर्स चालविण्यास घेतलें. सन १९५८ त औषधाचीं चार दुकानें काढून शहरातील ड्रुगिस्टवर एक प्रकारचें नियंत्रण आणिलें. संघाचे मॅनेजर कळवितात की, लवकरच संघाचे हरतऱ्हेच्या भाड्याचे मोठें दुकान सुरू होईल.

जो शेतकरी सहकारी संघ सन १९४२ त आपला व्यवहार बंद करावा की काय या चिंतेत होता, त्याचा आज (सन १९६२-६३) केवढा मोठा व्यवहार चालला आहे, हें खाली दिलेल्या त्रोटक माहितीवरून कळून येईल.

१. गूळ विभाग : कोल्हापूर पेठत विक्रीस येणाऱ्या मालापैकी सुमारें १४ टक्के माल संघाच्या अडतीच्या दुकानात विक्रीस येतो. त्याची किंमत सुमारें सत्तर लक्ष रुपये होत असावी.

२. खत विभाग : डिस्ट्रिक्ट होलसेलर या नात्याने संघ सुमारें एक कोट रुपयाचीं रासायनिक खत, मिश्रखत, इतर खतें पुरवितो.

३. डिझल ऑइल : सुमारें सत्तावन्न लक्ष रुपयाचें डिझेल तेल पुरवितो.

४. लोखंड : डिस्ट्रिक्ट होलसेलर या नात्यानें सुमारें आठ लक्ष रुपयाचा विक्री होते.

५. सिमेंट : डिस्ट्रिक्ट होलसेलर या नात्यानें सुमारें साडेचार लक्ष रुपयाची विक्री होते.

६. धान्य : घाऊक धान्याची विक्री सुमारें वीस लक्ष रुपयाची होते.

७. कापड व प्रोव्हिजन्सची सुमारें चार लक्ष रुपयाची विक्री होते.

रुपयांचें मिश्रगत व ३६,००० रुपयाचें इंजिन तेल सभासदास पुरविलें. सरूड कोऑपरेटिव्ह सोसायटी शाहूवाडी तालुका खरेदीविक्री सघाशीं सल्म झाली आहे. या तालुका खरेदीविक्री सघाबरोबर सरूड कोऑपरेटिव्ह सोसायटीचा गतसाली ६६,५०० रुपये खरेदीविक्रीचा व्यवहार झाला. या (म्हणजे हनुमान) सोसायटीशिवाय आज विणकर लोकांची हातमाग सोसायटी, कुंभार लोकांची सोसायटी व हरिजनाचा धान्य सोसायटी, अशा आणखी सोसायट्या उपयुक्त कामे करीत आहेत. एकदरीत सहकाराने सरूडास भक्कम मूळ धरलें आहे असे म्हणता येईल

त्याचप्रमाणे मीं शेतकी खात स्वतंत्र करून त्याची वाढ केली. एक वडिंग (बाधबंदिस्ती) ऑफिसर नेमून मॅट्रिक पास झालेल्या चार तरुणास बंडिंगचें शिक्षण देऊन त्या ऑफिसरच्या हाताखाली दिले. अधिक शेतकी अधिकारी तयार करण्या साठी पुण्यास शेतकी कॉलेजात दोन विद्यार्थी पाठविले व पुढे दोन वर्षे दरसाल दोन विद्यार्थी पाठविण्याचें ठरविले. बंडिंगसाठी एक लाख रुपये दोन वर्षात खर्चीं घालण्याची तजवीज केली.

इंजिनावर चालणाऱ्या चरकाचा व सुधारलेल्या चुलाणाचा प्रसार करण्यासाठीं पुण्याहून दोनतीन जाणते गवडी आणले. रायबागास सस्थानचीं काही रानावरें असत. तेथेंच चागल्या जातीचे बळू ठेवून, कॅटल ब्रीडिंग फार्म काढल. 'मरानो' जातीचे बकरे आणून स्थानिक मेंढराची लोकर सुधारण्याचे प्रयत्न सुरू केले.

कोल्हापूरची शेतकीशाळा म्युझियमजवळ (सध्याचें कलेक्टर ऑफिस) असे पण म्युझियमजवळ शेतीसाठी जमीन फार थोडी होती. कौन्सिलने बावड्याजवळ असलेली जुनी इन्फट्री वाढवून तिचे रूपांतर 'राजाराम रायफल्स'मध्ये करून ती टेंबलाईचे माळावर नेली व जुन्या इन्फट्रीच्या बराकीचे व इमारतीच पोलीस हेडक्वार्टर्स बनविले. यामुळे महाराजानी इन्फट्रीस भाजीपाला करण्यासाठीं मुलूक जमीन व इन्फट्रीतील मुलासाठी असलेली शाळेची इमारत शेतकी खात्याने ताब्यात घेऊन त्यात शेतकीशाळा नेली व जमिनीचे शेतकी फार्म बनविले. या जमिनात एक विहीर होती ती बाधून तिच्यावर इंजिन व पप बसवून, नागाईत पिक करण्याची सोय केली.

कोल्हापुरातील बागा, पी० डब्ल्यू० डी० खात्याकडे असत, पण त्यांवर तज्ज्ञाची देखरेख नसे. नवीन व्यवस्थेत ह्या बागा व टाउन हॉल बाग यावर एक अनुभवी पदवीधर (हॉर्टिकल्चरिस्ट) बाग अधिकारी नेमला.

रीजन्सी कौन्सिल येण्यापूर्वी दरबारचा गुरासाठी असा एकच दवाखाना होता. त्यातावक तो रिसाल्यातील घोड्यासाठी होता इलाखा पचायतीने एक व पाजरपोळ एक असे गुरांसाठी दोन दवाखाने चालविले हाते. ह्या दोन्हीवर सरकारी देखरेख नव्हती. रीजन्सी कौन्सिल झाल्यावर हे दोन्ही दवाखाने आम्हीं ताब्यात घेतले व त्याचा तपासणी रिसाल्याजवळच्या सरकारी दवाखान्यातील अनुभवी व्हेटर्नरी सर्जन

के० हिंदुराव घाटगे यांच्याकडे सापार्टी आणि लागलाच दोन दवाखाने एक रायबागास व दुसरा नानवडयास, उघडले. आमच्या योजनेप्रमाणे संस्थानात आणखी तेरा दवाखाने उघडावयाचे होते. त्यासाठी दरसाल एकेक विद्यार्थी मुंबईस व्हेटनरी कॉलेजात पाठविण्याचे ठरले होते. प्रथम पाठविलेला विद्यार्थी (श्री० पाटोळे-चव्हाण) मी असतानाच तयार झाला. त्यास बावडे दवाखान्यावर नेमिले. एक लास काढून साळहोरी (सॅकमन) तयार केले. अशा रीतीने शेतकऱ्यांच्या जनावरांची औषध पाण्याची चांगली सोय झाली.

कोल्हापूर रीजन्सी कौन्सिलात मंत्री असताना माझ्याकडे असलेल्या खात्यांना चांगले स्वरूप आले असे मला वाटते. शेतकऱ्यास, शेतकी खात्यामार्फत, संस्थानात मोठ्या प्रमाणावर बांधबंदिस्ती करता आली. सुधारलेली औजारे, इंजिनावर चालणारे नांगर (ट्रॅक्टर), चरक (क्रशर), सुधारलेला चुलाण, यांचा चांगला प्रसार झाला. संस्थानात शाळांचा व विद्यार्थ्यांची संख्या जवळजवळ दीडपट झाली. कोल्हापूर म्युनिसिपालिटीचे क्षेत्र वाढले. काही नवे रस्ते व भगीनोळ झाले, जुने रस्ते रुंद करण्यात आले. शहरात जागोजाग जुनी निरुपयोगी झालेली तळी व डबकी भरून काढली. नवीन बागा व पार्क झाले.

हे काम करीत असतानाच कौन्सिलच्या संमतीने मी Regional Survey of Economic Resources India Kolhapur (कोल्हापूर संस्थानची आर्थिक पाहणी) नावाचा संशोधनात्मक ग्रंथ लिहिला. दरम्यान संस्थान भारतात विलीन झाले. तरी पण सदर ग्रंथ मुंबई सरकारने प्रसिद्ध केला आहे. हा ग्रंथ लिहीत असताना मिळविलेल्या माहितीचा व साधनांचा उपयोग करून 'Food Problem in India in General and Kolhapur State in Particular' (हिंदुस्थानातील, विशेषकरून कोल्हापूर संस्थानातील, अन्नधान्याचा प्रश्न) हे पुस्तक मी स्वतःच प्रसिद्ध केले.

एकंदरीत ज्या संस्थानात माझा जन्म झाला, जेथे माझ्या उच्च शिक्षणास सुरुवात झाली, त्या संस्थानात माझ्या पेन्शनच्या काळातील काही वर्षे मला तेथील लोकांची थोडीफार सेवा करता आली, याबद्दल समाधान वाटते.

# महाराष्ट्रांतील शेती

माझा या ठिकाणीं शेतकीवर निबंध अगर प्रकरण लिहून शेतीसुधारणेच्या कामात सूचना करण्याचा विचार नाही. एक तर हें काम आटवणींच्या बाहेर जातें; शिवाय सध्याच्या शास्त्रीय युगात, बत्तीस वर्षांपूर्वी शेतकी खात्यातून निवृत्त झालेल्या एका अधिकाऱ्याने हें धाडस करणें बरें नाही. मला मनापासून वाटतें की, शेतकीसुधारणेचें काम योग्य दिशेने चाललें आहे. मात्र त्यातून व्हावी तितकी फलनिष्पत्ति होत नाहीसे दिसतें. पण ती गोष्ट निराळी. त्याचे मुख्य कारण, शेतकऱ्याचें सुधारणेकडे दुर्लक्ष व अल्पसंतोषी वृत्ति, आणि विकासखात्यातील अधिकारी व जनतेने निवडून दिलेले प्रतिनिधि याची यासंबंधची अनास्था, हें होय. त्यानून विकासाच्या कामासाठी नेमलेले लहानमोठे कर्मचारी हे स्वतःचें ज्ञान वाढवीत नाहीत व लोकांशीं एकजीव होण्याचा प्रयत्न करीत नाहीत असें म्हणावें लागतें. उच्च पातळीवरील सरकारी धोरणाचा यात दोष दिसत नाही.

मी जरा शेतकीसुधारणेचा काही भाग गाळणार असलों तरी काही तात्त्विक व मूलगामी मुद्द्यावर माझे विचार माडणार आहे. मला वाटतें, मुंबई प्रांताच्या अथवा महाराष्ट्राच्या शेतकी खात्यातील एखाद्या अधिकाऱ्याने महाराष्ट्रातील शेतीचा तपशीलवार इतिहास लिहावयास पाहिजे होता; पण तसे आतापर्यंत झालें नाही. तथापि जुना जमाना पाहिलेले व त्या काळच्या शेतीची माहिती असलेले अधिकारी आजहि जबाबदारीच्या जागावर आहेत. त्यानी तरा अशा प्रकारचा इतिहास लिहावा. ही जबाबदारी आम्हा जुन्या लोकाकडून पार पडलेली नाही. आमच्या वेळेस शेतकी खात्यात अधिकारी फार कमी होते. सन १९०६ साली सिंधपासून कारवार-धारवाडपर्यंत पसरलेल्या अवाढव्य मुंबई प्रांतासाठी एक डायरेक्टर ऑफ ॲग्रिकल्चर व त्याच्या हाताखाली एक डेप्युटी डायरेक्टर म्हणा वा सुपरिंटेंडट

ऑफ लँड रेकॉर्ड्स म्हणा, एवढेच अधिकारी होते. सुमारें सन १९०८ पर्यंत शेतकी खात्यात शेतीसुधारणेचा प्रचार करणारा एकहि अधिकारी प्रचारक नव्हता. मलाच त्या वेळीं प्रथम डेक्कन डिव्हिजनचा पहिला प्रचारक (इन्स्पेक्टर ऑफ ॲग्रिकल्चर) नेमलें. पुढे दोन वर्षांनी सिंध, गुजराथ व कर्नाटक या भागात एकेक शेतकी इन्स्पेक्टर नेमला. जवळजवळ सन १९२५ पर्यंत प्रांतातील प्रत्येक जिल्ह्याच्या वाटणीला एक एक शेतकी पदवीधरसुद्धा आला नसावा. या परिस्थितींत आम्हीं बोटावर मोजता येतील इतक्याच लोकानी आपापलीं विविध कामें सांभाळून शेतीचा इतिहास लिहिणें अवघड होतें. या थोड्या लोकाना त्या काळच्या शेतीची व शेतकामाची माहिती मिळविणें, शेतकऱ्याच्या गरजाचा अभ्यास करणें, पिकावरच्या रोगाची माहिती मिळविणें, व जें थोडेफार संशोधन मॉडेल फार्मावर झालें होत त्याची माहिती संकलित करून शेतकऱ्यापुढे मांडणें, अशीं नानाविध कामें करावीं लागत. अशा परिस्थितींत हातीं असलेलीं कामें सांभाळून, अर्वाचीन काळच्या शेतीचा इतिहास लिहिणें फार अवघड होत; यामुळे आम्हास अर्वाचीन काळच्या शेतीचा इतिहास लिहिता आला नाही हें कबूल करणें भाग आहे. आम्हीं कोणी तरी त्या वेळीं शेती व शेतकरी याची जुनी माहिती मिळवून त्याचा इतिहास लिहिण्याचा प्रयत्न केला पाहिजे होता, पण तसें झालें नाही. माझ्याबरोबर असलेले सहाध्यायी व प्रथम शेतकी खात्यात लागलेले माझे सहकारी याच्याकडून राहून गेलेल्या कामाच्या दोषाचा वाटा मजवरहि येतो हें मी जाणतो. नेहमी कामात गुंतलेला माणूसच अधिक काम करू शकतो. सन १९०० सालीं मुंबई प्रांताचे डायरेक्टर ऑफ ॲग्रिकल्चर जे० डब्ल्यू० मॉलिसन अगर अलीकडे, तीस वर्षांपूर्वी, पंजाबात रेव्हिन्यू कमिशनर असलेले मिस्टर ब्रेन यानी नाही का आपआपलीं कामें सभाळून शेतकऱ्यास व शेतीस उपयुक्त पुस्तक लिहिलीं! मला आशा आहे की, पुणें शेतकी कॉलेजचा एखादा माजी अगर आजी विद्यार्थी महाराष्ट्राच्या शेतीचा इतिहास लिहिण्याचा प्रयत्न करील. असला इतिहास फार मनोरंजक होईल.

आपल्या डेक्कन भागात सन १८७५ पूर्वी एकच एक पुणें-बंगलोर हमरस्ता असावा. रस्त्याचे अभावीं दाण्यादुण्याची ने-आण फारशी होत नसे. अर्थात् लोक आपापल्या भागात पिकणारें धान्यच खात. कोकण व सह्याद्रीलगतचा मावळ भाग यात भात पिकत असल्याने त्या भागातील लोकाच्या अन्नात मुख्यत्वें तांदूळ असे, पण भाकरीचीं पिकें निरनिराळीं असत. पुणें, नाशिक व पश्चिम अहमदनगर भागात बाजरीची भाकरी करीत, तर पूर्वभागात ज्वारीची भाकर असे. मावळात व कोकणात नाचणीची भाकर करीत. त्या काळीं मावळात व कोकणात जोंधळा पाहावयासमुद्धा मिळत नसे. गहू तर सणावाराच्या पोळीसाठीच मिळावयाचा. याचीं कारणें अनेक आहेत. त्या वेळीं रस्ते नव्हते; मग देशातील जोंधळे मावळात व कोकणात आणि तिकडील भात देशावर जाणार कसें? रेल्वेबद्दल बोलावयाचें, तर मला वाटतें, त्या

वेळीं दक्षिणेंत फक्त पुणें बंगलोर रेल्वेच असावी. तीसुद्धा सन १८८५ पर्यंत झाली नसावी. मग मिरज पंढरपूर रेलरस्ता कोठून असणार? कोल्हापूर आंबा रस्त्याचें काम १८७७ मध्ये म्हणजे मी जन्मलों त्या सालीं चालले होत. वाहतुकीच्या असल्या अडचणीच्या परिस्थितींत भावास व जोंधळ्यास बाजारपेठाच नव्हत्या; त्यामुळे ज्या त्या भागात पिकत असलेले धान्य तेथेच उपयोगात येई. स्थानिक अन्नधान्या शिवाय, शेतकऱ्यास लागणारें मीठ, मिरची, तेल, मसाला, खोबरें, नारळ, लत्ताकपडा इत्यादि विकत घेण्यासाठी व जमिनीचा सारा भरण्यासाठी आपल्याजवळ असलेल्या भाताचे तांदूळ करून शेतकऱ्याच्या बायका जवळच्या आठवड्याच्या बाजारात विकीत. आमच्या भागात फक्त थोड्या अंमलदार शेतकऱ्याकडे भाताचा साठा पावसाळ्यापर्यंत शिल्लक राही.

सुमारें पाऊणशे वर्षांपूर्वी वारणा व कडवी नद्यांच्या काठी नाचण्याचं व मक्याचं जिराईत पीक घेत. गेल्या चाळीस पन्नास वर्षांत नद्या वाळूने व गाळाने भरल्यामुळे त्या उथळ झाल्या आणि जरा जास्त पाऊस पडताच नद्यास पूर येतात; त्यामुळे श्रावणात नाचणी पेरता येत नाही. पूर्वी उसाचे फड करण्यास नदीचे वाहतें पाणी पुरे पडे. आता दिवाळीच्या सुमारास नदीस खंड पडतो व फडकऱ्यास नदींत कच्चीं धरणें घालावीं लागतात. नद्यास पाण्याचा तोटा येण्याचं दुसरें कारण म्हणजे अलीकडे गावोगाव नद्यावर ऊसवाल्याचे पंप चालतात. धरणात पाणी असल्यावेळीं हे इंजिनावर चालणारे पंप सारखे पाणी उपशीत असतात; पण भर उन्हाळ्यात धरणातील पाणी संपतें व मग शेतकऱ्यास नदीच्या पात्रात विहिरीसारखे खोल खड्डे करावे लागतात

पूर्व भागात म्हणजे बाजार बडगाव, अष्ट, वाळवें, व पेठ नेरले भागात, भात होत नाही. पण जोंधळा पिकतो तेथील लोक बहुतेक जोंधळाच खात; त्याना भात क्वचितच मिळे. या भागात सर्वसाधारणपणें पाऊस कमी असतो; पण सुकाळाच्या सालीं मोठ्या शेतकऱ्याला इतकं धान्य पिके की, ते घरीं साठविण्यास जागा पुरत नसे. असले घरदाज शेतकरी आपले जोंधळे, निपळगाचे शेतात अगर गावाशेजारच्या उंचवट्याच्या जागी मोठाले खड्डे खणून त्यात साठवीत. असल्या साठ्यास पेव म्हणतात. पेवात जोंधळे वर्ष दोन वर्षे टिकतात; पुढे मात्र कुबटतात धान्य पेवात ठेवण्याचं कारण म्हणजे जवळपास जोंधळ्यास मागणी नसे व दूरच्या पेठेस नेण्यास रस्ते नव्हते. अलीकडे या भागात रस्ते झाल्यामुळे धान्याची वाहतूक वाढली. आता मावळात जोंधळा व गहू जातो आणि देशात तांदूळ मिळतो जोंधळ्याशिवाय या भागात भुईमूग, तंबाखू व थोडाफार कापूस होई. कापूस गावातच स्त्रिया रिकाम्या वेळात त्याचं सूत काढीत व त्याचीं चिवटें करून जवळपासच्या बाजारात साळ्याकोष्टयास खादी काढण्यासाठी विकीत. त्या बाजूचा कापूस व चिवटें आमच्या गावाकडेहि विकण्यास येत. माझ्या गावाजवळ खडड्यास साठ ऐशीं हातमाग असत त्या वेळीं काही लोक टोक्यावरून कापूस नेऊन सम्डच्या बाजारांत विकीत. मोकळ्या

वेळात वायामाणसें त्याचें सूत काढून आठवड्याच्या बाजारात विकीत. मला आठवते, मी लहान असताना सरहास आठवडयाच्या बाजारात चिवटें विकण्याचा स्वतंत्र भाग होता; त्याला चिवटाचा बाजार म्हणत. गिरण्यानी शेतकऱ्याचे हे जोडधदे नाहीसे केले.

आमच्या भागातील (कोल्हापूर व सातारा जिल्ह्यातील) सध्याच्या वाचकास जर मीं सांगितलें की, त्या काळीं कोल्हापूर, मलकापूर, सांगली व कऱ्हाड येथे गुळाच्या पेठा नव्हत्या, तर त्याचा माझ्या सांगण्यावर विश्वास बसणार नाही. पण हें अक्षरशः सत्य आहे. खुद्द कोल्हापूरच्या पचक्रोशींत होणारा गूळसुद्धा त्या काळीं चिपळूण, सगमेश्वर, रत्नागिरी अगर राजापूर बदरास विक्रीस जाई. माझा गाव कोल्हापूरच्या पश्चिमेस तेवीस मैलावर आहे. मला आठवतें, माझ्या लहानपणी *माझ्या वडिलानी आपल्या शेतातील दोन गाड्या गूळ चिपळूण बदरास विक्रीसाठी* नेला होता. चिपळूण आमच्या गावापासून वायव्येस शभरसव्वाशे मैल एका खाडी-काठीं आहे. गुळाच्या गाड्या ओबडधोबड कश्या रस्त्याने न्याव्या लागत. वडिलानी परत येताना एक उत्तम बनात (सकलात) आणली होती, असें मला आठवतें. ज्या बदरास जाण्यास कच्चीसुद्धा सडक नसे, तिकडे मुठाच्या बैलावरून गुळाच्या मेल्या नेत, हें मी सन १८९५ पर्यंत पाहत होतों.

पुढील आठवणी देण्यापूर्वी मला असे सांगावेंसे वाटत की, इग्रज या देशात स्थिरस्थावर झाल्यावर त्यानी शेती, शेतीशिक्षण, पाटबधारे, देशातील दळणवळणाचे रस्ते याच्या विकासाचें काम हातीं घ्यावयास पाहिजे होतें. पण त्याच्याकडून तसें झालें नाही. काही काळ लोटल्यावर त्यानी काही आतरप्रातीय रस्ते व लोहमार्ग बाधले खरे, पण फारच थोडे. मुलकी, जगल, न्याय, पोलिस व लष्करी खातीं मात्र व्यवस्थित केलीं; मोजणी खातें, सर्व्हे सेटलमेंट, लँड रेकॉर्ड्स—म्हणजे ज्या खात्यावाचून रोजचा राज्यकारभार चालविण्यास अडचण येते अशीं खातीं त्यानी प्रथम स्थापून व्यवस्थित केलीं. पण लोकाच्या पोटास लागणारें अन्नधान्य वाढविणे व देशात उद्योगधदे वाढवून लोकाची आर्थिक स्थिति सुधारणें हे प्रश्न मागे पडले.

१९०२ सालीं मी शेतकी शिक्षण घेण्यासाठी पुण्यातील सायन्स कॉलेजात म्हणजे हल्लीच्या एजिनियरिंग कॉलेजात प्रवेश केला. या वेळीं पुण्यासच काय पण हिंदुस्थानातहि दुसरीकडे शेतीचें स्वतत्र कॉलेज नव्हतें. पुणें येथील सायन्स कॉलेजात शेतकीशिक्षणाची शाखा असे. याच शाखेंत माझे पहिल्या व दुसऱ्या वर्षाचें शिक्षण झालें. तिसऱ्या (एल्० एजी०) सालीं सध्याचें स्वतत्र कॉलेज ऑफ ॲग्रिकल्चर अर्धेमुर्धे बाधलें गेलें होतें. तेथूनच मी शेवटची परीक्षा पास झालों. पुढे सुमारें दहा वर्षेपर्यंत बगाल, मध्यप्रात, आध्र, मद्रास व सिलोन येथील सरकार *आपले विद्यार्थी पुण्याच्या शेतकी कॉलेजात पाठवीत. आमचें कॉलेज फार प्रसिद्ध* झालें होतें.

नवें शेतकी कॉलेज व त्यातील अध्यापकांची भरती म्हणजेच मुंबईच्या शेतकी खात्याच्या वाढीचें पहिलें पाऊल होय. सन १९०५ सालीं शेतकी खातें होतें; नाही असें नाही. त्या वेळीं सध्याचें सेंट्रल ऑफिस नव्हतें. शेतकी खात्याच ऑफिस पुणें लष्कराच्या बाजूस तानाजीच्या देवळापुढें भाड्याच्या जुन्या वाड्यात असे. त्या वेळीं शेतकी खात्यावर एक जूनिअर(नवीन भरती झालेला) आय्० सी० एस्० असे. खरें शेतकी खात्याचें काम ऑफिसात किंवा प्रांतातहि थोडेंच असे. डायरेक्टर ऑफ ॲग्रिकल्चरच्या हाताखालीं, सिंध धरून सर्व मुंबई प्रांतासाठी एक डेप्युटी डायरेक्टर असे. सिंधमध्ये एक (मिरपूरखास), गुजराथेंत चार (नडियाद, सुरत, दोहद व छारोडी), डेक्कनमध्ये दोन (पुणें व माजरी) आणि कर्नाटकांत एक (धारवाड) अशीं प्रयोगक्षेत्रें (फार्म) होतीं. त्यांच्यावर देखरेख डेप्युटी डायरेक्टरची असे. प्रत्येक फार्मवर स्थानिक शेतीचा अनुभव असलेला एक सुपरिंटेंडेंट असे. फार्मावरचीं कामें पाहणें, प्रयोग करणें, व कोणी जिज्ञासू फार्म पाहण्यासाठी आला तर त्यास माहिती पुरविणें हीं त्यांचीं कामें असत. प्रचारकार्यासाठी स्वतंत्र असा लहानमोठा अधिकारी सन १९०८ पर्यंत नव्हता.

मुंबई प्रांतासाठी पुण्यास डायरेक्टर ऑफ ॲग्रिकल्चर याचे ऑफिसांत डेप्युटी कलेक्टरच्या दर्जाचा एक मुलकी अधिकारी असे. तो बहुतेक दप्तरी काम पाही. या खात्यात शेतकीशिवाय वरींच खातीं होतीं, त्यांत मुख्य खातें अगर शाखा लँड रेकॉर्ड; शिवाय व्हेटर्नरी (पशुवैद्यक), प्रांतांतील प्रत्येक तालुक्यातील शेतमालाच्या किंमती व पावसाची नोंदणी, माणसाच्या व जनावराच्या साथीची नोंदणी, टोळधाडी सारख्या पिकावरच्या आपत्ति, अशीं नानाविध कामें असत. हळूहळू या विषयांचीं निरनिराळीं स्वतंत्र खातीं झालीं. त्या जुन्या काळीं मुंबई प्रांतासाठी—म्हणजे सिंध, गुजराथ, खानदेश, पश्चिम महाराष्ट्र व कर्नाटक यासाठी—एकच डायरेक्टर ऑफ ॲग्रिकल्चर असे. त्याचें नांव जे० डब्ल्यू० मॉलिसन. त्याच्या हाताखालीं पी० आर० मेथा नावाचे एक पारशी असत ते सुपरिंटेंडेंट ऑफ लँड रेकॉर्ड्स व सबंध प्रांतासाठी म्हणून डेप्युटी डायरेक्टरहि असत. इतकेंच नव्हे तर सायन्स कॉलेजांतील शेतकी क्लास मधूनमधून येऊन, आठपंधरा दिवस शेतकी विषय शिकवीत. मी त्या वेळीं दुसऱ्या वर्षात (एस्० एजी०त) होतों. मुंबई प्रांताच्या बागांचे सुपरिंटेंडेंट मिस्टर गॅमी हे आम्हांस वनस्पतिशास्त्र शिकवीत. बाकीचे विषय आम्हांस एनिनिअरिंग कॉलेजवरोबर शिकावे लागत. सन १९०१ सालीं मुंबई युनिव्हर्सिटीने शेतकी शास्त्राचा अभ्यासक्रम सुधारून डी० एजी० चे ऐवजी एल्० एजी० (लायसेन्शिएट ऑफ ॲग्रिकल्चर) ही डिग्री सुरू केली.

उपरिनिर्दिष्ट मॉलिसन हे चांगले शेतकीतज्ज्ञ होते. त्यांनी स्थानिक, विशेषकरून गुजराथ व महाराष्ट्रांतील, शेतीचें निरीक्षण करून चांगला अनुभव मिळविला. आणि हिंदुस्थानच्या शेतीवर तीन भागांत एक उत्तम ग्रंथ लिहून ठेविला. त्यांनी गुजराथेंत

विशेषकरून तंबाखू व कपाशी, डेक्कनमध्ये ऊस, भुईमूग व कपाशी आणि कर्नाटकात ज्वारी व कपाशीवर सरकारी फार्ममध्ये प्रयोग सुरू केले. प्रयोगात पिकाच्या जाती, त्यास लागणारीं खतें व पाणी याचें संशोधन करीत. मॉलिसनने सुरू केलेलीं कामें हींच हिंदुस्थानातील शेतकीसंशोधनाचा पाया होत.

पुढे सुमारें १९०२ सालीं मॉलिसनला अखिल हिंदुस्थानचे इन्स्पेक्टर जनरल ऑफ ॲग्रिकल्चर म्हणून नेमल्यावर मुंबई प्रांताच्या डायरेक्टरच्या जागीं नवीन भरती झालेले आय्‌० सी० एस्‌० येऊं लागले. मॉलिसन हिंदुस्थान सरकारकडे गल्यावर बिहार प्रांतात पुसा येथे शेतीच्या संशोधनासाठी एक भव्य संस्था उभारली गेली. (पुढे काही वर्षांनी ही संस्था दिल्लीस नेली. तेथेहि तिला पुसा इन्स्टिट्यूटच म्हणतात.) शेतीच्या निरनिराळ्या शास्त्राचे—वनस्पतिशास्त्र, रसायनशास्त्र, पशुवैद्यक, एंजिनिअरिंग, कीटकशास्त्र वगैरे—शेतीस उपयोगी पडणाऱ्या शास्त्राचे तज्ज्ञ विलायतेहून आणून संशोधन सुरू केलें. येथूनच सन १९०४ पर्यंत डॉक्टर लेंदर व डॉक्टर लीफ्रॉय पुण्यास ऑरगॅनिक केमिस्ट्री व कीटकशास्त्र शिकविण्यास येत असत. हळूहळू नागपूर, कानपूर, कोइमतूर, लायलपूर, वगैरे ठिकाणीं शेतकी कॉलेजें सुरू झालीं. शेतकीविषयक अर्थशास्त्र हा विषय सन १९२५ पर्यंत देशातील कोणत्याहि विश्वविद्यालयातील शेतकीपरीक्षेंत नव्हता. मी हा विषय अमेरिकेत शिकून आलों असल्यामुळे मला या विषयाचा प्रोफेसर नेमलें गेलें. देशात प्रथमच मुंबई विश्वविद्यालयाने तो विषय बी० एजी० च्या परीक्षेस ठेविला. हा विषय मीं सन १९३२ सालीं पेन्शन घेईपर्यंत शिकविला. लक्षात ठेवण्यासारखी गोष्ट म्हणजे सन १९२० च्या सुमारास मुंबई प्रांताच्या शेतकी खात्यातीलच नव्हे, तर हिंदुस्थानातील दुसऱ्या प्रांतातील शेतकी खात्यातील बहुतेक अधिकारी पुणे शेतकी कॉलेजात शिकलेले असत.

मुंबई प्रांताचे शेतकी खातें सुधारून वाढविण्याचें श्रेय मॉलिसनबरोबर किंटिंग व डॉक्टर मॅन यांच्याहि वाट्यास येत. पुण्याचे शेतकी कॉलेज प्रसिद्धीस आणण्यास व त्याला शास्त्रीय संशोधनसंस्थेचें स्वरूप देण्यास डॉक्टर मॅन ह्याची बुद्धिमत्ता व दुर्दम्य मेहनत कारणीभूत झाली म्हटल्यास चुकीचें होणार नाही. डॉक्टर मॅन याचें हिंदुस्थानावर मनापासून प्रेम होतें. त्या जुन्या काळीं हा इंग्रज गृहस्थ हिंदी समाजात मिळून-मिसळून वागत असे. इतकेंच काय पण ज्या वेळीं लोकमान्य टिळकांनी दारूबंदीच्या चळवळींत दारुगुत्यावर पिकेटिंग चालविलें तेव्हा डॉक्टर मॅन त्यांच्या खांद्यास खांदा लावून पुणें शहरात फिरत आणि लोकांस दारूपासून परावृत्त करण्याचा प्रयत्न करीत. हे विद्वान् वृद्ध गृहस्थ गेल्याच वर्षी (सन १९६३ सालीं) निवतले.

शेतकी खात्याची व शेतकीशिक्षणाची एवढी त्रोटक माहिती दिल्यानंतर सन १९०५ पूर्वी पश्चिम हिंदुस्थानात शेतीच्या धंद्यास लागणाऱ्या औतापाण्याची व

मशागतीची स्थिति कशी होती व त्यात शेतकी खात्याच्या प्रयत्नाने कोणते बदल झाले याच्याकडे आपण वळू. कोंकण, मावळ व मल्हाड भागात जमीन उथळ मुरमाड व पाऊस जास्त असल्याने तिकडची पिके व आउत देशभागातील पिकाआउतापेक्षा बरींच निराळीं असतात. कोल्हापूर, सातारा, अहमदनगर जिल्ह्याच्या पूर्वभागात पाऊस कमी, पण या जिल्ह्याच्या पश्चिम भागात पुरेसा पाऊस असतो आणि तेथील जमिनीहि खोल व सपाट आहेत. त्यात जोंधळा, कापूस, भुईमूग व ऊस पिकत असल्याने शेतीसुधारणेस या भागात चांगला अवसर होता. सुदैवाने हाच भाग माझ्या वाट्यास आला होता

सन १९०६पर्यंत देशभागात व त्याचप्रमाणे वर वर्णिलेल्या भागात जमिनीच्या मशागतीस लागणारे नागर लाकडी होते. जमिनी खोल असल्याने सहा ते आठ बैली मोठे लाकडी नागर वापरावे लागत. या भागात नदीच्या व विहिरीच्या पाण्यावर आणि नवीनच बांधलेल्या कॅनालच्या पाण्यावर बराच ऊस होत असे. त्या काळीं मुंबई इलाख्यातील उसाच्या क्षेत्राच्या जवळजवळ निम्मे क्षेत्र या माझ्या भागात असे.

सन १८९० च्या सुमारास मुंबई प्रांतात पुण्यास रामजी रघुनाथ बारी व १८९५ सालच्या सुमारास कोल्हापुरास दडवते हे तीन लाटाचे लोखंडी चरक तयार करू लागले. पण त्यांच्या चरकाचा खप फारसा वाढला नाही व त्यांना आपले कारखाने बंद करावे लागले. सुमारे १९०१ सालीं मुंबई शेतकी खात्याने विलायतेहून रॅन्सम सिम्सचे थोडे लोखंडी नागर आणविले होते. मॉलिसनच्या मते लोखंडी (टर्न रेस्ट) नागर खोल काळ्या जमिनींत लाकडी नागरापेक्षा जास्त उपयुक्त असे होते, व सरकारी फार्मवर ते वापरले जात. बारीच्या लोखंडी चरकानंतर सन १९०८ सालीं किर्लोस्कर कंपनीने सदर्न मराठा रेल्वेच्या कुडल स्टेशनाजवळ लोखंडी नागर व लोखंडी चरक करण्याचा कारखाना काढला आणि तो यशस्वी रीतीने चालविला. यानंतर १९११ सालच्या सुमारास सातारा रोड स्टेशनाजवळ धनजीशहा कूपर या पार्शी गृहस्थानें लोखंडी नागर व चरक ओतण्याचा कारखाना उभारला. तो कारखानाहि चांगला चालू लागला. आज हे दोन्ही कारखाने यशस्वी रीतीने चालले आहेत.

वास्तविक लोखंडी नागर व लोखंडी चरक यांचा या वेळपर्यंत महाराष्ट्रात प्रसार न होण्याचें कारण त्यांचा प्रचारच झाला नव्हता. त्याचप्रमाणे पुणें, मांजरी, सुरत, नडियाद आणि धारवाड येथ ज प्रयोग झाले त्यावरूनहि बराच उपयुक्त माहिती मिळाली होती, अ हे दसरींच पडून हाती. नडियाद फार्मवर तंबाखू व कापूस, सुरत फार्मवर कापूस, ज्वारी आणि मांजरा फार्मवर उसाच्या जाती, उसास लागणारें खत व पाणी, पुणें फार्मवर कापूस, ल्युसन, भाजी व मुरघासाच्या जाती यांवर प्रयोगांती ठरलेली उपयुक्त माहिती साठली होती; पण प्रचाराच्या अभावीं ही माहिती दसरीं पडूनच होती.

इतर राज्यकर्त्यांप्रमाणे व्यापारी धोरण हिंदुस्थान ही कच्च्या मालाची बखार व पक्क्या मालाची बाजारपेठ करण्यार्थ होत. रि येक वर्षे देशीच्या व धान्याच्या उत्पन्नाकडे त्यांनी दुर्लक्ष केले होते. पण येळोवेळीं येणार भागात नवराण पडत.

त्यामुळे शेतकरी कर्जबाजारी झाले. अवर्षणात सावकार जास्त कर्ज देईनात. मराठशाहींत सावकार लोकांना कुळाच्या जमिनी ताब्यात घेता येत नसत. इंग्रजी अमलात शेतकऱ्यांनी गहाण दिलेल्या जमिनी सावकाराना सहज ताब्यात घेता येऊ लागल्या. त्यामुळे जमिनी हातच्या जाऊ लागल्या व पुष्कळ शेतकरी उघडे पडू लागले. मग मात्र असल्या शेतकऱ्यांच्या मनावरचा ताग सुटला व ते निःसग झाले. मारवाडी दिसला की त्यास ते म्हणत, " पिंपळाच पान " म्हण. मारवाड्याना तसें म्हणता येत नसे. ते " पिंपळनो पान " म्हणत. ही भाषा ऐकताच त्यिकाचे नाक वा मान छाटले जात. असल्या अत्याचारामुळे इंग्रज सरकारचें लक्ष गरीब शेतकऱ्यांच्या लाचारीकडे वळणें भाग होतें.

महाराष्ट्रांतील पहिला कालवा (पुणे जिल्ह्याच्या दक्षिण भागातील नीरा लेफ्ट बँक कॅनाल) सन १९०६ सालीं पुरा झाला व त्यावर नरीच जमीन भिजण्याची सोय झाली. पण त्याच्या फार पूर्वी बिहारमधील शोणवर आठ लक्ष एकर, पंजाबात तेहतीस लक्ष एकर, व उत्तर प्रदेशात गगा कॅनालवर एकतीस लक्ष एकर जमिनीस पाणी मिळत होत. हं पाहिलें म्हणजे महाराष्ट्राची कशी आबाळ झाली होती ह्याची चांगली कल्पना येईल. आजसुद्धा प्रातवार कालव्याखालील क्षेत्र पाहिलें तर महाराष्ट्राचा नबर फार खाली म्हणजे सातवा दिसतो, तर आंध्राचा तिसरा दिसतो. महाराष्ट्रात फक्त दोन लक्ष ब्याण्णव हजार एकरास पाणी मिळतें, तर आंध्रात त्याचे दसपट क्षेत्रास कालव्याचें पाणी मिळत.

महाराष्ट्र सकटातून बाहेर पडत होता, तथापि धान्याचे, गुळाचे व कपाशीचे भाव कमीच होते. अशा काळीं (सन १९०६ ७ सालीं) मिस्टर जे० एफ्० किटिंग, आय्० सी० एस्०, याची मुंबई इलाख्याचे डायरेक्टर ऑफ ॲग्रिकल्चर म्हणून नेमणूक झाली. जात्या जमीनदार असल्याने सरकारची कर्तव्यच्युति त्यांच्या मनास बोचली असावी; आणि म्हणूनच त्यांनी शेतकीची सुधारणा करण्याचें व शेतकऱ्यांची सापत्तिक स्थिति सुधारण्याचें काम हातीं घेतलें असावें. नवीन होऊ घातलेल्या शेतकी कॉलेजसाठी मिस्टर नाइट नांवाच्या एका अमेरिकन शेतकीपदवीधरास शेती विषयाचे प्रोफेसर म्हणून नेमून घेतलें. या वेळीं ज्याचा भाग उल्लेख येऊन गेला आहे असे डॉक्टर हेरॉल्ड एच्० मॅन हे विद्वान् शास्त्रज्ञ बिहारमधील इंग्रज चहाच्या मळेवाल्यासाठी चहावरच्या रोगाचें सशोधन करीत होते. त्या वेळीं डॉक्टराची प्रसिद्धि झाली होती. मुंबई सरकारने डॉ० मॅन या विद्वान् शास्त्रज्ञाला या नव्या कॉलेजात रसायनशास्त्राचे प्रोफेसर व प्रिन्सिपॉल म्हणून नेमिलें आणि शेतकी खात वाढविण्याचें व *शेतकीशिक्षण सुधारण्याचें काम सुरू झालें. जिल्हाधिकाऱ्याचे शेतकीकडे लक्ष* वेधण्यासाठी शेतकी कॉलेजवर थोड्या मुदतीचे क्लास दरसाल काढून त्यात नवीन येणाऱ्या आय्० सी० एस्० अधिकाऱ्याना थोडेफार शेतकीशिक्षण देण्याची सोय केली.

नव्या कॉलेजसाठी निरनिराळ्या विषयाचे प्रोफेसर नेमिले, याच वेळीं माझ्याबरोबर सन १९०५ सालीं एल्० एजी० परीक्षा पास झालेल्या बहुतेक सहाध्यायास शेतकी कॉलेजात निरनिराळ्या विषयाचे असिस्टंट म्हणून घेतले. दोन वर्षे

कॉलेज फार्मचे सुपरिंटेंडट म्हणून काम करताना माझे काम किटिंगसाहेबांच्या नजरेंत भरलें व त्यानी माझी नेमणूक प्रयोगादाखल डेक्कन भागाचा शेतकी इन्स्पेक्टर म्हणून केली. शेतकी खात्यात प्रचारकार्यासाठी झालेली हीच पहिली नेमणूक. माझे डेक्कनमधील प्रचारकार्य उपयुक्त ठरल्यावर सन १९१० सालीं सिंध, गुजराथ आणि कर्नाटक या भागातहि शेतकी इन्स्पेक्टर नेमिले गेले.

मीं प्रचारकार्यास सुरवात केली, त्या वेळीं फक्त ज्या गोष्टी सरकारी फार्मावर निर्विवाद सिद्ध झाल्या होत्या व ज्याच्याबद्दल माझी खात्री झाली होती अशाच बाबी हातात घेतल्या, आणि सातारा जिल्ह्याच्या दक्षिण भागात कामास सुरवात केली. या भागात कोठे कोठे माझे सगेसोयरे होते. मी त्याच्याचपैकी एक असल्याचे त्याना कळल्यावर त्याचा माझ्या प्रचारकार्यावर विश्वास बसू लागला. एवढ्या मोठया जिल्ह्यात एकट्यादुकट्याने लोखंडी नागर व चरक घेऊन फिरून प्रचार करणें शक्य नव्हतें; म्हणून मीं आमच्या डायरेक्टरकडे सूचना केली कीं, सातारा जिल्ह्यातील ठळक ठळक जत्रातून शेतकी खात्याने लहान लहान शेतकी प्रदर्शनें भरवावीं; त्यात सुधारलेलीं आउतें, कृत्रिम खतें, चागल्या बियाचे नमुने, चागल्या जातीचे ऊस व इतर पिकाचे नमुने माडावेत. याच वेळीं जिल्हाकलेक्टरच्या मदतीने जिल्ह्यातील ठळक ठळक शेतकऱ्यास आपल्या शेतावरील पिकाचे नमुने माडण्यास व जातिवत बैल प्रदर्शनात आणण्यास सागावें. शेतकी खात्याने असल्या प्रदर्शनात लोखंडी नागर, चरक व सुधारलेल्या चुलाणाचीं प्रात्यक्षिकें दाखवावींत व ज्या शेतकऱ्यानी चागलें धान्य, गूळ, ऊस वा बैल आणले असतील त्यास कलेक्टरच्या हस्तें बक्षिसें द्यावींत. माझी सूचना मान्य झाली. आमच्या खात्यातील निरनिराळ्या शाखातील अधिकाऱ्याच्या मदतीची व प्रदर्शनासाठी लागणाऱ्या खर्चाची तजवीज झाली. त्याप्रमाणे दक्षिण सातारापैकी बत्तीसशिराळ्यातील गोरखनाथाच्या यात्रेच्या वेळीं व पेठेस माणकोबाच्या यात्रेच्या दिवशी प्रदर्शन भरविलें. प्रदर्शनात लोखंडी नागराचीं, चरकाचीं व सुधारलेल्या चुलाणाचीं काम दाखविलें. मला प्रत्येक प्रदर्शनापूर्वी त्या गावीं आठपधरा दिवस जाऊन राहावें लाग. स्थानिक मामलेदार व दुसरे अधिकारीहि त्या वेळीं माझ्या मदतीस असत. दोनहि प्रदर्शनें फार यशस्वी ठरलीं.

असल्या शेतकीप्रदर्शनामुळे माझे काम सोपें झालें. कारण मुलकी अधिकाऱ्याच्या सागण्यावरून लोक पिकाचे नमुने पाठवीत. आमच्या व्याख्यानास व प्रात्यक्षिकास अधिकारी व शेतकरी हजर राहत. प्रदर्शन भरलेल्या भागातील शेतकरी स्वत. लोखंडी नागर व चरक चालवून पाहत. सोन्याच्या चुलाणावर रस शिजविण्याने सर्पणाची बचत होते हृ ते स्वत· पाहत. प्रदर्शनात शेतकऱ्याना खर्च न पडेल याकडे आम्ही लक्ष देत असू; शिवाय उत्तेजनार्थ बक्षिसेंहि देत असू.

सन १९१० पर्यंत सातारा कोल्हापूर भागात ऊस गाळण्याचे घाणे (चरक) लाकडी असून त्यास मोठाल्या दोन लाटा असत. घाणा ओढण्यास चार बैल लागत.

पुणे-बारामतीकडे तीन लाटांचे लोखंडी चरक असत. त्यासहि चारच बैल जुपावे लागत. प्रथम प्रथम शेतकऱ्यांची तक्रार असे की, लोखंडी घाण्याचा रस रुचीला चांगला लागत नाही. दुसरें असें की, लाकडी घाणा चालू असताना त्याचा सुरेल आवाज दर फेरीस लहानमोठा होत जाऊन दूर ऐकू जातो व कानास गोड लागतो. लोखंडी घाण्यास तीन लाटा असल्याने एकाच वेळीं ऊस (कांडी) व चिपाड पिळलें जाई. त्याऐवजी दोन लाटेच्या लाकडी घाण्यात तेंच काम तीन वेळा करावें लागे —ऊस, घडी, व पिळा. याशिवाय लोखंडी घाण्याने रस जास्त निघे. ह प्रत्यक्ष दाखविण्यासाठी शेतकऱ्याच्या लाकडी घाण्याशेजारा आम्ही बरोबर नेलेला लोखंडी चरक उभा करीत असू व दोन्ही घाण्यावर तितकाच ऊस वजन करून देऊन व रसाचे वजन करून शेतकऱ्याची खात्री करून देत असू. या विषयावर पुढे सन १९२७ साली मीं एक पुस्तिका प्रसिद्ध केली.

तसाच फरक सातारा भागातील चुलाणे व पुणें भागातील चुलाणें यात होता. पुणे बारामतीकडे सोन्याचीं चुलाणें असत. म्हणजे चुलाणाचे खालून हवा आत येण्याची सोय असे. तसें सातारा भागातील चुलाणास सोरे नसे. त्या तोंडातून सरपण टाकावयाचें त्यातूनच हवा जावयाची व धूर बाहेर यावयाचा असल्याने चुलाण कोंदाटत असे. यामुळे सातारा भागात पालाचिपाडाशिवाय अवांतर सरपण लागे व त्यास खर्च फार येई. पण पुणें-बारामती भागात फक्त पालाचिपाडावर भाग. पुणे धर्तीचीं चुलाणे आम्ही सातारा भागात बाधून त्यावर सरपण जोखून देऊन शेतकऱ्याची खात्री करून दिली. ह्या विषयावरहि मीं एक स्वतत्र पुस्तिका प्रसिद्ध केलेली आहे.

सातारा जिल्ह्यातील प्रदर्शनाची व प्रात्यक्षिकाची माहिती सगळ्या डेक्कनभर पसरली. नतर आम्ही अहमदनगर, सगमनेर, जळगाव, नाशिक, वगैरे ठिकाणीं यशस्वी प्रदर्शनें भरविलीं. असलीं प्रदर्शनें व माझ्या दौऱ्यावरील प्रात्यक्षिकें फार उपयुक्त ठरली व आमच्याकडे लोखडी नागराच्या मागण्या येऊ लागल्या. त्याच वेळीं सोन्याचीं चुलाणें बाधून देण्यासाठी शेतकऱ्याचे अर्ज येऊ लागले.

दुसरी पायरी म्हणजे प्रत्येक जिल्ह्यात ठिकठिकाणीं सुधारलेल्या औताचे, खताचे व बियाचे डेपो (साठे) काढणें ही होय. हीं औतें विक्रीसाठी असली, तरी त्यातून काही नागर व जमीन सारखे करण्याच्या पेटाऱ्या नाममात्र भाडें घेऊन शेतकऱ्यास देण्याची व्यवस्था जागोजाग झाली. प्रचारकार्यामुळे उसासाठी अमोनियम सल्फेटची मागणी वाढली. तेव्हा डेपोंत आम्ही सल्फेटहि ठेवू लागलों. हीं कामें करीत असताना पिकाच्या रोगाच्या तक्रारी ऐकू येऊ लागल्या. असल्या तक्रारी आम्ही पुण्याच्या शेतकी कॉलेजमधील पिकाच्या रोगावरील अधिकाऱ्याकडे पाठवीत असू. थोडक्यात म्हणजे आम्हीं लोकाचा विश्वास सपादन केला व शेतकी खातें लोकप्रिय झालें.

पुढे लोखंडी नागर, चरक व सल्फेटची मागणी फार वाढल्यावर हे काम हळूहळू व्यापारी लोकांनी हातीं घेतलें, व आमच्यावरचा भार थोडा कमी झाला. जसे आमचे लोक उपेोच्या कामातून मोकळे झाले, तशीं आम्हीं मुंईमुगाच्या सुधारलेल्या जातीचा फैलाव, उसाची लागवड व पिकें सुधारण्याचीं कामें हातीं घेतलीं.

शेतकी खात्याने शेतीसुधारणेचें काम हाता घेण्यापूर्वी कोल्हापूर-सातारा भागात उसाच्या सऱ्या जवळ जवळ असून बी (कांडी) जास्त लाग; हीच स्थिति पुणें-बारामती भागात होती. पण दोन्ही भागातील लागणींत फरक असे. कोल्हापूर-सातारा भागात लागण झाल्यावर थाकुरा तोडीत व ऊस थोडा मोठा झाल्यावर उच जानवळ्याच्या पण आखूड फासेच्या बैलाने ओढल्या जाणाऱ्या उसाच्या कुळवाने ऊस भरीत. (ऊस भरणें म्हणजे उभ्या उसास दोहों बाजूनी खतमातीची भर देणें.) पुणें बारामतीकडे शेतकरी कुदळीच्या साहाय्याने हाताने ऊस भरीत ही पुणें-बारामतीकडची पद्धत जास्त मेहनतीची व खर्चाची असे. ह्या गोष्टी मीं त्या वेळचे माझे वरिष्ठ प्रोफेसर नाइट याच्या नजरेस आणल्या आणि त्याना प्रत्यक्ष दाखविल्यानतर आम्हीं दोघानी बसून दूर दूर सऱ्या असाव्या, त्यात बी कमी असावें, कांडी बाजूस डोळे करून लावावींत, मशागतींत सरी सोडण्याचा लोखंडी नागर असावा, त्याचप्रमाणे ऊसभरणीस तसलाच पण लहान नागर असावा असें ठरवून, तसलीं लोखंडी औत अमेरिकेहून मागवून घेतलीं आणि त्याचे नमुने किर्लोस्कर कपनीकडे पाठवून तसला औतें शेतकऱ्यास उपलब्ध करून दिलीं. माजरी फार्मवर उपयुक्त ठरलेला उसाचीं खतें (पेंड व सल्फेट ऑफ अमोनिया) कशीं, केव्हा व किती द्यावींत हें निश्चित करून 'रुद सरीची माजरी पद्धत' म्हणून अमलात आणली. आज जवळजवळ सर्व महाराष्ट्रात हीच पद्धत चालू आहे.

सातारा-कोल्हापूर भागात लोखंडी चरक व सुधारलेला चुलाणे सुरू केल्यावर तेथे फील्डमेन ठेवून मी नाशिक जिल्ह्यातील उसाकडे वळलों. नाशिक जिल्ह्यात ल्हानल्हान पाटबधारे पुष्कळ होते व आजहि आहेत. या पाटाखालील शेतींत एका मागून एक अशीं फेरपाल्याचीं पिकें घेत, त्यात उसाला वरचें स्थान असे. जमीन चागली, पाणी मुबलक, पण उसाची जात बारीक व कठीण असे. विशेषकरून जमिनीची मशागत, खत, गाळणी व गूळ करणे हीं काम पद्धतशीर होत नसत. उसास पड व सल्फेट देणं त्याना माहित नव्हतें. चरक ठेंगणे, दोन किंवा तीन लाटाचे लाकडी असत. ते साताऱ्याच्या लाकडी चरकापेक्षाहि कनिष्ठ दर्जाचे होते. चुलाणे फार खोल, विनचोऱ्याचीं असल्याने गूळ करण्यास सर्पण फार लाग. त्या सर्पणापायी दरसाल शेतातील आंब्याच्या काही झाडाची तोड होई. या भागातील शेतकरी मात्र सुस्वभावी व सांगितलेल्या सुधारणा मनापासून स्वीकारणारे असत. इकडील काही लोकाना आम्हीं पुण्यास नेऊन तिकडची उसाची लागण, मळणी व गूळ करण्याची पद्धत सरकारी खर्चाने दाखविली होती. नाशिकजवळच्या खेरवाडी ओझर

स्टेशनजवळच्या दोन शेतकऱ्यांनी इच्छा प्रदर्शित केली की, आपण शेतरी खातें सांगेल त्याप्रमाणे उसाची सर्व निगा करू, लोखंडी चरक विकत घेऊ, पुणे धर्तीची चुलाणे स्वखर्चाने बांधू, मात्र सरकारने आम्हास वर्ष-दोन वर्षे एक हुशार अनुभवी फील्डमन द्यावा. आम्ही त्याच्या राहण्याची व जेवणाखाण्याचीसुद्धा सोय करू. इतका त्यांचा उत्साह दिसल्यावर मीं माझ्या हाताखाली असलेले हुशार व विश्वासू ओव्हरसियर आबाजी रावजी निकम यास खेरवाडीस वर्षभर ठेविलें. शेतकऱ्याकडून आम्ही त्यांचा पगार घेतला नाही. श्रीयुत निकम हे जातिवंत शेतकरी आहत. त्यांनी त्या भागातील लोकांचा विश्वास संपादन केला. आजची नाशिक जिल्ह्यातील उसाची जात, शेताची मशागत, खतमूत, सुधारलेले चरक व चुलाण अमलात आणण्यात मला आबासाहेब निकम यांचा फार उपयोग झाला.

खेरवाडी दिंडोरी भागातील आमच उसाच्या पिकातील यश नाशिक जिल्ह्यात चोहोकडे पसरलें. वेज-पळवणकडे काही शेतकऱ्यांचे मोठाले उसाचे फड होते. वेज येथील एक शेतकरी मजकडे आला (मला त्याचे नाव आठवत नाही) आणि म्हणाला, "आमच्याकडे मोठाले पाट असल्याने ऊस फार आहे. आपण जसा एक माणूस खेरवाडीस ठेविला, तसा आमच्याकडे एक द्या. दुसऱ्याचें ऐकून मीं एक मोठा चरक (पॉवर क्रशर) आणिला आहे. पण आम्हास तो जोडता व उभा करता येत नाही. आपण एक जाणता माणूस आम्हास या हंगामात सहा महिने तरी द्या. आम्ही त्याचा पगार देतों. वेळेवर ऊस गाळला गेला नाही तर तो पोकळ पडून आमचें फार नुकसान होणार आहे." वगैरे वगैरे. त्या वेळीं शेतकी खात्यात पॉवर क्रशर जोडणारे व त्यास लागणारीं चुलाणें बांधणारे तज्ञ नव्हते. आपणास मदत करता येत नाही, हें सांगण्यास माझ्या जिवावर आलें. इतक्यात मला जी० एन्० सहस्रबुद्धे (एल्० एजी०) यांची आठवण झाली.

जी० एन्० सहस्रबुद्धे हे सन १९०८-१० च्या सुमारास प्रोफेसर नाइट यांच्या हाताखाली मांजरी शुगरकेन फार्मवर असिस्टंट होते. त्यांना आपल्या देशात साखर झाली पाहिजे अशी तळमळ असे. विद्यार्थीदशेत व नंतर मांजरी फार्मवर असताना सुद्धा ते परदेशी साखरेचा चहा घेत नसत. येळगुडी अगर खांडसरी (देशी) साखरेची पूड ते आपल्या खिशात ठेवीत. आम्ही त्यांना गन्ना(ऊस)शास्त्री म्हणत असू. मी नाइटसाहेबांच्या हाताखाली इन्स्पेक्टर असल्याने हे गन्नाशास्त्री पर्यायाने माझ्या हाताखाली होते. पुढे सन १९११ सालीं त्यांना मुंबई सरकारने वेस्ट इंडीज येथील साखरकारखान्यांचा अभ्यास करून येण्यासाठी टेक्निकल स्कॉलरशिप दिली होती. वेस्ट इंडीजहून शिकून आल्यावर ते रिकामेच होते. त्या काळीं महाराष्ट्रात एकहि साखर कारखाना नव्हता. कोणी तरी उद्योगपति पाहून त्याच्याकडून बारामती भागात साखर कारखाना काढावा, अशी सहस्रबुद्धयांची महत्त्वाकांक्षा होती. तोंपर्यंत त्यांना कोठें तरी हंगामी काम हवें, असें त्यांनी मला सांगितलें होतें. सहस्रबुद्धयास मीं लागलेच बोलावून

करणा तरी धनिक उद्योगपतीमार्फत कारखाने काढण्याची होती. वगैरे उद्योगपतींच्या शोधात ते होते. तरी पण असा धनिक मिळेपर्यंत काही दिवस त्याना शेतकी खात्यात नोकरी हवी होती, कारण मी त्याना देऊ केलेले काम सफल होते. मलाहि त्यांची गरज होती; म्हणून मी त्याना कॅनालवरील टेन्सर गुरंटिडर म्हणून नेमून घेतले. शिवाय माझ्या हाताखाली नेहमी अॅग्रिकल्चर इंजिनिअरचे दोन मेकॅनिक (मेस्त्री) असत. मी त्यांच्याकडून शेतकऱ्यांच्या कमी पाण्याच्या विहिरींत पहार (बोअरिंग) मारवीत असे. त्यांतील एक उत्तम श्री० राहटर, चांगला उंचापुरा, उमदा व हुशार असे, त्याला मी सहस्त्रबुद्धयांच्या हाताखाली दिले. शिवाय एक फील्डमनहि दिला.

कोपरगाव तालुक्यात नवीन आलेले माळी शेतकरी पैसेवाले होते. त्यांनी मोठाले जमिनींचे तळ विकत वा खंडाने घेतले. या शेतकऱ्यांना मोठाले चरक (पॉवर क्रशर) बसवावयाचे होते पण त्याना पॉवर क्रशरचा अनुभव नव्हता. आणि माझ्याकडे सहस्त्रबुद्धयांसारखा जाणता अधिकारी व हाताने काम करणारा राहटर सारखा मेकॅनिक होता. म्हणून मला या माळी शेतकऱ्यांना क्रशर उभे करण्यात व सुधारलेल्या चुलाण बांधून देण्यात चांगली मदत करता आली. आता आमचा मग ठाम जुळला होता. आमच्याकडे क्रशर बसविण्याच्या मागण्या येऊ लागल्या. गोदावरी कॅनालवर दहा जणांना व प्रवरा कॅनालवर पाच जणांना आम्ही क्रशर उभे करून दिले व सुधारलेली चुलाणे बांधून दिली. हे माळी शेतकरी आमचे खरेखुरे प्रचारक बनले, असे म्हणण्यास हरकत नाही.

जर या नवीन कॅनालवर हे माळी शेतकरी आले नसते व माझ्याकडे जी० एन० सहस्त्रबुद्ध, आनासाहेब निकम, श्रीपतराव जाधव व राहटर यांसारखी कष्टाळू माणसे नसती, तर गोदावरी व प्रवरा कॅनालवर इतक्या लवकर इतकी चांगली प्रगति झाली नसती हे खास.

ज्या सुधारणा मी व प्रोफेसर नाइट यांनी मांजरी फार्मवर निश्चित केल्या, त्या माझे असिस्टंट व माळी शेतकरी यास चांगल्या माहीत होत्या. त्यामुळे शेतकी खात्याचे काम फार सुकर झाले. ह्या माळी शेतकऱ्यांनी आम्हास कृतज्ञतेने वागविले. आम्ही त्यांच्यासाठी जी कामे केली, त्याबद्दल त्यांनी नेहमी कृतज्ञता व्यक्त केली. त्यांनी माळी सभेचा सन १९२० ते १९२४ अखेर कोपरगाव शाखेचा एक अहवाल प्रसिद्ध केला आहे त्याच्या पान ८ वरील उतारा खाली दिला आहे. त्यात ते म्हणतात

"शेती सुधारण्याच्या कामी मुंबई सरकारच्या शेतकी खात्याची आम्हास फार मदत झाली. मोठ्या प्रमाणावर ऊस करणें हें यांत्रिक साहाय्याशिवाय फायदेशीर होत नाही, हे जाणून इंजिनवर चालणारे चरक (पॉवर क्रशर) व मल्टिपल चुलाणें यांचा फायदा समजावून देऊन, मांजरी व कोपरगाव फार्मांत त्यांचे प्रत्यक्ष प्रयोग

करून व दाखवून प्रथमारंभी शेतकरी लोकांना, त्यांच्याकडून जें साहाय्य व प्रोत्साहन मिळालें, त्यामुळेच मोठ्या प्रमाणावर शेती करण्यास आम्हांपैकी कांहींना शक्य झालें. या कामीं शेतकी खात्यांतील अधिकारी ची मदत झाली. त्या वेळचे डेप्युटी डायरेक्टर रावबहादूर पी० सी० पाटील यांच्याकडे मुख्यत्व आमच्या भागाचे काम असल्यामुळे त्यांनी या कामीं फार मेहनत घेऊन व सहानुभूतिपूर्वक आम्हांस मदत केली. शेतकी खात्याचे काम फार चांगलें होण्यास निरभिमानी, कृपाळू, प्रेमळ व लोकांत मिसळणारा अधिकारी लागतो तशा प्रकारचे आमचे डेप्युटी डायरेक्टर रावबहादूर पी० सी० पाटील असल्याने आमचीं शेतीसुधारणेचीं कामें सुकर झालीं."

इंजिनावर पॉवर क्रशर बसवून गूळ करण्याच्या पुढची पायरी म्हणजे साखर कारखाने उभारणें. साखरकारखान्यांची हकीकत निवेदन करण्यापूर्वी महाराष्ट्रांत असल्या कारखान्यांचे बीज कोणीं व केव्हां पेरलें, हें सांगणें जरूर आहे. मिस्टर किंगि हे सन १९०६ ते १९२० पर्यंत मुंबई प्रांताच्या शेतकी खात्याचे डायरेक्टर होते. हे गृहस्थ इंग्लंडमधील सॉल्सबरी कौंटींतील एका जमीनदाराचे चिरंजीव असून ते आय० सी० एस्० आहेत. इतर सिव्हिलियनपेक्षां किंगिना शेतकीची माहिती अधिक असणें साहजिक होतें. त्यांना शेतकऱ्यांबद्दल कळकळ व हिंदुस्थानांतील उद्योगधंद्यांबद्दल आपुलकी वाटे. सुमारें १९१० सालीं महाराष्ट्रांत मुळा व नीरा कॅनॉलवर ऊस असे आणि गोदावरी व प्रवरावरच्या धरणांचीं व कॅनॉल बांधण्याचीं कामें चालू असावींत. बडोदें संस्थानांत गणदेवीस एक साखरकारखाना निघाला होता व पुण्याजवळ वर्तक इंजिनिअर यांनीहि ल्हानसा साखरकारखाना काढला होता. पण हे ल्हान ल्हान कारखाने परदेशांतून येणाऱ्या साखरेशीं स्पर्धा करूं शकले नाहींत. लवकरच ते बंद पडले. त्या कालखंडांत दरसाल सुमारें दहा लक्ष टन परदेशी साखर आयात होई. अशा वेळीं किंगिना मोठ्या प्रमाणावर जास्त ऊस होणाऱ्या कॅनॉल वर साखरकारखाना काढण्याचीं स्वप्नं पडूं लागलीं असावींत, असें दिसतें. नाहीं तर त्यांनी सन १९११ सालीं जी० एन्० सहस्रबुद्धे यास सरकारी स्कॉलरशिप देऊन वेस्ट इंडीजला साखर करण्याचें काम शिकण्यासाठीं पाठविलें नसतें. किंगिनी एक युरोपियन भांडवलवाला पाहून त्यास साखरकारखाना काढण्याची परवानगी मिळवून दिली व इरिगेशन खात्याकडून पाण्याच्या स्वतंत्र चाऱ्याची (पाटाची) सवलतहि मिळवून दिली. कंपनीच्या पहिल्या मॅनेजरचें नांव हॅरिसन असावें. त्याच्याशीं त्यांनी माझी ओळख करून दिली व साखरकारखाना अस्तित्वांत येण्यासाठीं शक्य ती मदत करण्यास मला सांगितलें. माजरी ऊस फार्मवर काम करीत असलेले असिस्टंट सुपरिंटेंडेंट मिस्टर जी० आर्० महाजन यास रजा देऊन त्यास ह्या नव्या (बेलापूर) साखरकारखान्यास जमिनी मिळवून देण्यास व त्या उसाच्या लागवडीसाठीं तयार

करण्यास लागिवलें. सन १९१९ पासून महाजन यानी या कारखान्यात इस्टेट मॅनेजरचें काम मरेपर्यंत म्हणजे १९४१ पर्यंत केलें. या कारखान्यात महाजन रुजू झाल्यावर त्याच्याबरोबर माजरी फार्मवर असलेले श्री० आर्० जी० पाध्ये सरकारी स्कॉलरशिप घेऊन अमेरिकेंतील ल्युझियाना युनिव्हर्सिटींतील साखरेचा कोर्स पुरा करून सन १९२३ सालीं परत आले. त्यानीहि वेलापूर कारखान्यात चीफ शुगर केमिस्ट म्हणून पुष्कळ वर्षें काम केलें. या दोघाचा या कारखान्यास फार उपयोग झाला.

मिस्टर नि्टिंग यानी पेन्शन घेऊन स्वदेशीं जाण्यापूर्वी जें साखरकारखान्याचे वेलापूर (आताच्या श्रीरामपूर) स्टेशनाजवळील हरेगावास बीजारोपण केलें, त्यास आता चागली फळें आलीं आहेत.

आपल्या देशातील सुमारें दीडशें साखरकारखान्यापैकी तीस कारखाने महाराष्ट्राच्या नैऋत्य भागात आहेत आणि ते सर्व सन १९२० नतरचे आहेत. या तीस कारखान्यापैकी पाच कारखाने अहमदनगर जिल्ह्याच्या एकट्या कोपरगाव तालुक्यात आहेत. महाराष्ट्रांतील तीस कारखान्यापैकी सतरा सहकारी कारखाने आहेत, हें विशेष आहे. कोपरगाव, वेलापूर, राहुरी भागात उसाशिवाय सत्री, मोसबी, चिकू व अलीकडे अनाबशाही जातीच्या द्राक्षाचीहि वाढ होत आहे आणि हा भाग महाराष्ट्राचें नदनवन बनला आहे. गल्या (सन १९६४च्या) हगामात श्रीरामपूरहून काही दिवस रोज दहा हजार किलो द्राक्ष मुंबई, दिल्ली, नागपूर व गुजरातकडे रवाना होत असल्याचें मीं वाचल्याचे आठवतें.

पन्नास वर्षांपूर्वीच्या या दुष्काळी भागात उसाच्या पिकाची घडी बसविण्यात मीं माळी शेतकऱ्याबरोबर पुष्कळ श्रम केले याचप्रमाणे किटिंगसाहेबाचें साखर कारखान्याचे सन १९१८ मधील स्वप्न सत्यसृष्टींत आणण्यास हस्तेंपरहस्तें मदत केली, याबद्दल मला अभिमान वाटतो.

>

शेतकीसबधी लिहीत असता, मानवी जीवनास अवश्य लागणाऱ्या अन्नवस्त्राच्या पुरवठ्यास अग्रस्थान मिळणे जरूर आहे. ज्याअर्थी आपल्या देशात सालोसाल कोट्यवधि रुपयाचें धान्य परदेशातून आयात करावें लागतें, त्याअर्थी आपला अन्न पुरवठा अपुरा पडतो, हे उघडच आहे. ह्या अतिमहत्त्वाच्या प्रश्नाकडे पुढाऱ्याचें लक्ष वेधल आहे आणि सरकारच्या व लोकनेत्याच्या प्रयत्नाने धान्याच्या उत्पादनांत वाढ होत असली पाहिजे, यात शका नाही. तथापि या वाढीच प्रमाण लोकसंख्येच्या वाढीच्या प्रमाणापक्षा कमी पडत असावें, हेहि उघड दिसतें. त्यासाठी धान्याचा वाढ व माणसाची वाढ याचा विचार सायसाथ केला पाहिजे. थोडक्यात सागावयाचें म्हणजे धान्यउत्पादन कसें वाढेल, त्याबरोबर माणसाच्या वाढीचें नियमन कसें करता येईल याचा विचार केला पाहिजे. जसे धान्योत्पादनाकडे लक्ष पुरवले आहे, तसें

नर्तीकडे लोकसंख्येची वाढ कशी कमी होईल, याकडेहि आपल्या पुढाऱ्याच लक्ष, भीतभीत, लागल आहे. पण बहुसंख्य अशिक्षित व धर्मभोळ्या अज्ञानी समाजात याची उमज पडलेली नाही. यासाठी सरकारने व लोकनेत्यांनी धान्योत्पादन वाढविण्यापक्षा संततिनियमनाकडे जास्त लक्ष देणें जरूर आहे. संततिनियमनाच्या प्रश्नाचा फक्त उल्लेख करूनच तो मला सोडला पाहिजे तो माझ्या कामाच्या कक्षेंत येत नाही.

*संततिनियमन व अन्नधान्याची वाढ ही जशी एक समस्या होऊन बसली आहे,* तशीच एक दुसरा समस्या या संबधात निर्माण झाली आहे; ती म्हणजे देशाच्या विकासात शेतीला प्राधान्य द्यावयाच की नाही ही होय. आपल्याला धान्याचा तोटा पडतो म्हणून तर परदेशी धान्य आणावें लागतें, यामुळे सकृद्दर्शनीं वाटण्याचा संभव आहे की, आधी 'पोटोबा' व मग उद्योगधंद्याची वाढ. पण सांप्रतच्या शास्त्रीय युगातील इतर देशाचा अनुभव असा आहे की, उद्योग (म्हणजे कारखानदारी—कापडाच्या व तेलाच्या गिरण्या, साखरेचे व लोखंडाचे कारखाने) व व्यापार वाढवून त्यात *वाढती प्रजा गुंतविल्याविना शेतीवरचा ताण कमी होत नाही. या कारखानदारींतच* यातील पड व अमोनिया, काक्वीसारख्या जिनसां(बायप्रॉडक्ट्स)पासून खतें, अल्कॉहॉल, स्पिरिट व माणसाच्या, जनावराच्या आणि पिकावरच्या औषधी बनविता येतात. या सर्वांचा विचार करता आपण फक्त शेतीच्या अगर निव्वळ कारखानदारीच्या मागे न लागता, एकसमयावच्छेदेंकरून या दोहाकडे लक्ष देणें परिस्थितीला धरून दिसतें.

याच संबधात जमीनविषयक धोरणासंबधी दोन शब्द लिहिणें बरें. आपल्या देशात लोकसंख्या जास्त, त्या मानाने वहितीयोग्य जमीन कमी आणि उद्योगधंदेहि कमी. असं असल्याने सरकारला जमीनविषयक कायदे करण्यात फार अडचणी आहेत. खतमूत घालून शेती मोठ्या प्रमाणावर व यांत्रिक साहाय्याने केल्याशिवाय ती चागली किफायतशीर होत नाही. पण मोठी शेती करण्यासाठी जे कायदे कराव लागतील त्यात लहानलहान शेतकरी नेस्तनाबूत होतील. त्याना दुसऱ्या उद्योगधंद्यात गुरविण्याची आगाऊ सोय केल्याशिवाय मोठाली शेतें बनविणे शक्य होणार नाही. कुळकायदे करताना सरकारला लहान कुळाना उत्तेजन देण याच कारणामुळे भाग पडतें कारण मालक परत जमीन कसू लागला, तर कुळाने कोठे जावें, हा प्रश्न उद्भवतो

आपल्या लोकात राष्ट्र ही भावना अगदी अलीकडची आहे, यामुळे आपणात स्वत पुरतं बघण्याची सवय होऊन बसली आहे देशासाठी व्यक्तीने काय केल पाहिजे याकडे फार थोड्या लोकाच लक्ष जातें, त्याचप्रमाणे नागरिकत्वाचा भावनाहि आमच्याकडे अलीकडची आहे. जुन्या काळीं लोक फार तर गावच्या हिताकडे पाहात आता देशाच्या गरजा पाहण्याची शिकवणूक समजावून देणं जरूर आहे. ही शिकवणूक

प्राथमिक व माध्यमिक शिक्षणात सोपे धडे देऊन न प्रादेशिक इतिहास-भूगोलाच्या द्वारें देणे उपयुक्त होईल.

शेतकी वा धान्योत्पादन म्हणजे त्यात शेतकऱ्याना घात-वाफ साधण्यासाठी स्वत: झटावें लागतें. पण या प्रवृत्तीस पोषक अशी आपल्या प्राथमिक व दुय्यम शिक्षणाची घडी बसलेली नाही. शिक्षणतज्ज्ञांचे व सरकारचेहि लक्ष या बाबीकडे गेलेलें दिसत नाही. अमेरिकेचे उदाहरण दिल्याने माझ्या सांगण्याचा हेतु स्पष्ट होईल. अमेरिकेत शेतीचें क्षेत्र मुबलक आहे, पण शेतमजुराची टंचाई आहे. त्यामुळे वेळेवर कापणी मोडणीस फार अडचणी येत असत. या अडचणींस तोंड देण्यासाठी, व त्याच वेळीं भावी पिढीस अंगकामाचें महत्त्व पटवून देण्यासाठी, कापणीमोडणीच्या हंगामात (जून ते सप्टेंबर, चार महिने) शाळांस व कॉलेजास सुट्या देण्याची प्रथा आज कित्येक वर्षे अमलात आणली आहे. या हंगामात शाळाकॉलेजातील बहुतेक मुले व अर्ध्यापेक्षा जास्त मुली शेतावर काम करतात व स्वतःच्या शिक्षणाचा खर्च बाहेर काढतात. या कामीं गरिबीश्रीमतीचा प्रश्न येत नाही. मी आपल्या देशात तसेंच करावें असे प्रतिपादन करीत नाहीं. मी प्रतिपादन करतों त हें की, आमच्या शिक्षणतज्ज्ञानी देशातील निरनिराळ्या भागातील पावसापाण्याचें, पिकाचें व उद्योग धंद्याचें निरीक्षण करुन, कोणत्या भागास काय पाहिजे याचा अभ्यास करुन शिक्षणात व ते देण्याच्या पद्धतींत फरक करावेत आणि शाळांस सुट्यासुद्धा निरनिराळ्या भागात निरनिराळ्या हंगामात द्याव्यात. आपल्याकडे मूलोद्योग शिक्षणात कापूस पिंजणें, सूत काढणें, कापड विणणें, यावरच चोहोकडे भर देण्यात येतो. खादी, मूलोद्योग हीं शिक्षणास उपयुक्त असलीं, तरी या बेसिक धंद्याचा आयुष्यात कितपत उपयोग होतो, हे अजमावण्याइतका अनुभव शिक्षणतज्ज्ञास आला असला पाहिजे. एक तर कापूस कांही भागातच पिकतो; दुसरें, देशात गिरण्यामध्ये कमी खर्चांत हीं कामे करता येतात. इतक्या दिवसांच्या अनुभवाचा आढावा घेऊन असल्या शिक्षणात फरक करणें जरूर दिसतें. खादापेक्षा शेतकी, मूलोद्योग शिक्षणपद्धतीस जास्त उपयोगी व कोणत्याहि प्रदेशात घेण्यासारखी नाही का ? पाऊस कमी पडणाऱ्या, जास्त पडणाऱ्या—कोणत्याहि भागात शेती ही आहेच. फार तर मोठ्या शहरात शेतीच्याऐवजी खादी मूलोद्योगासाठीं घ्यावी.

इंग्रजी रियासत सुरू झाल्यापासून शिक्षण जरी वाढलें, तरी त्यात एक नवा दोष शिरला आहे. तो म्हणजे अंगकामाचा कंटाळा. इंग्रजाना अंगकाम आवडत नसे असे नव्हे. पण त्यानी राज्ययंत्रणा हातीं घेतल्यावेळीं, आपलें कालचलाऊ काम करण्यास थोडेफार इंग्रजी शिकलेला माणूस त्याना हवा होता. थोडक्यात सांगावयाचें म्हणजे त्यांना तपास टेबून वेठ काम करणारे कारकून पाहिजे होते.

सन १८८५ पूर्वी आपल्या देशात शिक्षण जरा कमी होत, तरी त्या देशी शिक्षणाचा व तें देण्याच्या पद्धतीचा पाया शेतकीच्या धंद्यावर उभारलेला होता, ह मला अनुभवाने सांगता येईल. मीं सन १८८३ ८४ साला त्या वेळच्या गावठी शाळेंत धडे घेतले आहेत. माझे वडील व माझ्या आईचे भाऊ शिक्षित असून पाटिल्कीची कामें करीत असताना घरचीं शेतकामें करीत, पण इंग्रजी अमल सुरू झाला, तेव्हा इंग्रजाना फार जरुरा होती बैठ कारकुनी काम करणाऱ्या माणसाची. आणि असल्या लोकाना नको होतं अंगकाम. इंग्रजानी आयती हीच घडी घालून दिली. आणि अंगकाम ई इलक्या प्रतीच काम असे तरुणाना वाटू लागलं आणि या नव्या मुशीतून तयार झालेला मडकीं अंगकामाच्या दृष्टीने कचीं राहत गेलीं. या बाबतींत मीं सन १९०८ पासून बराच विचार व प्रयत्नहि केले आहेत. प्रथम त्या वेळचे शेतकी कॉलेजचे विद्वान् प्रिन्सिपाल डॉक्टर मॅन याच्याबरोबर शेतकीशाळा काढण्यात व त्या चालविण्यात मी भाग घेत होतो. डॉक्टर मॅन सेवानिवृत्त झाल्यावरहि मीं काही प्रयोग केले. यातील एका प्रयोगात पधरावीस संपूर्ण प्राथमिक (मराठी सातव्या इयत्तेपर्यंत शिकविणाऱ्या) शाळात शालेय विषय शिकविताना शेतीधंद्यातून साहित्य घेण्याचा प्रयोग केले होते. पण मला त्यात यावें तस यश आल नाही, हें मला कबूल केलं पाहिजे.

बेसिक एज्युकेशन—विशेषकरून शालेय विषयाना शेतीच वळण देणें, तं शिकविण्यासाठी लागणारी साधनसामग्री शेतीच्याच धंद्यातून घेण, जसें भूगोल शिकविताना कोणत्या भागात कोणती पिकं होतात, ती पिकं तेथच का होतात, ह सांगणें—अवघड नाही; गणित विषय शिकविताना शिक्षकाना शेतीच्या धंद्यात मुबलक सामग्री मिळेल, अशी माझी खात्री आहे. मुंबईस पाऊस १०० इंच, खडाळा लोणा वळ्यास ३०० इंच, पुण्यास ३५ इंच, तर पुढे दौंड पदरपुराकडे अवघा २०-२५ इंच हें असे का व्हावें? कोकणात भात, नाचणी व्हावी, पण कापूस, ज्वारी, बाजरी होऊ नये, असे का? ही सहज मिळविता येणारी पण उपयुक्त माहिती लहानपणापासून मुलाच्या मनावर ठिरविणं फार उपयुक्त ठरेल. पण तें काम सोंपं नाही. त्याला शाळाखात्याचा हार्दिक पाठिंबा हवा.

सुमारें सन १९३९-४० सालीं महात्मा गांधींची वर्धा स्कीम ऑफ बेसिक एज्युकेशन (मूलोद्योग शिक्षणपद्धति) हा विषय वेळोवेळीं चर्चेस येऊ लागला होता. मुंबई प्रांतांत श्री० जी० के० जोशी, इन्स्पेक्टर ऑफ एज्युकेशन, यांच्या अध्यक्षतेखाली एक कमिटी नेमली गेली होती. कमिटींतील सर्व सभासद सुशिक्षित होते, पण ते सर्वच शिक्षणतज्ज्ञ अथवा शेतकीतज्ज्ञ होतेच असे नव्हे. फार थोड्या जणाना शेतीचा व शेतकामाचा अनुभव होता. तथापि बहुतेक जण आपणास शिक्षणतज्ज्ञ वा शेतकीतज्ज्ञ समजत असल्याने कमिटींतील चर्चेत अशक्य कोटींतील सूचना येत. प्राथमिक शाळास जोडून शेतकी फार्म, गुऱ्हाळ, इंजिनवर चालणारे चरक, सूत कातणें, कापड विणण,

या गोष्टी असल्याच पाहिजेत, अशा आग्रह धरू लागल्यावर, असल्या चर्चेतून काय निघणार तें दिसतेंच!

मला वाटतें, पाचसहा प्रत्यक्ष शेती करणारी पण चांगली शिकलेली व शाळा गात्याचा थोडाफार अनुभव असलेली माणसें निवडून त्याच्याकडे प्रयोगादाखल एका तालुक्यातील सर्व प्राथमिक व दुय्यम शिक्षण दिलें आणि त्याचे मदतीस श्री० जे० पी० नाइकासारखा आत्मविश्वास असलेला व जबर मेहनती शिक्षणतज्ज्ञ अधिकारी नेमून दिला, तर सातआठ वर्षांत असला प्रयोग खात्रीने यशस्वी होईल. पूर्ण श्रद्धा व आत्मविश्वास असलेल्या अधिकाऱ्याच्या हाताखाली शिक्षकहि वसलेले व कष्टाळू असले पाहिजेत. या अधिकाऱ्याने त्या तालुक्यातील प्राथमिक शिक्षकांचे वेळोवेळीं पाठ घेतले पाहिजेत. मीं वरून वरून तरी या कामीं बरीच मेहनत घेतली आहे. पण मी प्राथमिक शाळात शिक्षक नव्हतों व सर्वाधिकारीहि नव्हतों. मीं शेतकी शाळाची देखरेख केलेली आहे. कोल्हापुरास रीजन्सी कौन्सिलांत शिक्षणमंत्री असताना चाळीसपन्नास प्राथमिक शाळांस लहानलहान बागवजा शेती व शेतीचीं अवजारें दिलीं आहेत; पण मीं ती जागा सोडतांच 'ये रे माझ्या मागल्या' असें झालें. कारण शाळाखात्यास हा जुल्माचा रामराम होता. अमेरिकेंतील अगर डेन्मार्क वेल्ज्ममधील प्राथमिक शिक्षण वेकिक न म्हणता वेकिक आहे. तेथील प्राथमिक शिक्षणास पूर्णतया शेतकीचें वळण असल्याचें मीं सन १९११ व १९२० सालीं वसल्या वर्गात चारआठ दिवस बसून पाहिलें आहे. मग आमच्याकडे तसें का न व्हावें?

ब्रिटिशानी आमच्या देशात सरकारी शाळा काढण्यापूर्वी, शिकलेल्या लोकाना शेतीची व अंगकामाची आवड होती, हें मला माहीत आहे. जर इंग्रजानी देशातील शिक्षणाची घडी त्या वेळीं शेतकीच्या पायावर घातली असती, तर स्वातंत्र्योत्तर काळात झालेल्या प्रयत्नास जास्त लौकर चांगलीं फळें आलीं असतीं. पर्यायाने काही गोष्टींचा शेतीवर बरावाईट परिणाम कसा होतो ह आपण पाहिलें. पाऊस, पाणी, व खतमूत याचा परिणाम प्रत्यक्ष होतो, व दिसतोहि. दक्षिण महाराष्ट्रा पावसाचा हंगाम अवघा चार महिने असून दरसालहि अनिश्चित व लहरी असतो. पश्चिम महाराष्ट्रांत उत्तर व दक्षिणच्या लांब सह्याद्रि पर्वतावर पाऊस भरपूर किंबहुना पाहिजे त्यापेक्षा अधिक पडतो; पण या पर्वतावर प्राचीन काळीं असलेलें दाट जंगलाचें आवरण गेल्या शंभर वर्षांत तोडलें गेल्यामुळे, जंगल फार विरळ व कोठे कोठे नाहींसें झालें आहे. त्यामुळे महाराष्ट्राचा कणा व दरगड्या खालोखाल धुवून उघड्या पडल्या व त्या खडकाळ झाल्या. या पर्वतावर पडत असलेल्या पावसाच्या पाण्याचा फायदा कोंकणपट्टी, मावळ व महाड या भागासहि मिळावा तितका मिळत नाहीं

कारण सह्याद्रीच्या पश्चिम बगलेवरचें पावसाचे पाणी तेथील माती धुवून काढीत काढीत अरबी समुद्रास मिळतें. पूर्वेकडच्या बगलेवर पडलेलें पावसाचें पाणीहि दरीखोरीं धूत धूत मावळ सोडून वेगाने देशभागातून कर्नाटक व आंध्र प्रदेशात जाऊन शांतपणे वाहू लागतें आणि महाराष्ट्रातील सह्याद्रीच्या पाण्यावर आंध्रच जास्त सत्ता गाजवितो.

आज (सन १९६४ साली) भारतातील सर्व राज्यात मिळून सुमारें १ कोट ८८ लक्ष एकर जमिनीस कालव्याचे पाणी मिळत. या पाण्याच्या वाटणींत महाराष्ट्रास फक्त २ लक्ष ३९ हजार एकरासच पाणी मिळतें आणि त्याचा नंबर सातवा लागतो. तेंच आमाप महाराष्ट्राच्या दसपट क्षेत्रास पाणी मिळून त्याचा नंबर भारतात तिसरा लागतो, हें लक्षात ठेवणे जरूर आहे. दुसऱ्या पंचवार्षिक योजनेत सुमारें पन्नास लक्ष एकरास पाणी मिळण्याची वाढ होईल असे दिसतें. या योजनेंत महाराष्ट्रास फक्त पन्नास हजार एकरास (गिरणा योजनेवर) पाणी मिळेलसे दिसतें. एवढ्याने *महाराष्ट्रावरचा अन्याय दूर होणार नाही.*

पाणीपुरवठ्याच्या संदर्भात, जंगलाचे संरक्षण व वाढ याकडे जरूर लक्ष गेले पाहिजे. जंगलाचा नाश झाल्यामुळे पावसाचें पाणी जमिनींत जिरण्यास मदत होत नाही व तेणेंकरून दरीखोरीं धुवून जाऊन लाखों टन जमिनीच पूल (माती) धुवून जातें. शेताची धूप कमी होण्यासाठी कंटूर बंडिंग (समपातळीवर बांध) केल्याने व जमिनींतील ओल टिकविण्यासाठी जमीन वेळोवेळीं कुळविल्याने पिकात वाढ होते, हें दक्षिणेंत तर सर्वांना कळलें आहे. पिकावरच्या किडीवर अलीकडे कीटकनाशक द्रव्यें निघालीं आहेत.

अन्नवाढीच्या संदर्भात समुद्रातील मासे व इतर जलचर प्राण्याचा उपयोग आपल्याकडे व्हावा तितका होत नाही. आपल्या देशाला सुमारें तीन हजार मैलाचा समुद्रकिनारा लाभला आहे. सध्या दरसाल सुमारें पंधरा लक्ष टन मासे धरले जातात. सध्या चाललेल्या प्रयोगावरून असे दिसतें की, लवकरच दरसाल अठरा लक्ष टन मासे धरता येतील. आपल्याकडचे कोळी, शिडाचे ल्हानल्हान मचवे खोल समुद्रात नेऊ शकत नाहीत. या कामीं सरकार संशोधन करीत आहे. खोल समुद्रात सुधार ऐल्या यांत्रिक बोटी थोड्याफार आणिल्या आहेत. केरळ किनाऱ्यावर क्विलॉन व कोचीन येथे आणि पूर्व किनाऱ्यावर काही ठिकाणीं मोठ्या प्रमाणावर मासेमारीचे प्रयोग व सुधारलेल्या बोटी प्रचारात येत आहेत.

सन १९०० पूर्वी आपल्या देशात शेणखत हेंच मुख्य खत होतें. पुढे लवकरच पुण्याजवळ मांजरी फार्मवर उसास मासळी, निरनिराळ्या पेंडी व सल्फेट आफ अमोनिया देण्याचे प्रयोग केले गले. त्यात कसली तरी पेंड व सल्फेट ऑफ अमोनिया उसास देणें फायदेशीर दिसल. १९१० पर्यंत मी सातारा-कोल्हापूर भागातील शेतकऱ्याच मन वळविण्यासाठी त्याना पड व सल्फेट ऑफ अमोनिया देत असे. लौकरच सल्फेट लोकप्रिय झालें. दुसऱ्या जागतिक युद्धानंतर गुळाच्या व

धान्याच्या किंमती वाढल्या व त्याबरोबर सल्फेटचा खपहि फार वाढला. सन १९४८ साली देशात फक्त पाऊण लाख टन सल्फेट तयार होई. अलीकडे पाण्यावरच्या पिकासाठी व कारखानदारीस लागणाऱ्या विद्युत्‌शक्तीसाठी मोठमोठाली वॉटरवर्क्स (धरणें) झालीं, आणि सल्फेटसारखीं खतें आता मोठ्या प्रमाणावर तयार होत आहेत. सिंद्री येथे सध्या सालीना अडीच लाख टन सल्फट ऑफ अमोनिया व भाक्रा-नानगल येथे दोन लक्ष टन कॅल्शियम अमोनियम नायट्रेट निघतें. पूर्ण वाढ झाल्यावर त्या कारखान्यात पुष्कळ सल्फेट निघेल. शिवाय लवकरच रूरकेला, ट्रॉंबे, नामरूप, नेव्हेली, नहरकाठिया, गोरखपूर, विशाखपट्टणम्, कोटागुडियम् व तुतिकोरिन येथे होऊ घातलेल्या कारखान्यातून कृत्रिम खतें होऊ लागतील, असे दिसत.

खताच्या दृष्टीने अतिमहत्त्वाचा ठेवा म्हणजे खेड्यापाड्यातील रहिवाशांची विष्ठा. पण ती फुकट जाते; एवढेच नव्हे तर तिची योग्य व नीट विल्हेवाट न लागल्यामुळे ती आरोग्यास अपायकारक ठरते. युरोपात व अमेरिकेत—विशेषकरून चीन व जपान या देशात—हें खत फार किंमतीचें समजलें जातं. इंग्लंड व अमेरिकेतील शेतकरी आपल्या शेतावरच राहतात आणि आपल्याकडच्या खताच्या गारीप्रमाणे त्याच्या शेतखा-याजवळ खड्डा असतो त्यात विष्ठा पडतें. त्यावर लोक माती व केरकचरा टाकतात. चारदोन महिन्यानी तें खत हलवितात. त्यास 'ड्राय पिट' पद्धत म्हणतात. बेल्जम डेन्मार्क हॉलंडमध्ये, जेथे कॅनालची सोय आहे तेथे, शहरातील धुवून जाणाऱ्या शेतखान्यातील मैला ल्हानल्हान बोटींतून कॅनालमधून शेतावर जातो. चीन व जपानात तर मैल्याच्या खताचें फार महत्त्व आहे. जो कोणी शास्त्रज्ञ, लोकास पटण्यासारखी योजना आखून, माणसाच्या विष्ठेचा खत म्हणून उपयोग करण्याची योजना करील त्यास मी फार मोठा लोककल्याणकर्ता समजेन. जर सर्व मैल्याचा खतासारखा उपयोग होईल, तर देशातील पीक दुप्पट निघेल असे मला वाटतं.

मीं अगोदरच सांगून ठेविलं आहे का, मी शेतीवर निरधवजा काही लिहीत नाहीं. शेतीस उपकारक गोष्टींचा उल्लेख केला. सहकारासंबधी अन्य ठिकाणीं तपशील आल्याने त्याचा पुनरुच्चार या प्रकरणात केला नाही. अमेरिकन अथवा डेन्मार्कमधील शिक्षणतज्ज्ञांनी जशी शालेय विषयाची सामग्री शेतकी धंद्यातून घेण्याची प्रथा पाडली, शेतकीस मदत व्हावी म्हणून कापणीमोडणीच्या हंगामात शाळाकॉलेजास सुट्या ठेऊन विद्यार्थ्यांनी शेती करण्याची घडी पाडली, त्याप्रमाणे आमचे लोक विचार करतील तर शेतीस उत्तेजन मिळेल, अन्नपुरवठा वाढेल आणि लोकात अग्रभागाची गोष्ट जडेल, एवढ सांगून हे प्रकरण पुरें करतो.



# आमचीं मुलेंबाळें



आम्हास एकूण पाच मुलगे व चार मुली होत्या, पैकी दोन मुलग व दोन मुली लहानपणींच वारल्या आणि तीन मुलग व दोन मुली मोठ्या झाल्या ह्या पाच मुलापैकी मोठे चिरजीव लेफ्टनट जनरल शकरराव (भाऊसाहेब) ५८ वर्षांचे असून लखनौ येथे ईस्टर्न कमाडचे जनरल ऑफिसर कमाडर इन् चीफ होऊन सन १९६१अखेर सेवानिवृत्त झाले. सध्या ते मुबईस महाराष्ट्र राज्याच्या पब्लिक सर्व्हिसेस कमिशनचे चेअरमन आहेत. शिवाय त्याना अलीकडे, चीनशीं युद्ध सुरू झाल्यापासून, देशाच्या सरक्षण समितींतहि काम करावें लागतें आमच दुसरें अपत्य (मुलगी, चिरजीव सौभाग्यवती आनदाबाई काशिनाथराव देशमुख) हिच वय ५५ वर्षांचें आहे. काशिनाथराव एम्० ए०, एलएल्० बी० हे अहमदनगर जिल्ह्यातील कोतूळचे देशमुख आहेत. सध्या ते कोल्हापुरास वकिली करतात आनदीबाइस दोन मुलग व पाच मुली आहेत. मोठा मुलगा आनदराव मुबईत फौजदार आहे व धाकटा वसतराव हा अलीकडेच लष्करात लेफ्टनट झाला आहे. आनदाबाईच्या मोठ्या मुलीचें (शकुतलेच) लग्न हेमतराव सुर्वे, डेप्युटी सुपरिंटेडट ऑफ पोलिस याच्याशीं झालें आहे. तिला मुलेंबाळें आहेत. दुसरी मुलगी सुलोचना, बी० ए०, बी० टी० हिचें लग्न, केशवराव माद्रे, एम्० एस्सी०, एलएल्० बी० याच्याशी झाल तिसरा सुनदा गल्याच सालीं एम्० बी० बी० एस्० परीक्षा देऊन डाक्टर झाली आहे. चौथी कुमुदिनी बी० एस्सी०च्या शेवटच्या वर्षांत असताना, गल्या वर्षी तिचें लग्न सातारा जिल्ह्यातील वडगावच्या कॅप्टन पाडुरग डी० थोरात याच्याशीं झाल. आणि सर्वांत लहान तिलोत्तमा मॅट्रिकमध्ये आहे. मुली विनयशील व कर्तव्यदक्ष आहेत त्या घरकाम, आपली कुलपरपरा, हिंदी सस्कृति, शिवणें टिपणें व कशिदा काढणे चागल जाणतात.

मरणानंतर व काही अर्थी तिच्या इच्छेनुसार, माझी खून झाली) म्हणत असे, "काही तरी वाईट होणार." या सुमारास आमचें नवें घर 'इंदुनिकेतन' तयार झालें होतें. आम्ही त्या घरात जाण्याचा विचार करीत होतों. इंदूला नव्या बंगल्यात जाणें पसंत नव्हते. तिने सरोजिनीस लिहिलेल्या पत्रात (ज्याची स्थळप्रत तिच्या पत्रव्यवहारात मिळते) लिहिलें आहे की, "कदाचित् तुझा माझा लवकरच वियोग होईल. नानाशीं (तिच्या भावाशीं) तुझ्या इच्छेप्रमाणे तुझं लग्न करण्यात मला आजवर मदत करता आली नाही. तुझं नानाशी लग्न व्हावें, अशी माझी मनापासून इच्छा आहे." तिने याच वेळीं आपल्या दुसऱ्या भावास म्हणजे दिनकररावास लिहिलें आहे की, "मला फारसेंच वाटतें. तुम्ही सुखी असा."

नव्या बंगल्याची वास्तुशांति करून आम्ही तेथे राहण्यास गेलों होतों. पुढे थोड्या दिवसात तिच्या टॉन्सिल्स दुखूं लागल्या व तिला मिरजेस नेऊन ऑपरेशन करावें असें आम्हीं ठरविलें. ऑपरेशन करावें अशी तिची मनापासून इच्छा नव्हती. तथापि माझ्या व आपल्या आईच्या सांगण्यावरून तिने कबुली दिली. पण सांगितलें की, "तुम्ही जरी हें ऑपरेशन लहानसें आहे म्हणता, तरी वहिनीस (डॉक्टर लीलावतीस) मजबरोबर असूं द्या." भाऊसाहेब रजेवर असल्याने ती आमच्याच घरीं होती. भाऊसाहेबास व लीलावतीस बरोबर देऊन तिला मिरजेस पाठवून दिलें. ऑपरेशन यशस्वी झालें. दोन-तीन दिवस राहून सर्व जण परत आली. भाऊसाहेबांची रजा संपल्याने ते व लीलावती लाहोरास परत गेलीं. पुढे सात आठ दिवसांनी ॲपेंडिसायटिसमुळे इंदूच्या पोटात दुखूं लागलें. भाऊसाहेबांचे एक स्नेही डॉक्टर होते, पण ते त्या वेळीं अननुभवी होते. त्यांनी येऊन तिला तपासलें व पोट साफ होण्याकरिता जुलाबाचें औषध दिलें. त्यानंतर पोटात जास्तच दुखूं लागलें. म्हणून आम्हीं ता० १९८१९४० रोजीं मिशन हॉस्पिटलमधून डॉ० डनिंगला बोलावून घेतलें. डनिंगच्या तपासणींत हें पोटांत दुखणें ॲपेंडिसायटिसचेंच ठरलें. डॉ० डनिंगच्या मतें, जुलाबाचें औषध दिलें ही चूक झाली. तिने सांगितलें, "आतांचे आतां मुलीस घेऊन हॉस्पिटलमध्ये चला. आपण ऑपरेशन करूं." ती आणखी असेंहि म्हणाली की, "बागलीस एक प्रसिद्ध अमेरिकन मिशनरी डॉक्टर आले आहेत, पण ते आज तेथ नाहीत. ते असते तर बरें झालें असतें." हॉस्पिटलमध्ये जाण्याचें इंदूच्या मनात साफ साफ नव्हतं. तिच्या मनाच्या अगदीं विरुद्धच तिला हॉस्पिटलमध्ये न्यावें लागलें. डॉ० डनिंगने देवाची प्रार्थना केली व ऑपरेशन करावयास सुरवात केली. अपेंडिक्स फुटल्याचें तिला दिसून आलें. पण तिने तसें मला सांगितलें नाही. तथापि ती म्हणाली, "प्रयत्न करूं या, मग ईश्वराची इच्छा." ऑपरेशन झालें व इंदूला तेथच एका स्वतंत्र खोलीत ठेवण्यात आलें. इंदूची अशी अवस्था होताच मीं त्यांना तारा केल्या. नानासाहेब पुण्याहून व आनंदीबाई साताऱ्याहून तातडीने कोल्हापुरास आलीं. डॉ० डनिंगने आपल्या मदतीस मिरजेहून

दुसरा डॉक्टर बोलावून घेतला होता. इंदूच्या पायावर व हातावर जागोजागी लांबच लांब काप टाकण्यात आले. शिवाय त्याने तिच्या हातापायाच्या काही शिरांतून बरेंच रक्त पंपाने ओढून काढिलें आणि त्यात काही औषधी घालून तें एकत्र केलें व परत तिच्या शिरांतून अंगात भरलें. त्याचा काही उपयोग झाला नाही. हें पाहून डॉ० डनिंग निराश झाली. तिला ही केस आपल्या हातून गेली असें वाटलें व तिने आम्हास सांगितलें की, "आता मुलीला घरीं न्या. औषधपाण्याच्या भरीस पडू नका. तिला स्वस्थ पडू द्या." इंदू चार दिवस दवाखान्यांत होती. आम्हीं तिला तारीख १ १ १९४० रोजीं पहाटे घरीं आणली. थोड्याच वेळात तिचें प्राणोत्क्रमण झालें. तिचें शव हॉलमधून सोप्यांत आणीत असतांना पाहून मला मूर्च्छा आली व मी जमिनीवर पडलों. काही मिनिटें बेशुद्ध होतों. मला वाटू लागलें, 'हॉस्पिटलमध्ये नेऊ नका,' असें इंदू म्हणत होती, तिचें ऐकलें असतें तर बरें झालें असतें. ती जगली असती असें नव्हे, पण इतके हाल तरी झाले नसते. इंदूच्या अकालीं व आकस्मिक मरणाचे वेळीं मी, माझी आई व इंदूची आई, बहीण, नानासाहेब व इंदूची मैत्रीण सरोजिनी इतकी मंडळी हजर होतों. बाबासाहेब ग्वाल्हेरहून मातीच्या दिवशीं आले. इंदूच्या आईचें दुःख अनावर होतें. मुलीच्या मरणाने ती खचली. त्या दुःखातून ती उतरली नाही. कसे तरी दिवस कंठीत होती.

थोड्या दिवसातच कोल्हापुरास रीजन्सी कौन्सिल नेमण्याचे ठरले व हिंदुस्थान सरकारने मला मिनिस्टर होण्याबद्दल विचारणा केली. माझ्या मनःस्थितींत विरंगुळा पडण्यास हें काम बरें पडेल असें जाणून हें पाचारण मीं स्वीकारलें आणि ऑक्टोबर सन १९४१ मध्ये शिक्षण, शेती वगैरे खातीं हातीं घेतलीं. तीं कामें माझ्या आवडीचीं होतीं म्हणून मीं कोल्हापूर प्रजेची सेवा करण्याचा आलेला योग पत्करला आणि सर्वस्वी त्या कामास वाहून घेतलें. या महत्त्वाच्या सार्वजनिक कामामुळे मला इंदूच्या मरणाचा हळूहळू विसर पडू लागला. विस्मृतीचा पडदा काळाचा ओघ पुढे सरकतांतच असतो.

शंकररावाचा जन्म वडगावीं तारीख १२ ऑगस्ट सन १९०६ रोजीं झाला. त्यापूर्वी थोडेच दिवस माझी नेमणूक पुण्यास शेतकी कॉलेजांत झाली होती. ते लहान असतानाच सन १९०७ सालीं माझ्या पत्नीबरोबर पुण्यास आले. सन १९११ पर्यंत पत्नी, शंकरराव व मुलगी आनंदीबाई पुण्यासच असत. मध्येमध्ये थोडे दिवस तीं गावीं जात. मी सन १९१२ सालीं विलायतच्या नऊ दहा महिन्याच्या प्रवासात असताना पत्नी व मुलें माझ्या आईवडिलांकडे राहत होतीं. तेथे माझ्या वडिलांनी शंकररावास मुळाक्षरें शिकविलीं. नंतर थोडे दिवस ते आमच्या गावाजवळ असलेल्या सरूड येथील शाळेंतहि जात. मी विलायतेहून परत येताच माझी सदर स्टेशन खानदेशांत जळगावास बदललें, म्हणून माझ्या वडिलांनी माझ्या पत्नीस व मुलांस जानेवारी १९१३ त जळगावीं मजकडे पोहोचविलें. तेथे आम्ही सन १९१४ एप्रिलपर्यंत होतों. परत सहा महिने पुण्यास गेलों, नंतर दीड वर्ष रत्नागिरीस जाऊन परत कायम पुण्यास आलों. अर्थात् शंकररावाचें प्राथमिक शिक्षण जळगाव, रत्नागिरी व पुणें या ठिकाणीं झालें. ते सन १९२४ सालीं नूतन मराठी स्कूलमधून मॅट्रिकची परीक्षा पास झाले. विलायतेस लष्करी शिक्षण घेण्यास जाण्यापूर्वी काही दिवस ते न्यू पूना कॉलेज मध्ये (आतां त्याचें नाव सर परशुरामभाऊ कॉलेज आहे) होते.

हिंदुस्थानात इंग्रजांचे राज्य झाल्यापासून सैन्यात काही गोऱ्या व कांही देशी पलटणी असत. गोऱ्या पलटणींतील लहानमोठे सर्व अधिकारी इंग्रज असत. या सर्व अधिकाऱ्यांचे शिक्षण विलायततील रॉयल मिलिटरी कॉलेज, सँढर्स्ट येथें होई. देशी पलटणींतसुद्धा वरचे अधिकारी सँडहर्स्टमध्ये किंग्ज कमिशन घेतलेले असत. खालचे अधिकारी, मेजर सुभेदार, सुभेदार वगैरे हिंदी असून त्यांना व्हाइसरॉय कमिशन मिळे.

पहिल्या जागतिक युद्धात जर्मनी व इटली यांविरुद्ध हिंदी सैन्याने इंग्रजांचे बाजूनें चांगली टक्कर दिली होती. या युद्धात मराठ्यांचें शौर्य इंग्रजांस पटलें होतें. मराठ्यांच्या या मदतीची आठवण इंग्रजांना होती, म्हणून त्यांनी १९२०-२१च्या

सुमारास सैन्यातील किंग कमिशनमधील दहा नारा जागा हिंदुस्थानी तरुणासाठी राखून ठेवण्याचा निर्णय घेतला होता. या जागासाठी अर्ज केलेल्या तरुणाची परीक्षा व निवड करून होई. विलायतेस जाणाऱ्या विद्यार्थ्यावर शिक्षणखर्च मोठा म्हणजे १६,००० रुपये असून ता त्याच्या आइबापास करावा लागे.

शंकरराव मॅट्रिक झाल्यावर टाइम्स आफ इंडियामध्ये आलेली जाहिरात माझ्या वाचण्यात आली. ही जाहिरात मी शंकररावास दाखविली व विचारलें, "तुमची इच्छा लष्करात जाण्याची आहे काय?" त्यानी सांगितलें, "तुम्ही पाठविल्यास जरूर जाइन." मी त्याना सांगितलें, "अर्ज तरी करा. निवड झाल्यास पुढे पाहू." त्याप्रमाणे त्यानी अर्ज केला. त्याना प्रवेशपरीक्षेसाठी सिमल्यास बोलाविण्यात आलें. परीक्षेत ते पास झाले. तेथेच त्याना कमांडर इन् चीफ फील्ड मार्शल बर्डवुड व व्हाइसरॉय लॉर्ड रीडिंग याच्यापुढे तोंडी परीक्षेस जावें लागलें त्यातहि ते निवडले गेले.

मी शंकररावाना लागणाऱ्या प्राथमिक खर्चाची जमवाजमव करू लागलों. माझ्या तीन हजार रुपयाच्या पॉलिसीची मुदत भरली होती व मजजवळ थोडी शिल्लकहि होती. तेवढ्यावर विलायतेस जाण्यासाठी लागणारा बोटखर्च, काही कपडेलत्ते व मिलिटरी कालेजमधील पहिल्या सहामाहीचा हप्ता भरण्याची सोय झाली. हे पैसे सरकारात आगाऊ भरावे लागत

शंकररावाच्या विलायतेस जाण्याची वार्ता पसरली आणि वर्तमानपत्रातून त्याच्या निवडीची प्रसिद्धीहि झाली. महाराष्ट्रातील व त्यातूनहि एका मराठा तरुणाची निवड झालेली पाहून लोकास बरें वाटलें आणि पुष्कळाकडून अभिनंदनपर पत्रे आलीं. त्यातील दोन पत्रांचा उल्लेख करणें जरूर आहे. पहिलें पत्र कै० भास्करराव जाधव याचें उत्तेजनपर पत्र होय. त्यात त्यानी आपला आनंद तर व्यक्त केलाच होता; पण पुढच्याच वाक्यात लिहिलें होतें की, "माझें कैंकुक तुमच्या हातीं आहे असें समजा." मी त्याचे आभार मानून कळविलें की, "जरूर पडलीच तर आपणास कळवीन" दुसरें पत्र बापूसाहेबमहाराज कागलकर याचें. त्यानी शंकररावाचे अभिनंदन करून मला भेटावयास बोलाविलें होतें. बोलाविल्याप्रमाणे मी त्याच्याकडे गेलों त्यानी आपण होऊन सांगितलें की, "शंकररावाच्या विलायतेंतील शिक्षणाचा खर्च मी देतों." मी त्याचे आभार मानिले व सांगितलें, "आपला मोठा आधार आहे तो असू द्यावा. जरूर लागेल तेव्हा मागणी करीन." पुढे बापूसाहेब म्हणाले, "आबासाहेब (शाहूमहाराज) आज जिवंत असते तर त्याना फार फार आनंद वाटला असता आणि त्यानी शंकररावास लागणारा खर्च तुम्हास करूच दिला नसता मला ही रक्कम भारी नाही मला खर्च करू द्या" मी म्हणालों, "मी उद्योगानें हा खर्च भागवू शकेन, अशी मला उमेद आहे. पण जरूर पडलीच तर आपणास कळवीन." कै० राजाराममहाराजानीहि माझे मित्र रावबहादूर शंकरराव इंदुलकर—जे त्या वेळीं

महाराजांचे हुजूरचिटणीस होते—याना सांगितलें की आपण पी० सी० पाटील याना उसनवार रक्कम देऊ असे कळवा. कर्मधर्मसंयोगाने मला कोणाची मदत घ्यावी लागली नाही, ही गोष्ट निराळी. पण तांपर्यंत साठविलेली सर्व पुंजी खर्च करावी लागली.

शंकररावाची निवड होताच पुण्यातील आमच्या स्नेह्यासोबत्यानी व मुंबईतील मराठा पुढाऱ्यानीहि मोठ्या उत्साहाने जंगी सभा भरवून त्याना निरोप दिला. आम्ही शंकररावाना तारीख ३ जानेवारी १९२४ रोजीं मुंबई बंदरात पी० अँड ओ० च्या (कॅलिडोनिया) बोटीवर पोचवून पुण्यास परत आलें. ते पोर्टसय्यद जिब्राल्टर मार्गानें तारीख १२ रोजीं इंग्लंडमधील टिलबरी बंदरात पोचले व तारीख २७ रोजीं कॅम्बरले जवळच्या रॉयल मिलिटरी कॉलेजमध्ये रुजू झाले. ते तेथें अठरा महिने होते. सुट्टींत त्यानी स्कॉटलंड, फ्रान्स व बेलजममधील पहिल्या जागतिक युद्धाचीं क्षेत्र पाहिलीं. पुढे शेवटची परीक्षा देऊन किंग्ज कमिशन मिळविलें व मायदेशीं येण्यासाठी ऑगस्ट १९२६ त इंग्लंड सोडलें.

शंकररावाची पहिली नेमणूक अहमदनगरास मिडलसेक्स नावाच्या गोऱ्या पल्टणींत सेकंड लेफ्टनंट म्हणून झाली. अहमदनगरास एक वर्ष घालविल्यावर त्यानी नेमणूक वायव्य सरहद्दीवर मझाईस, चौदाव्या पंजाब रेजिमेंटमधील पहिल्या पल्टणींत झाली. याच भागात १९३५ सालीं मोमंद ऑपरेशनमधील लढ्यात भाग घेण्याची संधि त्याना मिळाली. त्या वेळीं ते कॅप्टन असावेत. याच वायव्य सरहद्दीवर सन १९३७-३८ त आणखी काही लढ्यात त्यानी भाग घेतला.

तत्पूर्वी सन १९३६ सालीं दिल्लीस असताना त्यानी अमृतसर (पंजाब) येथील ॲडव्होकेट रायसाहेब भगतराम आनंद यांची कन्या डॉ० लीलावती, एम्० बी०, बी० एस्० हिच्याशीं लग्न करण्याचें निश्चित करून तसें आम्हास कळविलें. हें लग्न तारीख २९ डिसेंबर सन १९३६ रोजीं वेदोक्त पद्धतीनें अमृतसर येथें झालें. मी, माझे जामात काशिनाथराव देशमुख, भास्करराव जाधव, दौलतराव मामासाहेब मिणचेकर, वडगावचे दादा पाटील, व आमची धाकटी मुलगी इंदुमती, शिवाय बाळकिसन शिंदे व दोनचार नोकर बरोबर घेऊन लग्नास गेलों होतों. मी आईस व पत्नीस बरोबर नेणार होतों, पण शंकररावानी लीलावतीच्या आईवडिलांच्या सांगण्यावरून मला कळविलें होतें की पडद्यांत वावरणाऱ्या स्त्रिया लग्नसमारंभात हजर राहू शकत नाहींत. म्हणून त्या आमच्याबरोबर येऊ शकल्या नाहींत. शंकररावाची धाकटी बहीण इंदू त्या वेळीं पधरासोळा वर्षांची होती. पण तिला मात्र खास परवानगी मिळाली होती. लग्नानंतर आम्ही पंधरावडा मंडळी दिल्ली, मथुरा व आग्रा पाहून परत करवीरीं आलों. मागाहून शंकरराव आपल्या पत्नीसह कोल्हापुरास घरीं आले. नंतर त्यांच्यासह आम्ही पन्हाळ्यास देवदर्शनास गेलों. देवदर्शन झाल्यानंतर पत्नीसह शंकररावानी घरीं जाऊन आपल्या आईस व आजीस वंदन केलें. थोडे दिवस वडगावीं व कोल्हापुरास राहून दोघेहि परत गेलीं.

शंकररावाच्या पहिल्या मुलीचा (कुसुमचा) जन्म अमृतसरास तिच्या आजोळीं तारीख १९ जून १९३७ रोजीं झाला. ती दीड दोन महिन्यांची झाल्यावर तिची आई तिला घेऊन फिरोजपुरास भाऊसाहेबांकडे गेली. मुलीस पाहण्यास मी आईस व पत्नीस घेऊन ऑगस्ट महिन्यांत फिरोजपुरास गेलो होतो. तेथें थोडे दिवस राहून आम्ही हरिद्वारास गेलो. यात्रा करून दिल्ली, मथुरा व आग्रा पाहून चिरंजीव नानासाहेबांकडे ग्वाल्हेरास गेलों. येथें चार दिवस राहून परत येतांना मुलीकडे (सौ. आनंदीबाईकडे) कोपरगावास चार दिवस थांबून परत कोल्हापुरास आलों.

फिरोजपूरहून भाऊसाहेब यांची नंतर वजिरिस्तानांत बदली झाली. तेथून ते नंतर सिकंदराबादेस गेले. नंतर तेथून त्यांना केट्यास स्टाफ कॉलेजमध्ये पाठविले गेले. शंकरराव केट्यास असतांना सैन्यांतील थोरात नावाचे दुसरे एक अधिकारी वारले. ही हकीकत माझे स्नेही श्रीमंत रावसाहेब महाराज, देवास, यांनी वर्तमानपत्रांत वाचली आणि त्यांच्या गैरसमजुतीमुळें शंकरराव वारल्याची दुःखाची तार मला कोल्हापुरास आली. मला मोठा धक्का बसला. तथापि तारेंतील मजकुरावर माझा विश्वास बसेना. कारण त्या वेळीं केट्यास दगाधोपा काहीच नव्हता. ह्या तारेबद्दल घरीं कोणासहि न बोलता "मी बाहेर जाऊन येतो" असे पत्नीस सांगून मोटारींतून जनरल तारऑफिसकडे गेलों व केट्यास स्टाफ कॉलेजच्या प्रिन्सिपालास जरुरीचा फोन केला. त्या वेळीं लढाईचे दिवस होते. फोन पोचण्यास फार वेळ लागे. तथापि मी घरीं गेलों नाहीं. घरीं जाऊन पत्नीच्या समोर उभें राहण्याचा मला धीर होईना. म्हणून ड्रायव्हरला घरीं पाठवून निरोप कळविला कीं, काहीं जरुरीच्या कामामुळे मला घरीं येण्यास उशीर लागेल. नंतर फोनच्या उत्तराची वाट पाहत तारऑफिसांतच बसलों. एक तारहि शंकररावाच्या नावानें केली. फोन रजिस्टर केल्यापासून सातआठ तासांनी कॉलेजच्या कमांडन्टनी "काय पाहिजे" म्हणून विचारलें. मला आलेल्या दुःखाच्या तारेसंबंधी मी त्यांच्याशीं बोललों. त्यांनी ही बातमी खोटी असल्याचें सांगितलें. तेव्हां माझ्या जिवांत जीव आला. शंकररावहि फोनवर बोलले. घरीं जाऊन मी झालेली हकीकत पत्नीस सांगत होतों इतक्यांत, खुद्द शंकररावाची, आपण सुखरूप असल्याची तार आली. तारऑफिसांत टेलिफोनची वाट पाहत असतांना माझ्या मनाची काय स्थिति झाली असेल याची कल्पनाच करणें बरें! मी रावसाहेबांना तार करून शंकररावाची खुशाली कळविली. केट्यास असतांना सध्याचे पाकिस्तानचे प्रेसिडेंट फील्डमार्शल अयूबखानहि त्यांच्याच बरोबर होते. अयूबखान व शंकरराव एकाच पलटणींत होते. वास्तविक ते शंकररावाच्या मागून त्या पलटणींत आले होते. अजूनहि त्यांचा व अयूबखानाचा स्नेहसंबंध कायम आहे. स्टाफ कॉलेजची परीक्षा पास झाल्यानंतर शंकरराव मेजर झाले व त्यांची दिल्लीस आर्मी हेडक्वार्टर्समध्ये बदली झाली. ते दिल्लीस असतांना त्यांच्या दुसऱ्या मुलीचा (कुमुदचा) जन्म ३०-९-४२ रोजीं झाला.

सन १९४३ सालात मेजर असताना शकररावाची नेमणूक कोल्हापुरास राजाराम रायफल्सवर कमांडट म्हणून झाली. तेथे असताना ते सहकुटुंब कमांडटच्या बगल्यात राहत. ते कोल्हापुरास सुमारे एक वर्ष होते. तेथूनच ते जपानविरुद्ध लढण्यासाठी आसाममध्ये, ब्रह्मदेशच्या सरहद्दीवर कोहिमा भागात व नतर इफाल भागात गेले आणि तेथून रात्री ब्रह्मदेशात गेले.

दुसरे जागतिक महायुद्ध सुरू होण्यापूर्वी नऊ वर्षे अगोदर जपानने रशियाचा पराभव केला होता. आणि नतर थोड्याच दिवसानी चीनच्या पडत्या काळात, पश्चिम युरोपातील साम्राज्यवादी राष्ट्राबरोबर चीनच्या हद्दीत जपानने व्यापारी सवलती मिळविल्या आणि चीनचा काही भूभाग घशात टाकला होता. हिंदुस्थान व ब्रह्मदेश इग्रजाच्या ताब्यात होते. या देशावर जपानची वाकदृष्टि होती. इग्रजाच्या नशिबाने जपानला अमेरिकेच्या पर्लहार्बरवर हल्ला करून अमेरिकेची कुरापत काढण्याची कुबुद्धि सुचली. त्यामुळे अमेरिकेस युद्धात पडण भाग पडल. त्याच वेळी जपानने खालून इडोचायना घेऊन, उत्तरेकडून आसामच्या बाजूने व दक्षिणेकडून सयाम ब्रह्मदेशाच्या बाजूने चढाई सुरू केली होती. कारण हे मधील देश काबीज केल्याशिवाय जपान्याना हिंदुस्थानावर चाल करून येणे शक्य नव्हते. दोस्तराष्ट्रात अमेरिका सामील झाल्यामुळे त्या दोनहि आघाड्यावर इग्रजाच्या हिंदी व गोऱ्या पलटणींबरोबर अमेरिकेचे सैन्यहि जपानच्या चावटळीस प्रतिकार करात होत वेळोवेळी नव्या दमाच्या पलटणी हिंदुस्थानातून या आघाडीवर पाठविल्या जात होत्या. त्यातूनच सन १९४४ साला शकरराव मेजर असताना आसाम ब्रह्मदेश आघाडीवर रवाना झाले. तिकडे कोहिमा आणि इफाल भागात मोठ्या लढाया झाल्या.

'युद्धस्य कथा रम्या' अशी एक म्हण आहे. लढायाच्या वार्ता ऐकण्यास व वाचण्यास फार मनोरजक असतात, पण योद्धयाच्या अडचणींची व शारीरिक कष्टाची कल्पना फारच थोड्या लोकाना असते सैनिक असल्या अडचणी आतेष्टास कळवीत नाहीत. मी पण त्या वेळीं शकररावाना असली माहिती विचारली नव्हती. नोकरीतून निवृत्त होऊन घरीं आल्यावर सहज कोहिमा, इफाल व काराकच्या लढाईविषयी बोलत असताना त्याना मा त्या वेळच्या रणागणातील रोजच्या कार्यक्रमाबद्दल विचारल. त्या वेळीं त्यानी जी रोचक माहिती दिली, त्यावरून कळून आले की, फार काळ रात्रदिवस चालणाऱ्या लढाईत, विशेषेकरून ज्या ठिकाणीं रस्ते नाहीत व जेथे रसद पोचविण्याची अडचण असते तेथ, वळोवेळीं सैनिकाची फार उपासमार व कुचबणा होते. असे प्रसग इफाल, कोहिमा भागात वरचेवर आले. आमच्या लोकाना शिळ्या बिस्किटावर व चीजवर दिवस काढावे लागले. आमच्या तात्पुरत्या लष्करी ठाण्यात अन्नपुरवठा भरपूर होता, पण रसद पोचविणे फार मुष्किलीच होते. कधीकधी विमानातून खाद्यपदार्थ आपल्या गोटात टाकले जात, पण त्यापैकी काही भाग शत्रूच्या गोटाजवळ पडे; अर्थात् त्याचा उपयोग शत्रूला होई.

आसाम-ब्रह्मदेश सरहद्दीवर पुष्कळ निकराच्या लढाया झाल्या. या लढायात शकररावांची कर्तबगारी व शौर्य प्रामुख्याने दिसून आल्याने, त्याना दुसऱ्या पंजाब रेजिमेंटच्या पहिल्या पलटणीवर लेफ्टनंट कर्नल म्हणून बढतीवर नेमण्यात आलें. प्रथमच त्याना ही पुऱ्या पलटणीची कमांड मिळाली. दुसरी पंजाब पलटण पश्चिम ब्रह्मदेशात जपानी चढाईला तोंड देत होती. आराकान रणक्षेत्रात तुंबळ युद्ध चाललें होतें. नैतिक विवेकाचा भाग डोळ्याआड केला तर असें म्हणावें लागतें की, जपानी वीर जिवाची पर्वा न करता झुंजत होते. आमचें सैन्यहि त्यांच्याशीं टक्कर देत होतें. दोन्ही बाजूचे सैनिक व अधिकारी पटापट रणभूमीवर पडत. अशाच धारातीर्थी पडलेल्या एका लेफ्टनंट कर्नलच्या रिकाम्या झालेल्या जागेवर सन १९४४ सालीं शकररावांची नेमणूक झाली. त्याच सुमारास थिमय्या हे लेफ्टनंट कर्नल म्हणून हैदराबाद रेजिमेंटवर, याच युद्धक्षेत्रात, साथसाथ लढत होते.

आराकान रणक्षेत्रावर युद्धाची धनचक्कर चालली होती. पुष्कळ निकराच्या लढाया झाल्या. त्यातील फार महत्त्वाची लढाई कांगावची असें गणलें जात. कांगावच्या घनघोर लढाईत शकररावांनी अतुल शौर्य व युद्धकौशल्य दाखविलें. ही लढाई निर्णयात्मक ठरली व जपानी सैन्याने पाऊल मागे घेतलें. ही लढाई सतत तेवीस दिवस रात्रंदिन चालू होती. या लढाइत शकररावांच्या पलटणींपैकी तिसरा हिस्सा माणसें कामास आली. उलटपक्षीं त्यांच्या पलटणीनें आपल्या संख्येच्या तिप्पटीपेक्षा जास्त जपान्यांना यमसदनीं पाठवून मोठा विजय मिळविला. शकररावांच्या कौशल्यपूर्ण शौर्याबद्दल हिंदुस्थान सरकारच्या मुख्य सेनापतीकडून त्याना शाबासकी मिळाली व डी० एस्० ओ० (डिस्टिंग्विश्ड सर्व्हिस ऑर्डर) हा अत्यंत मौल्यवान किताबहि मिळाला. डी० एस्० ओ० किताब त्या काळपर्यंत फारच थोड्या हिंदी सेनानींना मिळाला होता.

शकरराव व थिमय्या याना बरोबरच डी० एस्० ओ० करण्यात आलें. फार दिवस रात्रंदिवस चालणाऱ्या या कांगावच्या लढाईत, अर्धी पलटण लढत असताना अर्ध्या पलटणीला विसावा देण्यात येई. पण एखाद्या दिवशीं शत्रूकडून अचानक मोठा हल्ला आला तर विसावा घेत असलेल्या लोकांना क्षणार्धात तयार होऊन लढाईत सामील व्हावें लागे. विसाव्याच्या वेळीं सदकाव गुपचुप पडून राहावें लागे. दिवाबत्ती वा विजेरी (टॉर्च) लावावयाची नाही, मोठ्याने बोलावयाचें नाही. बिछान्यावर असलेल्या माणसास खुणविता यावें म्हणून एका लांब रस्सीने त्यांच्या प्रत्येका पायास विडा देत असत. असली दोरी ओढूनच त्याना जागं करावें लागत असे. याच खंदकात त्यांचें खाणेंपिणें व्हावयाचें. पिण्यालाच पाणी थोडें, तर कपडे धुण्यास पाणी कोठून मिळणार? यामुळे कपड्यात उवा होत असत. मोकळ्या वेळीं उवा वेचून मारणें, हा एक उद्योगच होऊन बसत असे. लढाईच्या त्या दिवसात त्या भागात उकाडा फार होता. तेथील हवेत दमटपणा असतोच, त्यामुळे अगादून

घाम गळत असे. विमानावर असलेले शिपाई व अधिकारी आपूड विजारीवर काही न घालता उघडेच असत. रात्र पडू लागताच मच्छरांचें मोहोळ उठे. त्याला उपाय म्हणजे रॉनेल्सारखें एक प्रकारचे तेल अंगास लावावयाचे. पावसाची झिमझिम तिकडे नेहमीच असते. त्यामुळे जिकडेतिकडे चिखल असल्याने निसरड्यात गाड्या चालविण्यास अडचण पडे. म्हणून मोटारीच्या चाकाना साखळ्या गुंडाळाव्या लागत. रस्ते नसल्यामुळे कित्येक प्रसंगीं छातीइतक्या खोल पाण्यातून पलीकडे चालत जावें लागे. अंगावरचे ओले कपडे अंगावरच वाळवावे लागत. या जंगलात पावसाळ्याच्या सुमारास जळवा फार. या जळवा आगपेटीतील काडीएवढ्या जाडीच्या दिसतात. त्या अंगास डसल्या तरीहि प्रथम काही वेळ कळत नाही. अंगातील रक्त शोषून त्या फुगून अंगठ्याएवढ्या होऊन खाली पडतात; त्याना ओढूनहि काढता येत नाही. ओढून काढण्याचा प्रयत्न केल्यास त्या तुटून त्याची तोंडें कातडींतच राहतात. त्यासाठी जळू लागल्याठिकाणीं थोडी हळदीची पूड लाविली तर रक्त वाहणें थांबतें व जळूहि खाली गळून पडते. फुरसत मिळाली व जवळ ओढानाला असला तर आंघोळ करावी व कपडेहि पिळून वाळवावेत. त्याचप्रमाणे शिपायाना नेहमी जवळच्या तात्पुरत्या (बेस) इस्पितळात पाठविणे अवघड होई. लढाईत मेलेल्या लोकाना जाळण्याची अडचण, त्याचीं प्रेतं पुरणेंच भाग पडे प्रेतें पुरण्यापूर्वी, त्याचे अंत्यविधि मृताचे सोबती श्रद्धापूर्वक करीत.

आराकानमध्ये हिंदी लष्कराने फार कष्ट सोसले व शौर्यहि दाखविले. हाताखालच्या सैनिकाबद्दल शकररावाना फार अभिमान वाटतो. ते म्हणतात, "आमच्या शिपायानी अशक्य गोष्टी शक्य करून दाखविल्या. त्यांच्या वैयक्तिक शौर्याची कमाल आहे. मरणाची भीति त्याना नव्हतीच. आपण कशासाठी लढतो हें उमजण्यापेक्षा ते आपल्या पलटणीच्या इभ्रतीबद्दल फार जागरूक असत." पुढे ते असेहि म्हणाले की, प्रत्यक्ष लढाईतील अडचणींस तोंड देता यावें म्हणून लढाई तोंडावर आली नसलीच आपल्याच लष्करातील निरनिराळ्या पलटणी लढाईची तालीम घेतात. त्या वेळीं त्याना प्रत्यक्ष लढाईच्या वेळेप्रमाणे खंदकात राहावें लागत. पाण्याविना काही दिवस काढावे लागतात व दोनदोन तीनतीन दिवस नुसत्या चारदोन बिस्किटावर राहाव लागतें. थोडक्यात सांगावयाचें म्हणजे सैनिकाना नेहमीच असलें कष्टप्रद जीवन जगावें लागत. आणि म्हणूनच त्याच्या अंगी दणकटपणा व सोशिकपणा असावा लागतो.

मागे लिहिल्याप्रमाणे काकावच्या लढाईत शकररावानी व त्याच्या पलटणीने पुष्कळ दिवस काम केल्यावर, त्यांची पलटण सन १९४५ त परत स्वदेशीं आली. पण लागलीच शकररावाना पलटण घेऊन मलायात जावें लागले. तेथे जपान्याची चढाई चालू होती, तिला प्रतिकार करण्यासाठी मलायात जाण्याचा हुकूम मिळाला व त्याप्रमाणे त्याची पलटण मुंबईहून मलायास रवाना झाली. पण पलटण तेथे पोचण्यापूर्वीच

जपान्यानी शस्त्रे खाली ठेवली होती. पल्टण मलायात असतानाच शकररावाना बढती मिळून ते २५ व्या डिव्हिजनचे असिस्टंट ॲडज्युटंट आणि क्वार्टर मास्टर जनरल झाले.

सन १९४६ साली शकरराव मलायाहून परत आले आणि लागलीच कर्नल होऊन आर्मी हेडक्वार्टर्समध्ये डेप्युटी डायरेक्टर ऑफ पर्सनल सर्व्हिसेस म्हणून नेमले गेले. पुढे तीनचार महिन्याच्या आतच त्याना पुन्हा बढती मिळून ते ब्रिगेडिअर झाले आणि एका फार महत्त्वाच्या योजनेवर त्याची नेमणूक झाली. आता पुण्याजवळ खडकवासल्यास नॅशनल डिफेन्स ॲकॅडेमी म्हणून उच्च लष्करी शिक्षण देण्याची जी सस्था आहे तिची आखणी, तीस लागणाऱ्या इमारतींचे बाधकाम, तेथील शिक्षणक्रम या सर्वांचा आराखडा करून निर्णय घेण्यासाठी हिंदुस्थान सरकारने जी एक समिति नेमली तिचे त्याना सेक्रेटरी नेमिले. या समितीचे अध्यक्ष त्या वेळचे कमाडर इन् चीफ् फील्ड मार्शल ऑकिनलेक व उपाध्यक्ष डॉ० अमरनाथ झा हे होते.

ॲकॅडेमीची योजना अभूतपूर्व अशी होती. कारण जगात इतर कोणत्याहि देशात पायदळ, नौदळ व हवाई दळ यासाठी एके ठिकाणी एकत्र शिक्षणाचा प्रयोग कोठेहि झालेला नव्हता. हा प्रयोग प्रथम हिंदुस्थानातच झाला व तो यशस्वीहि झाला आहे, असे आता म्हणता येईल. ह्या संस्थेचा शिक्षणक्रम, बाधकामाचा आराखडा, सामानसुमानाची जुळवाजुळव व इतर सर्व बाबतींत शकररावाचा हात मोठ्या प्रमाणात होता. ॲकॅडेमीसाठी लागणारी जमीन शकररावानीच मुबई सरकारकडून विनामूल्य मिळविली. त्यासाठी त्याना अत्यत प्रयत्न करावे लागले; कारण त्या वेळचे मुबईसरकार जमीन विनामूल्य देण्यास कचरत होत. शेवटीं सरदार वल्लभभाई पटेल याच्या मध्यस्थीने शकररावानी खडकवासल्याजवळची सुमारें बारा हजार एकर जमीन मिळविली, म्हणूनच ॲकॅडेमी इतक्या लवकर अस्तित्वात आली. तिला महाराष्ट्रात आणण्याचें पुष्कळसे श्रेय शकररावास दिले पाहिजे असे जाणते लोक मानतात.

सन १९४७ साली शकररावाना ब्रिगेड कमाडर म्हणून बिहारमध्ये राची येथे पाठविण्यात आलें. या अवधीत कलकत्त्यास झालेल्या दुसऱ्या भयकर दग्याचा बदोबस्त करणे त्याच्याचकडे आले.

ऑगस्ट १९४७ साली हिंदुस्थान देशाची फाळणी होऊन त्यातून नव्या दोन राष्ट्राची—भारत व पाकिस्तानची—उभारणी झाली. नवीन सुरू केलेल्या स्वतत्र भारताच्या मुख्य लष्करी कचेरींत शकरराव हे डायरेक्टर ऑफ स्टाफ ड्यूटीज् व डायरेक्टर ऑफ वेपन्स ॲण्ड इक्विपमेंट म्हणून आले. ते या कामावर असतानाच दिल्लीस महात्मा गाधींचा खून झाला. दिल्लींत जाळपोळ, लुटालूट व हाणामाऱ्या सुरू झाल्या. तावडतोब शकररावाना दिल्ली एरिया कमाडर व मेजर जनरल हा हुद्दा देण्यात आला, आणि दिल्लीचे सरक्षण करण्याची कामगिरी त्याच्यावर सोपविली गेली. या वेळीं लाखों हिंदु पाकिस्तानातून हिंदुस्थानात व लाखों मुसलमान हिंदुस्थानातून पाकिस्तानात जात होते. जाळपोळ, खून वा मारामाऱ्या मोकाट

चालल्या होत्या. दिल्ली शहरात दिवसाढवळ्या कत्तली होत होत्या आणि सगळीकडे जणू बेबंदशाही माजली आहे, असे दिसत होतें. असल्या बिकट प्रसंगात दिल्लीचें संरक्षण व बंदोबस्त या दोन जबाबदाऱ्या शंकररावांच्या शिरावर पडल्या. दंगली शमविणें व निर्वासितांचें संरक्षण करणें हें काम अवघड खरेंच, पण त्यांनी ही जबाबदारी योग्य रीतीनें पार पाडली असावी, म्हणून की काय, दिल्लीमध्ये शांतता प्रस्थापित होताच त्यांना सन १९४८ सालीं ईस्ट पंजाब एरिया कमांडर म्हणून पंजाबच्या बंदोबस्तासाठी पाठविण्यात आलें. आता नवीन स्थापन झालेल्या पूर्व पंजाब व पश्चिम पंजाब (वा पाकिस्तान) यांच्यामधील सरहद्दीच्या संरक्षणाची जबाबदारी त्यांच्यावर येऊन पडली. ते तेथ अडीच वर्षें राहिले, आणि त्यांनी घालून दिलेल्या लष्करी योजना आजहि तशाच चालू आहेत, असे ऐकतों. त्या वेळीं पंजाबात अत्यंत कठीण परिस्थिति निर्माण झाली होती. मधूनमधून पश्चिमेकडून आपल्या भागात डाके पडत. निर्वासितांची स्थिति तर फारच अनुकंपनीय झाली होती. लाखो लोक निर्वासितांच्या छावण्यात राहत होते. अनाथ झालेल्या हजारों हिंदु स्त्रिया पाकिस्तानात धरून ठेविल्या गेल्या होत्या व त्यांचा शोध चालू होता. हिंदुस्थान पाकिस्तान सरकार मध्ये मालमत्तेचे, नद्यांतील पाण्याच्या वाटणीचे व इतर शेकडों झगडे चालू होते आणि तेथील जनतेच्या जीविताची घडी विसकटून गेली होती. अशा आणीबाणीच्या काळात शंकररावांनी फार मेहनत घेऊन ही घडी परत नीट बसविण्यासाठी पुष्कळच मदत केली. त्यामुळे शंकररावांचा मोठा लौकिक झाला. या बाबतींत अजूनहि तिकडील लोक त्यांचें नाव आदरानें घेतात.

सन १९५० सालीं शंकररावांचें भगंद्रावरचें ऑपरेशन झालें. ते हॉस्पिटलमध्ये असतानाच त्यांची नेमणूक चीफ ऑफ दि जनरल स्टाफ या महत्त्वाच्या जागेवर झाली. सर्व सैन्यात व आर्मी हेडक्वार्टर्समध्ये ही नेमणूक महत्त्वाची व अत्यंत जबाबदारीची समजली जाते. अखिल भारतीय सैन्याच्या व देशाच्या संरक्षणाच्या बहुतेक सर्व महत्त्वाच्या योजना आता त्यांच्या सल्ल्यानें किंवा हुकुमानें होऊं लागल्या. उदाहरणार्थ ट्रेनिंग (शिक्षण), युद्धसामग्रीचा बंदोबस्त, मिलिटरी इंटेलिजन्स (लष्करी हेर खातें), टेरिटोरियल आर्मी (प्रादेशिक सैन्य), वगैरे सर्व खातीं त्यांच्या हातीं आलीं आणि तीं त्यांनी फार दक्षतेनें चालविलीं असें अनुभवी लष्करी अधिकारी सांगतात.

या जागेवर असतानाच शंकरराव विमानाच्या एका भयंकर अपघातांत सापडले होते. दोन इंजिनांच्या विमानातून लष्करी पाहणीसाठी ते लखनौला गेले होते. परत येतांना त्या विमानाच्या एका इंजिनानें एकाएकी पेट घेतला. पाहतां पाहतां आग भडकली आणि आता पसरलेल्या आगीचा स्फोट होतो का विमान उडून खालीं पडतें, एवढाच प्रश्न राहिला होता. सुदैवयोगानें फक्त पेटलेलें इंजिन सुटून खालीं पडलें. एक इंजिन सुटून पडल्यामुळे विमानाचा समतोलपणा सुटला व तेथून त्यांचे सगळे सुटकेचे मार्ग खुंटले. तथापि वैमानिकाच्या प्रसंगावधानानें व धैर्यानें विमान

करुं तरी उनिनीपर्यंत आगिलें. बेली लॅंडिंग करण्यामुळे (विमान पोटावर उतरल्यामुळे) त ताळी आपटून त्याची फार मोडतोड झाली. पण आत असलेले शकरराव व दुसरे सहा लष्करी अधिकारी ईश्वरकृपेने सुखरूप वाचले. त्यात जनरल श्रीनागेश व जनरल थिमय्या पण होते.

संयुक्त राष्ट्राच्या विनंतीला मान देऊन सन १९५३ साली हिंदुस्थान सरकारने जी फौज कोरियाला पाठविली तिचें नाव 'कस्टोडियन फोर्स ऑफ इंडिया' असं होतें. ही फौज कोरियातील युद्धकैद्याचा प्रश्न सोडविण्यासाठी पाठविली होती. हे हिंदी सैन्य फक्त सहा हजार होतं. पण त्यावरची जबाबदारी फार मोठी व आंतरराष्ट्रीय स्वरूपाची होती, म्हणून या फौजेच्या वरिष्ठ अधिकारपदासाठी कोणाची निवड करावी या विषयावर पुष्कळ ऊहापोह झाला. शेवटी हिंदुस्थान सरकारने या कामासाठी शकररावाची निवड केली.

सन १९५३ च्या जुलै महिन्यात शकरराव प्रथम एकटच कोरियाला गले. तेथ दक्षिण कोरिया, उत्तर कोरिया व युनायटेड नेशन्स कमाड याच्याशी विचारविनिमय करून परत आले. सर्व प्रश्नांचा प्रत्यक्ष जागवर विचार करून त्यानी युद्धकैद्याच्या सोडवणुकीसंबंधी सरकारला ज्या सूचना केल्या त्या मजूर झाल्या आणि सहा हजार सैनिक घेऊन शकरराव सप्टेंबर महिन्यात परत कोरियाला गले. कोरियात त्यानी डीमिलिटराइज्ड झोनमध्ये (नि शस्त्रीकरण केलेला भाग) तळ दिला व बत्तीस हजार कम्युनिस्ट व अँटीकम्युनिस्ट युद्धकैद्याना ताब्यात घेतलें. शकररावानी आपल्या छावणीला 'हिंदनगर' असे नाव दिलं होतं. तेथे त्याना सात महिने राहावें लागलें.

कम्युनिस्ट व अँटीकम्युनिस्ट कैद्याचा प्रश्न फार नाजूक व बिकट होता. म्हणून संयुक्त राष्ट्राच्या प्रतिनिधि-मडळाने, जनरल थिमय्याच्या अध्यक्षतेखाली एक रिपॅट्रिएशन कमिशन नेमिलें होतें. या कमिशनचं काम ज्या देशाचे युद्धकैदी त्या देशाला परत करणें हें होतं. या मडळातील सभासदामध्ये मतैक्य नव्हतं. त्यामुळे शकररावाच आणि त्याच्या हाताखालील शातता व बदोबस्ताकरिता दिलेल्या फौजेचें काम फार नाजूक व अवघड झालं होतं. कम्युनिस्ट देशाच्या प्रतिनिधींचें म्हणणें एक, तर नॉन कम्युनिस्ट देशाच्या प्रतिनिधीचें म्हणणें त्याच्या अगदी विरुद्ध. कस्टोडियन फोर्सला न्यूट्रल नेशन्स रिपॅट्रिएशन कमिशनने आखून दिलेल्या धोरणाप्रमाणे काम करावयाचें होतें; पण आपसांतल्या वेबनावामुळे हें धोरण राबण्यास कस्टोडियन फोर्सला कठीण पडे. तरी पण शकररावानी मुत्सद्दीपणाने दोन्ही बाजू साभाळून चातुर्याने आपली कामगिरी कशी बजावली, हें आता इतिहासप्रसिद्ध आहे. त्याच्या कामाचा गौरव कम्युनिस्ट व नॉनकम्युनिस्ट राष्ट्रानी मुक्तकठाने केला आहे. आंतरराष्ट्रीय राजकारणात हिंदुस्थानचा जो दर्जा आता वाढला आहे, त्याचा पाया हिंदुस्थानी सैन्याच्या कोरियातल्या कामगिरीने घातला होता, असें म्हटल्यास अतिशयोक्ति होणार नाही.

कोरियात असताना एकदा युद्धकैद्यांनी कस्टोडियन फोर्सचा एक अधिकारी मेजर ग्रेवॉल याला जबरदस्तीने पकडून नेऊन व आपल्या गोटात कोंडून ठेविला. या गडबडीच्या वेळीच शंकरराव तेथे पाहणीसाठी गेले होते. त्यांनी हा प्रकार पाहताच स्वतः नि:शस्त्र असूनहि ते बेधडक कैद्यांच्या गटवात घुसले. कैद्यांनी त्यांना पण घेरा घातला. मेजर ग्रेवॉलचा जीव संकटात होताच, आता शंकरराव पण तसल्याच धोक्यात पडले. तरी ते संतापलेल्या कैद्यांस म्हणाले, "ग्रेवॉलला घेतल्याखेरीज मी येथून हलणार नाही." कैदी त्यांच्यावर चालून आले. जागेवरून न हलता त्यांनी शांतपणे निश्चयात्मक स्वरात सांगितले, "माझा माणूस मला पाहिजे." ही बोलाचाली पाहून हिंदी कस्टोडियन फोर्सचे अधिकारी व जवान चिडले. आपल्या मंडळींना घेरलेले पाहून ते संतापले व त्यांनी कैद्यांच्या तळाला वेढा घातला आणि त्यांच्यावर गोळीबार करण्यास बंदुका उचलल्या. हे पाहताच कैद्यांनी धमकी दिली की "आमच्यावर गोळीबार कराल तर तुमच्या कमांडरची धडगत नाही, हे लक्षात ठेवा." कस्टोडियन फोर्सने त्या पाचशे कैद्यांच्या तळाला कापून काढण्याची धमकी दिली. पण त्यांचे हात गुंतलेले होते, कारण शंकरराव कैद्यांच्या कडवात होते. प्रसंग अत्यंत आणीबाणीचा होता! काय करावें हे कोणालाहि उमजेना! शंकरराव मात्र कैद्यांशीं शांतपणे बोलत होते.

हा सर्व प्रकार चालू असतां, एकाएकी शंकरराव एका कैद्याकडे वळून हसत म्हणाले, "अरे! मीं तर ऐकले होतें की तुम्ही चिनी लोक फार आतिथ्यशील; पण मी तुमच्यामध्ये दीड तास उभा असून मला कोणी चहा किंवा सिगारेटहि दिली नाही. तुम्ही चिनी असले कसले? आणि तुमचे आदरातिथ्य गेलें कोठे!" कैदी आश्चर्यचकित होऊन एकमेकांकडे वेड्यासारखे पाहतच राहिले. मग एकाएकी पळापळीस सुरुवात झाली. कोणी चहा आणला, तर कोणी सिगारेट्स आणल्या. वातावरण एकदम बदललें. कैद्यांचा संताप कोठल्या कोठे विरघळून गेला. शंकररावांच्या निश्चल शांतपणापुढे कैद्यांनी हार खाल्ली. मेजर ग्रेवॉल मुक्त झाला. त्याला घेऊन परत येतांना, जे कैदी त्याला व शंकररावांना ठार मारण्यास उठले होते, त्यांनीच मोठ्या मानाची सलामी त्या दोघांना दिली. या प्रसंगावरून शंकररावांच्या प्रसंगावधानाचा जगातील सर्व राष्ट्रांनी मुक्तकंठाने गौरव केला. या वेळच्या शौर्याची वाखाणणी करून हिंदुस्थान सरकारने त्यांना 'अशोकचक्र' हे बहुमानाचे पदक दिलें.

कोरियातील कामगिरी संपवून शंकरराव मार्च १९५४ सालीं हिंदुस्थानात परत आले. दिल्ली शहरात त्यांचा फार मोठ्या प्रमाणात गौरव झाला आणि सरकारने त्यांना 'पद्मश्री' हा किताब बहाल केला.

महाराष्ट्रात तर त्यांचा गौरव करण्यासाठी जणू चुरसच लागली. कोल्हापूरच्या नागरिकांनी त्यांचें प्रचंड स्वागत केले. मोठी मिरवणूक काढली व मोठा सत्कार-समारंभ केला. छत्रपति शहाजीमहाराजांनी त्यांना नव्या राजवाड्यावर मोठी पार्टी

दिली, व 'शुजाराव' किताब देऊन सोन्याची तलवार भेट दिली. इतर शेकडो ठिकाणी पण त्याचा सत्कार झाला. कोरियातील कामगिरीमुळे शंकररावाचे नाव हिंदुस्थानातच नव्हे तर सर्व जगात प्रसिद्ध झालें. कोल्हापूर व इचलकरंजी येथील सत्कारसमयी मी हजर होतो. मला फार आनंद झाला व धन्यता वाटली.

कोरियाहून परत आल्यावर सन १९५४ त शंकररावाची नेमणूक प्रथम पाचव्या डिव्हिजनचे व नंतर अकराव्या कोअरचे 'जनरल ऑफिसर कमांडिंग' म्हणून झाली. सन १९५७ साली त्यास ईस्टर्न कमांडचे 'जनरल ऑफिसर कमांडिंग इन् चीफ' नेमण्यात आलें व ते लखनौला त्या जागेवर रुजू झाले. त्याच्या लष्करी देखरेखीखाली सबंध पूर्वहिंदुस्थान आला. उत्तरप्रदेश, बिहार, बंगाल, आसाम, ओरिसा हे प्रदेश, तसेच मणिपूर, त्रिपुरा, नागा हिल्स व नॉर्थईस्टर्न फ्रॉंटिअर एजन्सी हे भाग त्याच्या लष्करी हुकमतीखाली आले. नेपाळ, भूतान व सिक्कीम याच्या सरक्षणाची जबाबदारी पण त्याच्यावरच पडली.

ईस्टर्न कमांड लष्करी दृष्टीने अत्यंत महत्त्वाची आहे. कारण पश्चिमेस पाकिस्तानची, उत्तरेस तिबेटची सरहद्द, पूर्वेला ब्रह्मदेशाची व पूर्वपाकिस्तानची पुरा सरहद्द ह्या सर्व ईस्टर्न कमांडमध्ये येतात. तसेच नागा हिल्समधील चाललेल्या चकमकी पण ईस्टर्न कमांडच्या हुकमतीखाली होत्या. या सर्वांची जबाबदारी पण शंकररावावरच पडली. त्यातच चीनने 'लागजू' ठाण्यावर आक्रमण केल्यावर ही जबाबदारी फारच वाढली.

जेव्हा चीनचे आक्रमण झालें, तेव्हा उत्तर सरहद्दीवर हिंदुस्थानी सैन्य पुरेसे नव्हतें, व सरक्षणाची तयारी फारशी नव्हती. कारण त्या वेळीं सरकारच सर्व लक्ष काश्मीरच्या प्रश्नाकडे लागलेल होतं. उत्तर सरहद्दीच्या संपूर्ण सरक्षणाची योजना शंकररावानीच आखली. त्यासाठी ते दोन वर्षे मेहनत करात राहिले. ज्या ज्या योजना त्यानी आखून दिल्या, त्या आजहि तशाच चालू आहेत. नागा हिल्समधील त्याच्या योजना पण चालू आहेत. जरी शंकररावाना नागा लोकाशीं लढाया कराव्या लागल्या तरी पराभूत नागास त्यानी चांगल्या रीतीनें वागविलें असल्यामुळे नागा लोकाच त्याच्यावर प्रेम व विश्वास होता व अजूनहि आहे. नागा लोकास शंकररावाबद्दल आदर वाटतो असे म्हणतात.

सन १९६१ साली जनरल थिमय्या 'चीफ ऑफ दि आर्मी स्टाफ'ची जागा सोडणार असें ठरलें, तेव्हा लोकाची अपेक्षा होती की शंकररावच या जागेवर येतील. ती जागा त्याना का देण्यात आली नाही, याचा गवगवा देशभर वर्तमानपत्रातच झाला असे नाही, तर पार्लमेंटमध्ये पण 'जनरल थोराताना या जागवर नेमलं नाही, हा सरकारची फार मोठी चूक आहे' अशीं कित्येकानी विधानें केली.

तारीख ८ मे १९६१ साली सदतीस वर्षे लष्करी नोकरी पुरी झाल्यानंतर शंकरराव सेवानिवृत्त झाले आणि स्वत:च्या घरीं स्थायिक होण्याच्या उद्देशाने आपले

सामानसुमान घेऊन कोल्हापुरास आले. पण ऑक्टोबर १९६१ मध्येच महाराष्ट्र सरकारने त्याना महाराष्ट्र पब्लिक सर्व्हिस कमिशनच्या चेअरमनची जागा दिली आणि ते आता त्या पदावर आहेत. शिवाय नोव्हेंबर १९६२ त पंडित नेहरूंनी चिनी आक्रमणानंतर जें डिफेन्स कौन्सिल नेमलें त्यावरहि त्याना घेतलें आहे.

शंकररावाना अपत्यें तीन. सर्वांत मोठी मुलगी कुसुम ही एम्० ए० आहे. तिचें लग्न श्री० चांदनारायण कपूर, डेप्युटी डायरेक्टर, रेल्वे बोर्ड यांच्याशीं झालें असून तिला एक मुलगी व एक मुलगा अशीं दोन मुलें आहेत. दुसरी मुलगी कुमुद हीहि एम्० ए० आहे. तिचें लग्न अलीकडेच श्री० रुपेन घोस यांच्याशीं झालें. तिला एक मुलगी आहे. तिसरें व सर्वांत लहान अपत्य यशवंत हा अजमेरच्या मेयो कॉलेजांत (पब्लिक स्कूलमध्ये) शिकत असे. तो गेल्याच महिन्यात सीनियर केंब्रिजची परीक्षा पास झाला.

शंकररावाचें कौटुंबिक जीवन सुखाचें आहे. त्यांची पत्नी डॉक्टर लीलावती संसारांत व व्यवहारांत दक्ष असल्याने त्याना घरच्या दैनंदिन व्यवहाराकडे पाहावें लागत नाहीं. सध्याच्या लष्करी अधिकाऱ्याच्या जीवनात गृहिणीचा दर्जा मोठा असतो. लीलावतीने तो चांगला सांभाळल्याने शंकररावाचें जीवन सुखी झालें आहे. तें त्यांच्या दर्जास साजेसें करण्यात तिचा मोठा भाग आहे. शंकरराव जेथे जेथे जात तेथे तेथे त्यांची पत्नी सैनिकांच्या व इतर लोकांच्या स्त्रीवर्गाच्या व त्यांच्या मुलांच्या औषधपाण्याची सोय करी. दिल्लीस तिने इतर मोठ्या अधिकाऱ्यांच्या बायकांस बरोबर घेऊन एक बरेंच मोठें खासगी हॉस्पिटल चालविलें होतें. तें आता सरकार चालवितें. शंकरराव कोल्हापुरास कमांडट असताना, लीलावतीने तेथील सर्व्हिस हॉस्पिटल रंगारूपास आणिलें व पद्माराजे हॉस्पिटलांत मॅटर्निटी वॉर्ड काढण्यात पुढाकार घेतला होता.

शंकरराव धार्मिक वृत्तीचे आहेत. त्यांच्या घरीं नित्य देवपूजा चालते. फिरतीवर असतानासुद्धा पंढरपूरच्या विठोबाची लहानशी मूर्ति त्यांच्याबरोबर असते. माझ्याशीं व माझ्या पत्नीशीं ते फार प्रेमाने व नम्रतेने वागले, इतकेंच नव्हे तर गावच्या वडील मंडळींशीं व माझ्या स्नेह्यासोबत्यांशीं फार विनयाने वागतात. चिरंजीव सौभाग्यवती लीलावती तशीच धार्मिक वृत्तीची आहे. तिची पूजाअर्चा रोज सकाळीं बराच वेळ चालते. शंकररावाचें कौटुंबिक जीवन सुखाचें आहे.

माझे दुसरे चिरंजीव दिनकरराव (बाबासाहेब) यांचा जन्म पुण्याजवळ लोणी येथे शेतकरी शाळेत तारीख १९ माहे एप्रिल १९१४ रोजीं झाला. बारशानंतर त्यास घेऊन आम्ही पुण्यास गेलों. सहा महिन्यानी माझी बदली एक्स्ट्रा डेप्युटी डायरेक्टर ऑफ ॲग्रिकल्चर, कोंकण भाग म्हणून रत्नागिरीस झाली. तेव्हा बाबासाहेब अवघे सहा महिन्याचे होते. त्या काळीं बस-सर्व्हिस नव्हती.

बाबासाहेबांचे मराठी शिक्षण श्रीशिवाजी सोमायटीच्या मराठी शाळेत व इंग्रजी शिक्षण शिवाजी हायस्कुलांत झालें. ते सन १९३३ त मॅट्रिक पास झाले. त्या वेळीं मी सेवानिवृत्त होऊन कोल्हापुरास राहत होतों म्हणून बाबासाहेबांनी कोल्हापुरास राजाराम कालेजमध्ये प्रवेश मिळविला ते सन १९३७ सालीं बी० ए० झाले.

त्यांचा बी० ए०च्या परीक्षेचा निकाल लागण्यापूर्वी पधरा दिवस मी मुंबईस गलों असल्यावेळीं ग्वाल्हेरचे महाराज कै० जयाजीराव शिंदे तथे आपल्या 'समुद्रमहाल'त राहत होते. त्यांना सहज भेगवयास गलों असताना ते म्हणाले, "पाटीलसाहेब, तुम्ही नोकरींत असताना ग्वाल्हेरीस यांवें अशी माझ्या वडिलांची (माधवरावमहाराजांची) फार इच्छा होती. त्या वेळीं तुम्हास येतां आलें नाही. पुढे तुम्ही पेन्शन घेतल्यावर सुद्धा आमच्याकडे याव असे मीं म्हटल, पण तुम्ही टाळाटाळ केलीत. असो; तुम्ही नाहीं तर नाही, पण तुमचा एक तरी मुलगा आमच्याकडे द्या तुमचे थोरले चिरंजीव कॅप्टन शंकरराव तर येणं शक्य नाही. तुमचा दुसरा मुलगा काय करतो?" मी म्हणालों, "तो बी० ए०च्या परीक्षेस बसला आहे." महाराज म्हणाले, "त्याला मजकडे पाठवाल? पाहू या कसा आहे तो." मी "बरें" म्हणून महाराजांची रजा घेऊन कोल्हापुरास गलों व चि० बाबासाहेब यास महाराजांकडे मुंबईस पाठविलें श्रीमंत जयाजीराव महाराजांनी त्यास विचारलें, "तुम्ही आमच्याकडे येतां का?" बाबासाहेब म्हणाले, "मी बी० ए०च्या परीक्षेस बसलों आहें. परीक्षेचा निकाल आज आठ दिवसांनी लागल. पास झालों तर येईन." महाराज म्हणाले, "कसहि होवो, तुम्ही उद्या आठ दिवसांनी मला येथेच भेटा." बाबासाहेब बी० ए०ची परीक्षा पास झाले व परत शिंदेमहाराजांस भेटावयास मुंबईस गले. महाराजांनी विचारल, "परीक्षेचा निकाल लागला का?" बाबासाहेब म्हणाले, "होय, लागला व मी पासहि झालों" महाराजांनी त्यांचें अभिनंदन केलें व त्यास सांगितलें की, "मी तुम्हास डेप्युटी सुपरिंटेंडंट आफ पोलिसची जागा देतों. मी तुमच्या वडिलांसहि बोललों आहे. तरी तुम्ही आपल्या गावास जाऊन आईवडिलांस भेटून ग्वाल्हेरीस जाण्याच्या तयारीने येथे मुंबइस या."

बाबासाहेब ग्वाल्हेरीस गले. त्यांची डेप्युटी सुपरिंटेंडंट ऑफ पोलिस म्हणून ग्वाल्हेरीस्च तारीख २० जुलै १९३७ रोजीं नेमणूक झाली. ते तेथे डिसेंबर १९३८ पर्यंत होते ग्वाल्हेरीस असताना त्यांना घोड्यावर बसण्याचे शिकविण्याची व्यवस्था महाराजांनी केली होती. नतर जानेवारी १९३९त ग्वाल्हेर दरबारने त्यांना मुरादाबाद येथील ट्रेनिंग स्कूलमध्ये पाठविलें. तेथे सन १९४०त त्यांचें शिक्षण सपल.

पुढे सन १९४१च्या फब्रुवारी महिन्यात त्यांचे लग्न बळगावचे नानासाहेब चव्हाण, पेन्शनर फौजदार, यांची धाकटी मुलगी सुशीला हिच्याशीं झाले. लग्न बडगावांत आमच्या वरींच झालें. लग्नानतर सुशीलाचें नाव आम्हीं मदालिनी असें

ठेविलें. हें लग्न आम्हांला गडबडीने उरकून घ्यावें लागलें, कारण पांचच महिन्यांपूर्वी आमची मुलगी इंदू वारली होती व पुण्या रूढीप्रमाणे त्याच वर्षी घरीं लग्न न झाल्यास पुढे तीन वर्षे लग्न करतां येत नाही, असें समजलें जाई. लग्नानंतर बाबासाहेब सहकुटुंब ग्वाल्हेरास राहूं लागले. सन १९४३ सालीं ते सुपरिटेंडंट ऑफ पोलिस झाले. त्यांची बदली प्रथम सरदारपुरास झाली. सन १९४४ सालीं ते भेलसास होते व सन १९४५ व १९४६ त गुण्यास होते. नंतर सन १९४७-४८ त ते ग्वाल्हेरीस परत गेले.

गुण्यास असतांना त्यांनी मांग्या भिल्ल व शंकरसिंग या डाकूंच्या टोळ्यांवर धाडसाने हल्ले चढविले. कांही डाकू जागच्या जागीं ठार झाले व कांही पकडले गेले. या धाडसी कामगिरीबद्दल ग्वाल्हेर दरबारच्या शिफारसीवरुन ब्रिटिश सरकारने त्यांना त्यांच्या बहादुरीबद्दल सुवर्णपदक (किंग्ज मेडल) सन १९४६ सालीं बहाल केलें. शिवाय महाराजांनी त्यांना तीन हजार रुपये बक्षीसहि दिलें. मांग्या भिल्लाने २२ खून केले व ५७ दरोडे घातले होते असें म्हणतात.

पुढे सन १९४८ सालीं निझाम हैदराबादेस पोलिसकारवाई करून हिंदुस्थान सरकारने संस्थानाचा ताबा घेतला. हैदराबादेंत त्या वेळीं जनरल चौधरी हे मिलिटरी गव्हर्नर होते. त्यांना प्रामाणिक, धाडसी व अनुभवी पोलिस अधिकाऱ्यांची फार गरज होती. ग्वाल्हेरीस बाबासाहेबांनी डी० एस्० पी० चें काम केलें होतें व बहादुरीबद्दल त्यांना किंग्ज मेडलहि मिळालें होतें. हें ऐकून त्यांनी ग्वाल्हेरदरबारकडून बाबासाहेबांना सरदार वल्लभभाई पटेल यांचे मार्फत मागून घेतलें. ते बिदरास डी० एस्० पी० असतांना सन १९५२ सालीं दोन प्रसिद्ध डाकूंनी मुद्दाम निलंगा पोलिस ठाण्यावर एके रात्रीं मोठा हमला चढवून कांही रायफली, बंदुका व पिस्तुलें घेऊन ते पसार झाले. ही गोष्ट बाबासाहेबांना फार लागली व त्यांनी दरोडेखोरांच्या शोधार्थ सहा महिने खर्चून शेवटीं अक्कलकोट संस्थानांत डोंगरसिंग भाट-रजपुतांच्या टोळीकडून सरकारी हत्यारें परत मिळविलीं; गुन्हेगार शोधून काढून त्यांना धाडसाने पकडलें. हें त्यांचें चातुर्य व शौर्य पाहून हिंदुस्थान सरकारने त्यांना सन १९५४ सालीं त्यांच्या बहादुरीबद्दल सुवर्णपदक (पोलिस मेडल फॉर मेरिटोरियस सर्व्हिसेस) बहाल केलें.

सन १९५५-१९५६ सालीं ते एक वर्ष, मराठवाडा भागाचे ॲक्टिंग डेप्युटी इन्स्पेक्टर जनरल होते. पुढे सन १९५६ सालीं मराठवाडा मुंबई राज्यांत सामील केला गेल्यावर त्यांनी तारीख ३-११-१९५६ ते १५-५-१९६३ पर्यंत मुंबई शहरांत डेप्युटी कमिशनर ऑफ पोलिस म्हणून काम केलें. सध्या ते मुंबईसच डी० आय्० जी० आहेत.

त्यांना चार मुलगे व एक मुलगी आहे. मुलगा उदय खडकवासला येथील मिलिटरी ॲकेडेमीची व डेहराडून मिलिटरी कॉलेजची परीक्षा पास होऊन नुकताच वीस मराठा रेजिमेंटमध्ये लेफ्टनंट झाला आहे. त्याची पलटण सध्या काश्मिरांत आहे.

दुसरा मुलगा दिलीप सध्या साताऱ्यास सैनिकशाळेंत शिकत आहे. अर्थात् तोहि पुढे खडकवासला मिलिटरी ॲकेडेमींत प्रवेश करील. दुसरीं दोन मुलं ल्हान आहेत हीं सर्व मुलें प्रेमळ व विनयशील आहेत. बाबासाहेबाचें सुखासमाधानाचें कौटुंबिक जीवन पाहून मला आनंद वाटतो. त्याची पत्नी चिरंजीव सौभाग्यवती मदाकिनी प्रेमळ व उदार मनाची असून तिची वागणूक मारदस्तपणाची आहे. उगीच नवऱ्याच्या होयला होय म्हणणारी नाही किंवा सध्याचा व्यक्तिस्वातंत्र्याचा पवित्रा घेणारी नाही. पतीच्या व मुलाच्या कपड्यालत्त्याबद्दल व जेवणखाणाबद्दल ती फार दक्ष असते. या दांपत्याच्या उदार स्वभावामुळे त्याच्याकडे पाहुण्याची व मुंबईस येणाऱ्या स्नेह्याची भरपूर गर्दी असते. ती इतकी की, मी जरी त्याच्याकडे चार दिवस राहावयास गेलो तरी मला पाहुण्यांत भर घालणें अडचणीच वाटत. मात्र मला त्यांचा मनापासूनचा पाहुणचार (सध्याच्या काळी मुलाकडे राहण्यास पाहुणचारच म्हणणं बरें) अनुभवावासा वाटतो व मी त्याच्याकडे बऱ्याच वेळा जातो व बरेच दिवस राहतोंहि.

मुंबईस उद्योगधंद्यासाठी जाणाऱ्या आमच्या गावाकडच्या गोरगरिबास बाबा साहेबांचें मुंबईस राहणें फार उपयुक्त झालें आहे. कोणीहि त्याच्याकडे जावें, ते त्याला एखाद्या कंपनींत अथवा गिरणींत लावून देतात. पाहुणेंहि तर त्या दांपत्याच्या दिलदारपणाचा भरपूर फायदा घेतात. तथापि दोघेहि आपण केलेल्या मदतीबद्दल कधी ब्रदेखील काढीत नाहीत. मला हें सर्व मजूर व पसत आहे.

बाबासाहेबाचं लग्न सन १९४१ त झालें. त्या वेळीं ते नोकरींतच होते. त्याची आई सन १९४९ त वारली. या काळात मी व पत्नी बहुतेक दरसाल महिनाभर तरी त्याच्याकडे जात असू. कधीकधी माझी आईहि आमच्याबरोबर येई. मदाकिनी व तिचीं मुले आमच्याकडे बहुतेक दरसाल येत. या काळांत चिरंजीव सौ० मदाकिनी आपल्या सासूशीं फार प्रेमळपणानें वागत असे. आजहि बाबासाहेब, मदाकिनी व त्याचीं मुलें माझ्याशीं आदरानें वागतात.

माझे तिसरे चिरंजीव नानासाहेब यांचा जन्म पुण्यास झाला. त्या वेळीं मीं डेप्युटी डायरेक्टर ऑफ ॲग्रिकल्चर होतों. माझ्या भागांत गुजराथ, खानदेश व दक्षिणेंतील सर्व मराठी जिल्हे होते, तरी पण माझें खुद्द स्टेशन पुण्यासच असे. आमचें बिऱ्हाड शनिवार पेठेंत गार्डीच्या वाड्यांत होतें. सन १९१८ च्या सुरुवातीस पुण्यास प्लेग फार होता, म्हणून आम्ही फर्ग्युसन कॉलेज रोडवर (आता त्यास गोखले रोड म्हणतात) असलेल्या रामदास शहाच्या बंगल्याच्या पाठीमागे डॉ० विश्राम रामजी घोले यांच्या, त्यावेळीं खुल्या असलेल्या, माळरानांत तंबू देऊन राहिलों होतों. पत्नीचे दिवस भरताच तिला मंगळवार पेठेंतील ज्नाना हॉस्पिटलमध्ये ठेविलें व तेथेच नानासाहेबाचा जन्म तारीख २३ मार्च सन १९१८ रोजी झाला. नानासाहेबाच्या

ज्मानतर आम्ही सदाशिव पेठतील गाडगिळांच्या वाड्यात राहावयास गर्ल मी सन १९२१ साली अमेरिकेस गलो होतो त्या वेळी आमचे बिऱ्हाड तेथेच होते सन १९२२त परत आलो त्या वेळी गुजराथसाठी स्वतंत्र डेप्युटीची जागा निर्माण झाल्याने माझ्याकडे फक्त महाराष्ट्रातील मराठी जिल्हेच राहिले व माझे काम आटोपशीर झाले नानासाहेबांचे प्राथमिक शिक्षण डेक्कन जिमखान्यावरील भावे स्कूलच्या शाखेत व नंतर परशुरामभाऊ जवळील मुख्य शाळेत इंग्रजी सहाव्या इयत्तेपर्यंत झाले. मी जरी सन १९३० अखेर पेन्शन घेऊन वडगावास गलो तरी माझे बिऱ्हाड सन १९३४ पर्यंत पुण्यासच होते भावेस्कूलमध्ये असताना नानासाहेब नियमितपणे गोपाळ गायनसमाजात गाणे शिकण्यास जात. मी संध्याकाळी फिरावयास जाताना दुसऱ्या मुलांबरोबर तेहि माझ्याबरोबर मोटारीतून येत असत. त्या वेळेपासूनच त्यांना निसर्गाची आवड लागली. मी शिकारीस जाताना बरोबर नानासाहेब हटकून येणारच त्या वेळी माझ्याजवळ शिकारीची दोन कुत्री होती आणि नानासाहेब त्या वयातसुद्धा कित्येक मैल रान तुडवीत कुत्र्यापाठोपाठ ससाच्या मागे लागत

मी कोल्हापुरास सन १९३४ साली स्टेशनवरचा चिचलीकराचा बंगला वणकुद्रे कासारांकडून विकत घेऊन तेथे राहू लागल्यावर मुले घेऊन पत्नी कोल्हापुरास आली दिनकरराव (बाळासाहेब) राजाराम कॉलेजमध्ये गले. नानासाहेबांनी आयर्विन खिश्चन हायस्कूलमध्ये नाव घातले व तेथूनच ते सन १९३५ साली मॅट्रिक पास झाले आणि त्यांनी राजाराम कॉलेजमध्ये नाव घातले. तेथूनच ते सन १९३८ साली इंटरमिजिएट पास होऊन पुण्यास लॉ कॉलेजमध्ये गेले त्या वेळी कोल्हापुरास लॉ कालेज नव्हते ते सन १९३८ साली फर्स्ट एल्‌एल्‌० बी० पास झाले. हायस्कुलात व कालेजात असताना त्यांना क्रिकेट, हॉकी व टेनिस यांचा फार शौक असे त्यांचे वडील बंधु शंकरराव लष्करात ऑफिसर होते. आपणहि लष्करी ऑफिसर बनावे असे त्यांना वाटे, म्हणून सेकंड एल्‌एल्‌० बी० व्हावयाच्या आधीच शिक्षण सोडून त्यांनी इंडियन आर्मीमध्ये कमिशन मिळविण्याचा प्रयत्न केला पण त्यावेळी त्यांना कमिशन मिळाले नाही म्हणून त्यांनी अहमदनगरास लष्करात शिपायाची नोकरी पत्करली होती.

सन १९४०च्या नोव्हेंबरात छत्रपति राजाराममहाराज अकाली निवतले काही दिवस पूर्वीच कौन्सिल इंटेरिम कौन्सिल म्हणून राज्यकारभार पाहत होते हिंदुस्थान सरकार रीजन्सी कौन्सिल नेमण्याचा विचार करीत होते दुसरे जागतिक युद्ध चालू होते इंग्रज सरकारला सैन्याची मदत व्हावी म्हणून या पूर्वीच्याच कौन्सिलने पूर्वीची स्टेट आर्मी वाढवून त्याची ब्रिगेड बनवावयाचे ठरविले आणि त्या ब्रिगेडला नुकतेच कालवश झालेल्या राजाराम छत्रपतींचे नाव देण्याचे निश्चित केले या नव्या ब्रिगेडसाठी पाच सेकंड लेफ्टनंटच्या जागा निर्माण केल्या. या जागांसाठी संस्थानांतील शिक्षित लोकांचे अर्ज मागविले चिरंजीव नानासाहेबांनीहि अर्ज

पाठविलें. तिगाण दादासाहेब सुर्वे व कमांडट अलेक्झांडर यांनी अर्जदाराच्या मुलाखती घेतल्या. या पांच जणांत नानासाहेब निवडले गेले. पुढे ह्या उमेदवारांना ओ० टी० एस्‌०चें शिक्षण घेण्यास बंगलोरास पाठविलें. तिकडच शिक्षण पुरें झाल्यावर नानासाहेबांना सेकंड लेफ्टनंट म्हणून नेमण्यांत आलें.

सन १९४३च्या फेब्रुवारींत त्यांचे लग्न, श्रीयुत श्रीधरराव घिर्के फाल्तरपेकर, कोल्हापूर स्टेटचे एक्साइज कमिशनर, यांची ज्येष्ठ कन्या सरोजिनी, बी० ए०, बी० टी०, हिच्याशीं झालें.

त्या वेळीं ब्रह्मदेशाच्या नैर्ऋत्य भागात जपानी लोकांची चढाई चालू होती. हिंदुस्थान सरकारची एक गुरखा पल्टण ब्रह्मदेशांत चिनविनजवळ जपानी सैन्याशीं लढत होती. अशा वेळीं नानासाहेबांना ह्या गुरखा पल्टणींत दोन महिने लढाईचा प्रत्यक्ष शिक्षण व अनुभव घेण्यासाठी पाठविलें होतें. या मुदतींत एके दिवशीं बरेच हृदी इंजिनिअर्स व अधिकारी ट्रेनिंगवर जात असतां त्यांचा ट्रक उलटून मोठा अपघात झाला. ह्या अपघातांत तीन अधिकारी ठार झाले व बऱ्याच जणांना मुका मार बसला. नानासाहेब ट्रकखाली सापडले, पण त्यांना मोठी दुखापत झाली नाही. तरी पण ट्रकखाली सापडल्याने ट्रकचा बोजा त्यांच्या छातीवर एकदम पडला. त्यामुळे बरेच दिवस त्यांना त्रास झाला, व अजूनहि कधीकधी होतो.

ब्रह्मदेशांतून परत आल्यावर, कौन्सिलने राजाराम रायफल्सपैकी एक कंपनी सन १९४४ साली पंजाबांत सहराणपुरास जंगल ट्रेनिंगसाठी पाठविली. त्या कंपनींत नानासाहेब होते. तेथे त्यांचें शिक्षण चालू असतांना एका काळोख्या रात्रीं जंगलांत बॉम्बफेकीचा सराव करीत असतांना त्यांच्या त्यांच्या साथीदाराच्या हातीं बॉम्ब होता त्याचा हात झाडाच्या लटकत्या डहाळीस अडकून बॉम्ब खालीं पडला व त्याचा स्फोट झाला. ह्या स्फोटांत त्यांच्याबरोबर असलेला दुसरा अधिकारी जागच्या जागीं खलास झाला. नानासाहेबांच्या पायासहि जखमा झाल्या, पण प्राणावर आलेलें संकट शेपटावर गेलें. कांही दिवसांनी पायाच्या जखमा भरून आल्या.

सन १९४७ सालीं कोल्हापूर संस्थान भारतांत विलीन झालें व राजाराम रायफल्समधील अधिकाऱ्यांनी आपणास इंडियन आर्मीमध्ये घ्यावें अशी सरकारास विनंती केली. त्यांतील ज्या तीनचार जणांस इंडियन आर्मीमध्ये निवडलें त्यांत नानासाहेब होते. प्रथम त्यांना बेळगांवास रुजू व्हावें लागलें. पुढे दोनतीन महिन्यांनी त्यांना फर्स्ट मराठा इन्फंट्रीमध्ये नेमिलें. त्या वेळीं फर्स्ट मराठा इन्फंट्री अहमदाबादेस होती. सन १९४७त बहुतेक हिंदी संस्थानें भारतांत विलीन झालीं. त्यांत हैदराबाद व जुनागड यांनी बराच विरोध केला. शेवटीं जुनागडच्या नबाबानें आपला जनाना, नोकरचाकर, जडजवाहिर व मौल्यवान चिजा घेऊन समुद्रमार्गे पश्चिम पाकिस्तानांत पोबारा केला. नबाब पळून गेल्यावर शहरांत बरीच धादल व बेदिली माजली. लागलीच हिंदुस्थान सरकारनें शहराच्या बंदोबस्तासाठी इंडियन

सिव्हिल सर्व्हिसमधील एक अधिकारी शिवेश्वरकर व शीख लोकांची एक कंपनी जुनागडास रवाना केली. पण शिखांच्याकडून शिस्त राखली जात नाही, असें वाटल्यावरून त्यांच्या जागीं फर्स्ट मराठा पल्टण पाठविली गेली; तिचे मुख्य अधिकारी नानासाहेब होते.

श्रीयुत शिवेश्वरकर व नानासाहेब यांनी परिस्थिति लवकरच काबूत आणली, दक्षतापूर्वक शहराचा बंदोबस्त ठेविला व नागरिकांत विश्वास उत्पन्न केला. शहरांत हिंदूंपेक्षा मुसल्मानांची संख्या अधिक असल्यामुळे हें काम सोपें नव्हतें. मी १९५५ मध्ये सोरटीसोमनाथ व द्वारकेस गल्यावेळीं जुनागडास मुक्काम केला होता. त्या वेळीं जी मागची हकीकत ऐकिली, तांत शहराचा बंदोबस्त ठेवून हिंदु व मुसल्मान जमातींत सरकारबद्दल आदर उत्पन्न करण्यांत फर्स्ट मराठा कंपनीने आपलेपणाने आणि शिवेश्वरकर व नानासाहेब यांनी दक्षतेने कामे केल्याचे तेथील रहिवाश्याकडून ऐकिले होते. जुनागडास शांतता झाल्यावर नानासाहेबांची पल्टण काश्मिरास रवाना झाली. त्या वेळीं काश्मिरांत पाकिस्तान व हिंदुस्थान यांच्यामध्ये लढाई चालू होती. नानासाहेबांची पल्टण सन १९४८ ते १९५० पर्यंत काश्मिरांत होती. थोड्या दिवसांनी ते सोर्सेस व इंटेलिजन्स ऑफिसर म्हणून पुण्यास बदलून गेले. तेथे ते सन १९५१ ते १९५३ पर्यंत होते. पुणें हें फॅमिली स्टेशन असल्याने तेथे त्यांना आपल्या बायकोमुलांसह राहतां आले. पुढे ते तिबेटला बदलून गेले, तरी त्यांची बायको व मुलं पुण्यासच एल्फिन्स्टनरोडवरील वेलव्हेडिअर कोर्टमध्ये राहत. मुलें तेथे असतांना मी वेळोवेळीं मोटारींतून त्यांच्याकडे जात असें. त्या वेळीं निर्मलाचें वय सातआठ, उर्मिलाचें पाचसहा व सीमातिनीचें सुमारें चार वर्षांचें असावें. नानासाहेब तिबेटांत गल्यावर तीनचार महिन्यांनी शिवाजीचा जन्म झाला. मी वरचेवर पुण्यास जाई. मुलं माझ्या येण्याची वाट पाहत. पुण्यांत असतांना मी मुलांस मोटारींतून फिरावयास नेई.

त्यांच्यातील लहानपणाच्या शिस्तीची मला चांगली आठवण आहे. घरीं त्यांची आई त्यांना लागल त्या वस्तू देईच; पण कधीकधी मी केक किंवा चॉकलेट आणीं. त्या वेळीं मुलं कधी गडबड करीत नसत. एवढेंच नव्हे तर खाऊ एकमेकांत वाटून घेऊन शिवाय आपल्या आईचा व माझा वाटाहि राखून ठेवीत. दुसऱ्या दिवसाचीह तें आठवण ठेवीत. मी तेथ असतांना त्यांना मोटारींतून शाळेस जाण्यास निघे. पावसाळ्यांत मीं एकदा म्हटलें, "गल्या वर्षी मीं कोणालाशी छत्री घेऊन दिली होती. या पावसाळ्यांत मी एक उत्तम रेनकोट आणणार आहे. कोणाला द्यावा हें सांगा." मोठी निर्मला म्हणते, "सीमा सर्वांत लहान, तिलाच रेनकोट आणा." त्यावर तीन चार वर्षांची सीमा म्हणाली, "दस नव्ह आजोबा, तुम्ही निमाताईच्या अगवाच रेनकोट आणा. तिला तो लहान होऊं लागला म्हणजे उमा वापरील व उमाला लहान पडूं लागल्यावर तोच मला वाल्तां येईल." एकमेकींच्या या अगत्याच मला फार कौतुक वाटलं. मला वाटतं, त्या वेळीं मीं दोन रेनकोट आणले असावेत.

शिवाजीचा जन्म ऑक्टोबर १९५३ त झाला. त्या वेळीं नानासाहेब तिबेटांत होते. तीन मुलींच्या पाठीवर मुलगा झाला म्हणून आम्हा सर्वांना फार आनंद झाला. माझी आई व पत्नी त्या वेळीं हयात असत्या तर त्यांना फार आनंद वाटला असता. मी, माझी मुलगी आनंदीबाई, वहिणीची मुलगी हिराबाई व माझ्या चुलतभावाची बायको गंगूबाई शिवाजीच्या बारशास पुण्यास गेलो होतों. एक वर्षाने शिवाजीच्या वाढदिवसाच्या वेळीं नानासाहेब तिबेटहून रजा घेऊन आले होते. हा वाढदिवस आम्हीं मोठ्या थाटाने साजरा केला.

शिवाजीला लहानपणापासून मोटारीशीं खेळण, मोटारींतून फिरणें आवडत असे; तरीपण तो कधीहि हट्ट धरीत नसे. मी कोल्हापुराहून सकाळीं अकराच्या नंतर तेथें पोचणार, असे मुलास समजतांच "आत्ता आजोबांची मोटार येणार, येणार" अशी गडबड उडे. शिवाजी तर सकाळीं नऊपासूनच फाटकांत वाट पाहत राही. मी नियमितपणें सकाळीं व संध्याकाळीं मोटारींतून फिरण्यास जात असे, हें जाणून शिवाजी माझ्या जाण्याची वाटच पाही. मी जर लवकर बाहेर निघालों नाहीं तर तो माझी काठी व वहाणा माझ्याजवळ आणून ठेवी, पण "चला, चला" म्हणत नसे. ही मुलाची शिस्त आजवर कायम आहे.

नानासाहेब सन १९५३ मध्ये तिबेटांत गेल्याची हकीकत वर आलीच आहे. प्राचीन काळापासून हिंदुस्थानचा तिबेटशीं संबंध आहे. तिबेटशीं बराच व्यापार चाले. पण चांगल्या रस्त्याच्या अभावीं मालाची ने आण माणसांच्या डोईवरून वा खेचरांच्या पाठीवरून करावी लागे. अशा अडचणींतून मालाची ने-आण करणें धोक्याचें असे. म्हणून ब्रिटिशांच्या अमदानींतच चीन व हिंदुस्थान यांच्यामध्ये करारमदार होऊन हिंदुस्थान सरकारला हिमालयातून पुढे यातुंग व ब्रह्मपुत्रेवरील ग्यांटसीपर्यंत, व्यापाऱ्यांच्या संरक्षणासाठी, आपलीं लष्करी ठाणीं ठेवतां येत. यातुंग हिमालयाच्या उत्तरेस गौरीशंकर (एव्हरेस्ट) व सिक्कीमच्याहि पलीकडे, तिबेटांत आहे. यातुंगला जातांना दार्जिलिंगपर्यंतच रेल्वे आहे. पुढे फक्त तरी कच्च्या वाटांनी खेचरावरून व पुढे डोंगरांतून तर पायीच जावें लागे. सामानसुमान मजुरांच्या पाठीवरून न्यावें लागे. अगदी अलीकडे जीप-मोटार जाण्यासारखे काही रस्ते झाले आहेत, पण सन १९५३ त तिबेटांत जाणें हौशी दणकट लोकांशिवाय इतरांना शिक्षा वाटे. नानासाहेबांना डोंगराच्या दऱ्याखोऱ्यांतून व नदीनाल्यांतून जाण्यास अडचण वाटत नसे. आमच्या शिकारीमुळे त्यांना लहानपणापासून ती सवय होती. पण नागरी जीवनाच्या अभावीं, दूरदेशीं, विरळ लोकसंख्येच्या भागांत एकलकोंडेपणाने राहणें हें अदमानांतील शिक्षेप्रमाणे त्यांना वाटे. सोबत काय ती आपल्या हाताखालच्या शिपाईलोकांची, पण असल्या जागीं वेळ घालविण्यासाठी हरतऱ्हेचे खेळ काढून हे लष्करी अधिकारी वेळ काढीत. तिबेटमधील लोकांच्या राहणीचा, तेथील धर्माचा व समाजव्यवस्थेचा अभ्यास करून नानासाहेबांनी ह्या जीवनाचा आस्वाद घेतला.

नानासाहेब याटुंगला असताना, सन १९५४ मध्ये, ब्रह्मपुत्रा नदीस एकाएकी महापूर आला. हिमालयातील बर्फ वितळून असे पूर कधी कधी येतात; पण सन १९५४ चा पूर म्हणजे एक जलप्रलयच होता असे सांगतात. ब्रह्मपुत्रेच्या काठी ग्याटसी येथे भारताची व चीनची लष्करी ठाणी होती. पुरात ग्याटसी व तेथील पुरातन किल्ला वाहून गेला. आपल्या लोकास वाचविण्यासाठी चीन सरकारच्या रेस्क्यू पार्ट्या (बचाव तुकड्या) आल्या होत्या. त्यानी आपली माणसे बाहेर काढली, तरी त्यातील एक पार्टी वाहून गेलीच. भारतसरकारची एक जाट पलटण ग्याटसी येथे गॅरिसन ड्यूटीवर होती. पुराचे पाणी चढत असताना ह्या पलटणींतील बहुतेक लोक निसटले; तथापि त्यांच्यापैकी चौदा जवान अडकून पडले होते. ही बातमी याटुंगला समजताच, नानासाहेबानी आपली रेस्क्यू पार्टी तयार केली व ती घेऊन ताबडतोब, मध्ये असलेल्या पर्वताच्या एका खिंडीतून, शंभर दीडशे मैलाचा प्रवास खेचराच्या पाठीवरून व पायी करून, तिसरे दिवशी ब्रह्मपुत्रेवर पोचले. हा पूर हिवाळ्यातील बर्फ वितळून आल्यामुळे ब्रह्मपुत्रा अगदी गार पाण्याने दुथडी भरून चालली होती. आसमंतातील लोक हवालदिल झाले होते. हजार-दोन हजार बुद्ध भिक्षु एकत्र जमून मंत्रघोष करीत आपली प्रार्थनाचक्र फिरवीत होते आणि परमेश्वराजवळ मागणी करीत होते की, "हे बुद्धा, हे प्रभो, ही माणसे वाचीव." अशा वेळी नानासाहेब तेथे पोचले आणि मनाचा हिय्या करून त्यानी "ज्योतिबाचा चांग भला" अशी गर्जना करून पाण्यात प्रथम उडी घेतली. नानासाहेबांच्या साथीदार जवानाचा त्यांच्यावर पूर्ण विश्वास असल्याने, त्यानीहि नानासाहेबांच्या पाठोपाठ नदींत उड्या घेतल्या आणि ही तुकडी मैल-दीड-मैल पाणी तोडीत ग्याटसीजवळ पैलतीरास पोचली. या लोकाना पाहून अडकून पडलेल्या आमच्या जाट जवानास, आपणास वाचविण्यास देवच येत असावेत असे वाटले. कारण त्या जलप्रलयातून आपणास वाचविण्यास कोणी येईल अशी त्यांची अपेक्षा नव्हती. प्रथम हे जाट शिपाई वेढा पडलेल्या पाण्यात पायच ठेवीनात. दादापुता करून व धाकदपटशा दाखवून त्यास जवळजवळ जबरदस्तीने पैलतीरास न्यावें लागले. या लोकाना पाण्याच्या वेढ्यातून बाहेर काढण्यात खेचराच्या खोगिराच्या चामडी वाद्या एकमेकास जोडून, एकमेकाचे हात धरावयास लावून, चिखल तुडवीत बाहेर काढावें लागले. काही वेळाने हळूहळू पाणी उतरले व लोकास विश्रांति मिळाल्यावर त्याना धीर आला. तथापि त्याना याटुंगला आणावयास पुरे तीन आठवडे लागले.

नानासाहेबानी या बिकट प्रसंगी धाडसाने पुढे होऊन, पुरात उडी घेऊन, अडकून बसलेल्या सैनिकाना वाचविल्याबद्दल, त्यांच्या सेनापतीकडून त्याना शाबासकी मिळाली आणि त्यांच्या बहादुरीबद्दल त्यांच्याकडे कॉमेंडेशन कार्ड रवाना झाले.

सन १९५६ साली कॅलिंपॉंगहून त्यांची बदली डेहराडून मिलिटरी कॉलेजात इन्स्ट्रक्टर (शिक्षक) म्हणून झाली. त्या वेळीं ते बायकोमुलासह तिकडे गेले. मीहि दोन वेळा त्यांच्याकडे दिवाळीत गेलों होतों. त्या वेळीं मी त्यांच्या जंगलशिकार पार्टींत

सामील झालें होतें. स्वतः चागले स्पोर्टस्‌मन असल्याने ते विद्यार्थ्यांच्या खेळात व आपल्या कॉलेजचे दुसऱ्या संस्थेशी सामने होत त्यात लक्ष घालून विद्यार्थ्यांना उत्तेजन देत. इन्स्ट्रक्टर होण्यापूर्वा त्यानी लष्करात बराच अनुभव घेतला होता आणि काही अपघातहि पाहिले व अनुभवले होते. त्यामुळे त्याचीं अनुभवजन्य व्याख्यानें विद्यार्थ्यांस फार आवडत, असें मीं त्याच्या हाताखालून गेलेल्या अधिकाऱ्याकडून ऐकले आहे. डेहराडून येथे इन्स्ट्रक्टर असतानाच त्याना मेजरची बढती मिळाली.

नानासाहेब डेहराडूनला असताना ते व त्यांची पत्नी व मुलें बाजबरोबर मीहि मसुरी, हरिद्वार, हृषीकेश पाहावयास गेलों होतों. डेहराडूनला असताना तेथील सैनिक स्कूल मीं पाहून घेतलें. त्या स्कूलमधील शिस्त व विद्यार्थ्यांना आधुनिक सामान्य ज्ञान देण्याची प्रथा व त्यास लागणारी साधनसामग्री मला फार आवडली. पण तेथे मला एकहि महाराष्ट्रीय विद्यार्थी आढळला नाही, म्हणून मीं स्कूलच्या प्रिन्सिपॉलला विचारले. त्यानी सांगितलें की, सैनिक स्कूल इतर संस्थांच्या मानाने फार खर्चाचें आहे. त्या शाळेत महिना तीनशे रुपये खर्च येतो. शिवाय इतर प्रांतिक सरकारानी जशीं आपल्या प्रांतातील विद्यार्थ्यांसाठी विद्यावेतनें ठेविलीं आहेत, तशीं मुंबई प्रांतिक सरकारने ठेविलीं नाहीत. त्यामुळे तुमच्या प्रांतातील मुलें क्वचितच येतात. ह्या ठिकाणीं हे सांगणे जरूर आहे की, सैनिक स्कूलच्या विद्यार्थ्यांस मिलिटरी कॉलेजात प्रवेश मिळण्यास अडचण पडत नाही. मी डेहराडूनहून परत कोल्हापुरास जाताना मुद्दाम मुंबईत थांबून ऑनरेबल यशवंतराव चव्हाण, चीफ मिनिस्टर यांची गाठ घेतली आणि सैनिक स्कूलमध्ये विद्यावेतनाचे अभावीं महाराष्ट्रीयांचा शिरकाव कसा होत नाही, हे त्याना समजावून सांगितलें. नामदार चव्हाण यानी माझें बोलणं सहानुभूतिपूर्वक ऐकून घेऊन लगलीच मुंबई प्रांतासाठी दोन तीन स्कॉलरशिपा डेहराडून सैनिक-स्कूलमध्ये ठेविल्या.

सन १९५९त नानासाहेबांची बदली हैदराबादेजवळ गोवळकोंड्यास सेकंड मराठा पलटणींत सेकंड इन कमांड म्हणून झाली. तेथे ते मुलानातूसह दीड वर्ष होते. याच मुदतींत मी त्याच्या कुटुंबात कायम राहण्यास आलों होतों. त्या वेळेपर्यंत मी लष्करातील दोन्ही अमलदार मुलाचें जीवन दुरूनच पाहिलें होतें. आता मी त्याच्या-बरोबर सरकारी बंगल्यात राहत असल्याने, त्यांचें लष्करी व कौटुंबिक जीवन मला जवळून पाहता आले. आपल्या हाताखालच्या व बरोबरच्या लोकांशीं ते मिळून-मिसळून वागतात. त्यांची पत्नी सरोजिनी सुशिक्षित असून नियमशील व शिस्तप्रिय आहे. तिने आपल्या मुलाना चांगले वळण लाविलें आहे. लष्करातील शिपायांच्या बायकांसाठी वेल्फेअर (कल्याणकारी) कार्यात ती पुष्कळ काम करते. कपडे बेतणें, शिवणें, टिपणें, तुणण, कशिदा काढणें, कपड्यांची धुलाई, निरनिराळे स्त्रियांचे खेळ, व्यवस्थित स्वयंपाक, लोणचीं, मुरंबे, जॅम, जेली, वगैरेंची तिला माहिती व हौस आहे. त्यामुळे तिच्या देखरेखीखाली स्त्रियांचें वेल्फेअर सेंटर फार उत्तम कार्य करीत असतें.

सन १९६० सालीं भारत सरकारने आंध्रप्रांतांतील कांही विश्वविद्यालयांत 'हिंदी लष्कर व देशसंरक्षण' या विषयावर व्याख्यानें देण्यासाठी नानासाहेबांची निवड केली. त्यांचीं व्याख्यानें अध्यापकांना व विद्यार्थ्यांना फार आवडलींशीं दिसलीं. मी एका व्याख्यानाला हजर होतों.

नानासाहेबांच्या हाताखालच्या जवानांचें त्यांच्यावर प्रेम व निष्ठा दिसते. त्यांच्या हाताखाली काम केलेल्या प्रत्येक अधिकाऱ्यास व जवानास ते त्याच्या नावाने हाक मारूं शकतात. कोणीहि लष्करी जवान फार दिवसानी त्यांना भेटावयास आला, तरी ते त्याला ओळखून त्याची व त्याच्या सहकाऱ्यांची चौकशी करतात.

सन १९६१ सालीं त्यांची बदली विसाव्या मराठा पल्टणींत लेफ्टनंट कर्नल (कमांडिंग ऑफिसर) म्हणून झाली. ही पल्टण सध्या (सन १९६४) जम्मू-काश्मिरात आहे. सध्या वायव्यसरहद्दीवर चीनशीं लढा चालू आहे, त्यामुळे काश्मिरांत असलेल्या पल्टणीस निरनिराळ्या प्रकारचें कष्टप्रद, सोशिक जीवन कंठावें लागत असून वेळप्रसंगीं अर्धपोटीं राहून विनाअंथरूण रानांत खड्डे करून राहण्याचे धडे घ्यावे लागत आहेत.

नानासाहेब मोकळ्या मनाचे असून त्यांचा स्वभाव उमदा व प्रेमळ आहे.' त्यांच्या खर्चिक वृत्तीमुळे मी त्यांच्यावर कांही दिवसांपूर्वी रागावलोंहि आहें. त्याची खर्चिक सवय गेली नाही, तथापि त्यांनी कधी उलट जबाब दिला नाही. आता मागची स्थिति पालटली आहे.

त्यांना तीन मुली व एक मुलगा आहे. मोठी मुलगी निर्मला बी० ए०, बी० एड्० हिचें लग्न के० कर्नल अमृतराव मोहिते यांचे तृतीय चिरंजीव कॅप्टन शहाजीराव मोहिते यांच्याशीं ता. १९ माहे मे सन १९६४ रोजीं पुण्यास श्री शिवाजी मराठा हायस्कूलचे पटांगणांत झालें. दुसरी मुलगी उर्मिला मेडिकल कॉलेजच्या तिसऱ्या वर्षात आहे. तिसरी सीमतिनी होम सायन्स बी० एस्‌सी० च्या दुसऱ्या वर्षांत आहे. मुलगा दहा वर्षांचा असून हायस्कुलांत आठव्या इयत्तेत शिकत आहे. मुलें आईबापांशीं व एकमेकाशीं प्रेमाने वागतात. जरूर पडल्यास हरएक काम करतात.

गेलीं तीन वर्षे मी या मुलामाणसांच्या प्रेमळ सहवासांत आनंदाने दिवस घालवीत आहें. आम्ही सर्वजण आठवड्यातून एकदा तरी मोटारींतून शहराबाहेर फिरावयास जातों. कधी कधी वनभोजनास व आसपासचीं प्रेक्षणीय स्थळें पाहण्यासहि जातों.



# माझा व्यायाम व शिकारीचा शौक



लहानपणीं, म्हणजे माझ्या वयाच्या दहाव्या-अकराव्या वर्षी, मी सरुडात शाळेंत असताना, आमच्या गावीं मुलांना पट्टा खेळण्याची माझ्या वडिलांनी व्यवस्था केली होती. त्यांना स्वतःला पट्टा खेळण्याची आवड असे. आपल्या तरुणपणीं ते पट्टा चांगला खेळत. लहानपणींच बंदुकीने निशाण मारावयास मला त्यांनी शिकविलें होतें. मला पोहताहि चांगले येई. भरल्या नदींतून मी अलीकडे पलीकडे येई जाई. पुढे मी मलकापुरास शाळेस गेल्यावरहि, तेथील चांगला पट्टा खेळणाऱ्या गणू मांगाकडे काही मुलं पट्टा खेळण्यास जात असल्याने, वडिलांनी त्या मांगास मला पट्टा खेळण्यास शिकव असं सांगितले होतें. त्याप्रमाणे मी त्याच्याकडे शिकण्यास जात होतो. मलकापुरास दुसरे खेळ म्हणजे सुरपाट्या व आट्यापाट्या हे असत. कोल्हापुरास गेल्यावर सन १८९४ ते १८९९ च्या काळात, मी नियमितपणें टाउन हॉलच्या पश्चिमेस शनवारपेठेंत शिपुगड्याच्या तालमींत रोज संध्याकाळीं मेहनत, कुस्ती, दांडपट्टा व फरीगदगा खेळावयास जात असें. त्याचप्रमाणे सन १८९८ ते १९०१ पर्यंत, राजाराम हायस्कुलास जोडलेल्या इंग्रजी पद्धतीच्या तालमींत सिंगल बार, पॅरलल बार, ट्रॅपीझ, शिडी, दोरी व फळी यांचा व्यायाम घेई. पुढे मी टाउन हॉल बागेतील ज्या माळ्याच्या घरीं राहीं त्याची बदली नव्या राजवाड्यावरील बागेवर झाली, आणि त्याने आपलें बिऱ्हाड राजाराम हायस्कूल जवळील, जनरल लायब्ररीमागील एका घरात आणिलें. त्या घरात अभ्यास करण्यास व झोपण्यास पुरेशी जागा नव्हती, म्हणून मी हायस्कूलच्या तालमीच्या माडीवर (आता तेथे तालीम नसून लायब्ररी आहे) अभ्यासास व झोपण्यास जाऊ लागलों. या माडीवर माझे मित्र मामा जाधव, बळीबा पाटील, हरीबा पाटील वगैरे मंडळी राहत. त्यांच्या बरोबर मी इंग्रजी पद्धतीचा व्यायाम नियमाने घेऊं लागलों. पुढे

मॅट्रिक झाल्यावर, सन १९०० च्या सुरुवातीस मराठा बोर्डिंगात राहू लागलों. तेव्हा फक्त नियमित वेळींच या तालमींत खेळण्यास जाई. सन १९०२ सालीं पुण्यास शेतकी कॉलेजात गेल्यावर मात्र व्यायाम व कुस्ती बंद झाली, पण तेथे शेतावर काम करावें लागे. आमचें हॉस्टेल (त्याला क्वार्टर्स म्हणत) व प्रयोगक्षेत्र (शेत) सायन्स कॉलेजपासून मैल-दीड-मैल असावें. आम्ही विद्यार्थी पायींच कॉलेजास जात असूं. त्या काळात सायकली फार कमी होत्या. फक्त दोनतीन प्रोफेसर व चारदोन श्रीमंत विद्यार्थी यांच्याजवळ सायकली होत्या. सन १९०६ सालीं नोकरींत गेल्यापासून व्यायाम बंद झाला, तथापि तेव्हापासून मला शिकारीचा नाद लागला. सन १९१५ त रत्नागिरीहून डेप्युटी डायरेक्टर ऑफ ॲग्रिकल्चर म्हणून मी पुण्यास आल्यावर मला माझ्या सरकारी कामाच्या आड न येता शिकार करण्याची चांगली संधि मिळे. मध्यभागातील इतर जिल्ह्यांबरोबर पुणें व अहमदनगर येथे मला कामाच्या निमित्ताने वरचेवर जावें लागे. त्यातून मी वरच्या दर्जाचा अधिकारी असल्याने, मला दूरदूरचीं कामे तपासण्यासाठी मोटारने प्रवास करणें जरूर होतें. त्या काळीं मोटारींना फारशी किंमतहि पडत नव्हती. मला वाटते, फोर्ड मोटारीची किंमत रु. १,१०० असावी. शेवरलेटची रु. २,५०० असावी. पेट्रोल फार स्वस्त असे. मला वाटते, पेट्रोलची किंमत गॅलनास आठदहा आणे असावी. त्यामुळे फिरती खर्चाची होत नसे.

वरच्या दर्जाचे सर्व अधिकारी युरोपियन असत. माझ्यासारखा एखादाच हिंदी अधिकारी अपवादादाखल असे. त्यामुळे साहेबलोकांकरिता दिल्या गेलेल्या सवलती मलाहि मिळत. मैलीं बारा आणे प्रवासभत्ता, शिवाय रोजचा भत्ता दहा रुपये मिळे. त्यामुळे स्वतःच्या खिशावर ताण न पडता, सरकारी कामावर असताना-सुद्धा पुण्यास जातां येतां मला शिकार सहज मिळे. त्या काळात मोटारी फार कमी व बस सर्व्हिस नव्हती. रस्त्यावर रहदारी कमी असल्याने रस्त्याजवळपास शिकार मुबलक मिळे.

एकदा आम्ही (मी, रावसाहेब के० एम्० पवार, शेंडेदादा व सहदेवराव शिंदे) पुणें-दौंड रस्त्याने उरुळी चवतच्या रानात शिकारीस गेलों होतों. एका झाडा-खालीं मोटार उभी करून उताराचे बाजूस नदीकडे गेलों. आम्हास एक वन शिंगाचा नर काळवीट व एक वर्षा दीड वर्षाचा बामण्या (कोवळा काळवीट) मिळाला. माझी वहिवाट असे कीं, दोनपेक्षा जास्त हरणें मारावयाचीं नाहीत. आम्ही बरोबर घेतलेल्या दोन-तीन धाडाब्यांच्या पाठीस ही शिकार देऊन मोटारकडे चाललों होतों. बरेंच ऊन लागत होतें. वाटेंत एका मोठ्या शिंगाच्या झाडाखालीं बसलों व एका माणसास मोटारकडे जाऊन ती आम्ही बसलेल्या झाडाकडे आणण्यास सांगितलें. बरोबर आणलेली शिदोरी काढून खाल्ली. आमच्याबरोबर थॉरमॉस होतीच. पाणी प्यालों, नंतर मोटार आली. त्यात शिकार टाकली व ड्रायव्हरला मोटार घेऊन पुढे पाठवा

उडकेवर उभी करण्यास सांगितलें आणि आम्ही बोलत बोलत मोटारीच्या मागून चालू लागलों. कांही अंतर गेल्यावर आम्हास एका हरणाच्या कळपानें पाहिलें व हरणें उठून दूर पळूं लागलीं. आमची शिकारीची तहान भागली असल्यानें आम्हीं त्याच्याकडे दुर्लक्ष केलें. पण कळप दूर गेला तरी एक हरिणी कान उभारून आमच्याकडे पाहत उभी राहिली. आम्हाला त्याचें कारण समजलें नाहीं. शिवाय मी मादीवर बार टाकीत नसें. तथापि हरिणी एकटीच कां उभी आहे हे पाहण्याच्या जिज्ञासेनें आम्ही तिच्याकडेच जाऊं लागलों. ती जरा पुढें जाई व परत मागें येई. म्हणून आम्ही पाहत उभे राहिलों. वास्तविक ती नुकतीच व्याली होती व तिचें पाडस उठून उभें राहण्याचा प्रयत्न करीत होतें. तिला आमची भीति वाटत असावी म्हणून ती मागें पुढें करी, पण पाडसाची माया तिला सुटत नव्हती. मग थोडें पुढें जाऊन आम्ही एका झाडाखालीं गंमत पाहत उभे राहिलों. धडपड करीत पाडस दहापंधरा मिनिटांत आपला तोल सभाळीत अडखळत अडखळत आपल्या आईच्या पाठीमागून चालूं लागलें. पुढें ती लौकर लौकर आपल्या कळपाकडे निघाली तसें पाडस चटचट तिच्या पाठोपाठ गेलें. आमचा शिकारी वाटाड्या म्हणाला, हरिणी व्याल्यापासून पंधरावीस मिनिटांत तिचें पाडस उभें राहतें व तासाभरात आईबरोबर पळूंहि लागतें.

सन १९१८ सालच्या सुमारास, पुण्याच्या मुठा कॅनॉलवरील उसांत रानडुकराची वीण फार झाली होती. हीं डुकरें ऊस खाण्यापेक्षा पिळ काढण्यास सोपा करण्यात उसाची फार नासाडी करीत. डुकराची वीण होण्याची जागा म्हणजे (सोप), गाडी-दोन गाडया ऊस एके ठिकाणीं माणसानीं व्यवस्थित रचलेल्या ढिगासारखा ढीग असे. ढिगाच्या खालीं तळाशीं जाण्यास एक मोठें बीळ (जमिनीपासून पोखरलेली वाट) असे. आत सांव (डुकरीण) व तिचीं लहान पिलें, कांही दिवस राहत. त्याच्या वर्दळीनें पिकाचें फार नुकसान होई. डुकरापासून नुकसान होऊं नये म्हणून माझ्या सूचनेवरून आमच्या डायरेक्टरनी एक शिकारपार्टी बनविण्यास मला परवानगी दिली होती. त्या पार्टींत चार बंदुके, सातआठ हाका घालणारे दासरी व बरोबर त्यांचीं आठदहा कुत्रींहि असत. त्या पार्टीच्या खर्चासाठीं माझ्याकडे वार्षिक ठरावीक रकम येत असे. त्या पार्टीकडून दोनअडीचशें डुकरें मारलीं गेलीं. पुढें डुकरामधे लाळीची साथ आली, व जंगलांत मरून पडलेलीं डुकरें दिसूं लागलीं. श्रेय मात्र फुकटापुकटी आमच्या पार्टीस मिळालें. पुढें डुकराचा त्रास कमी झाल्यावर आम्हीं ही पार्टी बंद केली व शिकारी सभ्र बनविले. त्यांना आम्ही काडतुसासाठीं कांही रकम देत असू. या शिकारीपार्टींत मीं स्वतःहि पुष्कळच डुकरें मारलीं.

याशिवाय मला श्रीशाहूछत्रपतींनीं कोल्हापूरच्या जंगलात हौसेनें शिकार करण्याची परवानगी दिली होती. एकदा एक महिन्याची रजा घेऊन मी माझ्या गावीं गेलों होतों. माझ्या गावापासून पाचसहा मैलावर साळवी पिंपळवीच्या डोंगरात त्या वेळीं फार डुकरें असत. तीं शेतकऱ्याच्या उसाची फार नासाडी करीत. एकदा

बोलता बोलता मीं महाराजाना सांगितलें की, "पुणें जिल्ह्यात डुकरें मारण्यासाठी मीं एक सरकारी खर्चानें पार्टी बनविली आहे. आम्हीं तेथें दोनचारशें डुकरें मारलीं. सध्या मी सुटीवर आलों आहे. दोनचार दिवस साळशी पिरळीच्या डोंगरात शिकारीस जाऊं का?" त्यानी "जरूर जा" म्हणून सांगितलें. त्याच बैठकींत त्यानी लेखी हुकूमहि दिला. मी शिकारीस गेल्यावेळीं साळशी पिरळीच्या डोंगरात जंगलहि चांगलें होतें. शिकारहि पुष्कळ दिसे. दोनचार दिवसाच्या आमच्या शिकारींत आम्हास सातआठ डुकरें, दोन चितळें व एक ल्हानसा तेंदवा (वाघ) मिळाला. माझी गोळी चांगली लागत असे. महाराजाचे बंधु बापूसाहेब कागलकर यानी जंगलात शिकारीच्या जागा चांगल्या हेरून ठेवल्या होत्या. त्यातील एका जागवर (हिरडीच्या झाडावर) मी बसलों असताना, हाक्यातून, माझ्या खाल्न व वरून डुकरें पळत होतीं. त्याच जागवरून मला पाचदहा मिनिटात चार मोठीं डुकरें मिळाली. शिकार संपल्यावर दोनचार दिवसानी मी परत महाराजाना शिकारीची हकीकत सांगण्यास गेलों. शिकार चांगली झाल्याचें ऐकून महाराजाना आनंद झाला.

महाराजाना आनंद वाटण्याचें मुख्य कारण माझी शिकार नसून, माझ्या स्वभावातील एक गोम त्याना मिळाली हें होय. माझें शेतकी कॉलेजात जाणें हें त्याच्याच प्रेरणेनें व हुकुमानें झालें असल्यानें मला स्कॉलरशिपहि द्यावी अशी त्याची इच्छा होती पण मीं त्याना सांगितलें होतें की, "आपल्याच कॉलेजमधून मला दरमहा पंचवीस रुपयाची स्कॉलरशिप मिळण्याचा संभव आहे, त्या अर्थी आपल्या राजगींतून स्कालरशिप मंजूर करण्याची आवश्यकता नाही." शिवाय एकदा असेंहि झालें होतें की कोल्हापुरास जैन बोर्डिंगच्या उद्घाटनसमया एक शेतकीप्रदर्शन भरविलें होतें, त्या वेळीं मुंबई सरकारचे एक युरोपियन प्रतिनिधि आले असताना त्यानी आपल्या भाषणात माझ्या कामगिरीचा उल्लेख केला आणि "पी० सी० पाटिलाच्यासारखीं होतकरू व कष्टाळू माणसें आपल्याकडून मिळाल्यास, आमच्या शेतकी खात्यास त्याचा फार उपयोग होईल," असें ते म्हणाले. साहेबाचें हें भाषण ऐकून महाराज खुश झाले.

सदर प्रदर्शन भरण्यासाठी महाराजानी मला आगाऊ बोलावून घेतलें होतें, म्हणून मी काही दिवसाची रजा घेऊन आलों होतों. साहेब मुंबईस परत निघून गेल्यावर महाराजानी मला व रावबहादूर इंदुलकर याना बोलावून घेऊन इंदुलकराना सांगितलें होतें की पी० सी० पाटील याना घेऊन उद्या दुपारीं राधानगरीस जेवावयास या मी तुम्हा दोघाची वाट पाहीन. त्याप्रमाणें आम्ही दुसऱ्या दिवशीं सरकारी मोटारींतून राधानगरीस गलों. तेथें त्या वेळीं राधानगरी धरण बांधण्याचें काम चाललें होतें.

तेथें महाराजानी एक रायफल व एक बारा नंबरी बंदूक काढून ठेविली होती. ती घेऊन जा असें त्यानी मला सांगितलें. मीं महाराजाचे आभार मानले व म्हणालों, "माझ्याजवळ एक चांगली रायफल व एक बंदूक आहे; शिवाय मला दोनच

हल्याराचा परवाना आहे. तेव्हा आपण रायफल घेण्याचा आग्रह न करणें बरें." पण माझ्या स्वभावातील गोम महाराजना कळून चुकल्यामुळे ते म्हणाले, "काही हरकत नाही. पण त्याअर्थी तुम्ही शिकार चांगली करता त्याअर्थी कोलीकच्या (शिवारण्य) जंगलात शिकारीस का जात नाही?" मी म्हणालों, "हुजुराची आज्ञा झाल्यास अवश्य जाईन." लागलीच महाराजांनी खाजगी कारभारी रावसाहेब कुमोजकर याना बोलावून माझ्यासाठी कोलीकच्या जंगलात शिकारीची तयारी करण्यास हुकूम दिला, व "अमके दिवशी तुम्ही येथे या व येथून इदुल्कर व काही मंडळीस घेऊन शिवारण्यात शिकारीस जा. तोंपर्यंत गावीं जाऊनच तुमचे शिकारी कपडे व बंदूक घेऊन या" असें मला सांगितलें. नंतर मी गावीं गेलों.

शिवारण्य हे राखीव जंगल असून त्यांत वाघ, तेंदवे, अस्वले, सांबरें व इतर शिकार मुबलक होती. जंगलाचे भोंवती खोल खंदक खणून आंत काही रानटी हत्तीहि सोडिले होते. पंचवीस वर्षांत फक्त तीन नवे हत्ती झाले, पण तेहि शेतकऱ्यांच्या तक्रारीवरून रीजन्सी कौन्सिलच्या अमदानींत मारले गेले.

मी गेल्यानंतर रावसाहेब कुमोजकर याना महाराजांनी बोलावून घेऊन पहिल्या नंबरच्या शिकारीची तयारी करावयास सांगितलें. शिकारीच्या व्यवस्थेचे पहिला, दुसरा व तिसरा नंबर असे तीन प्रकार असत. ज्या वेळीं मुंबईचे गव्हर्नर अगर मोठ्या संस्थानचा राजे पाहुणे म्हणून शिकारीस येत, त्या वेळीं पहिल्या नंबरची व्यवस्था असावयाची. त्यांत जेवण्याखाण्याचा व वाहनाचा बंदोबस्त फार चांगला असे. त्या वेळीं फार चांगली कटलरी (सुऱ्या, काटे, चमचे), क्रोकरी (कपबश्या वगैरे) व चांदीचीं ताटेंवाट्या व तांब्ये असावयाचे. चहापाण्याची व जेवणाखाणाची व्यवस्था वेळेवर, चांगली व ठराविक ठिकाणीं असावयाची. सोवळेकरी (जेवण करणारेहि) तज्ज्ञ व हुषार असावयाचे. मुख्य तळावर तंबू, राहुट्या, खुर्च्या, पलंग वगैरे ठेवलेले असावयाचे. दुसऱ्या व तिसऱ्या नंबरच्या व्यवस्था मीं स्वतः पाहिलेल्या नाहीत. तथापि त्या अशा थाटाच्या व इतक्या बारकाईने आखलेल्या नसाव्यात असें वाटतें.

या पार्टीबरोबर रावबहादूर इदुल्कर, मामासाहेब मिणचेकर इनामदार, बाबासाहेब निंबाळकर चीफ पोलिस आफिसर व आणखी माझे दोनतीन स्नेही देण्याची व्यवस्था केली होती. ठरल्या दिवशीं रावबहादूर इदुल्कर यांच्या बंगल्यावर मी गेलों. आमच्या पार्टीकरिता बाजारभोगावपर्यंत मोटारी व तेथून पुढे खेचराचे टांगे व बैलगाड्या अशी व्यवस्था केली होती.

आमची शिकार फार चांगली झाली. चारपांच मोठालीं डुकरें, दोन सांबरें, एक मोठा तेंदवा (वाघ) मला मिळाला. बाकीच्या लोकांचीहि शिकार बरी झाली, पण मी मुख्य पाहुणा समजलें गेल्याने, चांगली शिकार मिळण्याचीं मचाणें (माळे) मला मिळत, म्हणून मला जास्त जनावरेंहि सापडत. अशा रीतीने शिकार संपवून आम्ही कोल्हापुरास परतलों व महाराजांच्या भेटीस गेलों.

मीं मुजरा केल्यावर महाराज म्हणाले, "का हो हसता?" मी म्हणालों, "महाराज, मोठ्या साहेबाची जशी शिकाराची तयारी व बंदोबस्त आपण ठेवता, तशीच माझी तयारी केली होती! मोटारा, खेचराचे टांग, बैलगाड्या व जगलात जाण्यासारखी तट्ट तयार होतीं. नाश्ता (न्याहारी), जेवण, चहा, फळफळावळ याची रेलचेल होती. पाहिजे तितके हाकेवाले होते. मग शिकार चांगली का न व्हावी? पण महाराज, तुम्हीं एवढी मोठी तयारी का केली?" महाराज म्हणाले, "हें पाहा, पाटील, एखादा फाटका साहेब आला तर त्याच्याकरिता आम्हाला तयारी लागते मग आमच्यातील तुमच्यासारखा एखादाच मोठा अधिकारी होतो, त्याच्यासाठी आम्हीं तयारी का न करावी? एवढी आमची हौस होऊ द्या. बरें, असो; तुम्हाला शिकार काय मिळाली?" मीं सांगितलं की, खुद्द मला तीनचार डुकरें मिळालीं, त्यात मोठ्या दाताचा एक येकूल होता. येकूल म्हणजे एकटा स्वैर फिरणारा मोठा डुकर. या येकुलाची मोठी गमत झाली. तें असें झालं, मला एका झाडावर बसविलें होतें. त्या खालून सावजें जाण्याचा मार्ग होता हाक्याला सुरुवात झाली त्यावेळीं हा येकूल माझ्या झाडाखाली येऊन उभा राहिला. इतकी संधि मिळाल्यावर मीं माझ्या बारा नबरच्या बदुकीनेच त्याच्या मणक्यावर गोळी मारली, त्याबरोबर तो सरळ वर उडून खाली पाठीवर पडला. फार मोठें जनावर असल्याने त्याला नाल्याबाहेर काढण्यास फार यातायात पडली. दुसऱ्या दिवशीच्या हाक्यात मला एक लाब शिगाचें व एक साधारण शिगाचें अशीं दोन सांबरें मिळालीं. आमच्या हाक्यात वाघ किंवा तेंदवा आला नव्हता म्हणून शिकारी अधिकाऱ्याने वर्दी आलेल्या ठिकाणीं शेळी बाधून जवळच्या झाडावर मचान बाधून ठेविलं होतं. त्या रात्रीं चांदण्याचा प्रकाशहि चांगला होता, म्हणून मला बॅटरीचा उपयोग करावा लागला नाही. तास दीड-तास बसल्यानतर माझ्या कानावर पाला वाजल्याची सळसळ आली. थोडक्याच वेळात तेंदव्याचे डोळे चमकू लागले. तो दबा धरून बसला होता. त्याने शेळीवर झेप घेण्यापूर्वींच माझी गोळी त्याच्या छातींत भिडली. त्याने एकदोन उड्या घेतल्या व तो एका खड्ड्यात पडला. इतक्यात आमचा शिकारी अधिकारीहि माझ्या मचानाखाली आला व म्हणाला, "आता आपण तबूवर जाऊ या. वाघ खड्ड्यात पडला आहे, पण आता तथे जाणें धोक्याच आहे. मी सकाळीं आणीन."

या शिकारींत मला आणखी एक गमत पाहावयास मिळाली. एके दिवशीं मी एका झाडावर बसलों असताना हाक्याची सुरुवात झाल्यानतर थोड्याच वेळात पाचसहा कोळशिंदे (कोळिसरे) माझ्या झाडाखाली येऊन झाडाच्या सभोवती बाहेर तोंडें करून उभे राहिले मोठ्या सावजाची वाट पाहात बसलो असल्याने मी त्याच्यावर बार काढला नाही कोळशिंदे हळूहळू पुढे निघून गेले. कोळिसरा म्हणजे जगलातील रानकुत्रा. त्याच शेपूट लाब असून त्याच्या टोकास लाब केसाचा झुपका असतो. त्याचे डोळे व कान तीक्ष्ण असतात. हीं जनावरें टोळ्या करून

राहतात. असे सांगतात की, या टोळ्या सांबरें, चितळें व भेकरें यास ताणून ताणून दमवून मारतात. त्याची गोष्ट अशी सांगतात की, कोळशिंग्यानी सावजाचें रान हेरलें म्हणजे ते आपल्या टोळींतील कोळशिंदे अंतराअंतरावर मैल दोन मैलपर्यंत पेरतात (उभे करतात). ही तयारी झाल्यावर एका टोकाचा कोळशिंदा 'कुक' (त्याचा एक ठराविक आवाज) घालतो ती ऐकताच सावज (भेकर, चितळ वा सांबर) पळून जाण्याचा प्रयत्न करतें. पहिला कोळिसरा त्याचा पाठलाग करतो. थोड्या वेळाने मधेमधे पेरलेले कोळिसरे त्याचा पाठलाग पुढे चालवितात, व शेवटीं सावज दमतें व नतर कोळिसरे त्यास फाडतात. कोळिसरे असलेल्या जगलात वाघ (तेंदवा) राहत नाही, पळून जातो. त्याचें कारण असे सागतात की, कोळिसरे त्याच्याहि अगावर टोळीने जाण्यास कमी करीत नाहीत. ते आपल्या शेपटीच्या झुरकाऱ्यावर मुतून, घेरलेल्या तेंदव्याच्या डोळ्यावर शेपूट मारून त्याला आधळें करून मारतात. मला स्वत ला ही झुज पाहण्यास मिळाली नाही, पण मला वाटतें, हे खरें असावें. कारण शिकारी लोक कोळिसरा दिसल्यास तें रान सोडून दुसऱ्या रानात शिकारीस जातात.

मी डेप्युटी डायरेक्टर असताना, म्हणजे सन १९१५ ते १९२५ च्या दरम्यान, रस्त्यावर रहदारी कमी असल्याने, फिरतीचें काम करून बहुतेक सध्याकाळीं पाचसहा वाजता निघून रात्रीं पुण्यास येत असे. त्या वेळीं सहजासहजी वाटेंत ससे व कधीकधी डुकरेंहि मिळत. जर सकाळीं निघून दुपारीं पुण्यास येण्याचें ठरलें तर सडकेजवळच्या डोंगरभागातून हरणें (काळवीट) मिळण्यास अडचण पडत नसे पुण्याच्या आसपास इतर लहानसान शिकार (पकुड्या, तीतर, हरेल वगैरे) मिळत असे. मुळा व मुठा व त्याचप्रमाणे नीरा नदींत मरळीचे मासेहि पुष्कळ मिळत.

मी उत्तर भागाचा डेप्युटी डायरेक्टर असताना, सन १९१८ सालीं अहमदाबाद जिल्ह्यातील विरमगाव स्टेशनाजवळील, छारोडी कॅटल फार्म (कानेजी जातीच्या जनावराचें) तपासण्यास गेलों होतों. गुजरातेंत ठाकर, भिल्ल, कोळी, वजारी वगैरे सारख्या खालच्या वर्गांतील जातीशिवाय कोणीहि मासाहार करीत नाहीत. शिवाय तिकडे साहेबलोकाशिवाय कोणीहि शिकार करीत नसे. छारोडी फार्मचें क्षेत्र सुमारें पचवीसशे एकर होतें या मोठ्या फार्मवर पुष्कळ हरणें व डुकरें असत. शिवाय जवळपासच्या भागातील हरणांडुकरास निर्धास्तपणें राहण्यास हें फार्म चागलें ठिकाण होतें.

या जनावराची कोणी शिकार करीत नसल्यामुळे हीं जनावरें माणूस पाहून लांब पळून जात नसत. फक्त दूर जाऊन झाडींत उभीं राहत. एके दिवशीं सकाळीं मी फार्मात फिरत असताना, एका लहानशा ढेपणीवर एक डुकराचा बाड उभा आहे असें मला वाटलें. मीं त्याच्यावर रायफल झाडली. बाड पडला. मी ज्याला ढेपण समजत होतों ती साव (डुकरीण) होती, ती उठून पळून गेली. पुढे फिरत फिरत

व याच समजावरून नलयानानें वल्हीनास छळल्यास वाङ्मयात या म्हणीची उपमा देतात व म्हणतात, "माठ्या माशानें लहान माशास गिळणें हा दस्तूरच आहे." पण ही म्हण सर्वस्वी खरी नाही. त्यात फक्त अर्धसत्य आहे, असे निरीक्षक शिकाऱ्याचें मत आहे. मला तें पटतें. एका जातीचा मासा आपल्या जातीच्या माशाचीं पिलें खात नाही, पण दुसऱ्या जातीच्या माशाचीं पिलें मात्र जरूर खातो.

माशाला ऐकू येत नाही असे म्हणतात, पण त्याची दृष्टि मात्र फार तीक्ष्ण असते. म्हणून दोन शिकारी एकमेकाशीं दुरून बोलतील, पण हालचाल मात्र बिल्कूल करणार नाहीत. पुष्कळानी पाहिलें असेल की देहू व आळदीजवळ इंद्रायणी दींत, आघोळ करतानासुद्धा, मासे अंगास घासून जातात. तसेच हरिद्वारजवळ गंगत
भौदुंबराजवळ कृष्णेंत माणसाला मासे बुजत नाहीत. पण या विवक्षित जागा
', वर खाली एक फर्लांगावर मासा इतर ठिकाणच्या माशासारखाच माणसास
आळदीच्या गोडापासून (आघोळीच्या जागेपासून) सुमारें एकदीड फर्लांगावर
हा पूल आहे. या पुलापासून खाली सहसा मासा दिसत नाही. मी एकदा
पाशेदुंबराच्या वरच्या बाजूस अवलखापेस एका पाहुण्याकडे गेलों होतों
औदुंबरीं त्याच्या वस्तीखाली मासा दिसेना; पण त्याने सांगितलें, अर्ध्या मैलावर
नव्हतीहात पाहिजे तेवढे मासे दिसतात. मला लोकाचीं मनें दुखवायची इच्छा
टेहाकडे मी पाहुण्याच्या वस्तीवर बंदूक ठेवून त्याच्याबरोबर औदुंबराच्या
मीं थे मला खरोखरच पुष्कळ मासे दिसले.

मासे खेळतां की मला पिलावरचा मासा मारणें आवडत नसे. पुष्कळ वेळा
शिकारास बसलों पाहत बसे. एकदा भावुर्ड्याजवळ किजळाच्या झाडावर
पटुनासह पाण्या,इतका गर्क झाला की वाकून त्याच्या हालचालीकडे पाहताना
हुषभून लात्री हें खें. तथापि रक्तातील हिंसक वृत्ति पुष्कळ वेळा भूतदयेस
नुकसान करीत नाहीत.ण, ससे, तींतर, हरेल, पकुड्यां, बदके, हे प्राणी फारम
एवढें खरें की असले प्रे शिकारी लोक (मी एक त्यातलाच) त्याना मारतात.
सकोच वाटत नसे; कारणे फारसे मारात नसें. डुकरें मारण्याचा मान मला
नासाडी फार करतात. म्हणून नावरे पीक खाऊनच राहत नाहीत तर पिकाची
घनात मनापासून भाग घेतला त्या नाश करण्यासाठी मीं योजना केल्या व तसल्या
मीं प्राण्याची हिंसा करणें सोडल अलीकडे मी शिकारीस जात नाहीं; याचा अर्थ
नाहीत, डोळेहि चागलें काम देत ", असे म्हणता येत नाही. आता श्रम होत
स्नायूत तितकीशी स्थिरता व बळकटी व पूर्वीप्रमाणे चटदिशी बंदूकहि झुळत नाही
मीं माझी रायफल व बंदूकच धाकच्या, वरा कधीकधी मन ओढ घेतें। म्हणून
पुष्कळ धावपळ केली आहे. आता नस गास देऊन टाकली. जगलशिकारींत मीं
आता मनसुद्धा ओढ घेत नाही.

# सामाजिक व धार्मिक मतें



माझ्या लहानपणीं व तरुणपणींसुद्धा दक्षिण महाराष्ट्रांत मनुप्रणीत ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र हे चार वर्ण न मानता मनूच्या अनुयायानी ब्राह्मण, वैश्य, शूद्र व अतिशूद्र असे चार वर्ण केले होते. *काही मानी मराठे घराणीं आपणास* क्षत्रिय म्हणवीत, हें खरें. शूद्र म्हणजे ब्राह्मणेतर असें समजलें जाई व अतिशूद्र म्हणजे अस्पृश्य अशी ढोबळ समाजरचना त्या वेळीं होती. अस्पृश्यता कठोरतेने पाळली जाई. शिवाशिव झाली तर स्नान करावें लागे.

याशिवाय ब्राह्मण स्त्रिया ब्राह्मणेतरांची अस्पृश्यता पाळीत. प्रामुख्याने डोळ्यापुढे येणारी गोष्ट म्हणजे महार, माग यांचीं नावें सरळ न घेता त्यांची नावें हीनतादर्शक करण्याची वहिवाट असे. त्या काळीं महार माग लोकांना रोज हजेरी द्यावी लागत असे. कुळकर्णी त्यांचीं नावें लिहीत तीं महादूऐवजी महाद्या महार, लक्ष्मणऐवजी *लक्ष्या माग अशीं. आम्हा मराठ्यांच्या मुलांना हें विचित्र वाटे. कारण आमच्या* घरांतील वायकामाणसें महारास "या-जा, अहो-जाहो" असें संबोधीत. माहेरचा महार आला असेल तर "केव्हा आलास?" असें विचारीत. अलीकडे महार माग लोक *आपल्या नावापुढे आडनावेंहि लिहितात*, 'महार', 'माग' असें लिहीत नाहीत.

ब्राह्मणेतरांचे धार्मिक विधि ब्राह्मण जोशीच करीत. पण ते पुराणोक्त पद्धतीने होत. *या ग्रामजोश्यांना वेदोक्त व पुराणोक्त यातला भेद कितपत समजत होता याची* मला शंका आहे. तथापि आमच्याकडे ग्रामजोशी ज्या वेळीं सत्यनारायणाच्या पूजेच्या निमित्ताने पूजेस येई त्या वेळीं तो 'पुराणोक्त' ह्या शब्दावर भर देऊन हा शब्द मोठ्याने उच्चारी.

शिवाशिवीच्या बाबतींत काळमानाने सुधारणा होत चालली आहे. त्याचीं मुख्य कारणें मनाच्या पालटापेक्षा प्रचारात आलेलीं प्रवासाचीं व वाहतुकीचीं साधनें

होत. आगगाडी, आगबोट, मोटर, बस याच्यात व इतर सार्वजनिक वाहनांत अस्पृश्यता पाळवाच येत नाही. खेडेगावात शाळामध्ये उघड रीतीने अस्पृश्यता पाळली जात नाही. देवाल्यात कायद्याने जरी अस्पृश्यास देवदर्शनाची मुभा असली तरी वहिवाटींत अजून अस्पृश्य देवळात जात नाहीत व त्यास जाऊ दिलेंहि जात नाही.

माझ्यापुरतें बोलावयाचें झाल्यास मला कबूल केले पाहिजे की, ज्या सामाजिक परिस्थितीत माझा जन्म झाला, ज्या वातावरणात व सगतींत माझे पूर्वायुष्य गेलें त्याचा माझ्या मनावर दृढ परिणाम होणे अपरिहार्य होतें. पुढे परिशीलनाने व निरीक्षणाने समाजातील व्यंगे व अडचणी मला दिसल्या व मनास पटल्याहि. समाजातील उचनीचपणा मनास झोंबला. पण धडाडीने ह्या दोषाच्या निवारणाचे प्रयत्न माझ्याकडून फारसे झाले नाहीत.

पण एवढे खरें की जर कोणीं घरच्या वा बाहेरच्या माणसानी काही सामाजिक सुधारणा करण्याचें योजिले तर त्याचा मीं प्रतिकार केला नाही. खळ्यावर पिकाची मळणी करून रास घरीं पोचवण्याच्या कामीं शेतकऱ्याबरोबर बैलाच्या महाराचा वापर होई आणि त्यामुळे महाराची शिवाशिव होणें अपरिहार्य असे. म्हणून घरीं आल्यावर शेतकरी लोक मुलाबाळाकडून अंगावर पाण्याचे शिंतोडे टाकून घेत. शेतकऱ्याचीं मुलेंसुद्धा महाराच्या मुलाची शिवाशिव झाल्यास अंगावर पाणी टाकून घेत. या रूढीचा परिणाम मजवर झाला होता.

माझ्या तरुणपणाच्या आकुंचित मनोवृत्तीची दुसरी एक गोष्ट मला आठवते. मी महाराष्ट्रात शेतकीइन्स्पेक्टर असताना अहमदनगरास माझ्या हाताखाली एस्. जी. मुरस्केर नावाचे एक मराठा स्नेही तेथे जिल्हा ओव्हरसिअर होते. आम्ही दोघे मिळून अहमदनगरहून फिरती करीत करीत करमाळ्यास गेलों व तेथील डाकबंगल्यात उतरलों. त्या वेळीं कोल्हापूरच्या राजाराम हायस्कूलमधील माझे एक मुसलमान स्नेही मुतवली इनामदार तेथ फौजदार होते. फौजदाराना कोण आले गेले याची माहिती लागतेच. ते लगेच माझ्याकडे डाकबंगल्यात आले. बऱ्याच दिवसानी आमची गाठ पडलेली असल्यामुळे त्याना व मलाहि आनंद झाला. आणि ते म्हणाले, "मी संध्याकाळच्या जेवणासाठी शिधासामग्री पाठवून देतों बर का!" जुन्या वहिवाटीप्रमाणे, त्यानी आम्हास आपल्या घरीं जेवावयास येण्याचें आमंत्रण न देता शिधासामग्री पाठवून देतों म्हणण्यांत कांही गैर नव्हतें. मीं त्याना सांगितले, "तुम्हीच सवडीने आमच्याबरोबर जेवायला या. उगीच शिधासामग्रीची यातायात करू नका." मुतवली इनामदार जुन्या खानदानी घराण्यातील असून मिरजेच्या एका स्वर्गांचे प्रमुख होते. "बरें फार छान!" म्हणत ते आपल्या घरीं गेले आणि आंबेमोहराचे तांदूळ, कमाफ, चिकन तयार केलेली घमेली घेऊन डाकबंगल्यावर आले. माझे स्नेही मुरस्केर, त्या वेळीं तरी, माझ्यापेक्षा जास्त सुधारक दिसले. मुतवली फौजदाराच दर्जाची गुर्मी ठेऊन आम्ही बसल्याच्या जोग्हाडमध्ये जेथ माझा स्वयंपाकी

जेवण बनवीत होता त्या खोलात गलों. मुरकेकर म्हणाले, "पाटीलसाहेब, ह्या आपल्या स्नेह्याने फार अगत्य दाखविलें. नको नको म्हणता, शिधा व चोंनडी चिरनहि आणली. हा त्यांच्या मनाचा मोठेपणा आहे. आपण शिधा न घेता, त्यांच्याच घरीं जेवणास जाणें बरें नाही का?" मलाहि तें पटलें व मीं मुतवल्लींना सांगितलें, "आम्ही तुमच्या घरींच जेवावयास येतों." त्यांना फार आश्चर्य वाटलं व आनंद झाला. मुतवल्लींच्या बिबीने वानड्याचा रस्सा, ताज्या तुपात बकऱ्याचे मासाचे कबाब, पुलाव व इतर फार चांगले पदार्थ बनविले होते. तरीहि जेवायला बसताना संकोच वाटला, हें कबूल केलें पाहिजे. हीच माझी परधर्मियाच्या घरीं जेवण घेण्याची पहिली खेप. तसें पाहिलें तर मुतवल्लींकडे जेवण्यात काहीच गैर नव्हतें. पण पूर्वसंस्कार व जुन्या रूढींचा मनावर पगडा बसलेला असला म्हणजे या रूढि मोडणें प्रथमप्रथम तरी जड जातें. माझ्या पूर्वायुष्यातील सनातनी मताचीं आणखी दोनतीन उदाहरणं माझ्या डोळ्यांसमोर आहेत.

मोठ्या अविभक्त, जुन्या मराठा शेतकरी कुटुंबात बऱ्याच बालविधवा असणारच, त्या विधवा बाया पूर्वपरंपरेप्रमाणे आल्या स्थितीस तोंड देऊन वैधव्यात दिवस कढीत. पण अशींहि एकदोन उदाहरणें घडलीं की, एका तरुण बाईच्या असहाय स्थितींत तिला तिच्या दिराभावाचा आधार मिळाला नाही. मी त्या वेळीं (सन १९२१) अमेरिकेंत होतों. मला तेथे त्या नातलग गतधवा तरुण मुलीचें पत्र आलें. त्यांत तिने आपल्या असहाय स्थितीचें वर्णन करून विनविलें होतें की, "माझ्या मोठ्या दिराला लिहून माझ्या पोटापाण्याची व लुगडेकपड्याची सोय कराल काय?" मीं त्याप्रमाणे तिच्या दिरास, त्याच्या घरदारपणास आवाहन करून, तिच्या अन्नवस्त्राची सोय करण्याची विनंती केली. माझ्या विनंतीचा उपयोग झाला नाही व मी परत येण्यापूर्वीच तिला पुनर्विवाह करणें भाग पडलें. तिला आता मुलंबाळें आहेत व ती सुखात आहे. पण तीस वर्षांपूर्वी, अमेरिकेहून मीं परत आल्यावर तिला आमच्या घरीं बोलावण्याची आठवण वा धैर्य मला झालें नाही. हा मनाचा कमकुवतपणा मला आजहि बोचतो. आता मात्र वाटतें की, त्या आमच्या नातलग बाईने मला एकदा येऊन भेटावें. शक्य आहे की, मी थोडे दिवस गावीं जाऊन राहिलों तर तिला बोलावून घेऊन लुगडेचोळी करीन.

यानंतरची गोष्ट चिरंजीव शंकररावाच्या विवाहाची. शंकरराव विलायतेंत लष्करी शिक्षण घेऊन परत येताच ते अधिकारी बनले. या वेळीं त्यांचें वय वीस वर्षांचें होतें. विलायतेत शिक्षण घेऊन वरच्या दर्जावर गेलेले हेच एकटे एक लष्करी अधिकारी असल्याने त्यांच्यासाठी मुली सांगून येऊ लागल्या, पण त्यांनी आग्रहाने कळविलें की, सैन्यातील वरच्या अधिकाऱ्यात ते तीस वर्षांच्या वयाचे होईपर्यंत वा कॅप्टन होईपर्यंत विवाह करण्याची प्रथा नाही. त्यांचे म्हणणें मान्य करणें भाग होतें. मीं सन १९३२ सालीं पेन्शन घेतलें. शंकररावांना कॅप्टनची बढती मिळताच परत

मुली सांगून येऊ लागल्या व पत्नीनेहि माझ्यामागे लकडा लावला तेव्हा मी वरचेवर लग्नासंबंधी शंकररावाना लिहू लागलें. पण ते तो विषयच टाळीत. मीं दोन मुली पाहून त्याच्या बाबतीत शंकररावाना लिहिलें होतें. त्यावरहि त्याच्याकडून काही लिहून आलें नाही. तेव्हा मींच त्याच्याकडे दिल्लीस जाऊन त्याचें मत घ्यावें, असें माझ्या आईने व पत्नीने सुचविलें. त्याप्रमाणे मी दिल्लीस गेलों व लग्नाच्या बाबतींत तुमचें काय मत आहे तें साफ-साफ सांगा, म्हणजे आम्ही मुली पाहू, तुम्हास दाखवू, असे मीं त्याना सांगितलें. गोष्टी निकरावर आलेल्या पाहून त्यानी सांगितलें कीं, "मीं या गोष्टीचा सखोल विचार केलेला आहे. मीं एक मुलगी पाहिली आहे. ती एका प्रतिष्ठित पंजाबी ॲड्व्होकेटची मुलगी असून सुशिक्षित आहे. ती लवकरच डॉक्टरी परीक्षा पास होईल. मी तिला चांगलें जाणतों. माझी खात्री आहे कीं, ती तुमच्याशीं व माझ्या आईशीं मिळतें घेऊन तुमच्या वृद्धावस्थेंत तुमची योग्य काळजी घेईल व तुमचा मान राखील. आपण जर संमति द्याल तर मी तिच्याशीं लग्न करीन, नाही तर मी आजन्म अविवाहित राहणार."

शंकररावाचा स्वभाव करारी असल्याचें मला माहीत होतें व त्यानी आपलें म्हणणे नम्रपणानें पण अगदी स्पष्टस्पष्ट सांगितलें होतें, तेव्हा त्याच्याशीं फारसा वादविवाद घालण्याच्या भानगडींत न पडता मी दिल्लीहून परत कोल्हापुरास आलों. या वेळीं आम्ही स्टेशनावरील आमच्या बंगल्यात राहत होतों. पत्नीस झालेली हकीकत सांगितली व विचारलें "आता काय करावें?" ती म्हणाली, "मी काय सांगू! आपण व मामी (माझी आई) काय तें पाहून घ्या!" मी नंतर गावीं आईकडे गेलों. आईस नमस्कार करून जुन्या घरातील झोपाळ्यावर बसलों. आईने चहा आणून दिला आणि विचारलें, "भाऊसाहेब कसे आहेत! त्याच्या लग्नाबद्दल तुम्हीं त्याना विचारलें का?" मीं ते सुखरूप आहेत म्हणून सांगितलें, व पुढे काही बोललों नाही माझें मन अस्वस्थ असल्याचें आईने ताडलें व म्हणाली, "पण ज्या कामासाठी इतक्या दूर तुम्ही गेलात त्याचें काय?" मीं उत्तर दिलें नाही. बसल्याबसल्या झोपाळ्यावरूनच वर आकाशाकडे पाहत होतों. तेव्हा तिने परत विचारलें, "मग भाऊसाहेब म्हणतात तरी काय?" तेव्हा मी भाऊसाहेबाशीं झालेलें माझं सविस्तर बोलणें तिला सांगितलें व तिच्याकडे पाहत राहिलों. आई म्हणाली, "स्वतः मुलगी पसंत करून ते लग्न करीत असले तर खुशाल करू देत. ते आता तीस वर्षे वयाचे झाले आहेत. त्याची जबाबदारी त्याना कळते. तुम्ही का काळजी करता? त्याच्या मुलाबाळाची जबाबदारी त्याना कळते व ती तुमच्यावर पडणार नाही. सगळं काही ठीक होईल. तुम्ही त्याना कळवा की, 'माझी, तुमच्या आईची व आजीचीहि तुम्ही पंजाबी मुलीशीं लग्न करण्यास काही हरकत येणार नाही. पाहिजे तर कोल्हापुरात लग्न करा, पाहिजे तर दिल्लीस करा. पण लवकर लग्न करा.'" हे आईचें धीटपणाचें बोलणें ऐकून मला आश्चर्य वाटलें. मी भीत होतों की, ही जुन्या जमान्यातील,

खेड्यांत राहणारी वाई आता माझा खरपूस समाचार घेणार. मी समाजात वावरलेला, परदेशीं गमन केलेला माणूस शंकररावांच्या आंतरजातीय व आंतरप्रांतीय विवाहास भीत होतों पण माझ्या आईनेच अनुमति दिल्यावर मला हायसे वाटलें व धीर आला. एवंकरच शंकररावाचें लग्न त्यांनी पसंत केलेल्या वधूबरोबर झालें. ते आनंदात राहत आहेत. त्यांच्या मोठ्या मुलीने पंजाबी क्षत्रियाशीं व दुसरीने बंगाली क्षत्रियाशीं लग्न केलें. शंकरराव संकुचित वृत्तीचे नाहीत. ते केवळ महाराष्ट्राचेच नसून उभ्या हिंदुस्थानचे आहेत. देशाच्या एकीकरणाच्या दृष्टीने त्यांनी केलें तें योग्यच केलें.

मीं जरी समाजसुधारणेंत प्रत्यक्ष भाग घेतला नसला तरी पण त्या सुधारणाच्या आड आलों नाही. वाटेल तें करा म्हणून अंग काढून एका बाजूला झालों नाही. त्यांच्यामध्ये एकरूप झालोंच की!

१

दक्षिण महाराष्ट्रातील लहानमोठ्या सर्व गावात एकदोन देवळें असत व आजहि आहेत. असल्या प्रशस्त देवळाशिवाय गावाबाहेर म्हसोबाच्या अगर मरीआईच्या नावें लहान देवळात, गुड्यात अगर उघड्यावर भोवती लहानशा सुट्या दगडागोट्याच्या खिळ्यातील एका उभ्या दगडास शेंदूर फासलेला असे. गावांतील देवालयें मुलाबाळाना खेळण्याच्या, लोकाना बसण्याउठण्याच्या व एकत्र येऊन गप्पागोष्टी करण्याच्या जागा असत. भजन-कीर्तन झालें तरी बहुधा देवालयांतच होई. गावातील देवळाची झाडलोट व देवपूजा गुरवाकडे असे. हे गुरव ब्राह्मणेतर जातीचे आहेत. सणावारादिवशीं व देवाच्या वाराच्या दिवशीं (म्हणजे देवी असल्यास शुक्रवारीं अगर मंगळवारीं, मारुती असल्यास शनिवारीं, महादेव असल्यास सोमवारीं) कांही लोक देवासाठी नैवेद्य आणीत. देवास दाखविलेला नैवेद्य गुरवाकडे जाई. नैवेद्याबरोबर नारळ असल्यास गुरव तो वाढवून (फोडून) देवास दाखवी. एक भकल व अंगारा (धूपारतींतील राख) नारळ आणणाऱ्यास परत करी. सणावारीं लोक नैवेद्य आणीत व आजहि आणतात. शहरात पुजारी ब्राह्मण असतो. दसऱ्याच्या नवरात्रात रोज दुपारीं गावचे लोक देवालयात जमून आरती करत. आरतीच्या वेळीं गावचे डवरी, गोंधळी, जगम व ढोल वाजविणारे धनगर जमून आरती होई व नंतर देवाची पालखी काढून देवालयाभोवती प्रदक्षिणा घालीत. अलीकडे असल्या समारंभास फार थोडे लोक जमतात.

सणावाराच्या दिवशीं आरती संपण्याच्या सुमारास कोठेकोठे ठराविक माणसाच्या अंगात देव येई. म्हणजे तो माणूस घुमू लागे व गोंधळी संबळ वाजवीत असतां त्याच्यापुढे हातवारे करीत नाचे व बेभान दिसे. लोक त्याला प्रश्न विचारीत. तो घुमतघुमत हातवारे करीत "भाकीत करी". प्रश्नाचें उत्तर देई. गावात कोणी

आजारी असल्यास, "त्याला असे का होते? देवा, त्याला लवकर उतार पडू दे!" अशी मागणी करीत. त्यावर तो 'झाड' म्हणे, "अमक्या देवास बकरे दे. तू देवाला गोंधळ घातला नाहीस तो घाल." असे काही तरी सांग. गोंधळाच्या दिवशी देवीपुढे बकरे बळी देण्याची वहिवाट असे. अशावेळी गोंधळास व नंतरच्या जेवणास गावांतील लोक जमत. चैत्रवैशाखांत गावाशेजारच्या देवाची जत्रा भरे त्या वेळी पावसाचे भाकीत होई. ज्याच्या अंगात येई तो माणूस काही तरी हाहू करीत सांग. मला आठवते, एकदा त्याने "रोहिणी फावबाउ (वृश्चिक नक्षत्र) उघडे जाईल, मृग मात्र बरसेल" असे सांगितले होते. लोक असले भाकीत श्रद्धेने ऐकत. अलीकडे देव अंगात येताना मी पाहिले नाही. देव अंगात येण्याची प्रथा अशिक्षित ब्राह्मणेतरांतच होती असे नाही. ब्राह्मणांतसुद्धा दसऱ्यात ब्राह्मणस्त्रिया एके ठिकाणी जमून तांदळाच्या पिठाची एक देवी बनवून तिच्याभोवती फेर धरून गाणी म्हणत; नंतर त्यांपैकी काही स्त्रिया दोन्ही हातांच्या पंजावर रिकाम्या घागरा घेऊन नाचत नाचत फेर घेत असतानाच त्या घागरींच्या तोंडात फू फू करीत फुंकर मारीत. या सारख्या फुंकर मारण्याने घागरींतून एक प्रकारचा गंभीर आवाज निघतो. जसजसा घागरींतून आवाज घुमू लागतो तसतसा स्त्रियांच्या फेरांतील नाचण्यास रंग येतो. बाया फेरात नाचून थकतात. एखाद्या बाईच्या अंगात येते व ती हाहू करीत खाली पडते. इतर स्त्रिया तिला आपल्या अडीनडीबद्दल प्रश्न विचारतात. त्यास ती हांहू करीत उत्तर देते. स्त्रियांच्या असल्या फेऱ्यातील गाण्यावाजविण्यास 'घागर घुमविणे' म्हणतात.

गावच्या देवळाशिवाय मुसलस्तु शेतकऱ्यांच्या घरींसुद्धा देव्हारे असत. आजहि आहेत. ब्राह्मणाच्या व वैश्याच्या घरीं तर देव्हारे असतच. आमच्या घरीं आई हयात असेपर्यंत वडगावास व शिवाय कोल्हापुरातहि देव्हारा असे. माझ्या वेळचा देव्हारा आता माझे ज्येष्ठ चिरंजीव शंकरराव यांच्याकडे कोल्हापुरात आमच्या बंगल्यांत आहे. त्या देव्हाऱ्यात ज्योतिबाचा पितळी मुखवटा आहे. देवीची व कृष्णाची अशा मूर्ति आहेत. याशिवाय सातआठ टाक व एक शंख आहे. हे वडिलोपार्जित टाक पातळ चांदीच्या पत्र्यावर ठसे उठवून केलेले व तांब्याच्या जाड पत्र्यावर लाखेने चिकटवलेले आहेत. हे टाक म्हणजे पूर्वजांच्या मूर्ति समजल्या जातात. सन १९४७त कोल्हापुरास देव्हारा हलविण्यापूर्वी वडगावीं आमच्या घरीं गावचा गुरव रोज सकाळीं येऊन देव्हाऱ्यातील मूर्तीची पूजा करी. खेड्यात अशी वहिवाट असे की ज्याच्या घरीं देव्हारा असे त्याच्या घरीं गावचा गुरव सकाळीं आंघोळ करून ताजें पाणी व शक्य असल्यास चार फुलं घेऊन जाई व देवाची पूजा करी. धूप घालताना घंटीचा आवाज होताच घरातील बाई एक ताजी भाकर, कधीकधी त्यावर भाजीपाला घालून गुरवाच्या हातीं देई. देवास भाकरीचा नैवेद्य दाखवून नैवेद्याची भाकर गुरव नेई. गुरव देवपूजा करून दोनतीन पत्रावळी त्या घरात देऊन जाई. या वहिवाटीनुसार सन १९४७पर्यंत गुरव देवपूजेस येत असे. वडगावचा

देव्हारा कोल्हापुरास आणल्यावर गुरवाच्याकडून होणारी देवपूजा बंद पडली.

खेडेगावात वतनदार पाटील घराण्याची स्वतंत्र थडगीं असत व आजहि आहेत या घराण्यातील माणूस वृद्ध होऊन मेला म्हणजे त्याच्या अस्थींपैकी काही त्या थड्यात घालवात. सणावाराच्या दिवशी विशेषकरून मेलेल्या माणसाच्या श्राद्ध व्हाळाच्या दिनीं त्या थडग्यास पाणीफुल वाहून नैवेद्य दाखवीत. काही लोक मेलेल्या मातापित्याच्या नाव आपल्या एका शेताच्या कुपणाजवळ नारळाएवढा गोग ठेवीत. असल्या गोग्याचे ओळीस थडील म्हणत. व शेत परताना त्या गोग्यापुढे नियाच्या पाच मुठी ठेवून पाया पडून पेरणीस सुरुवात करीत.

माझ्या ल्हानपणी खेड्यातील लोकांचा तरी भुताखेतावर फार विश्वास असे. बहुतेक शेतकऱ्याच्या एकदोन शेतात व घराच्या मागे परसात दरसाल बकरें कोंबडें देत. त्याला बकऱ्याची अगर कोंबड्याची जत्रा म्हणत. या जत्रा आषाढ महिन्यात असत. शक्य आहे की, पावसाळ्याच्या प्रारंभीच्या गारठ्यात शेतकऱ्यांना खारकाड, मासमच्छर खावेंसे वाटत असावें. शिवाय जुन्या काळीं श्रावणात कोणी मास खात नसत. म्हणून आषाढात असल्या जत्रांची गर्दी असे. कोकणातील लोकांचा बकर कोंबडे देण्यावर जास्त विश्वास असे. ब्राह्मण लोक जरी मास खात नसत तरी तेहि विवक्षित देवतेस बकर देत. असे कापलेलें बकरें ते आपल्या कुळाकडे देऊन त्याचा नैवेद्य देवास दाखवावयास सागत. बकर कापतेवेळीं व नैवेद्य दाखवितेवेळीं ते हजर असत. हें मीं कोकणात डेप्युटी डायरेक्टर असताना पाहिलें आहे. आज लोकात शिक्षण वाढल आहे. शिवाय बकऱ्याकोंबड्याच्या किंमतीहि वाढल्या आहेत. आज कोकणात जत्रेची अवस्था कशी आहे तें मला सागता येत नाही.

माझ्या बालपणीं खेड्यातील लोक 'गुरु' करीत मराठा शेतकरी समाजात हा गुरु ब्राह्मणेतर असे. त्याच्या निरनिराळ्या शाखा आहेत. आमच्या भागात गिरी, पुरी व भारती या शाखा आहेत. आमच्या गावात माझ्या बालपणीं पंढरपुराकडील आळसुदे गावच्या मठांतील कृष्णगिरीची वर्षातून एक फेरी होई त्या वेळीं, ज्याचे कान फुकलेले नसतील (म्हणज ज्यानी गुरु केलेला नसेल) त्याचे कान गुरुबुवा फुंकी- हे तिन्ही पंथ गोरखनाथपंथीय असावेत. आमच्या गावाजवळ बत्तीसशिराळ्यास गोरखनाथांचा मठ आहे. तेथे वैशाख महिन्यात मोठी जत्रा भरते. त्या वेळीं आमचा गुरुंना इतर बागाबरोबर हजर असे. कृष्णगिरी गुरुबाबा ल्हान तट्टावर बसून येत. त्याच्या जेवणाची व घोड्याच्या चंदीवैरणीची व्यवस्था आमचे लोक मनोभावें करीत. गुरुबाबा आपला स्वयपाक आपणच करीत. तथापि कधीकधी आपल्या शिष्याच्या घरीं जेवावयास जात. मला वाटतं त्या वेळीं आमच्या घरीं कोंबडीचा रस्सा करीत. गुरुबाबा देवळाच्या सोप्यात उतरत. त्या वेळीं गावातील ल्हान ल्हान मुलें त्याच्या भोवती जमत. त्यास गुरुबाबा खारका देत. या खारका शिराळ्याच्या नाथाच्या भेट, तेथील नाथाच्या मूर्तीपुढे भंडाऱ्याबरोबर वाहिलेल्या असल्याने त्या पिवळट

दिसत. कृष्णगिरींनवर त्याचा शिष्य हरिगिरी कधीकधी आमच्या गावात येई. पण पुढे त्याच्याबरोबर एक बाई (तो ती आपली मावसबहीण म्हणे) येत असे. हें लोकाना न आवडल्याने लोक त्याला मानीतनासे झाले. तो आता हयात नसावा. आता आमच्या गावात कोणी गुरुबाबा येत नाही.

माझ्या लहानपणीं म्हणजे सुमारें सत्तर वर्षांपूर्वी पश्चिम महाराष्ट्रात व विशेष करून कोकणांत देवास कौल लावीत. कौल लावणें म्हणजे देवास प्रश्न विचारणें मूर्ति बोलत नसल्याने माणसे काही हिकमत करितातच. त्यासाठी पूजारी मूर्तीच्या दोन्ही बाजूस भाताचे दाणे पाण्यात भिजवून लावी (चिकटवी) अगर मूर्तीची ठेवण फुलें ठेवण्यास योग्य असल्यास फुलें ठेवी व मोठ्याने म्हणे, "उजवा, पावचा दे" अगर असेच काही तरी म्हणे. तो दाणा अगर फूल पडल्यास विचारलेल्या प्रश्नास देवाचें उत्तर 'होय' असें समजत. भलताच दाणा पडल्यास परत दाणे अगर फुलें लावून पुजारी मागणी करी. कौलाचा उलगडा पुजारी करी डोंगरभागातील शेतकरी शिकारीस जाण्यासाठीसुद्धा कौल लावून विचारीत. "उद्या शिकारीस गेल्यास शिकार मिळेल किंवा नाही?" म्हणून कौल लावीत. "जा, शिकार मिळेल." असा कौल मिळाल्यास लोक उत्साहाने शिकारीस जात. "नको. शिकार मिळणार नाही." असा कौल लागल्यास शिकारीचा बेत पुढे ढकलीत. अलीकडे कौल लावण्याची प्रथा देशावर तरी मोडत चालली असावी.

पोथ्या वाचणारेसुद्धा पोथ्यास बोलावयास लावीत. कोणीं काही विचारलें अथवा स्वत स एखाद्या प्रश्नाबद्दल शंका उत्पन्न झाली तर गवताची काडी पोथींत खुपसीत व तेथील ओव्याचा मतलब प्रश्नाचे उत्तर समजत. हें महाराष्ट्रातच होतें असें नाही. पंजाबात शीख पथाच्या ग्रंथसाहेबास माणसें बोलावयास लावीत. मला तर एका पीएच्०डी० हिंदु प्रोफेसराने सांगितलें की आपण जरी शीख नाही तरी आपला ग्रंथसाहेबावर विश्वास आहे व आपण कधी कधी ग्रंथसाहेबात काडी घालून आपल्या प्रश्नाचें उत्तर मागतों. पंजाबच्या उल्लेख करण्याच कारण एवढेच की चोहोकडे असेच हावें व आजहि थोडेंफार देवभोळेपण आहे.

माझ्या लहानपणीं मूर्तिपूजेवर माझी श्रद्धा असे. गावीं असताना मी रोज ज्योतिबाच्या देवाल्यात दर्शनास जाई. आमच्या गावाजवळील कापशीस ताई साहेबांच्या (विशाळगडच्या पंताच्या घराण्यातील एका बाईची समाधि) दर्शनास दर गुरुवारी जात असें. माझी मराठी चौथीची परीक्षा पास व्हावी म्हणून मीं ताई साहेबाच्या समाधीस नवस केल्याचें मला स्मरतें. कोल्हापुरास हायस्कूलमध्ये असताना दर शुक्रवारीं सध्याकाळीं अंबाबाईच्या दर्शनास जाई त्या वेळीं देवळाच्या आवारातील दत्ताच व इतर देवतांचेंहि दर्शन घेई.

कोल्हापुरास कॉलेजमध्ये गेल्यावर नियमितपणें अंबाबाईच्या दर्शनास जाण्याचें बद पडलें. तथापि महाद्वाररस्त्याने अंबाबाईच्या देवाल्यावरून जाताना मी हात

जोडीं. आजहि जोडतों. गावीं गेलों म्हणजे प्रथम देवदर्शन घेऊन मग घरीं जातों. पण ल्हानपणीं जसे देव नवसास पावतो असें वाटे तसें तरुणपणीं वाटेनासें झालें. मूर्तींत देवपणा आहे असें आता वाटत नाही. तथापि देवालयावरुन जाताना हात जोडतों व देवळांत गेलों तर देवदर्शन घेतो. का कोणास ठाऊक, आमचें कुळदैवत पेठेचा माणकेश्वर, तुळजापूरची भवानी किंवा तिचीच प्रतिमा आमच्या गावाजवळील सरुडातील निनाबाई याच्या दर्शनास केव्हा तरी जावेंसें वाटतें व संधि आल्यास जातों.

दरसाल मातीचे नागोबा व गणपति बाजारातून आणून बसविणें व आठचार दिवसानी त्यास जोळविणें (नदींत टाकणें) ह्यावर श्रद्धा असणें अवघड. तथापि मुलं नातवडानी आपल्या सणावाराची परपरा चालवावी आणि त्यातून आनंद व समाधान मिळवावें असें मला वाटतें.

माझ्या ल्हानपणीं लोक श्राद्ध म्हाळ घालीत. त्या वेळीं खेड्यातील लोक तरा जवळपासच्या गावातील नातलगाना व गावातील काही लोकाना जेवावयास बोलवीत. ही वहिवाट हळूहळू बंद पडत चालली आहे. मी बहुधा आईवडिलांच्या श्राद्धाच्या दिवशीं गोडधडाचा नैवेद्य त्याच्या नावाने दाखवितों. माझी खात्री आहे की मीं दाखविलेला नैवेद्य त्याना पोचत नाही; पण मला वाटतें, या निमित्ताने तरी त्याना स्मृतिपुष्पें वाहता येतात.

माझ्या आईवडिलाचा तीर्थयात्रेवर विश्वास व मूर्तिपूजेवर श्रद्धा असे. दसन्यात आई नवरात्राचे नऊ दिवस हलक्या (केळीं, खजूर, दहीदूध यासारख्या) फराळावरच राही. त्या काळीं श्रावण महिन्यात लोक दुपारीं फराळ करीत व सध्याकाळीं सोमवार सोडत. आषाढी-कार्तिकी एकादशीस उपवास करीत. मीहि असले उपास करीं. अलीकडचे तरुण व मुलें असले उपास करीत नाहीत. माझेहि उपास बंद पडून बरेच दिवस झाले. आई व पत्नी ह्यात असेपर्यंत मी उपास पाळीत असें. हळूहळू विचारांत परिवर्तन घडत गेलें. सन १८९९ सालीं मी कोल्हापुरास मॅट्रिकमध्ये होतों. नव्हेंबरात चाचणी (प्रिलिमिनरी) परीक्षा झाली. मला दोन विषयात पुरेसे मार्क मिळाले नाहीत म्हणून मला युनिव्हर्सिटीच्या परीक्षेस जाता येत नाही असें कळलें. तेव्हा मी निराश होऊन, दप्तर गुडाळून घरीं गेलों. तेथून आईस बरोबर घेऊन गावच्या काही लोकाबरोबर बैलगाडीने पंढरपुरास गेलों होतो. पुढे नोकरींत गेल्यावर, पंढरपूर, पेठ व नाशिक हीं स्थळें माझ्या डिव्हिजनमध्ये असल्याने आईवडिलास घेऊन तिकडे मला सहजासहजी जाता येई. सन १९११ सालीं सरकारी खर्चाने प्रयाग येथे भरलेलें शेतकीप्रदर्शन पाहण्यास गेलों. तेथून काशी व गया जवळ असल्याने तिकडेहि गेलों होतों. पण ही यात्रा "सहज पडे, दडवत घडे" अशापैकीच होती. सन १९१४ सालीं आईवडिलांस घेऊन रामेश्वरास गेलों होतों. त्या वेळीं दक्षिण हिंदुस्थानातील बहुतेक सगळीं क्षेत्रें पाहिलीं. पण या यात्रेंतहि मातृपितृभक्तीचा भाग मोठा होता.

सन १९३२ सालीं मी पेन्शन घेतल्यावर दरसाल महिनाभर तरी आईस व पत्नीस घेऊन चक्ररावाकडे उत्तर हिंदुस्थानात वा बाबासाहेबाकडे ग्वाल्हेरीस जाई. त्या वेळीं हरद्वार, अयोध्या, काशी, मथुरा या यात्रा झाल्या. आई व पत्नी निवर्तल्यावर चिरंजीव नानासाहेबाकडे गेलों असताना त्याच्या मुलामाणसाबरोबर हरद्वार व हृषीकेश या यात्रा घडल्या. चक्रराव जालंदरास असताना तिकडे जातेवेळीं सोमनाथाचें व रैवतक पर्वतावरील अंबादेवीचें दर्शन घेतलें व नतर द्वारकेस गेलों होतों. चक्रराव लखनौस असताना त्याच्याबरोबर अयोध्या, प्रयाग, काशी, जगन्नाथपुरी व कोनार्कच्या यात्रा झाल्या. चक्रराव पूर्वभागाचे—ईस्टर्न कमांडचे—मुख्य असल्याने तिकडील लष्करी ठाण्याच्या तपासणीस त्याना अधूनमधून, स्वतंत्र राखीव डब्यातून जावें लागे. त्यामुळे हीं क्षेत्रें मला सहज पाहता आलीं. मी ज्या ज्या क्षेत्रीं जाई तेथील तीर्थांत स्नान करीं व क्षेत्रांतील मूर्तीचें दर्शन घेई. पण तीर्थयात्रेपेक्षा तिकडील प्रेक्षणीय स्थळें पाहण्यास मी गेलों होतों हें म्हणणें बरें! एकदा तर काशीस असताना गंगेवर स्नानास गेलों तेव्हा गंगेंत अर्धवट जळलेलें प्रेत तरंगताना पाहून स्नान न करताच परत आलों होतों. हैदराबादेहून कोल्हापुरास जाता येतां कधीकधी पंढरपुरास व तुळजापुरास देवदर्शन घेऊन दुसऱ्या दिवशीं पुढे जातों. मूर्तीवर फारसा विश्वास नाही म्हणावयाचें आणि तीर्थांच्या ठिकाणीं मुद्दाम किंवा सहज जाऊन देवदर्शन घ्यावयाचें यात थोडी विसंगति आहेच!

साधुसंतांचीं निरनिराळीं आराध्यदैवतें दिसतात. कोणी शिवास, कोणी रामास, कोणी कृष्णास देवत मानतात. मजसारख्या साधारण माणसाला त्या सर्वांना पूज्य मानावेंसं वाटतें. पण बराच विचार केल्यावर एकच देव असावा असें वाटतें. त्यास आकार नसावा, पण ती एक चैतन्यशक्ति असावी असें भासतें. द्वैतापेक्षा अद्वैत पटतें. सर्वांतरीं एकच एक परमेश्वर या चिच्छक्ति भरलेली असावी; जें जें काही बरेंवाईट, सुन्दरकुरूप दिसतें तें त्या एकापासूनच बनलेलें असावें; असें जरी विचारांतीं वाटतें तरी दृढ संस्कारांमुळे ज्या ज्या मूर्तीस मी बाळपणापासून पूज्य मानिलें त्यांच्यापुढे माझें मस्तक नमतें व हात जुळतात.

उलट या साधुसंतांचें तरी दुसरें काय होतें! महाराष्ट्रीय साधुसंत जरी सरसकट देवळाची सत्ता कबूल करीत व त्यांचा निषेधहि करीत तरी पंढरीच्या विठोबाच्या मूर्तीसच ते देव मानीत नव्हते काय? मग ते स्वतःच्या पदरचें म्हणून तसें करीत होते की सर्वसाधारण जनतेला भोळ्या भावाकडे वळविण्यासाठी तसें म्हणत होते याचा उलगडा मग होत नाही. नामदेव मूर्तिपूजेबद्दल म्हणतात, "दगडाचा देव.. ऐसे देव वेव्हारें पूजिले जरी, पावत उसरें केशवजी ना॥ ऐसी ही दैवतें नको दाखवूं मला, नामा म्हणे त्यासी विनवीतसे." तेच नामदेव आपले आणखी स्वतः देव सिद्ध म्हणतात "नामदेव म्हणे आम्हासी तो देव, देव विठ्ठलची पांडुरंग." तुकाराम म्हणतात, "बरवा शोभतो मूर्ति विठ्ठल, न सोडी चरण आता॥" तेच तुकाराम दुसऱ्या

ठिकाणीं म्हणतात की, जर सर्वांठायीं देव आहे तर मूर्तीतहि देव असला पाहिजे.

चमत्कारावरसुद्धा पुष्कळांचा विश्वास दिसतो. नामदेव शिंपल्यात वाढले, कोठे देऊळच फिरले, विठोबा जनीस दळू लागला, पांडुरंग सावता माळ्याची भाजी खुडू लागला, सजन कसायास मांस विकू लागला, असल्या असंभाव्य गोष्टी आपल्याच नव्हे तर दुसऱ्याहि धर्मांच्या पुराणात आढळतात; येशूख्रिस्ताचा जन्म कुमारिकेच्या पोटीं झाला वगैरे. असेहि असू शकेल की प्रसिद्ध संतांच्या भाविक अनुयायांनी असल्या चमत्कारांनी आपल्या पूज्य संतांच्या देवत्वाची साक्ष लोकांना पटावी व ते भक्तिमार्गाकडे वळावे म्हणून आपणच अभंग रचून ते त्या संतांच्या नावावर घातले असावेत. असो. असल्या गोष्टींवर मत देणें आपल्या आवाक्याबाहेरचें आहे.

या बाबतींत मला अलीकडेच स्वर्गवासी झालेले गाडगेबाबा यांचा खेड्यातील लोकांना उपयुक्त उपदेश देण्याचा मार्ग जास्त पटतो. त्यांचीं दोन कीर्तनें मीं ऐकलीं आहेत. मीं पदरीच्या वारकऱ्यांचीं भजनें व कीर्तनेंहि ऐकली आहेत. त्या कीर्तनांत आणि गाडगेबाबांच्या कीर्तनांत मला फार फरक वाटला. हे वारकरी कीर्तनकार तुकाराम, ज्ञानदेव किंवा एकनाथ यांचा एखादा अभंग निवडून तो गाऊन झाल्यावर त्या विषयावर व्याख्यान देतात. आध्यात्मिक व पारमार्थिक विषयावरचीं कीर्तनें शिकल्या-सवरल्या लोकांस वा जाणकार वारकऱ्यांस समजतात, पण सर्वसाधारण माणसास त्यापासून काय बोध घ्यावा हें समजतच असं नाही. गाडगेबाबांना ज्ञानदेव, तुकाराम यांचे अभंग पाठ नव्हते असं मला वाटत नाही. पण ते साधारण जनतेने कसें वागावें ह्या मुख्य मुद्द्याला हात घालून त्यांनी कसे वागावें हें त्यांच्याच भाषेत सांगत. ते अभंगाचा सर्व चरण क्वचितच म्हणत. 'गोपाळा, गोपाळा, देवकीनंदन गोपाळा' किंवा 'देवा पाहण्यासी गऽऽऽऽलों, अन् तेथे देव होऊनी ठेऽलो', 'ज्याचा अभिमान गला, अन् तुका म्हणे देव झाला', 'धरम करो गरीबोंसे, मगरूरीमें धोका है', 'जनी जनार्दन, जनी जनार्दन, संत बोलती वचन' असे एखादा चरण म्हणून लोकांना टाळ्या वाजविण्यास किंवा वर हात करण्यास सांगत. वरच्यावर 'गोपाळा, गोपाळा, देवकीनंदन गोपाळा' हे चरण मोठ्याने म्हणत. पण अध्यात्म वा वेदान्त विषयात न शिरता लोकांनी कसें वागावें, काय करावें हें त्यांच्या भाषेत सांगत, 'बापहो, भुकेल्यांना अन्न द्या, तान्हेल्यांना पाणी पाजा, उघड्यानागड्यांना लत्ताकपडे द्या, गरिबांच्या मुलांना शिक्षणासाठी मदत करा, बेकाराला रोजगार द्या, जरूर असेल त्याला आसऱ्यास जागा द्या, मुक्या प्राण्यांवर दया करा, गरिबांच्या लग्नास मदत करा, निराश झालेल्यांना धीर द्या.' गाडगेबाबा म्हणत, "चंद्रभागेंत किंवा गोदावरींत स्नान केल्याने का पाप धुवून जातं? ब्राह्मणभोजनें घातल्याने का पुण्य लागतं? जनतेंत जनार्दन आहे. जनतेची व दलितांची सेवा करा. ज्याच्याजवळ पैसा असेल त्याने शाळा काढाव्या, गरिबांच्या मुलांच्या शिक्षणाची सोय करावी. तुम्हास औषधपाण्याची माहिती असल्यास गरिबांस औषधे द्या. जवळ भरपूर पैसा असल्यास माणसासाठी

व अनारोग्यासाठी दवाखाने बांधा. दारू, गांजा पिणें हराम आहे, कर्ज काढणें वाईट. मारवाडी, गुजराथी व ब्राह्मण मांस खात नाहीत, दारू पीत नाहीत; ते सुखी आहेत. मामाचा कटाळा करू नका." अशा मुद्द्याच्या गोष्टीकडे ते वळत. कीर्तन संपण्याच्या वेळीं ते सटदिशीं फडातून एका बाजूनें निघून गावाबाहेर एखाद्या झाडाखालीं जाऊन बसत. त्यांच्या अंगावर गोधडी, हातांत काठी व एक मातीचें मडकें असे. कोणाचें जेवणाचें आमंत्रण ते स्वीकारीत नसत. दोन घरीं भिक्षा मागून खात. ते कोठे मिळेल जाणार याचा सुगावा लागू देत नसत.

त्यांचें कीर्तन साध्या बोलण्यासारखें लोकांस समजे. लोक कटाळले असे दिसल्यास, 'गोपाळा, गोपाळा' असें म्हणून लोकांस टाळ्या वाजवून 'गोपाळा, गोपाळा' म्हणण्यास सांगत. मला तर वाटतें, लोकांत प्राथमिक व माध्यमिक शिक्षण फैलावेपर्यंत गाडगेबाबांच्या कीर्तनासारखींच कीर्तनें अशा लोकांस समजतील व पटतील आणि जनतेस त्याचा फायदा होईल.

त्यांच्या चाहत्यांनी व शिष्यांनी आपण होऊन दिलेल्या पैशातून गाडगेबाबांनी लाखों रुपये खर्च करून क्षेत्राच्या ठिकाणीं धर्मशाळा बांधल्या आहेत. मी मुद्दाम गाडगेबाबा पंढरपुरास असतांना त्यांच्या मराठ्यांच्या धर्मशाळेंत एक दिवस राहिलो होतों. धर्मशाळेतील खोल्या स्वच्छ आहेत. त्यांत स्वयंपाक करण्यास जागा आहे. खोलींतच न्हाणी आहे. ज्याला गरज असेल त्याला स्वयंपाकासाठीं भांडीं मिळतात. धर्मशाळेच्या मोठ्या चौकांत पाण्याचे नळ आहेत. धर्मशाळेजवळ शेतखाने आहेत. गाडगेबाबा तेथे असतांना स्वतः चौक झाडीत. ल्हानसें ऑफिस आहे; तेथे कारकून उतारूचें नांव लिहून घेऊन खोलीची चिठ्ठी देतो. रात्रीस नाममात्र चार आणे भाडें होतें. धर्मशाळेची स्वच्छता व व्यवस्था फार चांगली वाटली.

एकंदर, मला मात्र असें वाटतें कीं सर्वांघटीं एक परमेश्वर आहे, तसेंच सर्वांभूतीं दया असणें चांगलें. मानवी प्राण्यांच्या उपयोगी पडावें, त्यांना मदत करावी, कोणाचें विनाकारण मन दुखवू नये. स्वकीय-परकीय सुखी असावेत!

## माझा वानप्रस्थाश्रम



एकंदर विचार करतां मला असें म्हणतां येईल कीं, आमची संसारनौका सन १९४७ पर्यंत ठीक चालली होती. आई वृद्ध होती, पण तिची प्रकृति निकोप व काटक असल्याने तिला सहसा दुसऱ्याची फारशी मदत घ्यावी लागत नसे. तरी तिच्याजवळ माझ्या दोन चुलतभावजया होत्याच. दोनतीन दिवस तिला बरें वाटत नव्हतें. मीं मुलांना कळविलें. सर्वांच्या गाठीभेटी आनंदात झाल्या व ८ मार्च १९४८ रोजीं रात्रीं आईने आमचा शेवटचा निरोप घेतला. त्या वेळीं ती ९७ वर्षांची होती.

आमची दुसरी मुलगी इंदू ४ फेब्रुवारी १९४० रोजीं वारल्यापासून पत्नीने अंथरूण धरलें होतें. त्यातच तिचा नातू (प्रताप) वारल्याची तार आली. तिला हा धक्का सोसला नाही. तिची सेवाशुश्रूषा चांगली चालली होती, पण शेवट आलाच. तिला जगावें, मुलाचें वैभव पाहावें, असें वाटत असावें, तथापि तिने धैर्यानें मरणास तोंड दिलें.

आतां मात्र माझें मन फारच उदास झालें. माझ्या संसार शकटाचीं दोन्ही चाकें एकामागून एक निखळून पडली व ज्या प्रसंगाचा या वेळपर्यंत मीं विचारहि केला नव्हता त्या विधुरावस्थेंतील खडकाळ एकाकी वानप्रस्थाश्रमाचा विचार करणें मला भाग पडलें.

वडील वारल्यानंतर ज्या माझ्या आईच्या अंगावर जमीनजुमला व घरदार सोपवून मी बत्तीस वर्षें निर्धास्त राहूं शकलों व ज्या जुन्या परंपरेंत वाढलेल्या पत्नीवर मुलें व संसार टाकून जगभर भटकलों त्या दोघीहि अगदी थोड्या अवधीने निवर्तल्या, त्यामुळे मन उद्विग्न व उदास झालें; मला चुकल्याचुकल्यासारखें वाटूं लागलें. आयुष्यातील उत्कट व अतीव मायेचे झरे आटले व वयाच्या बहात्तराव्या वर्षी मी पोरका झालों असें वाटूं लागलें.

माझ्या आईवडिलांना दुसऱ्यावर—आपल्या मुलांसुनांवरसुद्धा—अवलंबून राहणें पसंत नसे. माझाहि स्वभाव तसाच बनला होता. पुरा विचार करून कोणावरहि आपला कसलाहि बोजा पडूं नये, शक्य तोंवर स्वातंत्र्य व स्वाभिमान राखून जीवन कंठावें, यासाठीं पूर्वीप्रमाणे स्वतःचे नोकर तसेच ठेवून कोल्हापुरासच स्वतः बांधलेल्या बंगल्यांत राहावयाचें मीं ठरविलें.

पत्नी हयात असतांना घरांतील देवपूजा तिच्याकडे असे. तिच्या निधनानंतर अकरा वर्षे तिच्यासाठीं मीं देवपूजा अंगावर घेतली. घरीं जवळचें असें कोणी नव्हतें. बहुतेक वेळ वाचनांत घालवीं. रामायण, महाभारत व संतवाङ्मय वाचलें. वर्षांतून एक वेळ तरी चि० शंकररावांकडे उत्तर हिंदुस्थानात, बाबासाहेबांकडे माळव्यात व नानासाहेबांकडे ते असतील तेथे जाई. शंकररावाबरोबर अयोध्या, प्रयाग, काशी, जगन्नाथपुरी व कोनार्कमधील सूर्यमंदिर पाहिलें. दिनकररावाबरोबर सांची, अजिंठा, वेरूळ, तुळजापूर पाहिलें. नानासाहेब डेहराडूनला असताना हरिद्वार, हृषीकेश व मसुरी पाहिली. अशा रीतीने मुलांच्या कौटुंबिक जीवनात मला वेळोवेळीं सहभागी होता आलें.

अशा रीतीने आयुष्याच्या तिसऱ्या प्रहरच्या शिळोप्याचा काळ कोल्हापुरास ताराबाई पार्कमधील बंगल्यावर जवळजवळ एकांतवासांत चालला होता. माझा बंगला शहराबाहेर प्रशस्त कंपाउंडांत आहे. बंगल्याच्या गच्चीवरून सूर्योदयाचीं व सूर्यास्ताचीं मनोहर दृश्यें दिसत. नियमाने त्या वेळीं हे सुंदर देखावे मी पाहत राहीं. आनंद वाटे.

एका रात्रीं लघवीसाठी शेजारच्या न्हाणींत गेलों असतां तेथे नकळत एकाएकीं झीट आली व बेशुद्ध स्थितींत खालीं कोलमडलों; पण कांही लागलें नाही. काही वेळाने हळूहळू सावध झालों व पायाखालची फरशी व कडेची भिंत चाचपीत चाचपीत जाऊन पलंग गाठला व जवळच्या घंटीचें बटन दाबलें. तोंवर पायांत पेटके आले व अंगास घाम आला. घंटी ऐकून ड्रायव्हर व स्वयंपाकी वर धावत आले. त्यांनी चहा आणला व थोड्याच वेळात पायांतील पेटके व तळव्याची जळजळ कमी झाली व मी विचार करीत पलंगावर पडलों.

सन १९४७ सालीं एकदा वडगावीं आईचा पाय निसरून पडल्यावेळीं मीं तिच्याशीं वादविवाद केल्याची आठवण झाली. मला वाटलें, वेळ आहे, अवेळ आहे; बंगल्यात घरच्या माणसांविरहित, एकटा असतांना जर एखादे रात्रीं परत तशीच झीट येऊन पडलों व त्यातच माझी इतिश्री झाली, तर! वास्तविक आता मला मरणाची बिलकुल भीति वाटत नव्हती व आजहि वाटत नाही. मी तर म्हणेन "सदय शांत असशी मरणा!" सगळें मिळालें; आता काय मिळावयाचें राहिलें आहे! असल्या या आकस्मिक विनाक्लेश मरणाचें मी स्वागतच करीन व ईश्वरी कृपा मानीन. पण बंगल्यात एकटाच असतांना प्राणोत्क्रमण झालें तर! लोक माझ्या मुलांना नांवें नाहींत का ठेवणार! लोकांनी निष्कारण माझ्या मुलांना नांवें ठेवणं

मला पसत नाही. म्हणून मीं मनाशीं ठरवलें की, आपण आता कोणा तरी मुलाच्या-जवळ राहणें शहाणपणाचें होईल.

मी त्या वेळीं त्र्यायशी वर्षांचा होतों. अगातील ताकद व जोम कमी झाला होता. सर्व गोष्टींचा साधकबाधक विचार केला. पूर्ण विचार करून, घरेदारें, जमीन जुमला यांची मुलांत बरोबर वाटणी करून ज्याच्या त्याच्या नावें खातेफिरहि केली.

माझ्या आईने व पत्नीने स्वत च्या हयातींत सुनानातवडाना काही दागिनेर्टागिने दिलेच होते. एकदा तिनेहि चिरजीव सहकुटुब आमच्याकडे असताना, मुलीस (आनदीबाईस) बोलावून घेऊन माझ्याकडे असलेले दागिने व चादीचीं भाडीं वाटून सुनाकडे दिली. जमिनी व घरें जरी मुलाच्या नावावर चढलीं होतीं, तरी मुलें परप्रातीं असल्याने त्याच्या इस्टेटीची व्यवस्था मलाच पाहावी लागे. मला ही दगदग आता नकोशी होती, पण निरुपायाने हृ काम मला बरेच दिवस करावें लागत होतें.

आता ही सर्व दगदग सोडून कोणा तरी एका चिरजिवाकडे जावें असे ठरविले. वेळोवेळी मी, पत्नीस व आईस घेऊन व त्याच्या निधनानतर एकटाच, तिघाहि मुलाच्या घरीं त्याच्या कुटुबात जाऊन राहिलों होतों. कोणाकडे जास्त मोकळेपणाने, स्वाभिमान साभाळून राहता येईल याचा मीं अदाज बाधला होता. मी या गोष्टीचा विचार करीत होतों, त्या वेळीं ज्येष्ठ चिरजीव उत्तर हिंदुस्थानात होते, मधले दिनकरराव मुबईस डेप्युटी कमिशनर ऑफ पोलिस होते, व धाकटे चिरजीव हैदराबादजवळ गोवळकोंड्यास होते. मुबईच्या धकाली वस्तीचा मला कधी मोह वाटत नसे. उत्तर हिंदुस्थान म्हणजे परप्रात, परभाषा व अलग सस्कृति. म्हणून मी नानासाहेबाकडे गोवळकोंड्यास जाण्याचें ठरविलें. अनुभव घ्यावा म्हणून मी फेब्रुवारी १९६० मध्ये चिरजीव नानासाहेबाकडे एक महिनाभर गोवळकोंड्यास गेलों.

मला माझें गोवळकोंड्यांतील दीड महिन्याचे वास्तव्य आवडलें. तेथे असताना गोवळकोंड्यास मूसीनदीकाठीं शेती करणाऱ्या श्री० व्रजपाल नावाच्या वैश्य शेतकऱ्याची व त्याच्या आश्रयास असलेल्या विद्यालकार देवबधु नावाच्या एका कनोजी पडिताची ओळख झाली. आम्ही मित्र बनलों. माझे स्नेही श्री० राघवेंद्र गगाराम घोपाडे याच स्टेनलेस स्टीलच्या भाड्याचें दुकान आहे. ते व त्याची पत्नी आणि मुलगा गोपीनाथ व त्याची पत्नी व मुलं हैदराबादेस आहेत. आणखी काही ओळखी झाल्या.

माझ भाग्य की माझीं मुले सुज्ञ आहेत. गोवळकोंड्यास चिरजीव नानासाहेब, त्याची सुशिक्षित व प्रेमळ पत्नी व मुलं माझ्या खाण्यापिण्याकडे व सुखसोयींकडे बारकाईने लक्ष देतात. मी त्याच्याकडे कोल्हापूर सोडून आलों, यात माझी गल्लत झाली नाही. मी कोल्हापूर सोडून कायमचाच नानासाहेबाच्या कुटुबातील एक घटक झालों आहें.

वास्तविक माझा गोवळकोंड्यास जाण्याचा उद्देश माझ्या स्वत.च्या म्हणून असलेल्या घराची व गडीमाणसाची व्यवस्था लावण्याचे व नानासाहेबाच्या कुटुबात

राहण्याचें मला कसे काय जमतें हें पाहण्याचा होता. ह्या वास्तव्यात गोवळकोंडा हें ठिकाण हवापाण्याच्या दृष्टीने मला पसत पडलें. नानासाहेनाच्या कुटुंबात माझ्या मनाप्रमाणे वागता येईल, असें मला वाटलें. मी मार्चअखेर कोल्हापुरास गल्यावर, कोल्हापुरातील घरादाराची व गावाकडील जमीनजुमल्याची नीट व्यवस्था लावून, गोवळकोंड्यास राहण्याचें निश्चित केलें माझी पेन्शन व थोडी शिल्लक स्वत.चा खर्च व गरजा भागविण्यापुरती आहे, परावलंबीपणा भासण्याचें कारण नाही, असा विचार करून जून १९६० त चिरंजीव नानासाहेबाकडे गेलों, त्या वेळेपासून आजवर माझें वास्तव्य नानासाहेबाच्या मुलामाणसात आहे. कोल्हापूर, वडगाव, पुणें व मुबईस मुलामुलींस व इतर सग्यासोयऱ्यास वर्षांतून दोनतीन वेळा भेटून येतो. गोवळकोंड्यास आल्यावर, माझ्या पाठीमागची कोल्हापुरातील घरादाराची व गावाकडील जमीनजुमल्याची जबाबदारी आपोआप सुटली.

गोवळकोंडा किल्ला हैदराबादेच्या पश्चिमेस पाच मैलावर आहे. गोवळकोंडा किल्ल्याजवळच नानासाहेबाच्या पल्टणीच्या (सेकड मराठा लाइट इन्फट्री) इमारती होत्या. शिपायाच्या बराकी गोवळकोंडा किल्ल्याच्या पायथ्याशीं, मूसी (मुचकुदी) नदीच्या उत्तर किनाऱ्यावरील प्रशस्त मैदानात बाधल्या आहेत. लष्करी शिपायाच्या बराकीच्या पश्चिमेस थोडया अतरावर ऑफिसर लोकाचे सात-आठ बगले आहेत. चिरजीव नानासाहेब मेजर व सेकड इन कमाड असल्याने त्याचा बगला सोयीचा होता, व त्यात माझ्यासाठी एक स्वतत्र खोली, स्नानगृह व सडास याची चागली व्यवस्था होती.

ऑफिसराचे बगले हैदराबाद गडीपेठ रस्त्याला लागून उत्तरेकडे आत आहेत हैदराबाद गडीपेठ रस्त्यावर, त्या वेळीं फारशी रहदारी नव्हती. बगल्याच्या पाठीमाग पश्चिमेस जवळच दोन उच टेकडया आहेत एका टेकडीवर एक भरभक्कम मशीद आहे. दुसऱ्या टेकडीवर एक मोठा पण कडेने भिंतींनी बदिस्त नसलेला, मोठाल्या खाबावर आधारलेला महाल आहे. या महालाचें खरें नाव 'प्रेमवती' महाल आहे 'प्रेमवती' ही अबदुला कुतुबशहाची सौंदर्यसपन्न व सगीतप्रवीण हिंदु राणी होती. ती या नदीकाठच्या महालात बसण्याउठण्यास जात असे व तेथे काही वेळ गाण्या वजावण्यात घालवी. ह्या महालास चुकीने 'भागामती' महाल म्हणतात. दुसऱ्या टेकडीवर तर मशीद आहे. पण त्या मशिदीलाहि चुकीने 'तारामती' महाल म्हणतात. असो. मशीद असलेल्या टेकडीजवळ एक लहानसा तलावहि आहे प्रेमवती महालाच्या दक्षिणेस जवळूनच मूसी नदी वाहते. या दोन टेकडयाची महालासाठी निवड करणारा निसर्गसौंदर्याचा भोक्ता असला पाहिजे. महालाव जाण्यास बऱ्याच लाररुद पायऱ्या चढाव्या लागतात.

दोन टेकडयाच्या मधून हैदराबाद गडीपेठ रस्ता उस्मानसागराकडे जातो उस्मानसागरहि पाहण्यासारखा आहे. सागराचा तट पाऊण मैल तरी लाब असावा

वेटावरच्या रस्त्यावरून मोटारी जाऊ शकतात. हैदराबाद-गडीपेठ रस्ता सीमेंटकाँक्रीटचा असून, त्याच्या दोहों बाजूस सुंदर वृक्ष आहेत. हैदराबादची पचक्रोशी झाडाझुडपास व रानफुलास फार योग्य दिसते. मीं बरींच शहरें पाहिली आहेत. पण रस्त्यावरचीं अशीं मोठीं फुल्झाडें व रानफुलें मला कोठेहि दिसलीं नाहीत बाराहि महिने वस्तीं-ना कस्त्रीं-तरी फुलें पाहिजे तेवढीं मिळतात. मीं या नैसर्गिक देणगीचा पुरेपूर फायदा घेतला. लष्करी बंगले गावाबाहेर मोकळ्या हवेंत रस्त्याकाठीं असल्याने, मी सकाळीं व सध्याकाळीं पायीच फिरावयास जाई. केव्हा तरी नानासाहेबांच्या बरोबर किंवा मुलाच्या बरोबर मोटारींतून उस्मानसागरकडेहि जाई फिरून येताना सडकेकडेच्या झाडावरील व माळरानातील किंवा नदीकाठचीं फुलें आणीं नानासाहेबांची मोठी मुलगी निर्मला हिला फुलांचा षोक आहे व तिला फुलपानांची रचना चागली समजते. तिच्या बहिणींनाहि पानाफुलांच्या माडणीचा नाद लागला आहे.

सकाळीं सूर्योदयापूर्वी उठून प्रातर्विधि व मुखमार्जन झाल्यावर, नुसता चहा घेऊन मी एक तास फिरावयास जात असे. बगल्याच्या पूर्वेस गोवळकोंडा किल्ल्याची टेकडी आहे. आमच्या बगल्यातून व बागतूनहि सूर्योदयाची शोभा अपूर्व दिसत असे. या बगल्यापासून हैदराबाद-गडीपेठ रस्त्यास जोडणारा रस्त्याचा एक फाटा आहे. मी याच रस्त्याने मुख्य रस्त्यास मिळे व नरसिंगीच्या बाजूस फिरावयास जाई. कधीकधी याच रस्त्याने पूर्वेकडे गोवळकाडा किल्ल्यापर्यंतहि जात असे. सुमारें आठ वाजता फिरून आल्यावर न्याहारी करीं. न्याहारीस बहुतेक पॉरिज म्हणजे ओट नावाच्या धान्याची खीर, किंवा पावलोणी व जॅम किंवा मध असे. नतर बारा वाजेपर्यंत लिहीत किंवा वाचीत बसत असे. बारा वाजता स्नान करून भोजन करीं व थोडा वेळ वामकुक्षी करीं. सुमारें अडीच-तीन वाजता चहा झाल्यावर परत काही वाचन करीं. सध्याकाळीं पाच वाजता मुलं (माझीं नातवंडें) हैदराबादेहून शाळेंतून परत आल्यावर, त्याच्याबरोबर इकडेतिकडे थोडा वेळ घालवीं व नतर गडीपेठ रस्त्याने जाऊन मागामती महालाच्या पलीकडून मूसी नदी ओलांडून डोंगरटेकडीच्या पायथ्याजवळच्या भागाल अगर नरसिंगीपर्यंत फिरावयास जाई. बगल्याचे पश्चिम दिशेस सुमारें एक मैलावर मोठाल्या दगडाच्या वाकुड्यातिकड्या उतरडी असलेली एक डोंगराची रांग आहे. सूर्य मावळतांना या दगडी उतरडी लालीने उजळतात व सूर्यास्ताची शोभा मनोहर वाटते. फिरून आल्यावर वर्तमानपत्र वाचून नतर सुमारें साडेआठ वाजता जेवण होई. नऊ ते सकाळीं पाच साडेपाच वाजेपर्यंत झोप घेई.

मी नानासाहेबाकडे गोवळकोंड्यास जेव्हा राहण्यास गेलों, त्या वेळीं त्यांच्या परेडग्राउडच्या दक्षिणेस मूसी नदीच्या काठीं भवपाल नावाचा वैश्य जातीचा एक तरुण शेती करीत होता. त्याच्या शेतावरील घरीं त्याच्या आश्रयास एक आर्यसमाजी विद्वान्

कनोजी ब्राह्मण देशबंधु विद्यालंकार राहत असे. व्रतपालाचें शालेय शिक्षण व्यवस्थित झालें नसावें. त्याच्या शालेय शिक्षणाचा पाया कच्चा राहिला होता. पण त्याला अध्यात्माची बालपणापासूनच गोडी होती. व्रतपालाच्या बापाची इच्छा त्याने व्यापार करावा अशी होती. व्रतपालला तें पसत नव्हतें. ध्यानधारणा करण्याचें ठरवून, घर सोडून हरद्वार काशीकडे दोन वर्षे राहून त्याने अध्यात्माचा काही अभ्यास केला. तो दिल्लीजवळ 'झझर' येथील गुरुकुलात शिक्षक होता. (त्याच्या तिकडच्या खर्चास त्याचे वडील महिना २५ ३० रुपये पाठवीत). व्रतपालचे वडील पक्के बनिया आहेत, चिक्कू आहेत व हुकुमशहाहि आहेत. व्रतपालच्या वडील बधूचें आपल्या बापाशीं जमत नसे, म्हणून तेहि गृहत्याग करून गेले आहेत. व्रतपालसुद्धा बापावर रुसूनच तीर्थयात्रेला गेला असावा. परत आल्यावरसुद्धा त्याचें व बापाचें जमलें नाही. म्हणून तो परत साधना करण्यासाठी निघून गेला. नतर "तू पाहिजे असेल तो धदा येथे कर. तुला लागेल तें भाडवल आम्ही देतों व तुझ्या कामात ढवळाढवळ करणार नाही; पण परत ये." असें त्याच्या आईबापानी त्याला वचन देऊन त्याची समजूत घातली व त्याला परत बोलावून घेतलें. व्रतपालने मूसी नदीच्या काठीं वीसपचवीस एकर जमीन आठनऊ हजार रुपयास विकत घेतली, नदावर विजेचा पप बसविला, पाणी शेतात नेण्यास बराच खर्च करून पलाण (उच बाधावरून पाणी नेण्याचा पाट) बाधली, आउतें व दोन बैल विकत घेतले, काही भागात बाधबदिस्ती केली, राहण्यास पडळ व बैलासाठी गोठा बाधला.

व्रतपालने पूर्वी कधी शेती केली नव्हती, तरी त्याने तो धदा लवकरच आत्मसात् केला. जातीचा वैश्य असल्याने शेतीस लागणारें बीबियाणें, खतमूत व मजूर व्यवस्थित जमा केले, व शेतींत चागला जम बसविला. त्याने लवकरच हेरलें की, आपल्या रेताड (वाळसर) जमिनीस जास्त शेणखत दिल्याशिवाय भागणार नाही. शहराजवळ शेणखत तर फार महाग. शिवाय त्याने बरेच दिवस एका गुरुकुलात घालविल्यामुळे त्याला गोपालनाची हौस होती. म्हणून शेतीच्या धद्यास उपयुक्त व धार्मिक प्रवृत्तीस पोषक असा दुग्धोत्पादनाचा भाग धद्यास जोडला, व त्यासाठी पाच गाई खरेदी केल्या. त्यातील एकदोन जर्सी जातीच्या आहेत. जनावरांसाठी वाळलेला चारा स्वत च्या भातशेतींतील पिंजर (पढा) त्याच्याजवळ असतेच. हिरव्या चाऱ्यासाठी तो कडवळ व पॅरा नावाचे गवत करतो. पॅरा गवत व कडवळ चाफकटरने बारीक कापून, त्यात पेंड व कोंडा घालून तें अशोण दूध काढताना गाईस देतो. प्रकृतीस गाईचें दूध म्हशीच्या दुधापेक्षा चागलें असा त्याचा व श्री० देशबधूचा विश्वास आहे. खर्चास लागणार सुमारें चार शेर दूध घरीं ठेवून बाकीचें दूध तो विकतो. दुधाच्या पैशापेक्षा जनावरापासून मिळणाऱ्या शेणामुताच्या खतावर त्याची भिस्त आहे. गाई बैलाच्या गोठ्यात तो भाताच्या कोंड्याचा (तुसाचा) थर टाकतो. एकदोन दिवसांनी तो थर हलवितो. महिन्या-दोन महिन्यांनी ही कोंड्याची शेज काढून खताच्या गारींत

टाकतो. त्याचें सत पार चागलें होत. भाताचा कोंडा त्यास विकत आणावा लागत नाही. तो भात न विकता गिरणींत भरडून आणतो व आपल्या घरासमोर उपणतो. त्यामुळे तूस (जाड कोंडा) जनावरासाठी टाकण्यास व बारीक कोंडा गाइच्या आंबणात घालण्यास उपयोगी पडतो. याप्रमाणे मतपालची शेती हिशोबी चालली होती.

माग सांगितल्याप्रमाणे पंडित देशबंधु मतपालच्या घरींच राही. मतपालची व पडिताचीहि राहणी सारखच असे. सकाळीं दोघेहि एकक ग्लास निरसे दूध घेत. त्याबरोबर पंडित एक-दोन फळीं घेइ. मतपालची आई जेवण करी. मतपाल पंडिता बरोबरच भोजन करी; वेळ मिळेल तसे पंडिताजवळ अध्ययन करी. पंडितास वाचनाय व स्वाध्यायास मुबलक वेळ असे. शिवाय त्याना होमिओपाथीची माहिती असल्याने ते गोरगरीबास औषधहि देत. अशा रीतीने दोघाचहि ठीक चालत होतें ज्या वेळीं पंडित मतपालच्या घरीं असत, त्या वेळीं मी त्याच्याकडे जाई व थोडा वेळ घालवीं. तो माझा वेळ चागला जाई.

जन्मतःच शेतकरी असून आयुष्यातील बराच मोठा भाग शेतकी खात्यात घालविला असल्याने, मी मतपालच्या यशस्वी शेतीकडे कुतूहलाने पाहत असें. गोवळकोंड्यास असताना, एक दिवसाआड तरी मी मतपालच्या शेताकडे जाई. पुढे हैदराबादेस आलों तरी आठवड्यातून एक-दोन वेळा तरी त्याच्या शेतीकडे जातोंच.

मतपाल आठ एकर भात करी, काही जमिनींत भाताचीं दोन पिकें घेई, जनावरासाठी कडवळ करी. शिवाय कद्दू (दुध्या) व दोडके करी त्याच्या पडाणीवर शभरदीडशे केळीचे खुट आहेत. फारसा खर्च न करता त्यास केळीच उत्पन्न मिळे. गाइपासून होणाऱ्या पाड्याची (बैलाची) बरीच किंमत येइ. मतपाल बऱ्याच उदार वृत्तीचा असल्याने त्याला जरूर असलेले मजूर मिळत आणि तो मजुरी भरपूर देत असल्याने मजूर कामात चुकारपणा करीत नसत.

मतपालाकडे त्या वेळीं असलेल्या कनोजी पडिताचे शिक्षण हरिद्वारजवळच्या गुरुकुल-कागडी येथे झालें होतें. तेथे त्यानी चौदा वर्षे अध्ययन केलें, त्या वेळीं तेथे स्वामी श्रद्धानद कुलपति होते. त्या गुरुकुलात देशबंधूचें सस्कृत, हिंदी व इग्रजी शिक्षण चांगलें झाल. त्यांना ह्या भाषा चागल्या अवगत आहेत. या पडितानी उपनिषदें, मनुस्मृति व भगवद्गीता याचा सखोल अभ्यास केला आहे व त्यावर विचारहि केला आहे.

योगायोग असा की, सन १९२६ सालीं हेच श्री० देशबंधु (त्या वेळीं ते तरुण होते) पुण्या मुक्कडे योगाभ्यास केलेले तरुण म्हणून आले होते व त्याचे प्रयोग जागोजाग होत असत. मी पुण्यास शेतकी कॉलेजचा प्रिन्सिपॉल असताना, त्याचे प्रयोग शेतकी कॉलेजमध्ये केले होते ते आपली नाडी दोनतीन मिनिटें थांबवू शकत, इतकेंच नव्हे, तर हृदयाचे ठोकेहि थोडा वेळ थांबवू शकत. डॉक्टरानी त्याच्या

छातीस स्टेथॉस्कोप लावून, तें खरें आहे, असें सांगितलें होतें. त्याची तिरदाजी फार अपूर्व असे. कोणाच्या डोळ्यावरील काचा काढलेल्या चष्म्यात पैशाची ठेविलेली नाणीं, त्या माणसास इजा न होता ते उडवीत असत. आमच्या कॉलेजमध्ये त्यानी प्रात्यक्षिक दिल्यावर मीं त्याना एक सर्टिफिकेट दिले होतें. तें त्याच्याकडे होतें. एके दिवशीं (पस्तीस वर्षानतर) त्यानी मला ते दाखविल्यावर त्याची ओळख पटली.

पुढे पडितानी स्वत:च्या जबाबदारीवर व्रतपालच्या शेताजवळच थोडी शेती घेतली. व्रतपालनें हजारआठशे रुपये खर्च करून त्याना आश्रम बाधून दिला, व पडिताच्या विनतीनुसार अर्धापाऊण एकर पपई, द्दाक्षारा गुठे अनाबशाही द्राक्षाचे वेल लावून दिले. बागेस पाणी व्रतपालच देई. बहुतेक खर्च व्रतपालनेच केला. पुढे पडितानी आपली पत्नी आश्रमात आणली व स्वतत्र बिऱ्हाड केलें. दुधासाठी गाय घेतली. बागेंतील मशागत व आउतपाणी व्रतपालाचीं माणसेंच करीत. गाईस कडवळ त्याच्याकडूनच येई. असा पडिताचा खर्च वाढत गेला.

व्रतपाल जरी सरळ, सिध्या स्वभावाचा होता, तरी जन्माने बनिया असल्याने तो व्यवस्थित हिशोब ठेवी. पडिताचा खर्च वाढल्यावर व्रतपाल हात राखून वागू लागला. पडित म्हणत, आपण स्वत: खर्च देऊ, पण तें शक्य होत नसे. शिवाय पडित व त्याची पत्नी दोघेहि हुकुमशाहीने वागत व त्यामुळे उभयतामधील पूर्वीचें मोकळें वातावरण नाहीसें झालें.

पडिताच्या शेतीच्या यशाबद्दल मला शका होती आणि मी त्याना व व्रतपाल-लाहि प्रथमपासून सागत होतों. पण दोघेहि अडकून पडले होते. पडिताचा खर्च वाढला. ते आपण पैसा देतों म्हणत, पण सर्व पैशाचा बटवडा होत नसे; तेव्हा मींच त्या दोघाना सागितलें की, व्रतपालने पडिताच्या बागेवर व आश्रमावर केलेल्या सुमारें अडीच हजार रुपयाची सूट द्यावी व तेथून पुढे पडितांनी आपला खर्च आपण चालवावा. बागस लागणारें बी बियाणें, खत-मूत व मजूर आपण स्वतः मिळवावे, व्रतपालने पडिताच्या अध्यापनासाठी त्यास दरमहा पस्तीस रुपये द्यावेत, व दोघानी आपापले खर्च चालवावेत. पण प्रत्यक्षात तें उतरेना. म्हणून व्रतपालने दरमहाचा तनखा बद केला, व तसें पडितास कळविलें. पडित रागारागानें आश्रम सोडून हैदराबादेस आपल्या मुलाकडे राहू लागले. तरी व्रतपाल त्याच्याशीं तुटून वागत नव्हते. पडिताच्या बागेंत पपईचीं झाडें आहेत, थोडीं फळें निघतात; तीं आणण्यास पडितास आठवड्यातून दोन वेळा तिकडे जावें लागतें. पैकी एक वेळ रविवारीं सकाळीं ते माझ्याबरोबर जातात व येतात आणि त्याचीं फळें माझ्या मोटारींतून येतात.

लौकरच पडिताना शेती सोडावी लागेल असे दिसतें. आजहि मी व्रतपालकडे जातों. पडितहि मजकडे येतात-जातात. मला या गुरुशिष्याच्या सबधात व्रतपालचा सोशिकपणा व गृहस्थाश्रमाची पाळणूक दिसली. तो अविवाहित असून ब्रह्मचारी आहे. पडिताचें गृहसौख्य चागलें आहे. ते, पत्नी, दोन मुलगे (पैकी एक

विवाहित आहे) असून एकमेकांशीं प्रेमळपणानें वागतात. पण आर्थिक अडचणीमुळे म्हणा, अगर स्वभाव म्हणून म्हणा, त्याचा मोह व राग सुटलेला नाही, असें दिसतें.

गोवळकोंड्यांतील शांत वातावरणात मला हिंदुस्थानच्या प्राचीन काळच्या इतिहासाचें व वाङ्मयाचें वाचन करण्यास चांगली संधि मिळाली. याच काळात परत एकदा रामायण, महाभारत व सकलीलामृतासारख्या पोथ्याहि वाचल्या. या वाचनांतील प्रत्येक गोष्टीवर माझी पूर्ण श्रद्धा होती, असें मला म्हणवत येणार नाही. पुराणें व प्राचीन इतिहास चिकित्सक बुद्धीनें वाचले. तथापि या वाचनांत मला समाधानहि मिळालें, हें खरें.

गोवळकोंड्यास असताना मला हुसेनसागर, उस्मानसागर, हिमायतसागर, फल्कनुमा राजवाडा, उस्मानिया युनिव्हर्सिटी, वारंगळ व काझीपेठ येथील काकतीय राजधानीचे पुराणे अवशेष पाहावयास मिळाले. हैदराबादच्या पश्चिमेस सतत वाहणाऱ्या मुचकुंदी नदीच्या तीराजवळ प्राचीन काळीं वारंगळच्या काकतीय राजानी बांधलेल्या गोवळकोंडा किल्ल्याच्या परिसरातील मोकळ्या मैदानात राहणें फिरणें मला आवडलें. सन १९६१ च्या सुरुवातीस नानासाहेबांची बदली बिहार प्रांतात रायगडास झाली, त्या वेळीं त्यांच्या दोन मुली कॉलेजात शिकत होत्या, एक मॅट्रिकमध्ये होती व मुलगा सेंटजॉर्जिस ग्रामरस्कूलमध्ये शिकत होता. म्हणून नानासाहेबांची पत्नी, मुलें व मी हैदराबाद शहरात राहण्यास आलों. त्या वेळेपासून आजवर आम्ही हैदराबादेंतच आहोत. वर्षांतून दोनतीन वेळा दुसऱ्या मुलाकडे मुंबईस, मुलीकडे कोल्हापुरास व वतनगावाकडे जाऊन येतों. हैदराबाद येथील दिनचर्या गोवळकोंड्याच्या दिनचर्येप्रमाणेच आहे. फरक एवढाच कीं, गोवळकोंड्यास असताना पायीं फिरावयास जाई त्याऐवजी हैदराबादेंत मोटारनें शहराबाहेर हुसेनसागरपर्यंत जाऊन त्या तलावाच्या धक्क्यावरून सुमारें एक मैल पायीं जातों; परत चालत येऊन मोटारनें घरीं येतों. कधी हैदराबादेहून मल्कपेठ-नल्गोंडा रस्त्यानें मोटारनें बाहेर पडून पुढे पायीं मैलभर फिरून परत येतों. फार दूर न जावेंसे वाटल्यास 'बागेआम' (पब्लिक गार्डन)मध्ये फिरावयास जातों. आठवड्यातून एक वेळ तरी सकाळीं गोवळकोंड्यास पंडित देशबंधु व श्री० नवपाल यांच्याकडे जातों. थोडा वेळ बातचीत करून परत न्याहारीस घरीं येतों. परत येतांना नियमितपणें कसली तरी रानफुलें आणतोंच. कधीकधी मुलांच्या सुटीच्या दिवशीं आम्ही सर्व जण उस्मानसागरावर अगर प्रेमवतीमहालाजवळ मुसीनदीकाठीं वनभोजनास जातों. आठवड्यातून दोन तीन वेळा माझे जुने स्नेही रंगराव घोपाडे यांच्या घरीं जाऊन येतों. त्या वेळीं गतकाळच्या आठवणींचीं पारायणें होतात. हैदराबादच्या वास्तव्यात मला माझ्या आठवणी लिहून काढण्यास मुबलक वेळ व एकांत मिळाला. नानासाहेबांच्या मुलांबाळांत माझे दिवस समाधानांत जात आहेत.

गोवळकोंड्याचा शेवटचा सुलतान अबदुल हसन तानाशहा वेळोवेळी शिवाजीमहाराजास मोगलाविरुद्ध मदत करी. महाराज कर्नाटकच्या दिग्विजयावर जाण्यापूर्वी गोवळकोंड्यास एक महिना तानाशहाचे पाहुणे म्हणून राहिले होते. त्या वेळीं तानाशहाने व त्याच्या मराठा व तेलगू अधिकाऱ्यानी त्याचा फार गौरव व मोठा सत्कार केला होता.

हैदराबाद संस्थानें भारतात विलीन होण्यापूर्वी, पुणे कोल्हापूर भागातील सुशिक्षित माणसाची समजूत असे की, "निझामाच्या राज्यात अदाधुदी (मोगलाई) आहे, त्या राज्यात हिंदु लोकाना चागली वागणूक मिळत नाही व हिंदूना राज्यकारभारात कसलाहि वाव मिळत नाही." मलाहि तसच वाटे. हैदराबाद संस्थान विलीन झाल्या नतर दहाबारा वर्षांनी मी येथे आलो आहे. पण विलीनीकरणापूर्वीच्या हैदराबाद संस्थानाच्या परिस्थितीची कल्पना मला करता येते. निजामाने मुसल्मानाना जास्त सवलती दिल्या असतील हें खरें; पण कोणीहि सत्ताधीश राजा स्वजातीयाना सवलती देणारच. पेशव्यानी आपल्या जातिबांधवाचे स्तोम माजविले नाही का? अगदी अलीकडे ग्वाल्हेर, बडोदें, इदूर संस्थानात मराठ्याना जास्त वाव मिळाला नाही का? हैदराबाद राज्यात मुसल्मानेतर जहागिरदार (लहान राजे) पुष्कळ होते. त्यात मराठे, ब्राह्मण, तेलगण व आध्रातील रेड्डी व उत्तरेकडील क्षत्री नरेश होते. हैदराबाद संस्थानात मोठ्या जागावर मुसल्मानाबरोबर हिंदु अधिकारीहि होते. संस्थानचा मुख्य दिवाण बहुतकरून हिंदूच असे. राजा किशनप्रसाद किती तरी वर्षे संस्थानचे दिवाण होते. अलीकडेसुद्धा सर विश्वेश्वर अय्या हेहि येथे दिवाण होते. न्यायखात्यात हिंदु न्यायाधीश होते.

धार्मिक बाबतींत पूर्वी हिंदूना त्रास झाला नसेल असे नाही; कदाचित् थोडा फार झाला असेल. पण फार जुलूम अगर त्रास झाला असता तर गावोगाव हिंदूचीं देवालयें दिसलीं नसतीं. गोवळकोंडा किल्ल्यावर आजहि अबाबाईचे प्राचीन देवालय आहे. या भागात होऊन गेलेल्या तेलगू रामदासाची किल्ल्यात कोठडीहि आहे. दोन्ही ठिकाणीं पुजारी हिंदूच आहेत. चारमिनार म्हणून हैदराबाद शहरात जी चोहों बाजूस कमानी असलेली प्रसिद्ध इमारत आहे, तिच्या एका कोपऱ्यात इमारतीस लागून शेंदूर फासलेला म्हसोबा विराजमान झालेला आहे; खालच्या वर्गाचे लोक नेहमी त्याच्या दर्शनास जातात. शहरात हिंदूंची मोठालीं देवालयें आहेत. आर्यसमाजाचीं मंदिरें, जैनमंदिरें व खिश्चन लोकाचा चर्चस आहेत. गावोगाव कालीचीं व यल्लामाचीं लहानलहान देवळे गावाशेजारी आहेत.

छत्रपति शिवाजीमहाराजाच कुलदैवत अबाभवानीचें स्थान तुळजापूर, दत्ताचें प्रसिद्ध ठिकाण गाणगापूर व एकनाथस्वामींच पैठण हीं स्थानें याच संस्थानात होतीं. ... ... मराठवाड्यात पुष्कळ हिंदु साधुसत होऊन गेले व त्याच्या समाध्या सुरक्षित आहेत. मराठवाड्यात अजंठा व वेरूळ येथील कोराव लेण्यात हिंदु व बौद्ध धर्माच्या कोरीव व रगीत मूर्ति आहेत खुद्द औरंगाबादेजवळ दौलताबाद किल्ल्यात एकनाथस्वामींचे गुरु जनार्दनस्वामी याची समाधि आहे. हैदराबादपासून पूर्वेस सुमारें

खम्मम्‌च्यापासून १० मैलावर गोदावरीच्या काठी भद्राचलम् नावाचे एक प्रसिद्ध क्षेत्र आहे. त्या देवस्थानास जुन्या नबाबांनी इनाम जमिनी व वर्षासने दिली आहेत. भद्राचलम् जवळ पौराणिक काळी श्रीरामचंद्राने गोदावरी नदी ओलांडून दंडकारण्यात प्रवेश केला, अशी माहिती मिळते.

वरील विवेचनावरून मला तरी वाटते की सध्याच्या निझामांनी किंवा त्यांच्या वडिलांनी जाणूनबुजून हिंदूंना त्रास दिला नसावा. हिंदुस्थानास स्वराज्य मिळाल्यावर काही परप्रांतीय मायेफिरू मुसलमानांनी हैदराबादेस येऊन स्थानिक मुसलमानांस चिथावणी दिल्याने तेथे मोठी 'रझाकार' चळवळ उद्भवली व त्यामुळे दोन्ही जमातींचे (हिंदूंचे व मुसल्मानांचे) हाल व नुकसान झाले आणि बरीच प्राणहानीहि झाली, असे आपण वाचतो व ऐकतो.

मला वाटते, येथील लोक—मग ते मुसल्मान, हिंदु वा पारशी असोत—मनमिळाऊ व समजूतदार आहेत. हैदराबाद शहरात जवळजवळ एक लाख चाळीस हजार महाराष्ट्रीय लोक आहेत. त्यांचा व्यापारधंदा चांगला चालला आहे व ते आनंदात आहेत असे दिसते. लोकांत खोटे बोलण्याची प्रवृत्ति फारशी दिसत नाही. दुकानांत मालाच्या किंमती भलत्या सांगितल्या जात नाहीत. त्याचप्रमाणे टांगेवाले व रिक्षावाले भरमसाट भाडें मागत नाहीत.

पूर्वीच्या निझामांनी आपल्या पायग्यांना (सग्यासोयऱ्यांना) दरसाल लाखों रुपये उत्पन्न येणारी वतनें इनाम दिलीं होतीं. शिवाय शेकडों मुसल्मान व हिंदु जहागिरदारांनाहि मोठाली इनामें दिलीं होतीं. मला वाटते, सध्या त्यांना पूर्वीच्या उत्पन्नाबद्दल काही रोख मोबदला मिळतो. हल्लीच्या निझामसाहेबांनी सुद्धा तुर्कस्थान इराणकडचे संबंध करण्यात फार मोठा खर्च केला आणि सुनांच्या आईबापांना वर्षासनें दिलीं. निझामाच्या दानधर्माचा ओघ त्यांच्या राज्यात, परप्रांतात व परदेशात आजहि वाहतो आहे. निजाम धार्मिक वृत्तीचे आहेत. ते मातृभक्त असून त्यांच्या मातुश्री हयात असेपर्यंत ते रोज नियमाने त्यांच्या दर्शनास जात.

निझामांनी आपल्या राजधानींत मोठाल्या सार्वजनिक इमारती बांधल्या. कोर्ट-कचेऱ्यांशिवाय मोठे हायकोर्ट, असेम्ब्ली हॉल, सचिवालय बांधले. उस्मानिया युनिव्हर्सिटी स्थापिली. एवढी विस्तीर्ण युनिव्हर्सिटी मला दुसरीकडे दिसली नाही. काशींतील हिंदु युनिव्हर्सिटी मीं पाहिली आहे; पण मला ती फुरसतीने पाहतां आली नसल्याने, उस्मानिया युनिव्हर्सिटीएवढी आहे किंवा मोठी आहे, हें मला सांगता येत नाही. आर्ट्स, सायन्स, इंजिनिअरिंग, ॲग्रिकल्चर, कॉमर्स आदि सर्व अंगें आणि त्यांसाठी स्वतंत्र इमारती आहेत. युनिव्हर्सिटीची बाग फारच उत्तम आहे. शहरात 'बागआम' नावाचा बगीचा व त्यांत प्राणिसंग्रह व इतर निरनिराळे म्युझियम्स आहेत. फलकनुमा राजवाड्याशिवाय बोलारमचें राष्ट्रपतिभवन व हुसेनसागरवरच्या गव्हर्नमेंटहाउससारखे राजवाडे आहेत.

हैदराबाद सिकंदराबाद ह्या जुन्या शहरातील रस्ते रुंद, डांबरी अगर सीमेंटचे आहेत. शहराजवळ हुसेनसागर, उस्मानसागर व हिमायतसागर यासारखे मोठाले तलाव बांधले आहेत. त्यामुळे हैदराबाद सिकंदराबादची पचक्रोशी फार तापत नाही. शिवाय प्राचीन काळच्या इमारती चारमिनार, चारकमान, मक्का मशजिद, व सर सालरजंग म्युझियमसारखें (जगप्रसिद्ध म्युझियम) भव्य प्रासाद आहेत. मला वाटतें, इतकें चांगलें शहर आपल्या देशांत राहण्यास मिळणार नाही. येथे मुंबई कलकत्याप्रमाणे फार मोठी बकाली वस्ती नाही. निजामांनी बडोद्याचे सयाजीराव गायकवाड यांच्याप्रमाणे आपल्या संस्थानाचा विकास करून तें फार सुधारलें, असें माझें मत हैदराबाद व गोवळकोंड्यास राहून बनलें होतें. पण या आठवणी लिहिताना जास्त चौकशी केली. त्यांत समजलें की, निजामसाहेबांनी आपल्या राजधानीवरच मोठा खर्च केला. प्रजेच्या कल्याणाकडे व खेड्यापाड्याच्या सुधारणाकडे व उन्नतीकडे त्यांचें फारसें लक्ष्य गेलें नाही.

एवढें खरें की, सध्याचे निजाम स्वतःच्या चैनीवर फारसा पैसा खर्च करीत नाहीत. ज्या इमारतींत (किंगकोटींत) ते आपल्या जनान्यासह राहतात, ती इमारत सभोंवार उंच भिंती असलेल्या जुन्या तुरुंगासारखी अगदी साधी दिसते. जरी त्यांनी फलकनुम्यासारखे भव्य राजवाडे बांधले, तरी त्यांत ते स्वतः कधी राहिले नाहीत. त्यांची राहणी फार साधी आहे. ते स्वतः शाहीर आहेत. त्यांनी सर विश्वेश्वरय्या व सर मिर्झा इस्माइलसारखे नामांकित कर्तबगार दिवाण नेमून त्यांना सुधारणा करण्यास स्वातंत्र्य दिलें होतें.

जुन्या खानदानी मुसलमानांत सौजन्य दिसतें. भाषेच्या अडचणीमुळे, शिवाय वार्धक्यामुळेहि, मला खेड्यापाड्यांतून हिंडवा आलें नाही. तथापि माझे मधले चिरंजीव दिनकरराव (बाबासाहेब) पोलिसकारवाईनंतर या राज्यांत निरनिराळ्या ठिकाणीं डिस्ट्रिक्ट सुपरिंटेंडट ऑफ पोलिस असताना मला बिदर, रायचूर, गुलबर्गा वगैरे शहरीं कांही दिवस राहण्याची संधि मिळाली. अलीकडे दोन वर्षें तर मी गोवळकोंडा व हैदराबादेसच असतों. त्या माझ्या वास्तव्यांत मला असें दिसलें की, निजामाच्या राज्यांत एक स्वतंत्र संस्कृति निर्माण झाली असावी. ती दिल्ली-लखनौ कडची मुस्लिम नव्हे, अगर पुणें-नाशिककडची ब्राह्मणी नव्हे, वा ग्वाल्हेर इंदोरकडची हिंदी नव्हे, अशी एक निराळी संस्कृति बनली आहे. ती सर्व लोकांना (मग ते मुस्लिम असोत, हिंदु मराठे ब्राह्मण असोत वा पारशी असोत) पटलेली दिसते. या संस्कृतींत सौजन्य व भारदस्तपणा, मनाचा बराच मोकळेपणा हे गुण दिसतात त्याच्या त्याच्या ऐपतीप्रमाणे लोक चांगलें जीवन जगण्याचा प्रयत्न करतात.

पुणें कोल्हापूरसारख्या पश्चिम महाराष्ट्रांतील शहरांत भाजीपाला माणसं डोक्यावरून आणतात, पण हैदराबादेस असले ओझेवाले पुढ्यांत पाटी घेऊन रिक्शांतून येतात, व परत जातानाहि रिक्शांतून जातात. हैदराबाद शहरांत साठ

हजाराचेवर रिक्शा आहेत. हैदराबादचे व या बाजूच्या शहराचे रिक्शा हें एक विशेष आहे. रिक्शा हें ल्हानसे तिचाकी अजब वाहन आहे. रिक्शातून दोनतीन माणसे व कधीकधी आणखी दोनतीन मुलें जातात. हैदराबाद स्टेशनवर क्वचित् घोड्याचा टांगा अगर टॅक्सी दिसते. दोन प्रवासी व त्यांचे लगेज (सामान) एकाच रिक्शातून जातात कोल्हापूर-पुण्याकडील टांगेवाला इतकीं माणसें वा सामान घेत नाही. रिक्शाचें भाडे फार कमी असतें. साधारण मैलभर अंतरास एका माणसास चार आणे पडतात.

कारकुनी पेशाच्या लोकांचे कपडे पांढरेशुभ्र व इस्तरी केलेले असतात. मुंबई पुण्याप्रमाणे हैदराबादेसहि चहाफराळाचीं दुकानें (हॉटेलें) आहेत. पण तीं जास्त व्यवस्थित दिसतात. ऑफिसात जाणारीं माणसें व उद्योगधंदेवाले हॉटेलातच चहाकॉफी व फराळ घेतात. येथील देशी हॉटेलें पुणें, कोल्हापूर व मुंबईपेक्षा स्वच्छ दिसतात. वाढपी पुरेसे असून त्यांचे कपडेहि स्वच्छ असतात. असल्या हॉटेलमध्यें दुपारीं लंचला तरी फार गर्दी असते. मीं एकदा जाऊन पाहिलें, तेथील अन्न चांगलें असून निर्मळ दिसलें. बाजारात मालाची मल्ती किंमत सांगत नाहीत. रिक्शावालेसुद्धा क्वचित् चार आण्याऐवजी पाच आणे सांगतील, पण पुण्याप्रमाणे सांगावयाचे दोन रुपये शेवटीं घ्यावयाचे आठ आणे, असें होत नाही.

सिनेमागृहें पुणे कोल्हापूरप्रमाणे भरलेलीं असतात. विशेष म्हणजे उच्च दर्जाचें गाणें वरचेवर करविलें जातें. मला स्वतःला गाण्याबजावण्याचा शौक नाही. माझ्या ल्हानपणीं व तरुणपणीं मला तसा योग आला नाही व संधि मिळाली नाही. पण इकडील शहरात तरी संगीत जाणणारे बहुजनसमाजात बरेच दिसतात.

हैदराबाद-सिकंदराबाद शहरातील रस्त्यांचें वैशिष्ट्य म्हणजे रस्ते सीमेंटचे असून रुंद आहेत. रस्त्याकडचीं झाडें मध्यम उंचीचीं व डेरेदार आकाराचीं आहेत. झाडांचीं फुलें झगझगेदार पांढऱ्या रंगाचीं, लवकर न कोमेजणारीं आहेत. ऑक्टोबर ते एप्रिलपर्यंत हीं झाडें पानाफुलांनीं भरलेलीं असल्याने रस्त्यास शोभा आणतात.

मला वाटतें, पुणे कोल्हापुराकडील जमिनीपेक्षा इकडील जमीन फुलाफळांस जास्त योग्य आहे. बाजारात फळांच्या मोटारी भरभरून येतात. विशेषतः केळीं, टरबुजें, खरबुजें, सीताफळें, आंबे यांच्या ट्रक्स भरून येतात. सीताफळें ट्रक्समधून आणणें मला शक्य वाटत नव्हतें, पण ट्रक्स तसे भरून येतात खरें; फळें थोडीं कचीं काढावीं लागत असतील. सीताफळें मोठीं चवदार असतात. सीताफळाची शेतात लागवड केलेली नसते. ल्हानसान टेकड्यांवर व त्यांच्या कडेच्या डोंगराळ भागात हीं आपोआप उगवतात. जशीं मावळात हिरड्यांचीं रानें हिरडे गोळा करावयास लिलावानें देतात, तशीं इकडचीं रानें दरसाल सीताफळें काढून नेण्यासाठी लिलाव करतात. हैदराबादच्या आसपास अनाबशाही जातीच्या द्राक्षांची लागवड मोठ्या प्रमाणात होते. द्राक्षांचें एकरी उत्पन्नहि चांगलें येतें. गेल्या चारपाच वर्षांत अनाबशाहीची लागवड पुणें कोपरगावकडेहि फैलावली आहे.

माझ्यासारख्या पश्चिम महाराष्ट्रातील (म्हणजे कोल्हापूर सातान्याकडील) शेतकी-अधिकान्यास या भागात (विशेषकरून हैदराबाद, वारंगळ, रायचूर व तुंगभद्रा विजयानगर) जो विशेष निराळा देखावा दिसला, तो असा : या भागात, विशेषकरून हैदराबाद ते तुंगभद्रा नदीवरील विजयनगरपर्यंतच्या पट्ट्यात, जागोजाग दिसणाऱ्या ग्रॅनाइटच्या धुवून धुवून उघड्या पडलेल्या खडकाच्या रांगा व टेकड्या, त्यावरील एकावर एक मोठाले दगड रचून केल्यासारख्या भव्य उतरंडी व नित्येक टेकड्यांवर अखंड ग्रॅनाइटचे शेकडो फूट लांबीरुंदीचे दगड दिसतात. काही ठिकाणीं, मुली खडूने खेळताना खडू टाकतात तसे एखाद्या राक्षसीनें अजस्र खडू (दगड) टाकले असावेत असा भास होतो. आमच्याकडच्या देशभागासारखी—पूर्व सातारा व सोलापूरकडच्यासारखी—सपाट जमीन दिसत नाही. टेकड्या व मध्येमध्ये उथळ जमीन दिसते. पण पूर्वभागात गोदावरी व कृष्णा यांच्यामधील दुआबातील जमिनी खोल व सपाट आहेत. या दुआबात जागोजागीं पाटबंधारे असल्यामुळे बागायत पिकाचें क्षेत्र मोठें आहे.

पूर्व आंध्र प्रांतात व पलीकडे समुद्रकिनाऱ्याकडच्या भागात मराठवाड्यापेक्षा जास्त पाऊस पडतो. शिवाय हा भाग गोदावरी व कृष्णा नद्यांच्या दुआबात असल्याने तेथील जमिनी खोल व सपाट आहेत. या भागात पश्चिम महाराष्ट्रातील मराठा शेतकऱ्यासारखे पण तेलगू भाषिक रेड्डी शेतकरी आहेत. रेड्डी मराठा शेतकऱ्यापेक्षा सुखी व प्रगत आहे असे दिसते. या भागात नागार्जुन व अमरावती येथे प्राचीन कलाकृतींचीं मंदिरें आहेत. नागार्जुनसागराचें काम होताच तेथील मंदिरें पाण्यात जाणार.

आंध्र प्रदेशात तेलंगण प्रांत व आंध्र प्रांत मोडतात. दोन्ही भागांची भाषा तेलगूच आहे. मात्र हैदराबादच्या पूर्वेकडील भागाची (विशाखापट्टम्, मच्छलीपट्टम व काकिनाडाकडील) भाषा शुद्ध तेलगू व दक्षिणेकडची म्हणजे कर्नूल, अनंतपूर व कडाप्पा भागांतील भाषा तितकी शुद्ध नाही, असे म्हणतात. दोन्ही भागांत रेड्डी प्रामुख्याने दिसतात. भाषेचा प्रश्न वगळल्यास, पश्चिम महाराष्ट्रातील मराठे व कुणबी आणि आंध्रातील रेड्डी यांत फरक दिसत नाही. वायकांचे व पुरुषांचे पेहरावांत व रीतिरिवाजांतहि फरक दिसत नाही. चाळीसपन्नास वर्षांपूर्वी सातारा कोल्हापूर भागातील बहुसंख्य मराठा शेतकरी धोतरें नेसत नसत व जे नेसत तेसुद्धा खणावारीं नगर परगावीं जाताना नेसत. त्याची लांबी फक्त पांच हात असे व त्यास पंजे म्हणत. हे पंजे नेसताना डाव्या पायाच्या पिंढरीवरून घोट्याकडे सोगा सोडीत. तसलेच पंजे नेसून, रेड्डी शेतकरी डाव्या पायावर तसाच सोगा सोडतो. दोन्ही समाज शेतकरीच. पावसाळ्यात या शेतकऱ्यांच्या अंगावर आमच्या शेतकऱ्यांप्रमाणे घोंगड्याची खोळ असते. रेड्डी स्त्रिया मराठा स्त्रियांप्रमाणेच विनकासोट्याचे लुगडे नेसतात. चोळीची पद्धत तशीच आहे. कुंकू लावणें व डोक्यावर पदर घेणें तसेंच आहे. जितका व जसा मराठा स्त्रियांत पडदा, तितकाच रेड्डी स्त्रियांतहि पडदा आहे. वास्तविक मध्यमवर्गाच्या मराठा स्त्रियांत व रेड्डी स्त्रियांत पडदा नाही. श्रीमंत मराठ्यांत जसा

पडदा, तसाच श्रीमंत रेड्डी स्त्रियांत पडदा असतो. आम्ही ज्या एका रेड्डी जहागिरदाराच्या कंपाउंडांत राहतों, ते सुमारें पासष्ट वर्षांचे आहेत. त्यास मुलनातवंडें आहेत. त्यांच्या पत्नीकडून आमच्याकडे वेळोवेळीं रस्सा व भाज्या येतात. पण मीं तिला पाहिलेली नाही. तिच्या सुना मात्र पडदा ठेवीत नाहीत. माझी सून त्या बाईकडे कधींकधीं जाते.

कोंकणांत व पश्चिम महाराष्ट्रांत भाषा एकच असूनहि या दोन भागांतील माणसांत बराच फरक दिसतो. तसा फरक या दोन (महाराष्ट्र व आंध्र) पृथक्‌भाषिक लोकांत दिसत नाही. दिसण्यांत, वागण्यांत व वस्त्रप्रावरणांत महाराष्ट्रीय व रेड्डी शेतकरी सारखेच वाटतात.

रेड्डी समाज मराठा समाजाच्या मानानें जास्त सुखी असून पुढारलेला दिसतो. ते लहानमोठ्या व्यापारधंद्यांत व राजकारणांत पुढे गेलेले दिसतात. मराठा जातीपुरतें बोलावयाचें झाल्यास मराठे अगदीं अलीकडे दहावारा वर्षांतच सरकारदरबारांत पुढे येत आहेत. पश्चिम महाराष्ट्रांतील मराठे जसे अन्य स्पृश्य हिंदु जातींशीं मिळून असतात, त्यांच्यांत मोकळेपणानें वावरतात, तसेच रेड्डीहि वावरतात. गुजरात पंजाबपेक्षा, किंबहुना कोंकणापेक्षासुद्धां (फक्त भाषा वगळून) तेलंगण व आंध्र पुण्यासारखा भासतो. एवढें खरें कीं जसें गुजराती वा हिंदी भाषेशीं मराठीचें साम्य आहे तसें तेलगू भाषेशीं नाही. मराठी व तेलगू भाषांत असा फरक कां असावा हृं मला उमगत नाही. दोन्ही समाज मूळचे द्रविडच असावेत, पण उत्तरेकडून आर्य आले, ते जसे पश्चिम महाराष्ट्रांत वळले, तसे आंध्रप्रांतांत वळले नसावेत.

पश्चिम महाराष्ट्रांत सर्व लहानमोठ्या गांवांत देवाचें वा देवीचें मंदिर असतें, तसें आंध्र व तेलंगणांत दिसत नाही. शहरांत मात्र देवालयें आहेत. पण खेड्यांत, गांवाबाहेर, वाटेवर म्हसाई, यल्लमा, किंवा काली यांची बिनदाबी एकच लहान दार असलेलीं (पण त्याला कवाडें नसलेलीं) लहान देवळें असतात. त्यास गुडी म्हणतात. त्यांची लांबी, रुंदी, उंची साधारण पांच फूट असते. गुडीस खांब व कौलें नसतात. कडेच्या भिंतीवरच निमुळतं शिखर असतें. असल्या मेसमा अगर यल्लमा गुडींत मूर्ति दिसत नाहीत. दाराच्या समोरच्या भिंतीस शेंदूर फासलेला असतो. कोठेकोठे नारळाएवढे दगडी गोटे ठेवून त्यास शेंदूर फासलेला दिसतो. गुडीपुढे भाविक लोक बकरीं कोंबडीं कापतात. गुडींत दिवा लावण्यासाठीं पणती ठेवता यावी म्हणून लोक तेथे जाऊन पणती व उदबत्त्या लावतात व नारळ फोडतात. भुताखेतांवर व अंगांत येणाऱ्या देव देवतांवर लोकांचा विश्वास आहे. शहरांत तेलगू भाषेत भजन करतात. भजनांत मृदंग, वीणा व लहानलहान झांजा यांचा उपयोग करतात. भजन मोठ्या आवाजांत नसतें. जमिनीवर बसूनच भजन होतें. मीं तरी हैदराबादेस तसें पाहिलें आहे. मला ही पद्धत आमच्याकडील धसाफोसी गदारोळापेक्षा बरी वाटली.

卐

# चौथा प्रहर

卐

आज माझें वय ८७ वर्षांचें आहे. म्हणजे इतरांच्या मानानें मला पुष्कळ आयुष्य लाभलें आहे. आजवरचें आयुष्य सुखासमाधानांत गेलें म्हणावयास हरकत नाहीं. आजहि मी सुखी आहे. गतायुष्यांत मनुष्यमात्रास त्रास होईल, असलें कृत्य जाणूनबुजून हातून झालें नाहीं, असें मन साक्ष देतें. माझ्याइतकें सुखसमाधान फारच थोड्या व्यक्तींस मिळतें.

मुलें फार चांगलीं निघालीं. प्रकृतीनें धडधाकट असून तीं शूर व शीलवान आहेत म्हटल्यास आत्मप्रौढीचा दोष येणार नाहीं असें वाटतें. नातवंडें बरींच आहेत. त्यांतील पांच जणांनीं युनिव्हर्सिटीच्या पदव्या मिळविल्या आहेत. शिवाय दोन नातू नुकतेच लष्करांत लेफ्टनंट झाले आहेत. ही सर्व ईश्वरी कृपा.

वडिलांची सांपत्तिक स्थिति अगदीं साधारण असूनसुद्धा, योगायोगानें उच्च शिक्षण घेतां आलें. पहिल्या पदवीपरीक्षेंत पहिला नंबर आला. नोकरी ल्हान का असेना, चालून आली आणि युरोप, अमेरिका, जपान व जावा अशा परदेशांना जाण्याची संधि मिळाली. कामाची कदर करून रावबहादुरीचें पदक हिंदुस्थान सरकारनें दिलें. नोकरींत बढत्या मिळत जाऊन, लवकरच इंपीरिअल सर्व्हिसमध्ये शिरकाव झाला. सांपत्तिक स्थिति सुधारली व ज्येष्ठ चिरंजीव शंकरराव यास लष्करी शिक्षण घेण्यासाठीं विलायतेस पाठवितां आलें. त्या वेळीं इंग्रजी अमदानींतसुद्धा मला एका सरकारी कॉलेजचा प्रिन्सिपॉल होतां आलें.

माझ्या वेळीं मराठा समाजांत विश्वविद्यालयाची पदवी घेतलेले लोक फक्त एका हाताच्या बोटांवर मोजण्याइतकेच असल्यानें बहुतेक मराठे राजेरजवाड्यांचा दाट परिचय होणें साहजिक होतें. सन १९२६ सालीं अखिल भारतीय मराठा परिषद्

माळव्यात देवास येथे भरली. नियोजित अध्यक्ष नागपूरचे राजेसाहेब येऊ शकले नाहीत; व जातगंगेने सर्वानुमतें अध्यक्षपदाचा मान मला दिला.

विग्राहि चिरजिवाचें शिक्षण झालें. समाधानाची गोष्ट की, ते शीलसपन्न असून सुस्थितींत आहेत. लोकांत व सरकारांत त्याचा लौकिक आहे. मुलगी एकच. तिचेंहि ठीक चाललें आहे. मुलामुलींचे सदार सुखाचे पाहून मनास समाधान लाभलें.

सन १९३२ सालीं वयास पचावन वर्षे भरताच सेवानिवृत्त झालों. त्या वेळीं प्रकृति अगदी ठणठणीत होती. लागलीच अर्धी पेन्शन विकली (कॉम्यूट केली). त्यातच प्रॉव्हिडंट फंडाची रक्कम घातली. कोणाशीं हेवादावा न करता गावाकडे काही जमिनी विकत घेतल्या. तेथेच एक लहानशी बगली बाधली. थोड्या दिवसानतर कोल्हापुरास स्टेशनजवळ एक जुना बगला विकत घेतला व ताराबाई पार्कमध्ये दुसरा नवीन बाधला. अशा रीतीने सन १९३२ ते ४० हीं आठ वर्ष उमेदीने घराच्या सवारांचीं कामें करण्यात गेलीं.

सन १९४० सालीं उतारवयात त्रेसष्टावे वर्षी एक मोठा धक्का बसला. त्या वर्षी, एकाएकी आमची एकोणीस वर्षांची सुस्वरूप व धडधाकट मुलगी इंदुमती एकाच आठवड्याच्या आजारात वारली. विशेष म्हणजे, क्वचितच घडणारी गोष्ट अशी की, तिला आपण लवकर मरणार, असें मरणापूर्वी तीनचार महिने वाटत होतें. तिच्या आकस्मिक मरणाचा हा धक्का माझ्या मनास असह्य झाला. तरुणपणीं आप्तस्वकीयांच्या मौतीस गलों असता माझ्या डोळ्यांस सहसा पाणी येत नसे. मी एकोणतीस वर्षांचा असताना वडील वारले, त्याचें दुःखसुद्धा इतकेंसें जाणवलें नाही, पण इंदूचें निचेष्टित पडलेलें प्रेत पाहून मात्र मला मूर्च्छा आली व काही मिनिटें मी बेशुद्ध होऊन पडलों होतों. दुःखाचा विसर पडावा म्हणून आईला व पत्नीला बरोबर घेऊन मुलाच्याकडे उत्तर हिंदुस्थानात गलों. ग्वाल्हेरीस चि० भाऊसाहेबाकडे आठ दहा दिवस राहून सिकदराबादेस ज्येष्ठ चिरजीव लेफ्टनट शकररावाकडे थोडे दिवस राहिलों, तेथून पदरपुरास मुलीकडे गलों. जामात त्या वेळीं तेथें मुन्सफ होते. काही दिवस तेथे राहून कोल्हापुरास परत आलों.

आम्ही परत आल्यानतर थोड्याच दिवसात कोल्हापुरात रीजन्सी कौन्सिल होण्याचा प्रसंग आला. हिंदुस्थान सरकारने छत्रपति राजाराममहाराजांच्या अकाली निधनानतर थोरल्या महाराणी ताराबाईसाहेब यास रीजट नेमून त्यांच्या हाताखालीं एक कौन्सिल नेमिलें. सदर रीजन्सी कौन्सिलात मी शिक्षणखात्याचा मत्री होण्याबद्दल रेसिडेंटने आग्रह केला व मी कौन्सिलात मत्री झालों. स्वतःच्या घरींच राहून कोल्हापूर सस्थानची सेवा करण्यात मी तीनचार वर्षे अगदी गढून गलों. या कामात मुलीच्या मरणाच्या दुःखाचा हळूहळू विसर पडत गला.

मला माझ्या कामात गुतल्याने दुःखाचा विसर पडत चालला, तरी माझ्या पत्नीस मुलीच्या दुःखाचा विसर पडणें शक्य नव्हतें. त्यातच तिचा दम्याचा जुना विकार

मिळविलें. या वन्याच वर्षांच्या व्यायामानें प्रकृति शहाऐंशी वर्षांच्या वयापर्यंत टिकून राहिली असें म्हणण्यास हरकत नाही.

प्रकृति बरी असली, तरी वयाचा परिणाम हा होणारच. माझ्या दीर्घ आयुष्यात मला दुखण्याखाण्यानें फारसें जाचलें नाही. मात्र सन १९४२ सालीं प्रोस्टेटचा (मूत्राशयातील ग्रंथीपासून) त्रास झाला, पण काही इंजेक्शनें घेतल्यावर त्या हळूहळू दबल्या. पुढे थोडया दिवसांनी डोक्याच्या कवटींत सायनस नावाचा आजार झाला. सायनसमधील गाठ काढण्यासाठी शस्त्रक्रिया करावी लागेल, असें दरबारसर्जन डॉक्टर सिमियनी सांगितलें. मी नाखूष असल्याचें पाहून ते म्हणाले, "आपण 'क्ष' किरणें देऊन पाहू. पण शेवटीं ऑपरेशन हें करावें लागेलच." त्याप्रमाणे 'क्ष' किरणें देण्याचें सुरू केलें. उपाय लागू पडला. सायनसमध्ये बनलेली सुपारीएवढी गाठ एके दिवशीं शिंकताना घशातून एकदम बाहेर पडली. अशा रीतीनें दोन्ही आजाराच्या तावडींतून बचावलों. सन १९५० सालीं तोंडात कॅन्सर झाला. काही दिवस मुंबईतील टाटा कॅन्सर हॉस्पिटलमध्ये उपचार केल्यानंतर तो रोग बरा झाला. पण उपचार सुरू करण्यापूर्वीच डॉक्टरानी बहुतेक दात काढले होते. कृत्रिम दात वेळोवेळीं करून घेतले, तरा कृत्रिम ते कृत्रिमच. बोलताना शब्दाचे उच्चार स्पष्ट होत नाहीत. जेवतानाहि अडचण भासते. तथापि त्याचा उपयोग बराच होतो. त्यातच पायाची जळजळ सुरू झाली. अॅलोपाथी, होमिओपाथी, युनानी व आयुर्वेदी उपचार केले; पण त्याचा फारसा उपयोग होत नाही. एवढें खरें की, ही दर्द वा हा रोग असह्य नाही. थोडा त्रास होतो, पण तो सारखा चौवीस तास नसतो. रात्रंदिवसांपोटीं पाचसहा वेळा दहापाच मिनिटें त्रास होतो व नंतर त्याचा विसर पडतो; एवढें तरी बरें.

पायाची जळजळ होत असताना मला माझ्या विद्वान् व प्रज्ञावान् स्नेह्याची म्हणजे कै० भास्करराव जाधवांची आठवण होते. ते माझ्यापेक्षा वयानें दहा वर्षांनी वडील असून, सन १९५० सालीं वारले. सन १९४८ च्या सुमारास त्यांची दृष्टि अजिबात गेली. त्या वेळींसुद्धा त्यानी तक्रार केली नाही. ते मला म्हणत, "या डोळ्यानी पुष्कळ पाहिलें आहे हो! मला ऐकू येतें. सरावानें घरातल्या घरात वावरता येतें. तुमच्यासारखे स्नेही येतात. बस्स झालें. माझा वेळ सुखात जातो, बरें का!" भास्कररावांचें उदाहरण माझ्या फार उपयोगी पडतें.

निदान आज तरी माझें ठीक चाललें आहे. आजवर वेळोवेळीं मुंबईस मुला नातवाकडे, त्याचप्रमाणे कोल्हापुरास मुलीकडे व जन्मभूमीं वडगावीं सग्यासोयऱ्यास भेटावयास जातों. आता हैदराबाद सोडण्याची छाती होत नाही. पण मनाची ओढ असते म्हणून कधीकधी जातों. पण प्रवासात कितीहि काळजी घेतली तरी ठिकाणास पोचल्यावर प्रवास केल्याबद्दलचा दंड चारदोन दिवस भोगावा लागतो.

आताशी मी सकाळीं साडेपाच-सहाला उठतों. शौचमुखमार्जन करून हातपाय धुतों. यात बराच वेळ घालवतों. तोंपर्यंत चहाची तरई टेबलावर ठेविलेली असते. या वेळीं नुसता चहा व तोहि अगदी पातळ असा घतों. चहाची खरी तल्फ या वेळीं असते. नतर कपडे करून फिरावयास निघतों, तोंवर ड्रायव्हर गाडी तबेल्यातून बाहेर काढतो. सुमारें सातच्या सुमारास बाहेर पडतों. बहुतेक हैदराबाद व सिकंदराबाद यास जोडणाऱ्या हुसेनसागरच्या तटापर्यंत जातों. तेथे गाडी सोडून पायीं मैलभर जाऊन येतों. कधी कधी उस्मानिया युनिव्हर्सिटीच्या बागकडे अथवा मलकपटच्या पुढे जातों तरीपण तिकडे जातानाहि शहराबाहेर मोटार उभी करून पायींच जातों आठवड्यातून एक वेळ गोवळकोंड्यास श्री. नवगाल व पडित देशबधु याच्याकडे जाऊन येतों परत आल्यावर न्याहारी करतों. न्याहारीस टोस्ट (भाजलेला पाव), लोणी व मध घतों अडें सहसा घेत नाही. न्याहारीबरोबरचा चहाहि पातळ असतो. पातळ चहा घेणच चागलें असें मला वाटतें. नतर काही तरी वाचन व लिखाण करतों. बारा वाजता स्नान व लागलीच दुपारचें जेवण होतें. नानासाहेब व बाबासाहेब याच्या घरीं जेवण चागलच असतें, यात शका नाही. तथापि मासापेक्षा मासे व विशेषकरून तुरीच्या डाळीची आमटी व भाजीपालाच मला आवडतो. दही आवडतें पण अलीकडे तं सोसत नाही. दह्याऐवजी दूधच घेतों. मास मला फारसे आवडत नसेच, पण कॅन्सर झाल्यावेळीं दात काढावे लागल्याने मासावरचें मन जवळजवळ उडालें आहे. दुपारीं जेवल्यानतर थोडा वेळ वामकुक्षी करतों; वास्तविक वाचीत पडतों व थोडा वेळच डुलकी लागते. सुमारें अडीच तीनला चहा घेऊन परत काहीतरी वाचनलिखाण करतों. सध्याकाळीं सूर्यास्तापूर्वी गाडींतून फिरावयास हुसेनसागर तटावर जातों. परत आल्यावर कधीकधी थोडी जीन घेतों. पण नेहमी नाही. जशी मला चहाची तलफ वाटते, तशी जीन घ्यावीच असें मला वाटत नाही, एवढें बर आहे रात्रीं आम्ही लवकरच जेवतो सध्याकाळच्या जेवणाच्या वेळीं सर्व मुलें व सुन बरोबर असतात. थोडा वेळ काही तरी वाचतों व नऊचे सुमारास झोपतों.

झोप बरी येते. रात्रीं एकदोन वेळ उठावें लागतें. पहाटे पाचाच्या पुढे झोप येत नाही. तथापि अथरुणांत पडूनच असतों जर पहाटे उठल्यावर वाचीत बसलों, तर दुपारपर्यंत अगात मदपणा व डोळ्यावर झोप आल्यासारखे वाटतें, म्हणून पहाटे वाचन करीत नाही. सकाळीं कोणी तरी मुली भूपाळ्या, भावगीतें वा सुदर गाण्याच्या रेकॉर्ड्स लावतात. हें रेकार्ड्स चेंजर फार उपयुक्त वाटतें. मला गाता येत नसलं तरी रेकॉर्डवरचीं गाणीं फार आवडतात.

ह्या आठवणी लिहावयास घेतल्यापासून बऱ्याच वेळा मुबईस जाऊन काही दिवस राहावें लागतें. बाबासाहेबाचा बगला महालक्ष्मीजवळ समुद्रकाठच्या टेकाला हिल्वर असल्याने हवेशीर आहे. तेथून सकाळीं व सध्याकाळीं जवळच समुद्रकाठीं फिरावयास जाण्याचा फार सोइचें आहे. मुबईतील मुक्कामात मी नियमितपण सकाळीं

सध्याकाळीं फिरावयास जातों. कधीकधी बाबासाहेब, त्यांची पत्नी व मुलें, यांच्याबरोबर ग्रूहू बीचवर किंवा आरे दूध फॅक्टरीकडे फिरावयास जातो. कधीकधी सिनेमा शो किंवा कुस्त्या पाहण्यासहि जावयास मिळते. माडसाहेब व त्यांची पत्नी वरचेवर भेटून जातात.

एकंदरींत जाईन तेथें चांगली व्यवस्था आहे व सर्व कांहीं ठीक चाललें आहे. कशाची आशा राहिलेली नाही. सर्व दृष्टींनी पोट भरलें आहे. चांगले दिवस पाहावयास मिळाले; बस झाले! मन मोकळें आहे. मी जगन्नियंत्याचा फार आभारी आहें.



हळूहळू येऊन आमच्याबरोबर जेवत असे. काही दिवसांनी आईची अशक्तता वाढून तिला चालवयाचें अगदीं पडूं लागलें, तेव्हा तिने सांगितलें, "तुम्ही जेवल्यानंतर माझें ताट माझ्या खोलींत आणून देण्यास श्रीपतीस सांगा." त्याप्रमाणे आम्ही सर्व जण जेवल्यानंतर तिचें ताट घेऊन तिच्या खोलींत जात असू. आम्हीं तिचें ताट, तांब्या व तस्त घेऊन जाताच तिने विचारावें, "तुमचें जेवण झालें का? येसा (यशोदा, तिची सून) जेवली का?" अशी चौकशी करीत करीत तिचे जेवण होई. रात्रीच्या जेवणानंतर थोडा वेळ बोलत असल्यावर तिने म्हणावें, "मी आता जेवलें, एक रेंळहि खालें. मला आता थोडी अफू व अर्धा कप दूध आणून द्या." मागे सांगितल्याप्रमाणे ती सुमारें पंचेचाळीस वर्षांची असताना तिला प्रदराचा विकार झाला होता, त्या वेळेपासून ती रोज रात्रीं झोपण्यापूर्वी जोंधळ्याच्या एका दाण्याएवढी अफू व वाटीभर दूध घेत असे. त्यापासून तिला बरें वाटत असे. मग ती म्हणे, "तुम्ही आता माडीवर जा." नंतर आम्ही आपापल्या खोलींत जात असू. माझ्या आईच्या शेवटच्या आजारात, माझ्या चुलतभावाची (हिंदूरावाची) विधवा बायको गगुबाई व दुसऱ्या चुलतभावाची (श्रीपतीची) बालविधवा आऊबाई या दोघी आईबरोबर कोल्हापुरास होत्या. त्यांनी आईची सेवाशुश्रूषा मनोभावें केली. याबद्दल मागे उल्लेख आलाच आहे. हळूहळू आईचा थकवा वाढू लागला. डॉक्टराचें औषध गोळ्या असल्या तर तें ती घेई, पण इंजेक्शनें घेण्याचें साफ नाकारी. त्या वेळीं माझे थोरले चिरंजीव नानासाहेब व त्यांची बायको सरोजिनी आपल्या तिन्ही मुलांसह आमच्या स्टेशनाजवळील 'पांच बंगल्यां'त माडीवर राहात असत. सरोजिनी वरचेवर येऊन आईच्या शुश्रूषेला मदत करी. आमची मुलगी आनंदीबाई या पांच बंगल्याच्या तळमजल्यावर राहात असे. तीहि कधीकधी आमच्याकडे येऊन जाई. दुसरे चिरंजीव बाबासाहेब व त्यांची बायको व मुलें ग्वाल्हेरीहून आईस पाहण्यास आलीं. बाबासाहेबांना परत जावें लागलें, तथापि त्यांची बायको व मुलें कोल्हापुरासच राहिलीं. थोरले चिरंजीव आईस भेटून गेले. आई जास्त थकत चालली व तिची नजरहि फार कमी झाली.

आईची शुश्रूषा गगुबाई व आऊबाई यांनी मनोभावें चालविली होती. परंतु तिचा थकवा वाढतच गेला. अशा परिस्थितींत मीं आईला विचारलें, "आई, तुला पारमार्थिक बाबतींत कांही करावयाचें आहे काय?" तिने शांतपणें उत्तर दिलें, "आता काय करायचं राहिलें आहे? तुम्हीं माझें सर्व कांही यथास्थित केलें आहे. मला बरोबर घेऊन तुम्ही हरिद्वार, काशी, मथुरा, वृंदावन, नाशिक, रामेश्वर, देहू, आळंदी, पंढरपूर, वगैरे हिंदुस्थानांतील बहुतेक क्षेत्रांच्या यात्रा घडविल्या, पुष्कळ झालें. माझ्या लहानपणच्या मुलाचीहि तुम्हीं योग्य तरतूद केली आहे. मीं नुकत्याच भाऊसाहेबांच्या मुली पाहिल्या. बाबांचीं व नानांचीं व आनंदीचीं मुलें तर येथेच आहेत. फक्त नुकताच उपजलेला भाऊसाहेबांचा यशवंत पाहावयास मिळाला नाही.

तो पाहावयास मिळाला असता तर बरें झालें असतें. तेवढी इच्छा राहिली. असो. तुमच्या मुलाबाळांत माझें आयुष्य सुखानें गेलें. मीं आता देवाघरीं जावें हें बरें." आम्ही असें बोलत आहोंत, इतक्यात जसा एखादा दैवी चमत्कार घडावा तशी शंकररावाची तार आली की, आपण बायकोमुलांसह रात्रीं कोल्हापुरास पोचू. मी आईस म्हणालों, "आई, तुझी राहिलेली इच्छाहि पुरी होणार. तास दोन तासात शंकरराव व लीलावती तान्ह्या यशवंताला घेऊन येणार आहेत." हे ऐकताच तिला हुशारी वाटली. तिने डोळे उघडले व ती हलक्या आवाजात म्हणाली, "बरें झालें. माझ्या इच्छा पूर्ण होतील." थोड्याच वेळात शंकररावाची मोटार दारात येऊन थबकली. मी म्हणालों, "आई, पाहिलेंस, भाऊसाहेब व लीला छोट्या यशवंतास घेऊन उभीं आहेत." ती म्हणाली, "मला आता दिसत नाही. तथापि माझा हात बाळाच्या पाठीवरून फिरवा." मीं तिचा हात धरून तो बाळाच्या डोक्यावरून व पाठीवरून फिरविला. तिचीं बोटें कापत होतीं. सगळें वातावरण शांत होतें. सर्वांचीं जेवणें होऊन आम्ही परत आईजवळ चिंताग्रस्त होऊन बसलों होतों. मध्यरात्र उलटून गेली. पणतींतील तेल सरल्यावर जशी ज्योत लहानलहान होत जाते, तद्वत् आईची प्राणज्योत क्रमाक्रमी होत असल्याचें पाहून रात्रीचे सव्वाबारा वाजता मीं आईचें मस्तक हळूच मांडीवर घेतलें. काही वेळानें (०-३० वाजता) तिची प्राणज्योत मावळली. तिला कसलेहि क्लेश झाले नाहीत. त्या वेळीं तिचें वय ९७ वर्षांचं होते. आई मला सोडून देवाघरीं गेली माझा मायेचा मुख्य झरा आटला. मी ७१ वर्षांचा वृद्ध असून त्या घटकेपासून पोरका झालें माझ्यावरचें छत्र गलें असे वाटून मनाला अनिवार कष्ट झाले.

आईचे देहावसान, तारीख १३ माहे मार्च सन १९४८, मिति फाल्गुन शुद्ध ३, शके १८७० रोजीं पहाट होण्यापूर्वी झालें. त्या वेळीं शंकरराव, त्याची पत्नी व मुलगा यशवंत, नानासाहेब, त्यांची पत्नी व त्यांच्या निर्मला व उर्मिला या दोन लहान मुली, माझी दुसरी सून मदाकिनी व तिचीं दोन्ही मुलें (उदय व प्रताप), माझ्या चुलतभावजया (गगुनाई व आक्कुनाई) व माझी मुलगी आनंदीबाई, इतकीं माणसें जवळ होतीं. नानासाहेबांनी लागलीच आपल्या पलटणींतून एक ट्रक व एक मोटार आणली. शिवाय माझीहि मोटार होतीच. रात्रीं तीनच्या सुमारास आईचें शव घेऊन आम्ही सकाळीं पाच वाजता वडगावास पोचलों. आमच्या मोटारी तेथे पोचताच नामदेव, आनंदराव व महिपतराव यांनी माझ्या आईच्या निधनाची खबर जवळपासच्या गावातील आप्तेष्टास व स्नेह्यासोबत्यास पोचविली. पुष्कळ मंडळी तातडीने जमा झाली व सुमारे नऊ वाजता आईच्या-वडगावच्या आईच्या-शवास मंत्राग्नि दिला. तिसरे दिवशीं माती सावडली. दहावे दिवशीं और्ध्वदेहिक विधि करून बाराव्या दिवशीं दिवसाचें जेवण घातलें. दानधर्म करून काही संस्थाना देणग्या दिल्या. नंतर आम्ही कोल्हापुरास परतलों. गगुनाईना, आमच्यावर केलेल्या उपकारांची फेड म्हणून नव्हे, तर आईची आठवण म्हणून, आईच्या शिल्लक

राहिलेल्या दागिन्यांपैकी एक कंठी दिली. पण ती बाई मला म्हणाली, "मामींची थोडीफार सेवा केली म्हणून देता काय!" मी म्हणालों, "तसें काही नाही. माझ्या आईची आठवण म्हणून ही कंठी मी तुला देत आहें." मग तिने ती कंठी डोक्याला लावून घेतली. आईच्या अस्थि गावाजवळच्या वारणा नदींत, नरसोबाच्या वाडीजवळच्या कृष्णा नदींत व हरिद्वारजवळ गंगेत विसर्जन केल्या.

प्रत्येक जाणत्या माणसाला आपल्या जन्मदात्या मातापित्यांबद्दल प्रेम व आदर वाटणें साहजिकच आहे; पण वकीली तरफदारी न करता, प्रामाणिकपणे मला म्हणता येईल कीं, माझी आई एक असामान्य स्त्री होती. आजवरच्या माझ्या वयाच्या दीर्घ आयुष्यात मला पुष्कळ श्रीमंत घराण्यांतील, मध्यम स्थितींतील व गरीब समाजांतीलहि बायामाणसांशीं वागण्याबोलण्याचा निकट संबंध आला आहे. माझ्या गावीं शिक्षणाची सोय नसल्याने मला वयाच्या सातव्या वर्षापासून ते बाविसाव्या वर्षापर्यंत कोणाच्या ना कोणाच्या तरी कुटुंबात राहावें लागलें होतें. वयाच्या तेवीस ते अठ्ठावीस वर्षांपर्यंत मी वसतिगृहात राहिलों असलों, तरी परिचित स्नेह्यांच्या घरीं माझें जाणेयेणें असे. पुण्यास कॉलेजमध्ये असताना व विशेषत: नोकरींत असताना पुष्कळ सुशिक्षित ब्राह्मण, कायस्थ प्रभू व मराठे मंडळींशीं माझा निकट संबंध आला होता. त्या कालखंडात मराठा ज्ञातींत विद्यासंपन्न झालेली माणसें क्वचितच दिसत. मजसारखा एखादाच मराठा गृहस्थ चुकूनमाकून अधिकारी दिसायचा. त्यामुळे मराठा इनामदार व राजेलोकांतहि माझ्या दाट ओळखी झाल्या होत्या. अशा ऋणानुबंधामुळे मला निरनिराळ्या दर्जाच्या कुटुंबांत वावरण्याचे प्रसंग येत. पण माझ्या आईच्या कमाची, दक्ष व धीरोदात्त बाई मला आढळली नाही. माझ्या आईला लिहितावाचता येत नसे. तिचे आईबाप व सासूसासरे मध्यम स्थितींतील मराठे शेतकरी असल्याने त्यांच्या घरीं नियमितपणें पोथीपुराणें वाचलीं जात नसत, कथाप्रवचनें होत नसत व त्यांचा व्यापारधंदाहि नसे. सगळा व्यवहार मराठा शेतकऱ्याचा. शहरातील सुसंपन्न कुटुंबांतील बायांना किंवा इनामदारांच्या स्त्रियांना जसे सुशिक्षित समाजातील स्त्रीपुरुषांशीं बोलण्याचालण्याचे प्रसंग येतात, तसे प्रसंग माझ्या आईला येत नसत.

त्या वेळीं खेड्यात पावसाळ्यात बाहेरगावाहून कोणी तरी पुराणिक, महिना पंधरा दिवस पुराण सांगण्यास येत असे. अशा वेळीं वृद्ध बाया इतर श्रोत्यांच्या मागे बसून पुराण ऐकत. मराठा समाजांतील तरुण बायांना असलें पुराण ऐकावयास जाण्यास उघडीक आहे. दरवर्षी आश्विन नवरात्र उठल्यावर वृद्ध व तरुण बायाहि स्नान करून दुसऱ्या ग्रामदेवतेच्या देवालयात आरतीस जात. त्या वेळीं माझी आई इतर बायांबरोबर आरतीस जात असे, इतकेंच.

माझ्या वडिलांना जरी चांगलें लिहितावाचता येत असलें, तरी पण त्यांचें वाचन तात्त्विक वा पारमार्थिक स्वरूपाचें नव्हतें. वेताळपंचविशी, शुकबहात्तरी व

सिंहासनबत्तिशी अशापैकीच तें होतें. धार्मिक बाबतींत सुद्धा त्याचें वाचन कमीच. मागे लिहिल्याप्रमाणे, जर कोणी पुराणिक काही दिवस गावीं आला तर इतर लोकांबरोबर पुराण ऐकावें, पुराणिक आला नाही तर आपण स्वत श्रावण महिन्यात शिवलीलामृत, रामविजय किंवा हरिविजय यासारखी एखादी पोथी वाचावी, इतकेंच. शिवाय पाटिलकीचें काम व घरकारभार पाहण्यातच त्याचा वेळ जाई. अशा परिस्थितींत वाढलेल्या माझ्या आईच्या अंगीं दूरदर्शीपणा, प्रगल्भ बुद्धि, असामान्य धैर्य व प्रसंगावधान कोठून आलें ? एक तर हे गुण निसर्गाने दिले म्हणावयास पाहिजे, नाही तर पूर्वजन्मींचा संस्कार तरी म्हणावा लागेल.

माझ्या आईच्या मृत्यूच्या संदर्भात मला असें म्हणावेंसे वाटतें की, तिने जगण्याचा मोह धरला नाही व मरणाची भीतीहि बाळगली नाही. तिला कशाचीच आसक्ति राहिली नव्हती. जिवंत असेपर्यंत ती आनंदाने आपल्या परिवारात ववचवीत जीवन जगली. सुखामुळे मनास हुरळू दिले नाही व संकटें आलीं असतां दु:खाने हातपाय गाळून ती कर्तव्यविन्मुख झाली नाही. संकटाशीं धैर्याने झगडली. दुसऱ्यास मदत केली व त्याच्या सुखासाठी झटली, परंतु त्याबद्दल तिने कधीहि प्रौढी मिरविली नाही वडगावच्या व आसपासच्या गावातील एवढ्या मोठ्या नातलगाच्या परिवारात जें प्रेम व जो आदरमान तिने संपादन केला त्याचें मूळ तिच्या स्वभावातील दया, सौजन्य, धैर्य व स्वोपयोगीता या गुणात असले पाहिजे. पणतींतील तेल संपत आलेल्या दीपज्योतीप्रमाणे तिची जीवनज्योत हळूहळू व शांतपणें विझली. मात्र तिने जन्मभर जो प्रसाद दिला, त्याची चिरस्मृति मागे अखंड कायम ठेविली. त्या पवित्र आत्म्यास माझे सदैव वंदन असो.

0

# माझें प्राथमिक शिक्षण



आमचें वतनगाव मौजे वडगाव, तालुका शाहूवाडी, जिल्हा कोल्हापूर. आडनाव थोरात. पण आमच्या घराण्यात पाटिलकी असल्याने पाटील हेंहि उपनांव आम्ही लावतों. माझा जन्म माझ्या आजोळीं, मौजे साळशी, तालुका शाहूवाडी येथे तारीख १९ माहे जून, सन १८७७ (ज्येष्ठ शुद्ध ९ शके १७९९) रोजीं झाला.

माझ्या आईवडिलांस पाच अपत्यें झालीं. पहिलीं दोन लहानपणींच वारलीं. माझ्या जन्मपत्रिकेंत मी तिसरें अपत्य असल्याचें लिहिलें आहे. माझ्या पाठीवर मला एक भाऊ (दादू) व त्याच्या पाठीवर एक बहीण (लखुबाई) झाली. दादूचा जन्म कार्तिक शुद्ध ११ शके १८०१ मध्ये झाला होता. तो माझ्यापेक्षा बांधेसूद व सशक्त होता. तथापि तो पांचसहा वर्षांचा होतांच वारला. माझी धाकटी बहीण लखुबाई ही वैशाख वद्य ११ शके १८०४ रोजीं जन्मली. तिचें लग्न होऊन तिला मुलें-बाळें होऊन ती १९१६ सालीं प्लेगच्या आजाराने निवर्तली.

वयाचीं सहा वर्षें पुरीं होईपर्यंत मी आमच्या गावीं आईबापांकडे त्यांच्या प्रेमळ सहवासांत वाढलों. माझे वडील चांगले हुशार असून त्यांना उत्तम लिहिता-वाचतां व जमाखर्च ठेवतां येई. शेतकऱ्यांच्या अज्ञानाचा फायदा कुळकर्णी व जोशी कसे घेत हें त्यांना रोज दिसे. म्हणून ते माझ्या शिक्षणाचा विचार करूं लागले. आमचा गाव फार लहान असून त्या वेळीं तेथे गावठी किंवा सरकारी शाळा नव्हती. आमच्या गावापासून सुमारें मैल-दीडमैलावरून सरुडास सरकारी शाळा होती. त्या काळीं शाळा सकाळीं व संध्याकाळीं अशा दोन वेळा भरत असत. रोज सकाळीं संध्याकाळीं सरुडच्या शाळेंत जाणें मला कष्टाचें होईल म्हणून माझ्या आईने मला आपल्या माहेरीं साळशीच गावठी शाळेंत घालण्याचा सल्ला

सिंहासनबत्तिशी अशापैकीच तें होतें. धार्मिक बाबतींत सुद्धा त्याचें वाचन कमीच. मागे लिहिल्याप्रमाणे, जर कोणी पुराणिक काही दिवस गावी आला तर इतर लोकाबरोबर पुराण ऐकावें, पुराणिक आला नाही तर आपण स्वत: श्रावण महिन्यात शिवलीलामृत, रामविजय किंवा हरिविजय यासारखी एखादी पोथी वाचावी, इतकेच. शिवाय पाटिलकीचे काम व घरकारभार पाहण्यातच त्याचा वेळ जाई. अशा परिस्थितींत वाढलेल्या माझ्या आईच्या अगीं दूरदर्शीपणा, प्रगल्भ बुद्धि, असामान्य धैर्य व प्रसंगावधान कोठून आलें? एक तर हे गुण निसर्गाने दिले म्हणावयास पाहिजे, नाही तर पूर्वजन्मींचा संस्कार तरी म्हणावा लागेल.

माझ्या आईच्या मृत्यूच्या संदर्भात मला असे म्हणावेंसे वाटतें की, तिने जगण्याचा मोह धरला नाही व मरणाची भीतीहि बाळगली नाही. तिला कशाचीच आसक्ति राहिली नव्हती. जिवंत असेपर्यंत ती आनंदाने आपल्या परिवारात नवनीत जीवन जगली. सुखामुळे मनास हुरळू दिले नाही व संकटें आलीं असता दुःखाने हातपाय गाळून ती कर्तव्यविन्मुख झाली नाही. संकटाशीं धैर्याने झगडली. दुसऱ्यास मदत केली व त्याच्या सुखासाठी झटली; परंतु त्याबद्दल तिने कधीहि मोठी मिरविली नाही वडगावच्या व आसपासच्या गावातील एवढ्या मोठ्या नातलगाच्या परिवारात जें प्रेम व जो आदरमान तिने संपादन केला त्याचें मूळ तिच्या स्वभावातील दया, सौजन्य, धैर्य व उद्योगशीलता या गुणात असलें पाहिजे. पणतींतील तेल संपत आलेल्या दीपज्योतीप्रमाणे तिची जीवनज्योत हळूहळू व शांतपणें विझली. मात्र तिने जन्मभर जो प्रकाश दिला, त्याची चिरस्मृति मागे अखंड कायम ठेविली. त्या पवित्र आत्म्यास माझें सदैव वंदन असो.



# माझें प्राथमिक शिक्षण



आमचें वतनगांव मौजे वडगाव, तालुका शाहूवाडी, जिल्हा कोल्हापूर. आडनाव थोरात. पण आमच्या घराण्यात पाटिलकी असल्यानें पाटील हेंहि उपनांव आम्ही लावतों. माझा जन्म माझ्या आजोळीं, मौजे साळशी, तालुका शाहूवाडी येथे तारीख १९ माहे जून, सन १८७७ (ज्येष्ठ शुद्ध ९ शके १७९९) रोजीं झाला.

माझ्या आईवडिलांस पाच अपत्यें झालीं. पहिलीं दोन लहानपणींच वारलीं. माझ्या जन्मपत्रिकेंत मी तिसरें अपत्य असल्याचें लिहिलें आहे. माझ्या पाठीवर मला एक भाऊ (दादू) व त्याच्या पाठीवर एक बहीण (लखुबाई) झाली. दादूचा जन्म कार्तिक शुद्ध ११ शके १८०१ मध्ये झाला होता. तो माझ्यापेक्षा धष्टपुष्ट व सशक्त होता. तथापि तो पांचसहा वर्षांचा होताच वारला. माझी धाकटी बहीण लखुबाई ही वैशाख वद्य ११ शके १८०४ रोजीं जन्मली. तिचें लग्न होऊन तिला मुलें बाळें होऊन ती १९१६ सालीं प्लेगच्या आजारानें निवर्तली.

वयाचीं सहा वर्षें पुरीं होईपर्यंत मी आमच्या गांवीं आईबापाकडे त्यांच्या प्रेमळ सहवासांत वाढलों. माझे वडील चांगले हुशार असून त्यांना उत्तम लिहितावाचतां व हिशेबठिशेब ठेवतां येई. शेतकऱ्यांच्या अज्ञानाचा फायदा कुळकर्णी व जोशी कसे घेत हें त्यांना रोज दिसे. म्हणून ते माझ्या शिक्षणाचा विचार करू लागले. आमचा गांव फार लहान असून त्या वेळीं तेथे गावठी किंवा सरकारी शाळा नव्हती. आमच्या गांवापासून सुमारें मैल-दीडमैलावरून सरुडास सरकारी शाळा होती. त्या काळीं शाळा सकाळीं व संध्याकाळीं अशा दोन वेळा भरत असत. रोज सकाळीं संध्याकाळीं सरुडच्या शाळेंत जाणें मला कष्टाचें होईल म्हणून माझ्या आईनें मला आपल्या माहेरीं साळशीस गावठी शाळेंत घालण्याचा सल्ला

माझ्या वडिलांस दिला व त्याप्रमाणे मी सन १८८५ साली साळशीस गावठी शाळेंत जाऊं लागलो.

माझ्या साळशींतील शिक्षणासंबंधी माहिती देण्यापूर्वी निसर्गानें नटविलेल्या माझ्या आजोळची व आजोळच्या नातलगाची माहिती देणें जरूर वाटतें. माझें आजोळगाव साळशी हा एका लांब व उंच डोंगराच्या (म्हसाईच्या डोंगराच्या) अगदी जवळ पायथ्याशीं वसलें असून तो बराच मोठा आहे. या गावापाली डोंगराच्या खोऱ्यात तीन वाड्या आहेत. वाड्या धरून लोकसंख्या १६५० आहे. मी साळशीस असताना या लगतच्या डोंगरावर व त्याच्या दऱ्याखोऱ्यात सुंदर झाडी असे. ही वनश्री व उंच पठारावरील म्हसाईचें देऊळ व जवळच असलेलीं कोरीव लेणीं (पाण्डवदरा) आजसुद्धा माझ्या दृष्टीसमोर आहेत.

पण आज ती दाट झाडी जवळजवळ नाहींशी झाली आहे. याचें मुख्य कारण अधिकाऱ्याची बेपर्वाई (कधी कधी आप्पलपोटेपणा) व जनतेचें अज्ञान हें होय. मला माहीत आहे की कोल्हापुराच्या एका मोठ्या जबाबदार अधिकाऱ्यानें त्या डोंगरांतील शेतकऱ्यास झाडी तोडण्याची परवानगी दिली व त्याच्या मोबदल्यात जवळ असलेल्या आपल्या गावीं जमिनींत मोठी विहीर खणून, डोंगरातील फाड आणून ती जवळजवळ बिनखर्चे बांधून घेतली.

असल्या जंगलतोडीचा परिणाम व्हायचा तो झाला. गावाच्या व वाड्याच्या रानातील पुष्कळ पाट (नवारे) कोरडे पडले व जे आहेत त्यात पाणी फार कमी झालें आहे. याशिवाय शिवारातील विहिरी भरलेल्या असावयाच्या, त्यास पाण्याचा तोटा येऊं लागला आहे. माझ्या लहानपणीं या डोंगरावर झाडझाडोरा भरपूर असल्याने जमिनींत पावसाचें पाणी मुरे व तेणेकरून ओढ्यानाल्यास पुष्कळ दिवस पाणी टिकून राही. झाडी तुटल्याने पावसाचें पाणी व त्याबरोबर सकस माती वाहून धुपून जाते. शिवाय डोंगराच्या पायथ्याजवळील विहिरी पाण्याने तुडुंब भरलेल्या असावयाच्या, त्यास पाणीपुरवठा कमी होऊं लागला व विहिरींत पाणी कमी पडूं लागलें. ही स्थिति फक्त साळशीचीच नव्हे तर सबंध मावळाची झाली व त्याचे दुष्परिणाम आज आपण पाहात आहात.

मुख्य गावाच्या नैर्ऋत्येस डोंगरातून एक मोठा ओढा (याचें नाव अबीरा) निघून पश्चिमेच्या व उत्तरेच्या बाजूनें वळसा घालून वाहात जातो. मी साळशीस असताना अनियात बारमहा पाणी असे व ठिकठिकाणीं लहानलहान डोहहि असत. माझे मामा (गोविंदराव) कधीकधी असल्या डोहात मासळीचे मासे बंदुकीने मारीत व डोंगरात दुसऱ्याची शिकारहि करीत. म्हसाईचे डोंगराचा हा भाग—सह्याद्रीचे पाणलोटापासून त्याचिशाचे डोंगरापर्यंत—हें फारच रमणीय दृश्य असे. डोंगराच्या माथ्यावर म्हसाईचें (महिषासुरमर्दिनीचें) जुनें देऊळ आहे. या देवालयाच्या पाठीमागे लगतच, दक्षिणेच्या बाजूस उंच उभा कडा तुटून फार खोल दरी बनली आहे. देवालयापासून अधापाऊण

मैलावर पाडवदरा (कोरीव लेणीं) आहे. लेण्यात आता दोनतीनच दालनें राहिलीं आहेत; कोरीव काम राहिलेलें नाही. लेण्याचे पुढे सतत वाहणारा झरा आहे. लेणीं पाहण्याम व वनभोजनास कोल्हापूरचे व पन्हाळ्याचे हौशी लोक जातात.

डोंगरमाथ्यावरील लोक वरचेवर पाडवदऱ्यास जमावाने जाऊन जेवणहि करीत. म्हसाईची जत्रा दसऱ्यात भरते. त्या वेळीं आसपासच्या गावातील व वाड्यातील लोक ढोल व करड्या वाजवीत देवींच्या दर्शनास जात. त्या वेळीं नरीच ठकरी व कारडीं मारतीं जात. मी आजोळच्या माणसाबरोबर दोनतीन वेळा असल्या जत्रास गेलों होतों. लक्षात ठेवण्यासारखी एक गोष्ट म्हणजे, साळशी गाव सोडल्यापासून पठारावर, सुमारें चार मैल पोचेपर्यंत, निरं झाडीतून वाकड्यातिकड्या पायवाटेने जावें लाग. झाडी इतकी दाट असे, की उन्हाचा ताप तर होत नसेच, पण दाट झाडींतून सूर्यकिरणेंहि जमिनीपर्यंत पोचत नसत. साग, हिरडा, अळू, तोरणी, चिकण्या, करवंदी, उंभूठ व कारवी याची गर्दी असे. या दाट झाडीमुळे ओढ्यानाल्यास मुबलक पाणी असे. अलीकडे झाडी नाहीशी झाल्यामुळे, फक्त पटातूनच केवळ पावसाळी रिमझ खड्याच्या वेळीं पाणी मिळतें. पूर्वी पाटाच्या पाण्यावर हिवाळ्यात सरनी व गाजरें करीत. मी साळशीस असताना सुमारें वीसपचवीस पाटास भरपूर पाणी असे. डोंगरातील झाडाझुडपामुळे पावसाचें पाणी जमिनींत मुरून, साळशीचे शिवारातील विहिरीत मुबलक पाणी असे. विहिरीवर लोक खडया ऊस (बारे ऊस) करीत. आता पाटाचें पाणी फक्त पावसाळ्यानतर थोडे दिवस मिळतें व विहिरींचें पाणी उन्हाळ्यात कमी पडतें.

माझे आजोबा (मातामह) काशिराव हे त्या गावचे पाटील होते. मी साळशीस शाळेंत असताना (सन १८८३-८४ सालीं) आजोबा व आजी वृद्ध होतीं. आजोबा धार्मिक वृत्तीचे होते. त्याना लिहितावाचता येत नव्हतें, तथापि पहाटे उठून प्रातर्विधीनतर, हातपाय धुवून गुडगुडींत पाणी भरून थोडा वेळ गुडगुडी ओढल्यानतर तुकारामाचे अभग, हरिपाठ व भूपाळ्या म्हणत. नतर काठी टेकीतटेकीत गावाजवळी आपल्या विहिरीकडे मळयात जात. कधीकधी ते तिकडेच अविन्यात अगर विहिरींत स्नान करीत. एरवी घरींच ऊन पाण्याने स्नान करण्याचा त्याचा परिपाठ होता. स्नानानतर ते गावच्या मारुतीच्या व महादेवाच्या देवळात देवदर्शनास जात व नंतर घरच्या देवाची पूजा आटोपल्यावर जेवण करीत. प्रत्येक पौर्णिमेस, गावापासून दहा मैलावर असलेल्या ज्योतिबाच्या डोंगरावरील देवास नदादीपासाठी आजोबाच्याकडून नियमितपणें तेल जाई. दर्षा-दोन वर्षाआड बैलगाडी करून ते पंढरपूरची यात्राहि करीत.

आजोबाची स्वत च्या मालकीची शेती पुरेशी नव्हती : सुमारें पधरावीस एकर जमीन असावी. पण त्याच्याकडे खाडेकर नावाच्या एका पन्हाळच्या ब्राह्मणाची पधरावीस एकर दऱ्यातील पाणथळची जमीन कायम खडाने असे. आजोबा हयात होते

तोपर्यंत खांडेकरांची जमीन आजोबांकडेच होती. आजोबांच्या घरीं दोन रेडे, सहा बैल, दोन म्हशी, तीनचार गाई, चाळीसपन्नास मेंढरें व एक कुत्रा असे. जनावरांसाठी राहत्या घरास लागून, मध्ये प्रशस्त अंगण असलेला, एक चौसोपी वाडा त्यांनी बांधला होता. या वाड्यांत जनवारांना आंतबाहेर जाण्यास एक मोठा स्वतंत्र दरवाजा होता. दरवाजाजवळ सोप्यांत आमच्या आगटे पंतोजींची गावठी शाळा होती. मागल्या बाजूस दिंडीदरवाजा होता. या दिंडीतून जनावरांचें शेण व गदाळा बाहेर नेऊन गारींत टाकीत. आता हा चौसोपी वाडा जमीनदोस्त झाला आहे.

आजोबांच्या बैलांची चांगली निगा राखली जाई. त्यांचे बैल धष्टपुष्ट असत. घरीं कायमचे तीनचार सालदार गडी असत. गडी कष्टाळू व प्रामाणिक होते. या सर्व कारणामुळे आजोबांचें कुटुंब खाऊनपिऊन सुखी होतें. आजोबा पाटिलकीचें काम निःपक्षपातीपणाने करीत, त्यामुळे गावातील व वाड्यांतील लोक त्यांना मानीत. त्यांचा शब्द मोडीत नसत. अडीनडीच्या वेळीं वाड्यावरील शेतकरी आपले बैल व आउतें आणून त्यांना सर्व प्रकारें साहाय्य करीत. आजोबाहि त्यांचा पाहुणचार योग्य रीतीनेच करीत. अशी ही त्या काळची शेतकरी जीवनाची साधी व सात्त्विक ठेवण होती. आजोबांचा थोरला मुलगा नारायणराव यास चांगलें लिहितां-वाचतां येत असे. ते शरीराने धिप्पाड व सशक्त होते. मामा जरी धिप्पाड व सशक्त होते तरी आजोबांच्या निधनानतर एकदोन वर्षांनीच ते मधुमेहाच्या आजाराने वारले.

नारायणरावमामास तीन मुलगे होते. ज्येष्ठ बळवंतराव माझ्याच वयाचे होते. हे विठ्ठलभक्त आणि माळकरी होते. त्याची आषाढी-कार्तिकीची वारी कधीच चुकायची नाही. बळवंतराव १९५६ सालीं वारले.

मागे सांगितल्याप्रमाणे मला माझ्या आठवे वर्षी मौंजे साळशी येथे माझ्या आजोळीं गावठी शाळेंत घातलें. ही शाळा आमच्या आजोबांच्या वाड्याच्या सोप्यांत भरत असे. त्याच गावचे वासुदेव गोपाळ आगटे हे ब्राह्मण गृहस्थ त्या शाळेचे पंतोजी असत. गावठी शाळेंत धूळपाट्या वापरीत. ही पाटी म्हणजे पातळ लाकडी फळीचा हात-सव्वाहात लांब व वीत दीडवीत रुंद असा तुकडा असे. मुलांजवळ विरविरीत कापडाच्या एका पिशवींत विटकरीची बारीक पूड अथवा तांबडी माती भरलेली असे. ही मुकटी पाटावर झाडली जाई; नंतर कामटीच्या वीतभर कांडीने त्या पातळ धुळीवर मुळाक्षरें कोरून काढलीं जात. मुळाक्षरांना धुळाक्षर म्हणण्याचें हेंच कारण असावें. एकदा पाटीवर लिहिल्यावर पुन्हा धुळीवर हात फिरवून दुसऱ्यादा लिहितां येई. गावठी शाळेंत मुळाक्षरें, बाराखड्या, अंक, पाढे, पावकी, निमकी, पाउणकी, सव्वायकी, दीडकी, अडीचकी, औटकी, अकरकी, एकोनी, बेरीज व वजाबाकी, गुणाकार, भागाकार, फोडकें व तोंडचे हिशेब इतकेच शिक्षण देत. अक्षर वळणदार यावें म्हणून गर्दै गिरवावे लागत व पुस्त्या काढाव्या लागत. हस्तलिखितें वाचावयास देत. रोज

संध्याकाळीं शाळा सुटण्यापूर्वी परवचा म्हणावा लागे. परवच्याचा हा सांधिक कार्यक्रम दररोज नियमाने चाले. हें सर्व शिक्षण दीड ते दोन वर्षांत संपे.

सध्याचे शिक्षक व त्यांचें शास्त्र पाठ करण्याच्या चालीविरुद्ध आहेत. या पद्धतीमुळे मुलाच्या स्मरणशक्तीवर ताण पडतो असा त्यांचा दावा आहे. मला हें त्यांचें मत पटत नाही. माझ्या मतें परवचा म्हणताना विद्यार्थ्यांना उल्हास वाटतो आणि सहज, बिल्कूल ताण न पडता सारी उजळणी तोंडपाठ होते. बाळपणीं मुलाची स्मरणशक्ति फार ग्रहणशील असते. माझे आदरणीय व विद्वान स्नेही भास्करराव जाधव (जे एके काळीं मुंबई इलाख्याचे शिक्षणमंत्री होते) यांची ऐंशाव्या वर्षी दृष्टि गेली. त्या वेळीं ते म्हणत, "माझ लहानपणचे पाठांतर आजहि माझ्या या आंधळेपणात उपयोगी पडत आहे." मलासुद्धा मराठी चौथ्या, पाचव्या व सहाव्या इयत्तेच्या वाचनपाठमालेतील कितीतरी कविता पाठ असत. अद्यापहि त्या कवितांतील मधल्या मधल्या ओळी मला आठवतात.

सरकारी शाळांतून निदान कोल्हापूर संस्थानात तरी सन १८९०-९१ पर्यंत मोडी वाचनपुस्तकें वर्गात शिकविलीं जात असत. सव मराठी भाषिक प्रांतातील सरकारी दत्तर सुमारें १९१०पर्यंत मोडींतच होतें. मोडी लिखाण जलद, सहज व लेखणी वरचेवर न उचलता लिहिता येतें. मीं माझ्या या आत्मकथेचा पहिला खर्डा मोडींतच लिहिला. मोडी वाचणें कठीण नाही. सरावानें तें सहज येत. सध्याच बाळबोध लिखाण तरी काय आहे? विशेषतः कोर्टातील अधिकारी व कारकून त्याचप्रमाणे वकील व त्यांचे दिवाणजी या सर्वांचें बाळबोध लिहिणें अक्षरशः दुर्बोध झालें आहे. ही आपत्ति टाळण्यासाठी ल्युलेखन व त्वरेलेखन रूढ झाले आहे. या बाबतींत इंग्रजांनी आमचें *अनुकरण केलें नाही, हा त्यांचा शहाणपणा होय. त्यांच्याकडेहि आमच्या बाळबोध व* मोडी लिपीप्रमाणे छापण्याची व लिहिण्याची निरनिराळी लिपी आहे. या नव्या अमदानींत माझ्या जुन्या मताला विशेषसें महत्त्व नाही; पण माझ्या अनुभवास आलेल्या अडचणी स्पष्ट करणें माझें कर्तव्य आहे.

साळशीच्या गावठी शाळेंतील माझे शिक्षण संपल्यानंतर, सरूड गावच्या सरकारी (मोडी) शाळेंत मला घातलें. तेथील माझ्या शिक्षणासंबंधी लिहिण्यापूर्वी या गावाबद्दल थोडीशी माहिती देणें जरूर आहे. कसमें सरूड हा गाव पहिल्यापासून महत्त्वाचा आहे. लोकसंख्या सुमारें अडीच हजार आहे. या गावात व्यापार-उदीम बराच चालतो. हा भाग प्रथम विजापूरच्या बादशहाकडे होता. पुढे तो मराठी राज्यात गेला तरी विजापूरकर छोट्या छोट्या मराठी राजामार्फत त्या भागावर आपली सत्ता गाजवत असत. संभाजी छत्रपतींच्या वधानंतर त्यांचा मुलगा शाहू यास पकडून नेलें. पुढे साताऱ्याच्या छत्रपतींच्या गादीवर ताराबाई आपला हक्क सांगू लागली. त्यामुळे वाद उत्पन्न होऊन दरबारी मंडळात दुफळी झाली व ताराबाईने स्वतःच्या हिंमतीवर कोल्हापूरच्या स्वतंत्र गादीची स्थापना केली. तथापि, बरेच दिवस तंटा व चकमकी

होऊन सन १७३१ सालीं वारणेचा तह झाला. या तहान्वये वारणेच्या दक्षिणेकडचा महाराष्ट्राचा भाग कोल्हापूर छत्रपतींकडे गेला. सरूड व वडगाव वारणेच्या दक्षिण तिरावर असल्यामुळे साहजिकच कोल्हापूर राज्यात आलीं. पुढे कोल्हापूर छत्रपतींनी आपल्या पतप्रतिनिधीला चौसष्ट खेड्याची जहागिरी करून दिली. त्यात वडगाव पतप्रतिनिधींच्या विशाळगड जहागिरीत गेला व सरूड गाव कोल्हापूर राज्यातील पन्हाळ पेठ्यात तसाच राहिला. हे सरूड गाव कोल्हापूर छत्रपतींचे एक ठाणें बनलें. तेथें शमर शमर घोडेस्वाराच्या दोन पागा होत्या. मला वाटतें, माझ्या जन्मापर्यंत त्या पागात घोडीं असावींत एका पागचा पाया व तट अजूनहि तेथे दिसतात. शिवाय गावाबाहेर लक्ष्मीच्या देवळाजवळ हत्ती बांधण्याचें ठाण दिसतें. आजहि हत्तीला साखळदंडाने बांधण्याचे दगड तेथे उभे आहेत. घोड्याच्या व हत्तींच्या चारावैरणी साठी सरूडास एक मोठें कुरण आहे. तसेच जवळच शिंपे गावीं म्हशोबाचा दरा म्हणून दुसरें सरकारचें मोठें कुरण आहे. सरूड गाव मोठा असल्याने, तेथील चावडीवर बरेच जमीनवाले सनदी नोकर असत. मी शाळेत असतांना सरूड गावची पाटिलकी बाबाजी रोडे नावाच्या एका वजनदार व सुस्वभावी गृहस्थाकडे होती.

बाबाजी पाटलाचा सरूड भागात चांगला दरारा असून लोक त्यांना मान देत मी शाळेंत असतांना त्यांचें वय सुमारें ६० ६५ वर्षांच असावें. त्यांच्या डोक्यास बरेंच मोठें पांढरें पागोटें, अंगात अंगरखा, पांढरेंशुभ्र नेसावयाचें धोतर, पायात पठाणी तांबडा जोडा व अंगावर धोतराची रास माळ असावयाची. त्यांचें चालणें ऐटबाज व मारदस्त असे. गावात असो, अगर जत्रा असो वा लावण्याचे फड असोत, बाबाजी पाटील आले म्हणजे लोकांतील गडबड बंद होई. जर गडबड झाली व पाटलांनी हात वर केला तर गडबड एकदम बंद होई. गावात त्या वेळीं भांडणतंटा फारसा नसे. तथापि कोठे झालेच, तर पाटील सांगतील त्याप्रमाणे दोन्ही बाजू ऐकत. शाळेच्या सभांना व बक्षीससमारंभाना ते नेहमी हजर असायचे विद्याळीच्या दिवसात शाळेची मुलें व मास्तर यांना घेऊन ते थेरगाव-गोंडावर, वारणेच्या व कडवीच्या संगमावर जावयाचे.

बाबाजी पाटलानंतर दोन वजनदार व्यक्ति होऊन गेल्या. त्यांचीं नावें चंद्राजी येसाजी पाटील सोमोसी व दौलता भवानजी पाटील रोडे. दोघेहि हौशी गडी होते दोघांकडेहि चांगले किंमती घोडे असत त्यांचें बसणें, उठणें व लहान लहान मैफली दौलू पाटील यांच्या वाड्यात असावयाच्या. दोघेहि माझ्यापेक्षा वयाने थोडे मोठे होते. चंद्राजी पाटील गाण्याबजावण्याचा शौकी असे. गडी देखणा ऐटबाज असून, त्याचें कपडेलत्ते व्यवस्थित असावयाचे. त्यांच्याकडे एक गाणारा व भजन करणारा आंधळा बुवा असे. बुवा मारुतीचे देवळात संगीत भजन म्हणताना, चंद्र पाटील मृदंग वाजवीत बुवा सतारहि छान वाजवीत. बुवा मोठे विनोदी होते. ते पूर्णपणें आंधळे होते, तरी, चंद्राजी पाटलाच्याकडे जाणाऱ्यायेणाऱ्या माणसास, तो बोलण्यापूर्वीच,

ते ओळखत. मी मुद्दाम गमत करण्यासाठी त्यांच्याकडे न बोलतां जाई. जवळ जाताच, हाताने हातहि न लावता ते म्हणावयाचे, "काय साहेब, मी घा आंधळा आहें? आपण कधी कोल्हापुराहून आलात?" वगैरे वगैरे. त्यांना आपले कपडे मळले होताच तें हाताच्या स्पर्शाने कळत असे.

चंद्राजी पाटील यांच्याकडे एक गाणारी कलावंतीणहि सातआठ वर्षे होती. फार चांगली गाणारी होती असे नाही, पण दिसावयाला बरी होती. चंद्राजी पाटलाकडे असतानाच तिला एक मुलगी झाली. मुलगी बारल्यानंतर ती कोल्हापुरास परत गेली.

सरूड गाव शेतीप्रधान असल्याने मुख्य वस्ती शेतकऱ्यांची आहे. त्यांच्या खालोखाल महार (त्यांपैकी बरेचजण थोड्या वर्षांपूर्वी खिश्चन झाले आहेत), त्यांच्यानंतर साळी, कोष्टी, वाणी (लिंगायत व्यापारी), धनगर, तेली, कुंभार, सुतार, लोहार, चांभार, मांग, रामोशी असून, चार घरें ब्राह्मण कुलकर्ण्यांचीं असत. साळी व कोष्टी सोडून इतर समाजातील लोकांची थोडीफार शेती असे; तेणेकरून गावची ठेवण ग्रामीणच असे. दसऱ्यात व इतर सणावाराच्या दिवशीं ग्रामदेवतांच्या (निनाबाई, मारुती व विठोबाच्या) देवळांत—विशेषेंकरून निनाबाईच्या देवाळ्यात—लोक आरतीस जमत; त्यांत गाधळी, डौरी व ब्राह्मण आरत्या म्हणण्यात उत्साहाने भाग घेत.

सरूड भाग आधीच मावळातला; तेथे पाऊस जास्त, मुख्य पीक भाताचें, यामुळे शेतकऱ्यास पावसाळाभर चिखलात काम करावयाचे असल्याने, धोतर अगर पंचे नेसणारे शेतकरी विरळा असत. त्यांच्या अंगात कुडत, अंगावर पांघरायची खादीचें धोतर व नेसण्यास लंगोटी वा रुमाल असे. पावसाळ्यात अंगावर घोंगडीची जरूर असे, घोंगडीवर इरलें घ्यावें लागे. क्वचित् एखाद्या घरीं वेताच्या काड्यांची मेणकापडी छत्री असे. ब्राह्मण व व्यापारी लोक पंचे नेसत. आज मात्र शेतकरी, महार, मांग सर्व पुरुष पंचे नेसतात.

दर मंगळवारीं मारुतीच्या देवळाभोवती बाजार भरे. गावात वाणसौदाचीं दोनतीन दुकानें होतीं. त्यांतच मीठमिरची, तेल, मसाला, काड्यांच्या पेट्या, कोरे कागद व किरकोळ धान्य मिळे. धान्य देऊनहि ग्राहकास माल मिळे. कापडाचीं, चहाफराळाचीं, मिठाईचीं, शिलाईचीं, केस कापण्याचीं वगैरे दुकानें नव्हतीं. हातमाग बरेच होते. सरूडास जरी कापूस पिकत नसे, तरी देशभागातून लोक तो आणीत असत. गावातील गरीब बाया कापूस पिंजून त्याचे टकळीने (भिंगरीने) सूत काढीत व सुताचीं चिवटें करून तीं बाजारात विकीत. साळी व कोष्टी चिवटे विकत घेऊन त्यांची हातमागावर खादी काढीत. आठवड्याच्या बाजारात खादीचे कापड, कुडतीं, हातमाग वरील लुगडीं व खण विकावयास येत. कापसाचे सूत काढणें, त्याचें हातमागावर कापड विणणें, बायकांच्या करड्यासाठी सूत रंगविणें, हे फार उपयुक्त कुटीरोद्योग होते. या कुटीरोद्योगात विणकऱ्यांच्या बायकास व मुलास भरपूर काम मिळे. गिरणीचें सूत मिळू लागल्यापासून हे कुटीरोद्योग बसले.

त्या काळीं शेतकऱ्यांस मीठमिरची, तेल व कपडालत्ता यांसाठीं लागणारा पैसा आठवड्याच्या बाजारांत घरांतील तांदूळ, जोंधळे, मके, व मळींतील थोडींफार वांगीं विकून मिळवावा लागे. फार थोड्या शेतकऱ्यांचा ऊस असे. त्यांना गुऱ्हाळहंगामीं गुळाचा थोडा पैसा येई. धान्य व गूळ त्या काळीं फार स्वस्त असे. गुळाचा खपहि कमी असे. त्या वेळीं सरूडास उसाचे सातआठ फड असावेत. 'फड' म्हणजे तात्पुरता सहकारी संघ असे. फडाला नदीचें पाणी उचलून वर आणण्यास एकावर एक असा चार अगर पांच मोट तरी करीत. दर मोटेस दोन बैल लागत असल्याने, आठ अगर दहा बैलांची जुळणी करावी लागे. कोणी एक बैलाचा, कोणी दोन बैलांचा फडात वाटा करी. बारा महिन्यांचा ऊस झाल्यावर तो लाकडी घाण्याने गाळीत. घाण्यास चार बैल जोडीत. अलीकडे उसास लागणारें नदीचें पाणी इंजिनाचे पंपाने उचललें जातें. लाकडी घाण्याची जागाहि 'क्रशर' (लोखंडी तीन आडव्या लाटेच्या घाण्याने) घेतली. क्रशर इंजिनावर चालतो. भात भरडून-कांडून तांदूळ करण्याचा धंदाहि बसला. माझ्या लहानपणीं तांदूळ करण्याच्या गिरण्या नव्हत्या. त्या वेळीं सरुडास सुमारें तीसचाळीस शेतकऱ्यांच्या बाया (भुसारणी) गगागाने जाऊन ज्वळच्या खेड्यातून भात आणून तें भरडून कांडून बाजारासाठीं तांदूळ करीत. आज सरुडास दोन दळणाकांडणाच्या गिरण्या झाल्याने हा भुसारणींचा धंदा बसला. या गिरण्या दळपाचेंहि काम करतात. आता घरात बायामाणसें जात्यावर दाणे दळीत नाहीत. गिरण्यांनी दळप अंगावर घेतलं त्याबद्दल मला वाईट वाटत नाही. पिठाच्या गिरण्यांनी बायामाणसांचे कष्ट कमी झाले खरे, तथापि भात भरडून व कांडून तांदूळ करण्याने काही बायांचा दुय्यम धंदा गेला, हें एक, दुसरें, गिरण्यांत तांदूळ जास्त सडले गल्याने तांदळावरचा बारीक कोंडा (ज्यांत जीवनसत्त्वें असतात तो) वाया जातो.

अलीकडे माणसांची शहरास येजा फार वाढली आहे. रोज तीनचार एस० टी० गाड्या येतात जातात. सरूड गावच्या लोकांची सांपत्तिक स्थिति सुधारल्याचें दिसतं. लोकांच्या खाण्यापिण्यांतहि फार फरक पडलेला दिसतो. आता सरुडास पांच चहाचीं व दोन सोडालेमनचीं दुकानें आहेत. माझ्या लहानपणीं असलीं दुकानें नव्हतीं. लोक पूर्वीपेक्षा जास्त व चांगलें अन्न खात असावेत. पूर्वी दर आठवड्याच्या बाजारांत एक बकरें पडे. बकऱ्याची किंमत तीन ते चार रुपये असे मांस बहुतेक चार आणे शेर मिळत असे. आता त्याच सरुडास दर मंगळवारच्या बाजारात वीस व दर रविवारीं तीनचार बकरीं पडतात, शिवाय मधून मधून बकरीं पडतातच. बकऱ्याची किंमत सध्या पंचवीस ते पस्तीस रुपये असावी व मांस दोन रुपये शेर असावें. कापडाचा खपहि पुष्कळ वाढला आहे. आता सरुडास शिलाईचीं यंत्रें पंचवीस एक आहेत. उसाच्या फडास पाणी देण्यासाठीं नदीवर तीसपस्तीस पंप चालतात. गुऱ्हाळे इंजिनावर चालतात. दारूबंदी असली तरी चोरून बरीच दारू गाळली जाते. गावांत ग्रामपंचायत आहे वाचनालय आहे. जिल्हा परिषदेचा

दवाखाना आहे. गावात बऱ्याच चिरेबंदी इमारती झाल्या आहेत. एकंदरींत बऱ्यावाइटाची बेरीज व वजाबाकी करता गावाची सुधारणा होत असल्याचें दिसतें.

आजोळीं गावठी शाळेंतील शिक्षण संपल्यावर मला सरुडास सन १८८६ सालीं मराठी दुसऱ्या इयत्तेंत घातलें. माझ्या वेळीं शाळेंत फक्त मराठी (मोडी) चारच इयत्ता होत्या. मोडी इयत्ता म्हणण्याचें कारण, शाळेत मोडी लिहिणेंवाचणें, गणित व लोटचे हिशेब एवढेच विषय शिकविले जात. बालबोध लिहिणेंवाचणें, व्याकरण, इतिहास व भूगोल हे विषय शिकवीत नसत. माझ्या वेळीं शाळेंत ४० ५० मुलें असावींत. शिक्षक फक्त दोनच होते. हेड मास्तरास पगार दरमहा बारा रुपये व ॲसिस्टंट (धाकट्या) मास्तरास सात रुपये होता. शाळेस स्वतंत्र इमारत नव्हती. शाळा निनाबाईच्या देवळांत भरे. १८८७ सालीं मुलांची संख्या वाढली; त्या वेळीं देसायाच्या गल्लींतील हरि पाटलाच्या वाड्याचा वरचा मजला शाळाखात्याने दोन वर्गासाठी भाड्याने घेतला होता. अलीकडेपर्यंत काही वर्ग देवळात बसत.

शाळेच्या अपुऱ्या जागेची अडचण माझ्या मनाला बोचत असे. मी पुढे मुंबई प्रांतात वरच्या जागेवर होतों. कोल्हापुरातील अधिकारी वर्ग मला मानीत असे. मुख्य म्हणजे छत्रपति शाहूमहाराजांचा माझ्यावर लोभ असे. यामुळे सरुडास व विशेषें-करून सरुडातील शिक्षणास मला बरीच मदत करता आली. कोल्हापूर संस्थानचे दिवाण कै० रघुनाथराव सबनीस व नतरचे दिवाण कै० रावबहादूर दादासाहेब सुर्वे यांच्या सहानुभूतीने निनाबाईच्या देवळाचा जीर्णोद्धार करतांना, देऊळ निराळें ठेवून जवळच शाळेस तीनचार वर्ग बांधून देता आले. शाळेंत विद्यार्थ्यांची संख्या वाढल्यावर, रावबहादूर शंकरराव इंदूलकर, सरसुभे, यांच्या सहानुभूतीने गावाबाहेर एक मोठी शाळा बांधून देतां आली. आज ह्या शाळेंत सातवीपर्यंत शिक्षण दिलें जातें. शाळेंत ३७८ मुलें असून शिक्षकांची संख्या नऊ आहे. माझ्या वेळीं आमच्या गावाहून मी, माझे चुलत बंधु गणपतराव व नामदेव महादू पाटील मिळून सरूडच्या शाळेस जात असू. सन १८८७ सालीं प्रल्हाद सखाराम जामळे हेडमास्तर होते. त्यांचे ज्येष्ठ चिरंजीव रामभाऊ माझ्या वर्गांत तिसरींत होते. पुढे ते बरींच वर्षे 'टाइम्स ऑफ इंडियाचे' कोल्हापूरचे बातमीदार होते. जामळे हेडमास्तर असतानाच सन १८८७ सालीं इंग्लंडची राणी व्हिक्टोरिया इजला गादीवर बसल्यास पन्नास वर्षे झालीं होतीं म्हणून तिची गोल्डन ज्युबिली सर्व साम्राज्यात साजरी झाली. आमच्या शाळेंतहि समारंभ झाला. शाळेंतील सर्व मुलांस मिठाई वाटली. जामळे मास्तरांनी केलेल्या कविता आम्हीं म्हटल्या. मला त्यांतील काही ओळी आठवतात त्या खालीं दिल्या आहेत :

निनाबाईदेवी आम्ही प्रार्थितों कीं, सुखी राही तीचा परिवार लोकीं ॥<br>
न हो रोगराई दुष्काळ राष्ट्रीं, सदा सुखी असो तिची राज्यसृष्टि ॥

लोटलीं वर्षें, वर्षें पन्नास, राणीच्या कारकीर्दीत ॥
शहाणपण देई, घालुनी शाळा, सुखनी बहुत ही आम्हां बाळा ॥
बहु सुख देई, देई प्रजा-लोकां, कापती शत्रु तिच्या धाका ॥
जयो ही राणी, राणी दयावान, सुखीहि करो, तीस भगवान ॥

माझ्या वेळीं सन १९०४-१९०६ सालीं सरुडास एक शाळा होती. शाळेंत सुमारें ४०-५० विद्यार्थी असावेत. दोन शिक्षक होते. त्याच शाळेंत आज सातव्या इयत्तेपर्यंत शिक्षण मिळतें. सध्या शाळेंत नऊ शिक्षक असून मुलांची संख्या ३७८ आहे. शिवाय एक मुलींची शाळा आहे. तींतहि सातव्या इयत्तेपर्यंत शिक्षण मिळतें. या शाळेंत चार शिक्षिका असून पटावर मुलींची संख्या १७३ आहे. शिवाय ख्रिश्चन मिशनची शाळा आहे.

विशेष महत्त्वाची गोष्ट म्हणजे सातारा रयत सभेचें हायस्कूल होय. या हायस्कूलात सहा शिक्षक असून सवथी ते अकरावी मिळून ११८ विद्यार्थी आहेत. अलीकडे सरकारनें बेसिक ट्रेनिंग कॉलेज काढलें आहे. त्यात १५३ शिक्षक विद्यार्थी आहेत. म्हणजे सरुडास आता शिक्षणाची सोय चांगली झाली आहे.

सरुडास मराठी (मोडी) चौथी इयत्ता झाल्यावर मी पुढच्या शिक्षणासाठी मलकापुरास गेलों. हा गाव विशाळगड जहागिरीचें मुख्य ठाणें होता. मलकापूर आमच्या गावापासून पश्चिमेस आठ नऊ मैल असावें. गावची लोकसंख्या २,८०० आहे. हें व्यापारी ठिकाण कोंकणात माल पाठविण्याची व बंदरांतील माल देशावर नेण्याची उतारपेठ होतें.

मी मलकापुरास जाण्यापूर्वी कांही वर्षें तरुण जहागिरदार, श्रीमंत आबासाहेब पतप्रतिनिधि, कोल्हापुरास शिक्षणासाठी राजाराम हायस्कुलास जोडलेल्या सरदार क्लासात शिकत होते. त्यांच्या वृद्ध मातोश्री आईसाहेब मलकापुरास सरकारवाड्यात राहात. वाडा मोठा असून दुमजली आहे. मुख्य भाग म्हणजे अंबाबाईचा चौक. चौकाच्या पश्चिमेस देवीची मूर्ति एका मोठ्या देव्हाऱ्यात बसविली आहे. त्या देवघरापुढे मोठा सभामंडप आहे. ह्याच जागीं जहागिरदाराचा दसऱ्याचा दरबार भरे. बारीच्या वेळीं ह्या मंडपात मुलकी व न्यायकचेरींतील कारकून बसत. देवीच्या मंडपाच्या पाठीमागे मुदपाकघर व नोकरचाकराच्या जागा असत. वाडा मोठा असून मधे दोन चौक आहेत. आईसाहेब व तरुण जहागिरदार मलकापुरात असल्यावेळीं वरच्या मजल्यावर राहात. मुख्य दरवाजाच्या जवळ सरकारी खजिना असे व त्याजवळ इनफंट्री शिपायाचा पहारा असे. ह्या शिपायाची पार्टी कोल्हापूर दरबार पुरवी.

वाड्यातसुद्धा नळाच्या पाण्याची सोय नव्हती. मुख्य दरवाजाबाहेर मोठें पटांगण आहे. पटांगणापलीकडे लांबच लांब पडवी होती. ह्यात जुनीं दप्तरें (रेकॉर्ड्स) होतीं. बैलाच्या रहाटगाडग्यानें शेजारून वाहणाऱ्या कडवी नदीचें पाणी उचलून साठविलें जाई. वाड्यातून बाहेर पडण्यास पूर्वी तरी तीन दरवाजे असत. वाड्याच्या मोठ्या

पटांगणाच्या दरवाजापुढे पूर्वी दोन ल्हान ल्हान पागा होत्या. ह्या पागांत रथाचे व स्वारीचे घोडे बांधीत. मुख्य पागा गावाच्या पश्चिम टोकास विठोबाच्या देवालयाच्या मागे असे. त्यांत स्वारीचे साठ घोडे असत. वाड्याच्या आतील दरवाज्यांतून बाहेर पडतांना उजव्या बाजूस वर उल्लेखिलेली ल्हान पागा व डाव्या बाजूस तुरुंगाच्या आठदहा खोल्या होत्या. नंतर पश्चिमाभिमुख मोठा नगारखाना होता (आजहि आहे). नगारखान्यांत प्रसिद्ध चौघडा व नौबती वाजविणारे व कुशल सनईवाले होते. स्वारी (घोड्यावरून अगर रथांतून) नगारखान्यांतून बाहेर पडतांना वा परत येतांना, नगारा एकदोन मिनिटें वाजविला जाई. शिवाय सूर्योदयापूर्वी एक तास, दुपारी ११ ते १२, संध्याकाळीं सूर्यास्ताच्या वेळीं तासभर व रात्रीं ११ ते १२ असें चार वेळा नगारा, सूर-सनई व कर्णा यांचें वादन होई. नगारा शहरभर ऐकूं येई. इतकेंच नव्हे तर रात्रीं शांततेच्या वेळीं आमच्या गावापर्यंत सातआठ मैल ऐकूं येई. लोकांना वेळ समजण्यास व पहाटे जाग आणण्यास या मंगल वाद्याचा उपयोग होई.

मल्कापुरास श्रीमंताच्या वाड्याजवळ एक दवाखाना (डिस्पेन्सरी) होता. त्यावर एक सबअसिस्टंट सर्जन (डॉक्टर), एक कंपाउंडर व एक शिपाई (ड्रेसर) असे. औषधासाठी, मला वाटतें, दरसाल दोनशें रुपयांची व्यवस्था असे. कांही वर्षें औषध फुकट देण्याची व्यवस्था असे. पुढेंपुढें औषधासाठी रोग्याकडून रोज एक आणा घेत. फारसे लोक दवाखान्यांत येत नसत. डॉक्टर व औषध यांचा उपयोग जहागिरदार व त्यांचे कुटुंबियांनाच होई.

मी मल्कापुरास एका विधवा वैश्यवाणी बाईच्या घरीं दाणागोटा देऊन जेवत व राहत असे. मला वाटतें आम्ही दरमहा चार पायली व दोन पायली जोंधळे देत असू. त्या बाईचें नांव राधाबाई गांधी. तिला मी आक्का म्हणत असे. तिला दोन मुलगे. मोठ्याचें नांव बाळशेट व धाकट्याचें सीताराम. मी त्यांच्या घरीं राहावयास गेल्यावेळीं त्यांचीं वयें अनुक्रमें सतरा व पंधरा वर्षांचीं असावींत. बाळशेटचें लग्न नुकतेंच झालेलें होतें. संसाराचा बोजा, मी त्यांच्याकडे जाईपर्यंत, राधाबाईवरच असे. ती वाणसौदाचें पोतें खांद्यावर टाकून रोज सकाळीं जवळच्या खेड्यांतून फेरी करी व शहरांत शुक्रवार व मंगळवारच्या बाजारांत वाणसौदाचें दुकान मांडी. या कुटुंबाचा संसार कसातरी जेमतेम चालला होता. मल्कापुरास त्यांच्या घरीं मी राहण्यास गेलों त्याच वेळीं राधाबाईने खेड्यांतील फेरी सोडली व आपल्या मुलास एक मुठाचा बैल घेऊन दिला. तिचीं मुलें आतां किरकोळ व्यापार करूं लागलीं होतीं. खेड्यांवर फिरून हरभरे, वाटाणे, मसूर गोळा करून बैलावरून आणीत व ते राजापूर-संगमेश्वर बंदरास विकावयास नेत. राधाबाईने जरी फेरी सोडली तरी शुक्रवारचा बाजार सोडला नव्हता. पुढे वर्ष दीड वर्षानें राधाबाईच्या मुलांनी मुठाचा बैल विकून एक गाडी व दोन बैल घेतले, आणि त्यांचा संसार बरा चालूं लागला. कांही दिवसांनी त्यांनी व नारायण कोल्हे यांनी पार्तीत दलालीची वखार घातली. दलालीबरोबर ते व्यापारहि करीत.

आक्रा सात्त्विक वृत्तीची बाई होती. ती पहाटे उठून झाडलोट करून प्रातर्विधी नतर भक्तिभावाने भूपाळ्या म्हणत असे. आक्काच्या घरची गरिबी असल्यामुळे तिच्या घरीं दूधदुभतं असणें शक्य नव्हतें. एखादा मुलगा राजापुरास अथवा सगमेश्वरास माल घेऊन गेला असला व मागें सणवार झाला तर तिने मुलगा परत येइपर्यंत रोज पुरणपोळी परतून घ्यावी व येळवण्याच्या आमटीस कढ द्यावा असें चाले.

त्या काळात चहाचें नावमुद्धा कोणास माहीत नव्हतं. न्याहारी करण्याचा प्रघातहि नव्हता. खेड्यात मात्र शेतावर काम करणारीं माणसें व आक्काच्या घरचीं मुलें न्याहारी करीत. माणसें फक्त दोन वेळा जेवत. जेवणात भात, नाचण्याची भाकर व आमटी असे. तरीपण आक्कास माहीत होतें की, मी माझ्या गावीं न्याहारी करीत असें, म्हणून ती माझ्यासाठी रात्रीच्या जेवणातील नाचण्याची अर्धी भाकरी राखून ठेवी. सकाळीं भाकरीवर थोडे काळ्या तिळाचें तिळकूट किंवा साधी चटणी व त्यावर कारळ्याचें तेल टाकून त ती मला देत असे. या प्रेमळ स्वभावाच्या बाईने मला फार चागलें वागविलें. आपल्या मुलात व माझ्यात फरक केला नाही. यामुळे माझ्या जेवणाखाण्यात जरी थोडी आबाळ झाली तरा आक्काच्या प्रेमळ वागणुकीमुळे मला त्याचें काही वाटलें नाही.

मलकापुरास माझ्या वर्गांत आत्माराम धोंडदेव कारखानीस, दामोदर रामचद्र काटे, गोविंद भिकाजी कोलते व दत्तु हर्पे असल्याचें मला आठवतें. पैकी काटे व कारखानीस इंदुरास मेडिकल स्कूलमध्ये जाऊन हॉस्पिटल असिस्टंट बनले. काट्यांनी इंदूर सस्थानातच नोकरी धरली व आत्माराम कारखानीस आफ्रिकेस गेले. ते सन १९४० च्या सुमारास परत येऊन पुण्यास स्थायिक झाले होते. मी त्यास पचेचाळीस वर्षांनी सन १९४२ त भेटलों होतो. त्यानतर ते लवकरच वारले. हर्प्यांनी मलकापूरच्या दवाखान्यात कपाउंडर म्हणून पुष्कळ वर्षे काम केलें. ह्या माझ्या सहाध्यायांपैकी आता कोणीहि राहिला नाही.

मी मलकापुरास शिकत असताना, आत्माराम कारखानीसाचे लहान चुलत बधु शकरराव, आमच्या खालच्या वर्गात होते. तेच काकासाहेब कारखानीस म्हणून विजापुरास प्रसिद्ध आहेत. तसच त्या वेळीं आचार्य जावडेकर (जहागिरदाराच्या ट्यूटरचे चिरंजीव) आमच्या मागं होते.

मलकापुरास मी चार वर्षे होतों. तेथे माझ्या मराठी चार व इग्रजी तीन इयत्ता झाल्या. तिसरीच्या परीक्षेंत मी पहिला आलों. माझ्या वेळीं तिसऱ्या इयत्तेंत पहिला नंबर आलेल्या विद्यार्थ्यास पुढच्या शिक्षणासाठी कोल्हापुरास राजाराम हायस्कुलात तीन वर्षे दरमहा तीन रुपये स्कॉलरशिप मिळत असे. पण कोठे माशी शिंकली कोणास ठाऊक! मी पहिला आलों त्याच वर्षी ही स्कालरशिप बद केली गली. परतु आश्चर्य हें की जहागिरदारानी स्कॉलरशिप पुन्हा सुरू केली. मात्र, ह्या वेळीं पहिला येणारा विद्यार्थी ब्राह्मण होता.



# कोल्हापुरांतील वास्तव्य



माझी मल्कापुरास इंग्रजी तिसरी इयत्ता पास झाल्यावर, मी दप्तर गुंडाळून वडगावीं घरीं आलों. याचा अर्थ माझ्या मतें माझें शिक्षण संपलें असा होता. मल्कापुरास माझ्याबरोबर शिकत असलेलीं मुलें फार श्रीमंत होतीं असें नाही, कांहींची स्थिति चांगली होती. पण ब्राह्मण समाजास शिक्षणाची दुर्दम्य इच्छा असल्याने, कांही मुलें कोल्हापूर, रत्नागिरी, ज्मखिंडी व इंदूर येथे पुढील शिक्षणासाठी गेलीं. त्यांपैकी एकाचे (दामोदर काटे यांचे) वडील मल्कापूरचे रहिवासी असून त्यास तेथे जहागीर-कचेरींत कारकुनीची नोकरी होती. शिवाय त्यांना आमच्या गावीं थोडीच इनाम जमीन होती. त्यांनी आमच्या गावीं घर बांधलें होतें. घराजवळ एक बांधीव आड होता. वास्तविक काट्यांची स्थिति आमच्यापेक्षा फार चांगली होती. तथापि त्यांनासुद्धा कोल्हापुरास दुय्यम शिक्षणासाठी आपल्या मुलास ठेवतां आलें नाही, म्हणून त्यांनी दामोदर यास इंदुरास डॉक्टर रावे यांचेकडे पाठविलें. डॉक्टर रावे मूळचे कोल्हापूरचे. ते कोल्हापूरच्या कांही ब्राह्मण विद्यार्थ्यांची मेडिकल स्कूलमध्ये सोय करीत. माझे दुसरे वर्गबंधु आत्माराम धोंडू कारखानीस हे कोल्हापूरच्या राजाराम हायस्कुलांत गेले. त्यांना परत तिसरींतच बसावें लागलें. मी मल्कापूर सोडून घरीं आल्यावर माझ्या वडिलांचें मन द्विधा झालें होतें. कारण कोल्हापूरच्या शिक्षणाचा खर्च त्यांच्या आवाक्याबाहेर होता. आणि मीं इंग्रजी शिक्षण घेतलें तरी शेवटीं मला शेतीच करावी लागणार हें जाणूनसुद्धा त्यांना वाटे की आपल्या मुलानें आणखी कांही दिवस तरी शिकावें. त्यांनीं माझें मत विचारलें. माझी इच्छा अर्थात् पुढें शिकावें अशी असल्याने, तुम्हीं पाठवल्यास पुढच्या शिक्षणासाठी कोल्हापुरास जरूर जाईन असें मीं सांगितलें. माझ्या आईनेंहि मला पाठिंबा दिला.

मी माझे मामा (गोविंदराव) व वडील यांच्याबरोबर कोल्हापुरास गेलों. प्रथम

खानावळींत जेवण्याचें ठरविलें. त्या वेळीं ब्राह्मणाच्या खानावळींचा दर महिन्यास पाच रुपये होता. हा दर आम्हास जास्त वाटला. शिवाय खानावळीच्या मालकांनी सांगितले की, तुम्ही मराठे असल्यामुळे तुम्हास निराळें बसावें लागेल. तुमचें पानहि तुम्हास उचलावें लागेल. हें ऐकून आम्ही परत गावीं आलो. ही हकीकत माझे श्वशुर लक्ष्मणराव माने नाईक यास समजली. त्यांचा एक स्नेही बाबाजी चिले नांवाचा (मराठा गवळी) टाउन हॉल बागेत मुख्य माळी कामगार होता. लक्ष्मणराव मामा त्यास भेटले व त्याच्याकडे माझी राहण्याजेवण्याची सोय केली. आम्ही त्यास दरमहा साडेतीन रुपये देत होतों. शिवाय त्याच्याकडे दरसाल एक मण भात व गुऱ्हाळातील काही गूळहि देत असू. बाबाजी चिल्याचा मुलगा तुकाराम न्यू इंग्लिश स्कूलमध्ये तिसऱ्या इयत्तेत शिकत होता, म्हणून मींहि त्याच शाळेंत जाण्याचें ठरविलें होतें. पण मला माझ्या बलवत्तर नशिबानें कसें ओढलें होतें याच्या पाठीमागे लहानसा इतिहास आहे. मी न्यू इंग्लिश स्कूलमध्ये नाव घालण्यास जाण्यापूर्वी तुकाराम चिल्याबरोबर जुना राजवाडा पाहण्यास गेलों होतों. वाड्यात जाण्यास एका भव्य नगारखान्यातून जावें लागतें. वाड्यातील अंबाबाईचें देऊळ पाहून आम्ही परत येताना नगारखान्यातून बाहेर पडलों. नगारखान्याला लागूनच त्या वेळचें राजाराम हायस्कूल व कॉलेज आहे. मी नगारखान्याबाहेर भिंतीजवळ लघवीस बसलों. हें हायस्कूलचे व्हाइस प्रिन्सिपाल पराजपे यानी पाहिलें व पहाऱ्यावरील सत् नाइकास मजकडे पाठवून मला बोलावून घेतलें. लाल अंगरख्याच्या शिपायास पाहून मी एक खेडवळ मुलगा घाबरलों होतोंच. पराजपेसाहेबानी मला तेथे का लघवीस बसलास म्हणून विचारलें. "मला काही माहीत नव्हते, मी चुकलों, मला माफ करा" असें मीं त्याना सांगितलें. त्यानी "तू कुठला, काय करतोस" म्हणून विचारलें. मीं इंग्रजी शिकण्यास आल्याचे त्याना सांगितले. त्यावर ते म्हणाले, "तू जर आमच्या राजाराम हायस्कुलात नाव घालशील तर तुला सोडतों. नाही तर पोलीसगेटावर पाठवितो." मीं राजाराम हायस्कुलात नाव घालण्याचें कबूल केलें.

पराजपेसाहेबानी एक शिपाई बरोबर देऊन मला गुजरींत पाटणकराच्या वाड्यात राजाराम हायस्कूलची शाखा होती तिकडे नाव नोंदण्यास पाठविलें. तेथे मला रेणावीकर मास्तराच्याकडे नेले. त्याना मीं सांगितलें की, माझी इंग्रजी तिसरी इयत्ता मल्कापुरास पास झाली आहे व मी परीक्षेत पहिला आलों आहें. रेणावीकर मास्तरानी मला भूगोलातील व इतिहासातील बरेच प्रश्न विचारले. त्या सर्वांचीं मीं बरोबर उत्तरें दिलीं. तेव्हा ते म्हणाले, "काही हरकत नाही. तुझें नाव आम्ही चौथ्या इयत्तेंत घालतों." आदल्या दिवशीं मल्कापुरास मजबरोबर शिकत असलेल्या आत्माराम कारखानीसाची गांठ पडली होती. त्याने आपण हायस्कुलातच तिसरे इयत्तेत असल्याचें मला सांगितलें होतें. तेव्हा मी रेणावीकर मास्तराना म्हणालों, "मास्तर, मला आत्मारामबरोबर तिसऱ्या इयत्तेतच बसवा." "असे का?" म्हणून मास्तरानी

मला विचारलें. मी म्हणालों, "येथे माझी कोणाची ओळखपाळख नाही. आत्माराम तेवढा माझ्या ओळखीचा आहे. मी त्याच्याबरोबर शिकेन." अशा रीतीने योग्य मार्गदर्शनाच्या अभावीं मी होऊन माझे एक वर्ष गमावलें.

मी टाउन हॉल बागत माळ्याचे बिऱ्हाडीं पहिलीं दोन वर्ष राहिलों होतो. टाउन हॉलजवळच शनिवारपेठेंत शिपुगड्याची तालीम होती. तेथे मी रोज सध्या काळीं मेहनत व कुस्ती करावयास जाई. पुढे त्या माळ्याची बदली एजन्साहेबांच्या बावडेरस्त्यातील बागवर झाली. तेव्हा माळी कामगाराला टाउन हॉल सोडावा लागला आणि त्याने आपले बिऱ्हाड राजाराम हायस्कूलजवळ जनरल लायब्ररीच्या पाठीमागे चोळात नेलें. ही जागा हायस्कूलजवळ असल्याने मला सोईची होती, पण त्या घरी जागा अपुरी असल्यामुळे मीं जवळच हायस्कूलच्या सरकारी तालमीच्या माडीवर अभ्यासास व झोपण्यास जाऊ लागलों. (आता तालमीचें रूपांतर लायब्ररींत झाले आहे.) तेथे माझे काही मराठे स्नेही अभ्यासासाठी राहात. तेथे रोज त्यांच्याबरोबर मी तालीमहि करीत असें व तेथेच रोज रात्रीं झोपत असे.

त्या काळच्या मानाने माळी कामगाराची सांपत्तिक स्थिति व राहणी बरी होती. हे माळी कामगार एजटसाहेबाच्या बगल्यावर काम करीत असल्याने त्याना एजटसाहेब चहा घेताना दिसत. याचा परिणाम असा झाला की, माळीहि आपल्या घरीं चहा घेऊ लागले. माळ्याच्या घरीं चहा व दूध नव्हतेंच. गूळ अगर साखर घालून ते चहा घेत घरात दुसरे कोणी चहा घेत नसत. घरात कोणी आताच्या प्रमाणे न्याहारी करीत नसे. कोल्हापुरास त्या काळीं जेवणात भाजीपाल्याची फारशी वहिवाट नव्हती. तथापि माळ्याच्या घरीं अन्न—'भात, भाकरी, आमटी'—चांगलें असे. आठवड्यातून आणा दोन आण्याचें मास आणून त्याचा डाळीबरोबर रस्सा करीत. आठपधरा दिवसानी त्याच्या घरीं गोडधोडहि होई. माळ्याच्या घरीं माझे राहणें एका घरच्याच माणसासारखें असे व मी तेथे पाच वर्षे सुखाने राहिलों.

मीं राजाराम हायस्कुलात नाव घातलें त्या वेळीं पहिल्या चार इयत्ता गुजरी व महाद्वार रस्त्याच्या कोपऱ्यात नागपुरकराच्या वाड्यात होत्या. इग्रजी पाचवी, सहावी व सातवी (मॅट्रिक) व कॉलेजचे दोन वर्ग (पी० ई० व इटर) नगारखान्याजवळील राजाराम हायस्कूलच्या इमारतींत भरत शिवाय या इमारतींत एक सरदार क्लास असे. या क्लासाची भरती होण्यासाठी मला या क्लासात काही दिवस बसविलें होतें. सरदार क्लासात त्या वेळीं साताऱ्याचे भाऊसाहेब महाराज व लेकापुरकर इनामदार होते.

कोल्हापुरात प्रत्येक पेठेंत एकदोन तालमी असत. शाहूमहाराज कुस्तीचे शोकीन होते. त्यानी जुन्या राजवाड्यातील मोतीबागत एक, नव्या राजवाड्यावर एक व बाबुजमालात एक, अशा तालमी चालविल्या होत्या. याशिवाय पुष्कळ पहिलवान लोकाना खुराक अगर तनखे ते देत. शहरातील तालमींत कुस्तीशिवाय फरीगदगा विटा, बाणा व बनिया चालविणें हें शिकविलें जाई.

अर्वाच एक शिपुगड्याची तालीम टाउन हॉल-भागच्या पश्चिमेस शनिवारपेठेंत असे. तेथे माझे वर्गबंधु डॉ० बळवंतराव चव्हाण (त्यास आम्ही तेव्हा बाळू म्हणत असू) व त्या वेळचे असिस्टंट पोलिटिकल एजंट मांजरेकर यांचा मुलगा लक्ष्मण व मी मिळून कुस्ती खेळण्यास जात असू.

पूर्वी मला पट्टा खेळण्याचा नाद होता. शिपुगड्याच्या तालमींतील तरुण दांडपट्टा व फरीगदगा खेळण्यांत पटाईत असत. मीहि त्यांच्याबरोबर फरीगदगा व दांडपट्टा खेळू लागलों. हा क्रम चार वर्षे चालला. त्याच वेळीं राजाराम हायस्कुलांत इंग्रजी पद्धतीचा व्यायाम शिकविण्यासाठीं जी तालीम होती त्या तालमींत मी सिंगलबार, डबलबार, ट्रॅपीझ, वगैरे शिकण्याकरिता जात असें. या तालमीवरच्या गॅलरींत मामा जाधव, बळीराम पाटील, हरबा पाटील, हिंदुराव मोसले हे व्यायामपटु मराठा विद्यार्थी तालीम व अभ्यासाकरिता राहात होते. तेथेंच मीहि राहिलों. ज्या माळी कामगाराच्या घरीं मी राहात असे त्याची बदली काही दिवसांनी नव्या राजवाड्यावरील बागेंत झाल्याने त्याने आपलें बिऱ्हाड राजाराम कॉलेजजवळ आणलें. अर्थात् मला शनिवारांतील शिपुगड्याची तालीम फार लांब पडू लागली. त्यामुळे कुस्तीचा नाद सोडावा लागला. पुढे वर उल्लेखिलेल्या स्नेह्यांबरोबर सरकारी तालमीच्या माडीच्या गॅलरीवर मी राहू लागलों तेथील इंग्रजी पद्धतीच्या व्यायामांत जास्त लक्ष घालू लागलों व त्या खेळांत चांगला तरबेज झालों. दरसाल मला बक्षिसें मिळत. मॅट्रिक परीक्षा पास होईपर्यंत हा क्रम अव्याहत चालू राहिला. या माझ्या तालमीच्या शौकाचा पुढे मला फार उपयोग झाला व होत आहे. आज ब्याऐंशीव्या वर्षींसुद्धा माझा तोल आपोआप सांभाळला जातो. कोल्हापुरास व हैदराबादेसहि डांबरी रस्त्यावर पावसाळ्यात लोकांनी निष्काळजीपणाने टाकलेल्या केळीच्या सालावरून बराच वेळ पाय घसरल्याचा अनुभव मला आला आहे; पण शरीरास वळणच लागलें असल्याने मी आजवर तरी कधी पाठीवर पडलों नाहीं. आता चालताना काळजी घेऊन चालतों हें खरें. काठी हातात असते, पण ती टेकीत जाण्याची सवय व गरज आजवर भासत नाही मला वाटतें, माझ्या शारीरिक स्वास्थ्याचें व दीर्घायुष्याचें कारण, तरुणपणची तालीम व व्यायाम हीं असावात. आजहि मला सकाळसंध्याकाळीं मैल-दोन मैल चालल्याशिवाय बरें वाटत नाही.

माझ्या वेळीं इंग्रजी चौथ्या इयत्तेपासून एक दुसरी भाषा (सेकंड लँग्वेज) घ्यावी लागे. मी व माझे सातआठ मराठा वर्गबंधु यांनी संस्कृत घेण्याचा हट्ट धरला. आम्ही संस्कृतच्या वर्गात बसू लागलों. परंतु शास्त्रीबुवांनी आमचा पराभव केला. आमच्या वेळीं पुण्यामुंबईप्रमाणे विद्यार्थ्यांनी टोपी (हंगेरियन कॅप) घालण्याची प्रथा पडली नव्हती. मराठा विद्यार्थी गुलाबी रंगाचे पटके बांधीत, तर ब्राह्मण विद्यार्थी पांढरे अगर रंगीत रुमाल बांधीत. गणेशशास्त्र्यांना अब्राह्मणांनी त्यांच्या संस्कृत वर्गांत बसणें अपथ्य होतें. पण त्यांना तसें बोलता येईना. मग त्यांनी आमच्यातील

एखाद्या मुलास सांगावें, "अरे, लाल पटका, 'रामो हरिः करी' म्हण." त्याने जरी स्पष्ट व शुद्ध भाषेत म्हटलें तरी शास्त्रीबुवा म्हणायचे, "अरे, तुला कसे संस्कृत येईल!" अशा रीतीनें आम्हा मराठा विद्यार्थ्यांचा फार हिरमोड होऊन आम्हास पर्शियन घ्यावें लागलें. आमचे पर्शियनचे शिक्षक खरीच फार भले गृहस्थ होते. ते मुसल्मान होते. पण स्वतः संस्कृत घेऊन मॅट्रिक पास झाले होते—अर्थात् कोल्हापुरास नव्हे! ते विद्यार्थ्यांशी प्रेमाने वागत.

सन १८९९ सालीं कोल्हापुरात प्लेग फार जोरात होता. तथापि मॅट्रिकची प्रिलिमिनरी परीक्षा होईपर्यंत मी तेथेच तालमीच्या गॅलरीतच राहात होतों. प्रिलिमिनरीच्या परीक्षेत मला फॉर्म मिळाला नाही, म्हणून मी निराश होऊन गावीं आलों. नतर बैलगाडी करून आईसह पंढरपुरास गेलों आणि सावकाश यात्रा करून पधरा दिवसानी गावीं परत आलों. दरम्यान माझे एक स्नेही रगराव धोपाडे (जे या वेळीं राजाराम कॉलेजचे क्रिकेट सेक्रेटरी होते) त्यानी प्रिन्सिपॉल कँडी याच्याकडे जाऊन माझ्याबद्दल रदबदली केली, फॉर्म मिळवून फीहि भरली व मला तसे पत्र माझ्या गावीं पाठविलें. पत्रात मला परस्पर मुंबई केंद्रास परीक्षेस जाण्यास लिहिलें होतें. मी पंढरपुराहून परत येताच, तें पत्र माझ्या हातीं पडलें. मीं पधरा दिवसात कसलेंहि पुस्तक उघडलें नव्हतें म्हणून मला पास होण्याची खात्री वाटेना. पण वडील म्हणाले, "जा, परीक्षस बैस. काही अनुभव तरी येईल. नापास झालास तर पुढच्या वर्षी पास होशील." या उत्तेजनामुळे मला बराच धीर आला आणि मीं कऱ्हाड स्टेशनावर आगगाडींत बसून मुंबईस जाण्याचें ठरविलें. याच वेळीं सातारा जिल्ह्यातील मागल्याच्या पडित घराण्यातील एक मुलगा (त्याचें घर आमच्या गावाजवळील भेडसगावातहि होतें) माझ्याबरोबर निघाला. वडिलानी घरचें घोडें व माणूस दिला होता. आम्ही पहाटे तीन वाजता निघून दुपारीं सुमारें १२ वाजता कऱ्हाडनजीकच्या एका विहिरीवर आलों व सडकेजवळच्या झाडाखाली विश्रांति घेण्याचा बेत केला. विहीर बाधीव नव्हती व तिला चागल्या पायऱ्याहि नव्हत्या. दुपारची बाराची वेळ. पोटात कावळे नाचू लागले होते. मीं विहिरींत हळूहळू उतरून तांब्याभर पाणी आणलें, पण माझा ब्राह्मण स्नेही फार सोवळा असल्यामुळे त्याला तें पाणी चालेना. म्हणून तो छाती करून माझ्याबरोबर कसा तरी विहिरींत उतरला व पाण्याचा तांब्या भरून मुठींत जीव धरून वर आला. माझ्या आईने माझ्याबरोबर तळलेल्या सांजुऱ्या व झुणकाचपात्या दिल्या होत्या. मीं पडितास फराळास बोलाविलें. तो सोवळा ब्राह्मण प्रथम कांहीं येईना. पण तुमचेपुढे काय करणार! त्याने फक्त तळलेल्या सांजुऱ्या खाल्ल्या, पण त्याचें पोट भरलें नाही. त्याच्याबरोबर तादूळ व पिठल्याचें पीठ होतें. "आपण मातपिठलें करू या." असे तो म्हणाला. परतु विहिरींतून पाणी आणण्यास तो धजेना मीं आणलेल्या पाण्यात त्याने थोडें आपण आणलेलें पाणी टाकलें आणि मातपिठलें केलें, व दोघानी तें